# अर्पणपत्रिका

रसिकवर्य

**श्री. नरसिंह चिंतामण केळकर,**

पुणें, यास—

**सादर सा. न. वि. वि.**

प्रिय महाशय,

माझी प्राथमिक शाळेंतील बोधभाषा कानडी होती. पण बापटसंपादित लो. टिळकांच्या "आठवणी आणि आख्यायिकां"च्या पहिल्या खंडाला आपण जी अत्यंत सर्वांगसुंदर मराठी प्रस्तावना जोडली आहे तिच्या वाचनानें मी आपला अढळ भक्तच बनलों. तेव्हांपासून आपल्या सुबोध व संयमपूर्ण लेखनगुणांइतक्याच सुंदर व आकर्षक लेखनशैलीनें मोहित होऊन, प्रत्यक्ष गुरु नसतां, माझ्या अल्प मतीप्रमाणें मराठींत लेखनव्यवसायाला प्रारंभ तर केला. नी त्याचेंच पहिलें 'कच्चें' फळ, 'पत्रं पुष्पं फलं तोयं यो मे भक्त्या प्रयच्छति' या न्यायानें आपल्याला, आपल्याच संमतीनें, परमादरपूर्वक व नम्रभावपूर्वक आज समर्पण करीत आहें.

कारवार,<br>
११ आगष्ट १९३७.

आपला,<br>
**मारुति पै.**

# अनुक्रमणिका




पृष्ठ

अन्तःकरणाच्या गाभाऱ्यांत (निवेदन) ... १–४

## (१) निरीक्षणाच्या निकषावर

### (शब्दचित्रें)

१. बालिकेच्या लीला ... ... ... ... ३
२. संगीताचें प्रतीक......शीड!... ... ... ५
३. संगीत व साहित्य यांजमधील विहार (एक अंतर्मुख अनुभव) १०
४. प्रो. दत्तो वामन पोतदार (ओझरतें स्वभावदर्शन) ... १६
५. आमचा गेरसप्पाचा प्रवास ... ... ... २८
६. फोटोची हौस पुरी फिटली! ... ... ... ३६

## (२) साहित्यविमर्श

### (अ) अनुवादित लेख

१. साहित्यातील 'ब्रह्मराक्षस' ... ... ... ४७
२. "कन्नड साहित्य व त्याचीं ध्येयें" ... ... ५४
३. "आधुनिक कवींची काव्याची दृष्टि" ... ... ६७

### (ब) इतर लेख

४. संस्कृति व साहित्य यांजमधील स्थित्यंतरें ... ... ९५
५. टागोरांचें ओजस्वी तत्त्वज्ञान ... ... ... १०७

## (३) समाज, संस्कृति व इतिहास

१. वेदकालीन स्त्रियांची सामाजिक स्थिति ... ... ११७
२. भारतीय नौकानयनाचा इतिहास ... ... १२४

## (४) लेखनव्यवसाय

पृष्ठ

१. कांहीं महाराष्ट्रीय साहित्यसेवकांचे लेखनव्यवसाया-
विषयीं मननीय विचारः— ... ... १४३
निवेदकः—(१) श्री. न. चिं. केळकर.
(२) प्रो. श्री. ना. बनहट्टी.
(३) प्रा. मा. त्र्यं. पटवर्धन.
(४) श्री. चिं. वि. जोशी.
(५) श्री. वा. वि. जोशी.
(६) कै. वाग्भट ना. देशपांडे.
(७) प्रो. शं. दा. पेंडसे.
(८) श्री. ग. त्र्यं. माडखोलकर.
२. दोघां साहित्यसेवकांचे लेखनविषयक अनुभव ... १५२
निवेदकः—(१) रावसाहेब गो. स. सरदेसाई.
(२) श्री. वि. स. खांडेकर.
३. जीवितांतील आशा-निराशा (ले.–सहानुभवी) ... १६२
४. होतकरू लेखकाची मनोभूमिका (चिंतनपर लघुनिबंध) १७६
५. लेखिकेच्या जीविताचा प्रधान हेतु कोणता ? (ले.–सौ. सीमोर) १८४
६. कार्लाईल व लेखनव्यवसाय ... ... ... १९५

## (५) वाङ्मय व जीवित

१. वाङ्मय हें शास्त्र कीं कला ? ... ... ... २०३
२. वाङ्मयाचें व्यसन व उदासीनता ... ... २२६

## (६) मनोविश्लेषण

(मानसशास्त्रीय तात्त्विक चर्चा)

१. मानवी मनाचे दोन प्रधान दृष्टिकोन ... ... २५९
२. अंतःकरणाच्या दोन मूलभूत प्रवृत्ती ... ... २७५
३. मानवी मनाचे दोन कप्पे ... ... ... २९५

## (७) वाङ्मयीन चरित्रचर्चा


पृष्ठ

१. इतिहासकार गिबन्‌चें आत्मचरित्र ... ... ३०५


## (८) जीविताचा हेतु व ध्येय


१. उत्कृष्ट जीविताचा प्रधान हेतु कोणता ? ... ... ३४१

२. लेखकांची प्रतिभा व नीति याविषयीं गॅल्सवर्दीनें काढलेला रसबोध ३४५

३. जोसेफ मॅझिनीचीं कार्लाईलबाईला पत्रें ... ... ३५५


# परिशिष्ट

## प्रमुख व्यक्तींचा ओझरता वाङ्मय-परिचय

### (१) युरोपीय लेखक


(१) गटे ... ... ... १

(२) टॉड ... ... ... १

(३) फ्रूड ... ... ... १

(४) मॅझिनी ... ... ... २

(५) लबॉक ... ... ... २

(६) लुईस ... ... ... २


### (२) मराठी लेखक


(१) खांडेकर वि. स. ... ... ५

(२) जोशी चिं. वि. ... ... ५

(३) जोशी वा. वि. ... ... ५

(४) जोशी वा. म. ... ... ५

(५) देशपांडे वाग्भट ना. ... ... ६

पृष्ठ

(६) पटवर्धन मा. त्र्यं. ... ... ६
(७) पेंडसे शं. दा. ... ... ६
(८) बनहट्टी श्री. ना. ... ... ६
(९) माडखोलकर ग. त्र्यं. ... ... ७
(१०) सरदेसाई गो. स. ... .. ७


## (३) कानडी लेखक


(१) अय्यंगार मास्ती ... ... ७
(२) श्रीकंठय्या ... ... ८
(३) सीतारामय्या ... ... ८


## सूचि


(अ) विषयपर ... ... १
(ब) व्यक्तिपर ... ... ६
प्रमुख संदर्भग्रंथांची यादी ... ... १०
शुद्धिपत्र ... ... १३


---

*

## अंतःकरणाच्या गाभाऱ्यांत

"स्वतःचें मनोविनोदन हाच (या आत्मचरित्रांत) माझा हेतु आहे, नी तेंच त्याचें पारितोषिकहि म्हणतां येईल." –गिबन्.

सहृदय वाचक,

गेल्या सात वर्षांत मी मराठी मासिकांत वेळोवेळीं लिहिलेल्या लेखांतून व काहीं अप्रकाशित लेखांतून **वाङ्मय, संस्कृति, लेखन व जीवित** या विषयांवरील निवडक लेखांचा व अनुवादांचा संग्रह प्रथमच आपल्यापुढें नम्र बुद्धीनें ठेवण्यांत मला मोठा आनंद वाटतो. वास्तविक मला या कामीं कोणीहि आग्रह केलेला नाहीं. माझ्या या प्रयत्नांच्या परिणामाला सर्वस्वीं मीच उत्तरदायी आहें. म्हणून गिबन्च्या वरील उक्तींत किंचित् स्थित्यंतर करून मी असें म्हणेन कीं, माझें स्वतःचें मनोविनोदन हाच या लेखसंग्रहाचा प्रधान हेतु नी आपलें समाधान हेंच माझें पारितोषिक.

खरें सांगूं का ? माझी उपजत प्रवृत्ति उत्कट भावनाशील साहित्यप्रेमीची आहे, नी माझ्या वाङ्मयरसविषयक विशिष्ट अभिरुचीशीं साधर्म्य असलेल्या इंग्रजी, मराठी, कानडी आदि साहित्यांतील नामांकित ग्रंथकारांच्या उत्कृष्ट कृति वाचतांना मला ज्या अलौकिक आनंदाचा लाभ होतो, त्या आनंद-वर्तुलाचा परिघ स्वतःच्या वाचनापुरताच मर्यादित न ठेवतां, आपल्या-सारख्यानाहि बरोबर घेऊन तो वाढविण्याच्या विनम्र उपासकाच्या भूमिके-मुळेंच मी या संग्रहांतील लेखांची मुख्यतः रचना केली आहे. वास्तविक मी अजून साहित्यरसाची गोडी चाखूं पाहणारा अस्थिर भ्रमरच आहें, नी केवळ याच दृष्टीनें मी वेळोवेळीं वाङ्मयवाटिकेंत उडत असतां मधुर फुलां-पासून मूळ माझ्याच उपयोगाकरितां जो मकरंद गोळा केला, त्यांतील बराचसा अंश विशेषतः आपल्यासारख्यांच्या सेवनाकरितां या संग्रहांत व्यवस्थित सांठविलेला आहे. यावरून आपल्याला माझ्या प्रस्तुत मनः-स्थितीची यथार्थ कल्पना येईल असें मी समजतों. कारण माझी या ग्रंथा-

संबंधींची भूमिका अधिकारी व निर्दोष तज्ज्ञ पंडिताची नाहीं; जिज्ञासु पण स्खलनशील नम्र विनीताची आहे. प्रतिभावान् युगप्रणेत्या वरकवीची नाही; रसिक वाङ्मयरसास्वादेच्छु काव्यप्रेमीची आहे. उपवनांतील फुलझाडांने कसोशीनें संवर्धन करण्यांत गुंगणाऱ्या कुशल माळ्याची नाहीं; शब्दो-पासनेकरिता फुलबागेतील ओंजळीभर फुलें वेंचणाऱ्या विनम्र भक्ताची आहे. नी याच स्निग्ध सहानुभूतीच्या दृष्टीनें आपण माझ्या या प्रथम कृतीकडे कौतुकानें पहाल अशी मला आशा आहे.

वरील भ्रमराच्यासारखीच माझी वाचनाची कांहीशी आधाशी भूक पाहून जेव्हां माझा एक निकटचा साहित्यप्रेमी मित्र माझी सर सुप्रसिद्ध मूर्तिभंजक गिजनी महमूदशीं विनोदानें करतो, तेव्हां त्यांतील सार्थ खोंच पाहून मला एक प्रकारची असंवेद्य मौज वाटते व आत्मप्रत्ययाची चुणूक भासते. कारण हातीं पडतील तीं माझीं व इतरांचीं इंग्रजी, कानडी, मराठी व हिंदी पुस्तकें व नियतकालिकें सपाट्यानें वाचण्याच्या माझ्या विलक्षण नादामुळे नवें पुस्तक हातीं येतांच अर्धीमर्धीं वाचलेलीं, व तृष्णेनें नुसतीं ओझरतीं पाहिलेलीं, जुनीं पुस्तकें गिजनी महमूदपुढील अगणित द्रव्यराशींप्रमाणेंच माझी अतृप्त तळमळ सारखीच जाणवितात नी वाढवितात!

दुसऱ्या एका विरक्त विद्वानानें माझी तुलना हॅमर्टनच्या "बौद्धिक जीवन" ( Intellectual Life) या ग्रंथांतील एका लंगड्याशीं केली आहे. तो विद्वान् म्हणतो, "हा लंगडा स्वतःच्याच हातानें आपली बाबा-गाडी हांकीत प्रवास करून वाचनालयें गांठी, लेखकांच्या भेटी घेई, स्वतः वाचून लिहिण्याचा प्रयत्न करी, आपलें लेखन दुसऱ्यांस वाचून दाखवून त्यावरील टीका ऐके, आणि अशा रीतीनें लेखनकलेंत फारशी प्रगति झाली नाहीं तरी खट्टू न होतां सतत प्रयत्न चालू ठेवी. खेरीज त्याला पोटा-साठीं कोळसेविक्याचें काम करावें लागे तें वेगळेंच. हॅमर्टनच्या मतें हा लंगडा तरुण बौद्धिक जीवनाच्या विद्यालयांत उमेदवार होण्यास मनो-दृष्टया पूर्णपणें पात्र होता. आणि अशाच कोंपऱ्यांत पडलेल्या अज्ञात व्यक्तींच्या प्रयत्नांनीं समाजाचें बौद्धिक जीवन समृद्ध होत असतें व त्याची पातळी वर चढण्यास मदत होत असते हें कोणी विसरूं नये." इत्यादि.

अंमळ आत्मनिरीक्षणाअंतीं वरील दोनहि दृष्टांत मला पुरते पटतात व

त्यांत सुचविलेले दोष शक्य तों निवारण्याकरितां मी धडपडतच असतों व पुढेंहि तसे सतत प्रयत्न करीन म्हणतों. पण तिसरीहि एक दीर्घ कल्पना माझ्या चिकित्सक विनोदबुद्धीला चाटून जाते. ती हीच कीं, सर्व्हांटेसविरचित विक्षिप्त डॉन क्विक्झोटशीं तर माझें कांहींसें साधर्म्य जुळणार नाहीं ना! नी त्याच्या त्या प्रतापी शिलेदारीच्या विलक्षण वेडासारखीच माझ्या या हावऱ्या साहित्यसेवेच्या दुर्दम्य व्यसनाची काहीशी परिणति तर होणार नाहीं ना!

विविध साहित्यविभागातील माझा अचूक कल मला प्रथम नीट ओळखतां न आल्यामुळें सुमारें चार वर्षांपूर्वीच्या माझ्या संशयित व तळमळणाऱ्या मनःस्थितीचें द्योतक दिग्दर्शन मराठी साहितींना उद्देशून मीं लिहिलेल्या या ग्रंथांतील जिज्ञासामूलक प्रश्नमालिकेंत आपल्याला आढळेल. आज मी येथें आपल्याला इतकेंच सांगेन कीं, माझी मूळ प्रवृत्ति उत्पादक व उत्कट ललितकलाप्रेमीची (creative artist) नी चिकित्सक विनोदप्रियाची असल्याची तीव्र संवेदना मला आतां जाणवूं लागली आहे. प्रारंभींच्या "निरीक्षणाच्या निकषावरी"ल कांहीं दृश्यात तिचें प्रत्यंतर आपल्यास पडताळता आल्यास पहा असें मी येथें हळूच नम्रपणें सुचवितों, नी असा लेखक भावनात्मक कलाकृति रचण्याऐवजीं प्रथमच बौद्धिक निबंधकार होण्याचे प्रयत्न करीत असल्यास त्याची कृति कशी काय उतरते, याचीं प्रत्यक्ष मनोरंजक उदाहरणें आपल्याला या ग्रथात दिसतील नी तिऱ्हाइताच्या भूमिकेनें आपणच त्यापासून योग्य तीं अनुमानें काढूं शकाल असेंहि म्हणण्याचें धाडस करतों.

"प्रतिभा व जीवन" या माझ्या प्रश्नावलीला कांहीं प्रसिद्ध साहितींकडून आलेलीं विविध भाषांतील उत्तरें मराठींत अनुवादून या ग्रंथात एका स्वतंत्र प्रकरणात गोंवण्याचा माझा प्रथम विचार होता. पण या ग्रंथाचा विस्तार आवाक्याबाहेर गेल्यामुळें पदरच्या सारभूत विवेचनाची भर घालून नी आणखी कित्येक नामांकित साहितींचीं उत्तरें संग्रहून, तो प्रबंध स्वतंत्र रीतीनें प्रसिद्धिल्यास सरस होईल असें माझें व माझ्या मित्रांचें मत झाल्यावरून हा विचार तूर्त रहित करावा लागला. या ग्रंथप्रकाशनांत आपल्याकडून योग्य प्रोत्साहन मिळाल्यास तो प्रबंध सवडीनें आपल्यापुढें सादर करण्याचा माझा संकल्प आहे.

विविध भाषांतील सांस्कृतिक देवघेवीनें एकमेकींची समृद्धि होत असते असें माझें ठाम मत असल्यामुळेंच मला मार्गदर्शक झालेले इंग्रजी व कानडी साहित्यांतील कित्येक उद्बोधक विचारप्रवाह आपल्यालाहि तितकेच उद्बोधक वाटतील या विश्वासानें मी या ग्रंथांत अनुवादून संपादिले आहेत. आपलीं हीं अमोल भाषणें कानडींतून मराठींत अनुवादिण्यास संमति दिल्याबद्दल श्रीमान् बी. एम्. श्रीकंठय्या व श्रीमान् वी. सीतारामय्या यांचा मी अत्यंत ऋणी आहें.

या ग्रंथाच्या शेवटीं विषयपर व व्यक्तिपर सविस्तर सूचि, प्रमुख संदर्भ-ग्रंथांची यादी व प्रासंगिक वाङ्मयिक व्यक्तिपरिचय दिली असून, त्यांमुळें या ग्रंथाच्या उपयुक्ततेंत तितकीच भर पडेल अशी मला आशा आहे.

'लेखनव्यवसाय' या प्रकरणांतील माझ्या प्रश्नावलीला तत्परतेनें उत्तरें पाठवून तीं या ग्रंथांत आपणापुढें ठेवण्यास संमति दिल्याबद्दल मी त्या पत्रलेखकांचा आभारी आहें. तसेंच या ग्रंथाच्या संपादनकार्यांत मला निरलसपणें व आत्मीयतेनें वेळोवेळीं अमोल सल्ला दिल्याबद्दल पुण्याच्या "ध्रुव" मासिकाचे संपादक, श्री. रा. प्र. कानिटकर, एम्. ए. यांचा व मुंबईच्या माजी "आत्मोन्नति" मासिकाचे संपादक, श्री. गो. स. वाघ यांचा मी फार आभारी आहें. येथील ललितवाङ्मयप्रेमी मित्रद्वय श्री. हनुमंतराव माजरेकर, बी. ए., एस्. टी. सी. व श्री. देवेंद्र शेणै यांनींहि या ग्रंथसंपादनाच्या कामीं कांहीं उपयुक्त सूचना करून मजवर उपकार केले आहेत.

ब्राह्मणगल्ली, कारवार<br>(जि. उत्तर कानडा).<br>नागपंचमी,<br>११ माहे ऑगस्ट १९३७.

आपला लोभाकांक्षी,<br>मारुति अनंत पै.

# बालिकेच्या लीला

आत्यंतिक कलासक्तीपुढें मनमोकळें प्रेमबीम करायला 'फुरसत' नसलेला मी एके दिवशीं नित्याप्रमाणें वाचन करण्याकरितां माझ्या आवडत्या तक्क्याशीं आडवा झालों. तों एका वर्षाची (१९३४) माझी कमा बोबडे बोल बोलतच माझ्यापाशीं आली आणि माझ्या हातांतील पुस्तक बळेंच काढून घेऊं लागली !

मीं तिजवर रागावण्याचा आविर्भाव आणला, धमकावलें, डोळे वटारले ! पण व्यर्थ ! !

तिचें आपलें ठराविक संबोधन सुरू झालें:— "काका, काऽका !" पुस्तकांतील मजकूर आवडीनें प्यावयास आतुर झालेल्या मी काय पाहिलें ? कमा माझ्या हातांतून पुस्तक काढून घेऊन तें जमिनीवर पसरलेल्या आपल्या पायांवर नीट ठेवून त्याच्या बहिरंगाचे पटापट मुके घेत होती ! आणि मी वाचण्यास पुस्तक नाहीं म्हणून मनांत चरफडत होतों ! शेवटीं बराच वेळ वाट पाहून मी थकलों आणि बऱ्या बोलानें कमा पुस्तक देत नाहींसें पाहून तें तिच्या पायावरून हिसकावून घेतलें ! आणि वर तिच्यावर तीक्ष्ण दृष्टीचे शर सोडले ! !

मला वाटलें होतें कीं, कमा आतां रडायला सुरवात करणार आणि मी माझ्या आवडत्या वाचनसमाधीला मुकणार !

पण कमा काय करीत होती ?

ती मलाच बिलगून पुस्तकाच्या ऐवजीं उलट माझ्याच तोंडाचे बळेंच मुके घेत होती !

वास्तविक साहित्य-संगीतादि कलांच्या चंचल मृगजलापासून त्वरित कीर्तीची तृषा भागविण्यासाठीं धडपडणारा मृग मी !

कौटुंबिक प्रेमाचें मूलभूत जीवनच जणूं मी तेवढ्या क्षणांपुरतें पिण्यास विसरत होतों ! आणि म्हणून "पाण्यावीण मीन जैसा" अशीच माझी मनःस्थिति झालेली !

संसारांतील प्रत्यक्ष प्रेम अजमावण्यापेक्षा चरित्रांतील व कादंबऱ्यांतील चित्रित प्रेमप्रसंगांचीं कथानकें मनमुराद चाखण्याची एकलकोंडेपणाची एककल्ली संवय अंगीं बाणली होती मला !

पण कमाच्या प्रेमपूर्ण गोड मुक्यानें माझ्या वरपांगी निष्ठुर अंतरंगाच्या कठिण करटींतहि प्रतियोगी प्रेमसंवेदनेचें गोड पाणी खळखळलें ! आणि हातांतील पुस्तक एकीकडे फेकून मी माझ्या प्रिय कमाला एकदम हृदयाशीं घट्टच धरलें !!

मात्र, पश्चात्तापदग्ध करुणाश्रूंनीं मला वाटतें, माझे डोळे किंचित् काळ ओलसर झाले होते खरे !!!

---

## संगीताचें प्रतीक,........शीड

सहा वर्षांपूर्वीचे (१९२८) आमच्या गावांतील प्लेगाचें पहिलें वर्ष मला अजूनहि कसें पक्कें आठवतें !

काय ती तेव्हांची प्लेगाची भीति आणि काय तीं जीव घेऊन गांवाबाहेर धूम ठोकणारीं कुटुंबांचीं कुटुंबें ! प्लेग म्हणजे जसा कांही सर्व महाव्याधींचा राजा अशी त्याच्या नवखेपणामुळें आपल्या भाबड्या मनाची समजूत करून घेतलेले लोक प्लेगच्या टापूतून दूर गांवाबाहेर जाऊन चुडतांच्या झोंपड्या बांधून रहात असत. त्या वर्षी आम्ही सर्व मंडळींनीं गांवाबाहेर सुमारें सव्वा मैलाच्या अंतरावर समुद्राच्या चिंचोळ्या खाडीनजीक असलेल्या एका शेतांत जाऊन आमची झोंपडी उभी करविली; आणि जवळच्या वनराजीच्या सान्निध्यामुळें जणूं वनवासच भोगते झालों ! आता माझी मूलभूत एकांतप्रिय प्रवृत्ति चराचर वस्तुमात्रांचें पृथक्करण, सौंदर्यग्रहण व सूक्ष्म चिन्तन करण्याकडे अधिक झुकती असल्यामुळें या स्थानातरात किंबहुना अवस्थांतरांतहि मनाचें समाधान व शांति निश्चल ठेवण्याकरितां कांही पुस्तकें व वाजाची हातपेटी बरोबर घेण्यास मी विसरलों नव्हतों.

या झोंपडींत मी एके दिवशीं सकाळीं सुमारें आठ वाजतां भूप रागांतील 'प्रथम शरण गजवदना जावें' या भजनी पदाचा प्रथम चरण मनोमय त्रितालाच्या ठेक्यात ( कारण तबल्याची साथ नव्हती ! ) पेटीवर वाजवून तल्लीनतेनें गळ्याची साथ करून गात होतों. इतक्यांत अनाहूतपणें आठ दहा जवान अरबाचा तांडा तेथें येऊन ठेपला ! त्यांच्या या आकस्मिक आगमनानें मूढ झालेली बायकामंडळी क्षणांत

आंतल्या बाजूला धांवली ! या अरबांनीं माझ्या गायनाला तबल्याची साथ नाहीं हें पाहून आपल्या टाळ्या तालांत वाजवून संगति लावली व संमति दर्शविली; आणि जणूं असेंच ध्वनित केलें कीं, 'तुमचें गायन-वादन श्रवण केल्याबद्दल त्या सनातन नादब्रह्माच्या पवित्र चरणीं आमची ही ताल धरण्याची तितकीच निःस्वार्थी सेवा रुजू होवो कशी !'

आमची बोली आणि अरबाची बोली यांत महदंतर आहे. त्यांचें बोलणें जलद व गळ्यांतल्या गळ्यात ! मिळून आमचें स्वभाषेंतील बोलणें एकमेकांना कळण्याचा मार्गच नव्हता ! पण जें कार्य कित्ये-कदां जिभेनें म्हणजे भाषणानें किंवा द्विजिव्हेनें उर्फ लेखणीनें होऊं शकलें नसतें, तें अंतरंगांतील ऐक्याच्या तन्मय भावाची अमूर्त संवेदना अचूक व बिनबोभाट व्यक्त करण्याचें नाजुक कार्य, संगीतासारखी अत्युच्च कला सहजीं व क्षणार्धात करूं शकलीच ना !

पण त्या अरबांची तृप्ति इतक्यानेंच पुरी झाली नसावी. माझ्या गायनाला आपल्या तालाच्या साथीची जोड देऊन गायनवादनाच्या जोडीला नर्तनहि केल्याविना ही कलासेवा संपूर्ण होणार नाहीं अशी त्यांना अंतःस्थ रुखरुख लागली असावी; कारण त्याच्यापैकीं तिघे चौघे आमच्या छोट्या झोंपडीच्या बाहेर मोकळ्या जागीं जाऊन या पदाच्या त्रितालाच्या आतील टाळ्याच्या गजराबरहुकूम बाहेर पदन्यास करीत होते ! आणि हें सर्व जणूं काही ('गायनं वादनं तथा नर्तनं संगीतं इति अभिधीयते' [ भावार्थ ] गायन, वादन व नर्तन या तिहींच्या संयो-गाला संगीत ही संज्ञा आहे) या सुप्रसिद्ध वचनाच्या परिपूर्तीसाठीं ! येणेप्रमाणें निःस्वार्थी कलासेवेपायीं निर्हेतुक आनंद सेवण्यांत व लुटण्यांत ते बेहोष झालेले पाहून मीं माझें गाणें थांबविलें आणि अंमळ विश्राति घेण्याकरितां म्हणून बाहेर आलों. इतक्यांत आंतील अरबहि बाहेरच्या मंडळींत मिसळून सर्व मंडळी एकत्र बसली आणि "आच्छा" असे कांहीसे संमतिदर्शक तुटक शब्दखंड तिनें हिंदुस्थानींत उच्चारले व तेथून ती परतली.

पुढें चौकशी करतां मला असें समजून आलें कीं, हे अरब आमच्या

गावीं खारीक व खजूर विकण्याकरितां थेट अरबस्थानाहून मचवे घेऊन आले होते ! त्यांना पिण्यास व नित्य व्यवहारास गोड्या पाण्याची आवश्यकता भासत असल्यामुळें ते आमच्या झोंपडीनजीकच्या विहिरीजवळ पाणी नेण्यासाठीं नित्य सकाळीं येत असत. त्यांतील म्होरक्यानें माझ्या गाण्याचें वर्तमान जवळच खाडीपाशीं जाऊन ओरडून व हातवारे करून आपल्या मचव्यावरील इतर बंधूंना कळविलें असावें आणि तेहि माझ्या अल्पस्वल्प कलासेवेचें श्रवणरूपानें सेवन करण्याकरितां भुर्रकन् पारवे जमावेत तसे स्वच्छंदानें टोळीनें आले असावे !

पण स्वतः कलासेवा व कलासेवन हीं उच्च दृष्टीनें विचार केल्यास निर्हेतुक असलीं तरी, त्याच्या मधुर संयोगानें उमटलेली गोड स्मृति सदैव तरुण रहावी असे प्रयत्न कांही दूरदर्शी विचारवत कृतज्ञताबुद्धीनें करीतच असतात ! आणि हे अरबहि अशा महाभागाच्या कोटीला अपवाद नव्हतेसे दिसले ! कारण मी बसण्याच्या आरामखुर्चीचें वस्त्र काहींसें फाटलेलें असें त्याच्यापैकीं एकाच्या दृष्टीस पडतांच त्यानें दुसऱ्या एकाला लगेच खूण करून बोलावलें आणि त्याला मचव्यावर पाठवून तेथून जाडजूड पाढऱ्या शिडाचा भला मोठा टाकाच आणवून मला बहाल केला ! बरोबरच खजुरानें व खारकांनीं भरलेली टोपली होती ! हें दृश्य पाहून कृतज्ञतेचे प्रेमाश्रु क्षणभर माझ्या डोळ्यांत उभे राहिले ! कंठ दाटून आल्यामुळें वाचा जड होऊन उघड 'नको' म्हणतां येईना ! आणि कदाचित् मी त्या वस्तु नाकारण्याचें धाडस केलें असतें असें मानलें तरी हिंदुस्थानी बोलीच्या अभावीं काय बोलावें म्हणून मला तोंडावाटे शब्दच फुटते ना !

त्या वर्षापासून दरवर्षी आमच्या निसर्गसुंदर गांवीं प्लेगाची उभारणी व संहारणी राजरोस चालू आहे ! मात्र, आजकाल लोकहि प्लेगोबाच्या मरणाला बरेच सरावल्यामुळें पूर्वींप्रमाणें उठल्यासुटल्या त्याला भिऊन आपलें बिऱ्हाडाचें सामान भराभर वाहनांवर लादून गांवाच्या वेशीबाहेर पळ काढीत नाहींत !

पण, माझी बाजाची हातपेटी........ ?

हो ! सुमारें चार पांच वर्षांपूर्वी ती वारंवार सरस सुटून बिघडत असल्या-

मुळें कंटाळून मीं विकून टाकली असून संगीताच्या हुकमी आस्वादापासून साहित्यसेवेच्या कीर्तिविषयक परिमलाकडे अधिकाधिक झुकत आहे! मात्र, जितकें जवळ जावें तितका तो परिमल अति दुरूनच येत आहे किंवा निदान तसा भास होत आहे असें मला वाटूं लागले आहे! अशा कांहीशा विमनस्क मनःस्थितींत जेव्हां जेव्हा माझ्या आरामखुर्चीकडे माझी सहज नजर जाते तेव्हा तेव्हा सहा वर्षांपूर्वीची वरील सुखद स्मृति जागृत होते! सगीताचा कमालीचा ध्यास घेऊन त्याच्या पायीं नित्य दोन तीन तास तरी गुरूविना शक्य ती ऐकीव मेहनत मी करीत असल्याचा काळ तो! आता माझें चिन्तनशील मन विवेकशील बुद्धीला विचारतें कीं, 'तूं तेव्हा खरी सुखी होतीस कीं आतां!' तेव्हा व आतां......! खरोखर याच्यापैकीं अधिक सुखाचे क्षण कोणते!

यावर बुद्धि मला कौल देते कीं, 'तूं तेव्हाच अधिक सुखी व आनंदी होतास! कारण गायनानें घरचें व सभोंवतालचें वातावरण जेव्हा तूं दरवळून सोडीत होतास तेव्हा श्रोत्याचे मूक धन्योद्गार तुझ्या मनःशातीला पोषकच होत असले पाहिजेत. शिवाय स्वतः तुला त्याच क्षणीं परम आनंद होत होता तो वेगळाच. आता मात्र तूं अशा बोलक्या संगीताशीं अकारण अबोला धरून जणूं त्याचा सूड घेण्याकरितां किचकट साहित्यसेवेचें मूक व्रत हट्टाच्या हौसेनें पतकरलेंस!'

आणि त्याच वेळीं माझ्या खुर्चीला आच्छादणारें तें अरबांचें कृतज्ञताबान जणूं माझ्या कानांत खालीलप्रमाणें कटु पण पथ्यकर सत्य बजावून सांगतें:—

'हें पाहा, तुझ्या पूर्वीच्या संगीतसेवेचें अमर प्रतीक म्हणून तुला तिची सदैव आठवण देण्याकरिता हें मी सहा वर्षेपर्यंत किमपीहि न फाटतां व तुटता तुझ्या या खुर्चीशीं बिलगून सर्वांच्या सेवेस सज्ज आहे! तूं जरी मला विसरलास तरी तुझें पूर्ववृत्त मी विसरलें नाहीं बरें! आतां माझें सांगणें इतकेंच कीं, तूं तुझ्या अमर संगीतकलेशीं प्रतारणा कधींहि करूं नकोस! जर करशील तर हें कृतघ्नतेचें दृश्य पाहून माझी छाती दुभंगेल! आणि पुढें आमचा परस्परपरिचयहि बुजण्याच्या मार्गास लागेल!!'

त्यावर माझी बुद्धि स्वगत चिंतिते:—

'गांवांत प्लेग येईल, प्लेग जाईल! अरब येतील, अरब जातील! त्यांनी तुला सहा वर्षांपूर्वी प्रेमपूर्वक उचित दिलेल्या खजुराची चव आजहि तुला वाटल्यास फिरून चाखतां येईल! आणि तेव्हांचें तुझें प्रिय संगीत......! तें तुला आजहि थोड्याशा प्रयत्नांतीं सहज पुनः उभें करतां येईल! पण या साऱ्या सुखद स्मृतींच्या व गोड घटनांच्या मालिकांचीं ज्याच्यामुळें तुझ्या मानससरोवराच्या पृष्ठभागावर आंदोलनें उमटलीं, तें खुर्चीवरचें शीड तुझ्या संगीताचें खरेंखुरें अमर प्रतीक नव्हे का!'

- -

# संगीत व साहित्य यांजमधील विहार

## ( एक अंतर्मुख अनुभव )

तो एक अंतर्मुख वृत्तीचा कलाभ्यासी तरुण होता. आपल्या भावना-प्रधान मनोधर्माच्या कप्प्यांत तो चराचर वस्तुजातांतील असंख्य घडा-मोडींचें स्वरूप विलीन करीत असे.

बालपणापासून त्याला संगीताची उपजत आवड ! शाळेंत शिकतांना शिक्षकाकडून त्याच्या गोड गळयाबद्दल जेव्हां स्तुति होई तेव्हा त्याला अत्यंत अभिमान वाटे आणि आनंदाचें भरतें येई !

होता होतां त्यानें बाल्यांतून तारुण्यांत प्रवेश केला आणि प्रत्यक्ष गायनाचार्यांकडून मिळणाऱ्या शिक्षणाच्या अभावीं संगीतांत जितकी म्हणून ऐकीव प्रगति करतां आली तितकी त्यानें अत्यंत आस्थेनें केली ! तथापि तितक्यानें त्याच्या मनाचें खरें समाधान होईना !

कारण तो पडला पूर्ण ध्येयवादी ! कोणत्याहि कलेंत अत्यंत अल्प काळात जास्तींत जास्त अशी वरची पायरी गांठण्याची त्याच्या अंतरींची तळमळ त्याला मुळींच चैन पडूं देईना !

पुढें त्याला निर्वाहाकरितां एका लहानशा गांवीं नोकरी पतकरावी लागली. म्हणून एखाद्या मोठ्या शहरीं जाऊन कांही काळ तरी उच्च गायनाचे धडे संगीताचार्यांकडून घेण्याचे त्याचे गोड बेत मनांतल्या मनांत जिरले !

तरीहि रात्रीच्या निवात समयीं तो मियामल्हार, दरबारी कानडा यांसारखे करुणोदात्त राग आळवून आपल्या जिवाचें कसें तरी समाधान

करून घेत असे ! पण तो कमालीचा ध्येयवादी असल्यामुळें उत्कृष्ट व शास्त्रोक्त गाणें गाता आल्याविना तें व्यर्थ होय असें त्याच्या मनानें घेतलें.

गायनाची विद्या अत्यंत परावलंबी आणि तो पडला एकटा ! जेथें तो रहात असे तेथें गानप्रेमी शोकीन लोकाच्या गायनाच्या मैफली होत नसत. म्हणून सद्गुरूच्या व योग्य साथीच्या अभावीं त्यानें आपल्या अत्यंत आवडत्या गायनविद्येला साश्रु नयनानीं पण अंतःकरण कठोर करून कष्टानें निरोप दिला !

विद्वद्वर्य कै. श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांनी एके ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "संगीतकला उत्कट विकारांच्या स्वररूपांनीं दिसणाऱ्या परिणामांवर उभारलेली आहे, तर काव्यकला नैसर्गिक वस्तु नेत्रांसमोर मांडून तिची कल्पना मनांत उत्पन्न करण्याच्या भूमिकेवर आधारलेली आहे."

अशा या अत्यंत उच्च व गहन संगीतकलेविषयीं निराशेनें ग्रासल्यामुळें त्या तरुणाने आपल्या मनोधर्मांतील दुसरा एक नजीकचा कप्पा उघडला. त्यांतून साहित्याच्या विभागात जावयाचें ! परतु दुर्दैवानें तेथेंहि त्याला आशेचे किरण दिसेनात !

कारण संगीतांत निदान एखाद्या उत्तम रागांतील तान किंवा मेंड लयदारीनें आळवून एकातींहि उच्चतम आत्मानंद चाखणें त्याला शक्य होतें ! वाटल्यास कांही दर्दी श्रोते असावे, अज्ञ श्रोते नसले तरी पुरवले अशी त्याची मनीषा !

पण वाचनांतीं जेव्हां तो अपक्व लेखन करून तें प्रसिद्धीसाठीं नियत-कालिकांकडे व मासिकांकडे भराभर पाठवूं लागला तेव्हां मात्र त्याचा उतावळा कीर्तिलोभ त्याच्या जीवनसुखाच्या आड आला ! प्रथम संगीतांत त्याचा हा लोभ काहीसा हावरा असला तरी आत्मतृप्त होता; आतां तो साहित्यांत जाता बहिर्मुख बनला !

आणि सुरवातीस सांगितल्याप्रमाणें त्याची मनोरचना जात्याच अंतर्मुख असल्यामुळें अंतर्मुख व बहिर्मुख अशा विरुद्ध दिशांनीं अनिरुद्ध गतीनें वाहणाऱ्या मतप्रवाहांच्या वर्तुलाकार भ्रमणाच्या दोन भोवऱ्यांत तो सांपडून

त्याची मानसिक स्थिति अत्यंत अनुकंपनीय झाली! आणि प्रतिभारूपी बीज त्याला कांही निश्चित विचार सुचूं न देतां गत कालाबद्दल असमाधानाचे व भविष्यकालाबद्दल उज्ज्वल आशावादाचे असे दुहेरी चटके एकाच वेळीं देऊन त्याला क्षणोक्षणीं भाजून व उफाळून काढूं लागली!

प्रतिभेच्या तापानें अत्यंत म्लान व दीन दिसणाऱ्या त्या अभागी तरुणास मीं एके दिवशीं बळेंच हटकलें व विचारलें, "तुमची ती कायशी 'प्रतिभा' म्हणजे काय हो! तुमचें मुखकमल सदा उदास व खंगलेलें दिसतें! तेव्हां उदासीनता म्हणजेच प्रतिभा समजावयाचें काय!"

त्या तरुणाच्या मुखावर दिव्य स्फूर्तीची एक क्षीण छटा क्षणात चमकून गेली!

तो म्हणतो, "प्रतिभा कशी काय असते तें मी जाणत नाहीं! तथापि माझ्या अल्प बुद्धीला आज कित्येक वर्षांपासून असें भासत आलें आहे कीं, 'प्रतिभा' म्हणजे आलस्याच्या संपूर्ण अभावाची एक प्रकारची बेचैन उतावीळ मनःस्थिति!"

"एकच सुविचार—स्वानुभवाच्या व सत्याच्या निकषावर चाटून जाणारी एकच उज्ज्वल व सुंदर कल्पना—इतरांसहि शक्य तितक्या लौकर देण्यासाठीं निःस्वार्थीपणानें अहर्निश तळमळणारी अत्यंत प्रभावी व प्रवाही मनःस्थिति म्हणजेच 'प्रतिभा'!"

त्या तरुणानें अंतःस्थ उसळीसरसें वरील जोमदार उत्तर दिलें खरे. परंतु त्याची उदासीनता पार मावळली असें काही मला वाटेना! कारण त्याच्या आयुष्यक्रमाचा किंचित् जास्त खोल विचार करता मला असें आढळून आलें कीं, तो तरुण कांही अंशीं अविवेकी, कांही अंशीं भावनाप्रधान व काही अंशीं कृतघ्नहि पण होता!

कारण असें पहा कीं, त्या दयाघन ईश्वरानें त्याला गोड गळा दिला होता! आणि सुदैवानें गायनाची चीजच अशी अपूर्व आहे कीं, तिचें 'चीज' करण्यासाठीं कोणाला इतर रसिकांना हटकून अशभागी केलेंच पाहिजे असेंहि सर्वस्वीं म्हणतां येणार नाहीं! परंतु त्यानें संगीताचा आपला जुना स्वतंत्र क्रम क्रूर मनानें वगळून जेव्हां साहित्यसेवक होण्याचें अत्यंत

कठिण व किचकट व्रत हौसेनें पत्करिलें, तेव्हां आपल्याला पुढें किती पश्चात्ताप होईल याची अंधुक कल्पनाहि त्याला आली नसली पाहिजे !

विद्वद्वर्य श्री. नरसिंह चिंतामण केळकर यांनी मागें एका भाषणांत असे उद्गार काढले होते कीं, "होतकरू तरुण वाङ्मय-सेवकानें आपल्या मनासमोर असें एक निःस्वार्थ ध्येय ठेवलें पाहिजे कीं, मी माझ्या सुविचारांचीं सुमनें माझ्या लेखनांत लीलेनें उधळीन, तेथून तीं इतरांस एक प्रकारचा वाचनानंद देतील असें करीन, आणि वर्तुळाकार गतीनें हा आनंद जेव्हां परत मजपाशीं येऊन पोंचेल आणि हा फेरा पूर्ण होईल तेव्हां मीहि आनंदी होईन !" अबबबब ! विनोदानें कल्पनाच केली तर एखाद्या लिंबासारख्या वाटोळ्या वस्तूच्या परिघाभोंवतीं बिचाऱ्या त्या आनंदास मुंगी-प्रमाणें पिंगा घालण्यास लावणारी साहित्यसेवानंदाची ही हुकमी तळमळ एकूण मोठी अजब खरी ! किंवा तें एक मृगजळच म्हणाना !'

पूर्वी त्या तरुणाला संगीतकलेंत काही प्रमाणात तरी स्वतःला स्वतंत्रपणें आनंद उपभोगितां येत होता ! पण आता ? आपल्या लेखाच्या सत्वर प्रसिद्धीसाठीं, अमर्याद लेखनसागरांत गटंगळ्या खाणाऱ्या बिचाऱ्या संपादक-महाशयाकडे दीनवाणीनें याचना करण्याचा कटु प्रसंग त्याजवर आला !

आपला लेख संपादकांस एकदाचा पसत पडणार, पुढें कधीं तरी सवडीनें तो छापून निघणार, तेथून त्या लेखातील वर्णाक्षरांचा समूह रसिक वाचकांच्या पसंतीच्या वाटोळ्या मंडळाभोंवतीं चक्रगतीनें घिरट्या घालून परत येणार, तोंपर्यंत आपली 'प्रतिभा' पार गारठून जाईल याची वाट काय असें नेहमीं तो मजपाशीं काहीशा त्वेशानें म्हणे. आणि जातिवंत साहित्यसेवक 'लेखक'च असला पाहिजे काय असाहि एक सूचक व अर्थगर्भ प्रश्न मला करण्यास त्यानें मागेंपुढें पाहिलें नाहीं !

एतावता कटु अनुभवांच्या पश्चात्तापानें पोळलेल्या पण भावि साहित्य-सेवेच्या उज्ज्वल आशाकिरणांनीं विचारसौंदर्यांत कित्येक रात्रींच्या रात्री रमून व दमून काढणाऱ्या त्या होतकरू तरुणाला पहांटेच्या समयीं एक

अद्भुत स्वप्न पडलें! त्याची हकीकत त्यानेंच मला सांगितली ती अशी :—

एका दिव्य पुरुषानें माझ्या मस्तकावर वरदहस्त ठेवून म्हटलें, "वत्सा, तुझी निःस्वार्थी साहित्यसेवेची इच्छा दुर्दम्य खरी! पण तूं केवळ चंचल व क्षणिक कीर्तिलोभाच्या मागें वर्तुळाकार धांवण्यांत आणि व्यर्थ असमाधान पावण्यांत अर्थ नाहीं! प्रतापी अलेग्झांडरनें आपल्याच सावलीला बुजून बेफाम् उधळणाऱ्या घोड्याला सूर्यापुढें त्याचें तोंड करून लगाम खेंचून आवरून धरल्याप्रमाणें, तूंही तुझ्या चंचल मनाच्या व्यापारांना पायबंद घालून, ध्येयरूपी ध्रुवताऱ्याकडे निश्चल दृष्टि करून उभा ठाक म्हणजे कीर्तिलोभाची सावली तुला पदोपदीं अडविणार नाहीं किंवा बुजविणारहि नाहीं! तुझी अत्यंत आवडती संगीतकला विना-कारण कां बरें सोडतोस? लेखनाने शीण आल्यावेळीं तिचा अवश्य आश्रय कर म्हणजे तुझा शीणहि जाईल आणि नव-विचारांचा हुरूपहि येईल. मात्र, असें बुद्ध्या न करशील, तर संगीत व साहित्य या बहिणींमध्यें थोरल्या बहिणीशीं कृतघ्नपणे अकारण अबोला धरल्याचा सूड, ती तुझ्या आयुष्यक्रमावर आणि अनुषंगानें तुझ्या अत्यंत आवडत्या साहित्यावरहि घेतल्यावांचून खास रहाणार नाहीं!

"बेटा, एखादी नवीन वस्तु ग्रहण करतांना जुनी चांगली वस्तु पूर्णपणें टाकून द्यावी असें थोडेंच आहे? आणि येथें तर संगीत ही साहित्याची मानलेली थोरली बहीण! तर ऊठ! विना-कारण संशयात्मा होऊन निष्फळ विवंचना करीत कुढूं नकोस!"

अत्यंत आनंदानें हें स्वप्न त्या तरुणानें मला सांगितलें. आणि काय नवल! खरोखरीच त्या क्षणापासून त्यानें एरवीं नीरस भासणाऱ्या आपल्या जीवनक्रमांत संगीतास पूर्वीचें उच्च स्थान दिलें! तेव्हां मात्र त्याच्या आत्म्यास फारां दिवसांनीं इष्ट ती शांति लाभली व एक प्रकारची धन्यता वाटली असें भासलें! त्या क्षणापासून 'प्रतिभे'ची तीक्ष्ण टोंचणी त्याच्या कोमल हृदयाला विद्ध करीनाशी झाली!

आणि सांगण्यास समाधान वाटतें कीं, संगीत व साहित्य या दोन बहिणींच्या दिव्य तेजोवलयापुढें 'प्रतिभे'चा जाच व भीषण नाच अलीकडे बराच फिक्का पडत चालला आहे आणि ती संथ व इष्टरसानुकूल बनत चालली आहे असें तो तरुण आतांशा मजपाशीं नेहमीं म्हणत असतो.

---

# प्रो. दत्तो वामन पोतदार

## ( ओझरतें स्वभावदर्शन )

'साहित्यिकांच्या सान्निध्यांत' हें सदर 'प्रतिभा' पाक्षिकांत उघडलेलें पाहून मला मौज वाटली ! ती अशी कीं 'सान्निध्यांत' या शब्दाची वस्तुतः व्याप्ति किती ? एखाद्या थोर साहित्यसेवकाच्या सान्निध्यांत कांही क्षण, तास, किंवा एखादा आटवडाहि काढल्यानें त्याचा मनोधर्म, त्याच्या आवडीनिवडी, त्याच्या आशानिराशा, त्याचा गूढवाद व त्याची ध्येयवत्ता यांची पूर्ण पारख होतकरू चहात्याला कितीशी होणार ! तथापि सर्वांनाच अशा साहित्यिकांच्या अखंड सान्निध्यांत राहून, बॉसवेलनें जसें जॉनसनचें अत्युत्कृष्ट चरित्र लिहिलें तसें चरित्र किंवा हृदयंगम आठवणीहि लिहिणें कठिण ! तेव्हां 'सान्निध्यांत' या शब्दाची व्याप्ति त्या त्या चहात्याला त्या त्या साहित्यिकाचें जितकें सान्निध्य अनुभविता आलें तितक्या प्रमाणानें ती मर्यादित आहे असें कल्पिणें अर्थातच भाग पडतें. आणि लेखकाच्या वांट्यास आलेल्या सान्निध्याच्या बंधनानें व्याप्त असें शब्दचित्र किंवा स्वभावचित्र सर्वस्वीं स्वयंपूर्ण असणें कठिण आहे याची जाणीव धरल्यास वाचकांस आपल्या मनाचें कांहीसें समाधान करून घेतां येण्यासारखें आहे. मला प्रो. पोतदार यांच्याशीं प्रत्यक्ष सहवास करण्याचा योग गत-वर्षी (१९३२) थोड्या दिवसांचाच आला होता. म्हणून प्रोफेसरमजकुरांचें काढलेलें हें ओझरतें स्तभावचित्र यथार्थ आहे असें म्हणणें कठिणच !

प्रो. दत्तो वामन पोतदार यांचें घर पुण्यांतील शनिवार पेठेंत

सुप्रसिद्ध शनवारवाड्यानजीक आहे.* त्यांच्या घराची आंतर रचना पाहून पाहुणा प्रथम बुचकळ्यांत पडतो. अंधाऱ्या खोलींतून दोन जिने ओलांडून नंतर त्यांच्या माडीवरील बसण्याच्या खोलींत जावयाचें असतें. अनोळखी इसम प्रथम प्रथम हे जिने चढून जातांना वाट विसरून भलत्याच ठिकाणीं पोंचण्याचा संभव फार ! रॉबिन्सन क्रूसोनें आपलें घर दीर्घ विचार करून व स्वसंरक्षणाकडे पूर्ण लक्ष देऊन बांधलें होतें अशी कथा आहे ! दत्तोपंतांचें घर पाहून प्रथम अशीच कांहीशी कल्पना होते आणि एक प्रकारची गूढ अद्‌भुतता जाणवते ! त्यांच्या माडीवरील बसण्याच्या खोलींत प्रवेश करतांच सभोंवार इतिहासविषयावरील शेंकडो ग्रंथ लावलेले दिसतात. ग्रंथरचनेच्या बाबतींत मात्र अंमळ अव्यवस्थाच दिसते. स्वतः दत्तोपंतांची आवडती बैठक जुन्या थाटाची ! एका लहानशा हातपेटीसमोर लोडाशीं टेंकून ते लिहीत वाचीत बसतात. जवळच एका स्वच्छ काचेच्या पात्रांत पिण्याचें पाणी ठेवलेलें असतें.

दत्तोपंताजवळ कोणीहि जाईना, त्यास आढळून येणारा त्यांचा प्रमुख गुण म्हणजे मनाचा निर्मळ मनमोकळेपणा. आपणाकडे आलेला माणूस थोर-लहान, विद्वान्-अविद्वान्, उच्च-नीच, असा किंतु मनांत मुळींच न धरतां मन खुलें ठेवून त्याजजवळ त्यानें मनांत धरून आलेल्या कामाविषयीं ते बोलतील. बोलतांना मुद्दाम विनोदाची पेरणी जरी ते करीत नाहींत तरी त्यांच्या हंसऱ्या व सदैव आनंदी चेहऱ्यामुळें त्यांस भेटावयास आलेला प्रत्येक इसम आनंदित होऊन परत जातो. त्यांच्या स्वभावाचा विशेष हा कीं, त्यांच्या या सदा आनंदी व उत्साही मनोधर्मामुळें तरुणांच्या उत्साहालाहि ते हेवा वाटावयास लावतात. आणि त्यांचा निगर्वीपणा इतका व्यक्त असतो कीं, त्यांच्याशीं एकवार मुलाखत झालेल्या प्रत्येक इसमाला त्यांच्याविषयीं आदर वाटतो आणि पुढें तो वाढत्या प्रेमांत परिणत झाल्यावांचून रहात नाहीं. मात्र, या मनमोकळेपणाच्या पोटीं जळजळीत स्वाभिमान दडलेला असतो ! आणि जर का कोणी त्यास अकारण डंवचलें तर तो तात्काळ पेट घेऊन आपलें उग्र स्वरूप प्रगट

* यानंतर या घराची पुनर्रचना केल्याचें समजतें. — लेखक.

केल्याशिवाय रहात नाहीं ! संभाषणावरून माणसाच्या स्वभावाची खरी पारख होते असें म्हणतात; पण त्याच्या लेखनावरून त्याचें व्यक्तित्व सर्वस्वीं ओळखतां येईलच असें खात्रीनें सागतां येत नाहीं. दत्तोपंतांच्या खुल्या मनाच्या सभाषणपद्धतीमुळें त्यांचा मित्रपरिवार दिवसेंदिवस वाढतच आहे.

आतां विदग्ध वाङ्मयांत किंवा ललित लेखनप्रकारांत प्रत्यक्ष मोठी भर घातलेले साहित्यिक या दृष्टीनें कोणी आशेनें त्यांजकडे पाहूं नये किंवा तशी अपेक्षाही करूं नये. जात्याच त्यांस नियमित लेखनाचा व अशा किचकट परिश्रमाचा कंटाळा आहे असें वाटतें. त्यांनी लिहिलेल्या ग्रंथांकडे पहाता ते फारच तुरळक ! श्री. न. चिं. केळकर यांनी लिहिलेल्या "मराठे व इंग्रज" या ऐतिहासिक ग्रंथाचें परीक्षण, नूतन मराठी विद्यालयांतील तरुण विद्यार्थ्यांना उद्देशून प्रसंगोपात्त केलेल्या उपदेशाचीं छोटीं पुस्तकें व "मराठी गद्याचा इंग्रजी अवतार" हा ग्रंथ, या पुस्तकांशिवाय इतर कांही पुस्तकरूपानें त्यानी लिहिल्याचें मला ठाऊक नाहीं. 'रत्नाकर' मासिकांत मागे "मराठी साहित्यपरिषद् व साहित्यसंमेलनें" या विषयावर त्यांचे काही लेख प्रसिद्ध झाले आहेत. पण लेखक किंवा ग्रंथकार होण्याचा हव्यास त्यांनी प्रथमपासून बाळगल्याचें दिसत नाहीं. म्हणून झाल्या इतक्या लेखनाबद्दल त्यांस असमाधान वाटल्याचें मुळींच दिसत नाहीं.

मात्र, त्यांचा ओढा जात्याच ललित साहित्यसेवेपेक्षां किंवा त्याच्या प्रसारापेक्षां महाराष्ट्र-संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाकडे अधिक आहे. आणि म्हणूनच तिच्या वाढीकडे त्यांचें लक्ष्य पुरेपूर आहे. तें इतकें कीं, नवख्या लेखकाला किंवा परस्थ साहित्यप्रेमी गृहस्थाला एखादे वेळीं असेंहि वाटावयाचें कीं, दत्तोपंत खरेच 'साहित्यिक' आहेत किंवा काय ? अशा लोकांकरितां त्यांचा दृष्टिकोन किंचित् विशद करून सांगणें ठीक होईल. कै. पंडित मोतीलाल नेहरू यांनी मागें एकदा तरुणाना उद्देशून असे उद्गार काढले होते कीं, "तुम्ही आतां जुना इतिहास पढूं नका, स्वतः देशाचा नवा इतिहास बनवा !" दत्तोपंतांचा दृष्टिकोन असाच आहे असें सूक्ष्मपणें पाहिल्यास दिसून येईल. थोडक्यांत सांगावयाचें म्हणजे ते

महाराष्ट्र-संस्कृतीच्या आघाडीवरील एक शूर, उमदे व दिलदार सरदार आहेत. महाराष्ट्र-संस्कृति आज मलिन झालेली आहे; महाराष्ट्रधर्माचें उज्ज्वल अधिष्ठान तिला पूर्वीप्रमाणें लाभलेलें नसल्यामुळें समाज निराशेनें व असंतोषानें कष्ट पावत आहे; अशा वेळीं संस्कृतिविस्मृतीच्या अदृढ पायावर ललित वाङ्मयाचे कितीहि मनोरे रचले तरी त्यांची शाश्वति चिरकाल राहील असें त्यांना वाटत नाहीं. आणि म्हणून हा पायाच प्रथम सुदृढ करण्यासाठीं ते यथामति व यथाशक्ति झटत असतात. "ज्या राष्ट्राला गत इतिहास नाहीं त्याला उज्ज्वल भविष्यकाळ नाहीं" हें त्यांचें ब्रीद म्हणता येईल. म्हणून गत इतिहासाच्या व संस्कृतीच्या ज्ञानाला ते फार महत्त्व देतात. आमच्या संस्कृतीला व ज्ञानाला पोषक असेंच साहित्य असावें याविषयीं त्यांचा कटाक्ष आहे. म्हणून त्यांस एका अर्थी साहित्यिक असे म्हणण्यापेक्षां संस्कृतिप्रेरक व त्या अनुषंगानें साहित्य-प्रसारक असें जास्त औचित्यानें म्हणतां येईल. प्रत्यक्ष साहित्य प्रसवण्या-पेक्षां संस्कृतीचा प्रसार करविणें हेंच त्यांचें ध्येय आहे. पुण्यातील "भारत इतिहास सशोधक मंडळा"सारखी संस्था झीज सोसून इतक्या नांवलौकि-काला आणण्याचें बरेंच श्रेय त्याना आहे. या संस्थेमुळें आजपर्यंत जनतेंत इतिहासाविषयीं खरी आवड व स्फूर्ति उत्पन्न झाली आहे याबद्दल मुळींच वाद नाही.

तथापि विदग्ध वाङ्मयात किंवा ललितलेखनांत ग्रंथरूपानें त्यांनी प्रत्यक्ष भर घातलेली नसली तरी ते या बाबतींत उत्तम मर्मज्ञ व रसज्ञ आहेत यांत शंका नाहीं. प्रतिभा, ओज व विचारस्वातंत्र्य या पवित्र गुणांनीं संमीलित असलेलें तेजस्वी, जिवंत व ध्येयवादी साहित्य त्यांस आवडतें व मानवतें. वाङ्मयाची कसोटी क्षणिक आल्हादाच्या वा मनो-रंजनाच्या दृष्टीनें ते न करतां जिवंत स्वदेशाभिमानाला व स्वातंत्र्याला तें कितपत पोषक होईल, जीवनातील गतानुगतिक चुकलेले प्रवाह अचूक दाखवून मनोविकासाच्या टापूंत वाचकांचें मन तें किती पुढें आणूं शकेल, त्यांच्यांत अज्ञानामुळें दडलेल्या सुप्त प्रवृत्ति जागृत करून त्यांचें दिव्य आत्म-तेज तें कितपत बाहेर उफाळून काढील, या व अशा कसोटींनीं ते पहात

असतात. उघडच आहे ! ज्यांच्या मनाची घडणच एखाद्या शूर सेनानीसारखी त्यांचे विचार कोणत्या दिशेनें चालत असतील ! आणि त्यांस सामान्यतः ओजास पारखें झालेलें मृतकल्प व ध्येयहीन लिखाण कसें रुचेल !

कै. प्रो. शिवराम महादेव परांजपे यांच्या प्रतिभेच्या विलासाबद्दल त्यांना कमालीचा आदर वाटतो. मराठी साहित्यांत त्याच्या मते शिवरामपंतांनी घातलेली भर केवळ अपूर्व होय ! 'जसें बोलावें तसें लिहावें' या मताचे ते असल्यामुळे अस्खलित वक्तृत्वाचीच जणूं छाया असलेली शिवरामपंताची ओघवती, रसाळ, वक्रोक्तिपूर्ण, जळजळीत, तेजस्वी लेखनाविष्ट वाणी त्यांना मोहित करते यात नवल तें काय !

इतिहासाच्या दालनात त्याना कै. विश्वनाथ काशिनाथ राजवाडे यांच्याविषयीं अत्यंत आदर वाटतो. राजवाड्याचा विक्षिप्तपणा वगळूनहि जन्माची फकीरी पतकरून स्वीकृत इतिहाससंशोधनाचें अत्यंत प्रचंड कार्य प्रसिद्धीची हांव न धरता चिकाटीनें पुढें लोटणारा, निर्भीड स्वतंत्र विचारसरणीचा असा वीर क्वचित्च निपजतो, असे ते जिव्हाळ्यानें सांगतात. आणि त्यांचा प्रांजळपणा इतका कीं, लगेच श्रोत्याचें समाधान करण्याकरितां ते स्वतः वाचक होण्याचें व्रत हौसेनें पतकरून शिवरामपंतांच्या किंवा राजवाड्यांच्या ओजस्वी लिखाणातील काही महत्त्वाचा भाग त्याला निरभिमान आस्थेनें वाचून ऐकवितात !

पाश्चात्य पंडिताच्या दृष्टीनें एखाद्या व्यक्तीचा स्वभाव अजमावण्याचें प्रमुख गमक म्हणजे ती अंतर्मुख वृत्तीची (Subjective) किंवा बहिर्मुख वृत्तीची (Objective) आहे ते अचूक ओळखणे होय. कवि, कादंबरीकार, विनोदी लेखक, नाटककार इत्यादि ललित वाङ्मयप्रकाराचे हौशी उपासक बहुशः अंतर्मुख असतात. आणि दत्तोपंतासारखे इतिहासप्रेमी संस्कृतिप्रचारक ललित मनोधर्माच्या व्यक्तींना बाहेरून काहीसे रूक्ष दिसत असले तरी दुसऱ्या सदरात पडतात. आणि या दोन प्रवाहांमधील वस्तुगत्याच स्थूल फरक जाणणाऱ्या मर्मज्ञांना तरी दत्तोपंताच्या या विशिष्ट मनोरचनेबद्दल भलता अपसमज वाटणार नाहीं. प्रसिद्ध जर्मन कवि व तत्त्वज्ञ गटे याजविषयीं फ्रँज हॉर्न हा एके ठिकाणीं म्हणतो :—

"गटेविषयीं जों जों अधिक विचार करावा तों तों आम्हांस जणूं असें भासतें कीं, आम्ही स्थिर जमिनीवर दृढ उभे आहों; अमर्याद सागरांत गटंगळ्या खात नाहीं!" दत्तोपंतांची विचारसरणी स्थूलपणें या वचनांना अनुसरून आहे. ते पक्के व्यवहारी आहेत. ते गूढगुंजनवादी काव्यप्रेमी नाहींत; त्यांचें मन भावनागम्य काव्यात्म विकाराना वश होत नाहीं; कित्येक ललित लेखकांचे ध्येयहीन मृदु विन्यास त्यांच्या मनात आंदोलनें उमटवून त्यांची शाति ढळवीत नाहींत; किंवा वैषयिक स्त्री-पुरुषप्रेमाचे सारीपाट खेळविणाऱ्या क्षीण ललित कृति त्यांची धीरगंभीरता ढळवूं शकत नाहींत. म्हणून त्यापैकीं काही श्रेष्ठ प्रतीच्या कृतींना वाङ्मयांत एक विशिष्ट स्थान नाहीं असें मात्र म्हणण्यास ते तयार नाहींत.

मजजवळ ते सहज बोलण्याच्या ओघांत एकदा म्हणाले होते कीं, "गडकऱ्यांच्या प्रतिभेबद्दल तुम्हांला काय वाटतें? त्यांच्या प्रतिभाविलासाचें प्रमुख अंग कशांत ओळखावें?" मीं म्हटलें, "त्यांच्या स्वातंत्र्य-समतावादात." त्यांस माझें मत कांही अंशीं पटलें असें त्यांच्या चर्येवरून दिसलें. सांगण्याचें तात्पर्य हें कीं, ललित लेखनांतही जर करुणरसाबरोबरच गडकऱ्यांच्या लेखनांत असल्याप्रमाणें स्वातंत्र्याची व समतावादाची जोमदार उसळी असेल तर अशा वाङ्मयाचा यथोचित गौरव करण्यांत ते कोणाहि साहित्यिकास हार जाणार नाहींत; किंबहुना आपलेपणानें कांकणभर जास्तच गौरव करून अशा होतकरू लेखकांना प्रोत्साहनच देतील!

दत्तोपंतांची बहिर्मुख प्रवृत्तीच त्याच्या इतक्या विविध व अफाट मित्रपरिवारामागें सदैव सज्ज आहे असें मला वाटतें. सर परशुरामभाऊ कॉलेजांत शिकवणीला गेल्यानंतर ते फुरसतींत जवळच्या मीमांसाविद्यालयाला भेट देतील व तेथील शास्त्रीबुवांपाशीं अस्खलित संस्कृत भाषेंत बोलतील. तेथून कॉलेजच्या विज्ञानशास्त्राच्या विभागांत जाऊन तेथील अध्यापकांकडे सस्मित विचारपूस व चर्चा करतील. वाटेंत कोणी परिचित विद्यार्थी भेटल्यास त्यास हटकून त्याच्याशीं मौजेंत दोन शब्द बोलतील! सारांश, त्यांचा उत्साहाचा व आत्मानंदाचा झरा इतका अखंड व आकंठ

वहातो कीं, तो स्वतः आनंदांत तर मग्न असतोच पण त्याबरोबरच आनंदाचे थोडथोडे घुटके इतरांसहि—वाटल्यास कांहीशा सलगीच्या हट्टानें किंवा हट्टाच्या सलगीनें म्हणा—पाजीतच सुटतो.

दत्तोपंतांचा स्वभाव वर सांगितल्याप्रमाणें जात्या आनंदी असला तरी त्यास सत्यप्रीति व कांटेकोर न्यायनिष्ठुरता यांची जोड लाभलेली असल्यामुळें तो कांहींना 'जहाल' भासतो. मात्र त्यांचा कल नीट जाणणाऱ्यांना त्याचा संपर्क जाणवत नाहीं! कित्येकांना परस्थ विद्वानांविषयीं अतोनात आदर वाटत असतो; परंतु त्यांची स्वत्वविस्मृति इतकी खोल कीं आपल्यांतीलच एखादें उकिरड्यांत पडलेलें रत्न त्यांना दिसत नाहीं! कलकत्त्याच्या प्रो. यदुनाथ सरकारांनीं मराठ्यांच्या इतिहासाविषयीं क्वचित् चुकीचीं विधानें करावीं आणि आमच्यांतीलच काही विद्वानानीं त्यांच्या फर्ड्या इंग्रजी लेखनशैलीला मोहित होऊन त्यांचा प्रतिकार करूं नये हें दृश्य प्रो. पोतदारांना असह्य होतें. व्यक्तिशः यदुनाथांच्या अपार विद्वत्तेबद्दल त्याना आदर असला तरी यदुनाथांचें प्रत्येक प्रमेय "बाबावाक्यं प्रमाणम्" म्हणून झेलण्याइतके मात्र ते मवाळ नाहींत! स्वत्वविस्मृति, स्वसंस्कृतीला पारखें होणें, या दोन गोष्टींविरुद्ध त्यांना जितकी चीड येते तितकी इतर कोणत्याहि गोष्टीबद्दल येत नसेल! "मद्रप्रांतीय लोक सुंदर इंग्रजी लिहितात व बोलतात," असें मीं म्हटल्यावरून खालील आशयाचे विचार त्यांनी प्रदर्शित केले, "गोष्ट खरी! परंतु त्यांपैकीं किती जणांनीं आपल्या मातृभाषेची तितकीच उच्च व स्पृहणीय सेवा केली आहे! आधीं आपल्या परतंत्र मायभाषेचें दैन्य फेडून नतर अन्य भाषांकडे धांव घेणारांचें मी कौतुकच करीन. उलट आपल्या मायबोलीचें दैन्य न फेडतां परकी भाषेला उत्कृष्ट शृंगारसाज करणें कृत्रिमच नव्हे तर काय!" या व अशा विचारांवरून स्वसंस्कृतीची महती त्यांच्या रोमरोमांत किती खोल भिनली आहे याचें प्रत्यंतर येईल.

भारत-इतिहास-संशोधक मंडळाचे एक उत्साही कार्यकर्ते चिटणीस, नूतन मराठी विद्यालयांतील एक कर्तबगार अध्यापक व व्यवस्थापक, सर परशुरामभाऊ कॉलेजांतील अध्यापक, इतके बौद्धिक श्रमांचे व्यवसाय

सामान्यतः एका व्यक्तीच्या व्यापाला पुरून आहेत. परंतु दत्तोपंतांचा स्वभावच अत्यंत उत्साही, प्रचारकी बाण्याचा व बहिर्मुख असल्यामुळें महाराष्ट्र-साहित्य-परिषदेच्या पुनर्घटनेच्या बाबतींत त्यांनी बरेंच लक्ष पुरविलें आहे. ज्याना या परिषदेच्या चालकांत व सभासदांत कांही वर्षांपासून चालत असलेला मतभेद व शुष्क वाद ठाऊक असेल त्याना तरी दत्तोपंतांनीं आपल्या रसाळ वाणीनें त्याच्यांत तडजोड घडवून आणण्यासाठीं किती परिश्रम घेतले असतील हें विदित आहेच. यंदाच्या (१९३३) साहित्य-परिषदेच्या निवडणुकींत ते "महाराष्ट्र-साहित्य-पत्रिका" या परिषदेच्या त्रैमासिकाचे संपादक झाले असून त्यांच्या देखरेखीखालीं ते त्यांत इष्ट त्या सुधारणा घडवून आणतील अशी उमेद आहे.

दत्तोपंतांच्या मनोरचनेचा आणखी एक अभिनन्दनीय विशेष म्हणजे मतनिष्ठा व पंथनिष्ठा यांचें अस्तित्व असलेल्या पुण्यात राहून पाण्यापासून जसें कमळाचें दळ अलिप्त असतें तसें त्यांचें वर्तन असतें हा होय. हा टिळकांचा पक्ष, तो आगरकराचा किंवा गोखल्याचा पक्ष, अमुक गांधीजींचा पक्ष, अशा पक्षनिष्ठेपासून ते अंतरंगानेंहि अलिप्त असल्यामुळें प्रत्येक भिन्न भिन्न पक्षाच्या अनुयायांना त्यांच्या सहानुभूतीविषयीं एक प्रकारचा आपलेपणा वाटत असतो. आणि म्हणूनच प्रत्यक्ष राजकीय सभा सोडून इतर सभांतून ते शक्य तों उत्साहानें भाग घेतात आणि आपले स्वतंत्र विचार जणूं हंसत खेळत सभेपुढें निर्भीडपणें माडून विचारस्वातंत्र्याचें एक प्रकारचें उच्च वातावरण सभोंवार निर्माण करूं शकतात.

कित्येक साहित्यिकांना ग्रासणारा मोठा शत्रु म्हणजे कीर्तिलोभ हा होय. दत्तोपंतांच्या बाबतींत मात्र असें खात्रीनें म्हणतां येईल कीं, ते द्रव्यलोभ व कीर्तिलोभ या दुकलीपासून अलिप्त आहेत. आपली चहूंकडे प्रसिद्धि व्हावी अशी त्यांस हांव नाहीं. त्यांचें मन जात्याच इतकें उदार व भरदार कीं दुसऱ्याचा उचित गौरव करण्यांतच ते आपला गौरव मानून घेतील. स्वतः आपण मागें राहून थोरांसच काय पण होतकरू तरुणांसहि योग्य प्रोत्साहन देण्यास त्यांस मुळींच वाईट वाटत नाहीं.

दत्तोपंतांच्या लेखनाच्या बाबतींत होतकरू लेखकाला निराशा ग्रासते

खरी, पण ती त्यांच्या भाषणामुळें बऱ्याच अंशीं भरून निघते. त्यांचें भाषण तितकेंसें आविर्भावपूर्ण नसतें; परंतु त्यांचें मन खुलें असल्यामुळें व चेहऱ्यावर सदैव स्मित झळकत असल्यामुळें त्यांचें रसाळ भाषण चालू असतांना श्रोत्यांच्या हृदयांत आनंदाच्या ऊर्मि उठल्यावांचून रहात नाहींत. आपल्या भाषणांत ते बुद्धया शब्दांच्या कसरती व हरकती योजीत नाहींत किंवा उपमाउत्प्रेक्षांचा पाऊस पाडीत नाहींत. सांगण्याचे मुद्दे ते निर्भीडपणें मोजक्या शब्दांत सांगतील. पण मध्येंच अशी एखादी बहारीची कोटी किंवा उपमा लावून देतील कीं तिनें श्रोत्यांच्या हृदयाचा अचूक ठावच घ्यावा! त्याचें वक्तृत्व अनिरुद्धपणें वहाणाऱ्या खडकांतील पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें नसून खळखळ न करता संथपणें वहाणाऱ्या नदीच्या गंभीर पात्राप्रमाणें वाटतें. सुरवातीस त्यांच्या भाषणाला तितकासा रंग येत नाहीं. पण अखेरी अखेरीस ते बरेच रंगतात आणि प्रतिपाद्य विषयाशीं एकरूप होतात. अशा समयीं लहान लहान शब्दखंडांची मालिका आपल्या कल्पनाशक्तीनें योजून जेव्हा ते एखादें रसपूर्ण वाक्य संपवितात तेव्हां त्यांचें वक्तृत्व अत्यंत परिणामकारक होतें. त्यांच्या भाषणांतील दुसरा गुण म्हणजे त्याची वाणी अस्खलित, ओघवती व मोहक आहे हा होय. वक्तृत्वांत अखंडपणें स्रवणाऱ्या वक्त्यांच्या मोहक वाणीला प्राधान्य देतात. अशी वाणी दत्तोपंतांना सुदैवानें लाभली असून तिचा ते पुरेपूर फायदा घेतात. आणि लेखनाविषयीं त्यांना जात्याच कंटाळा असल्यामुळें जीं साहित्यविषयक प्रमेयें लिहून काढण्याचें ते टाळतात तीं आपल्या भाषणात बऱ्याच अंशानें सुस्पष्ट व सुव्यक्त करण्यास ते मुळींच कसूर करीत नाहींत.

गेल्या वर्षी (ऑगस्ट १९३२) श्री. चिं. वि. वैद्य यांच्या अध्यक्षते-खालीं भा. इ. सं. मंडळाच्या दिवाणखान्यांत श्री. न. चिं. केळकर यांस त्यांच्या एकसष्टाव्या वाढदिवसानिमित्त शारदामंदिराच्या वतीनें प्रमुख साहित्यसेवकांच्या तर्फे मानपत्र देण्यांत आलें होतें. त्या वेळीं इतर वक्त्यांच्या मालिकेंत दत्तोपंतांच्या भाषणाचा एक आटपशीर पण उत्कृष्ट नमुना ऐकण्याची जी अपूर्व संधि मला लाभली ती अजूनहि माझ्या आठवणींत

ताजी आहे. श्री. वैद्य यानी श्री. केळकरांच्या पगडीला उद्देशून केलेल्या एका विधानाला अनुलक्षून दत्तोपंतानी ओघानें पगडीविषयीं जी सुंदर व मार्मिक उपमा रचिली व कोटी केली ती सभेंतील श्रोत्यांच्या आठवणींतून निघून जाणें कठिण ! त्यांच्या वक्तृत्वाचे प्रातिनिधिक गुण म्हणजे अंतरींचा उमाळा, प्रतिपाद्य विषयाचें स्वच्छ आकलन, स्वाभिमान, हजरजबाबी-पणा, सत्यप्रीति व शालीनता याचा प्रमाणबद्ध संगम, हे होत. महाराष्ट्रांत अंतरींच्या जिव्हाळयानें व निर्भीड सत्यप्रीतीनें स्मितयुक्त, अस्खलित बोलणारे जे कांही थोडे वक्ते आहेत त्यात दत्तोपंताचा अनुक्रम बराच वर लागेल.

दत्तोपंताचा स्वभाव उत्साही व चळवळ्या असल्यामुळें त्यांस प्रवास करण्याची हौस फार. त्यानी पुष्कळच प्रवास केला आहे आणि अधिक प्रवास करूं अशीहि त्यास उमेद आहे. अनेक ऐतिहासिक स्थळांबरोबरच निसर्गाचीं दृश्येंहि त्यानी नुसतींच पाहिलेलीं नाहींत, तर आपल्या लघु कॅमेऱ्याच्या साह्यानें त्यांचीं छायाचित्रेंहि त्यांनी घेतलेलीं आहेत. प्रवासानें माणसाची दृष्टि व्यापक होते असें म्हणतात. आपल्या अपूर्व निरीक्षण-शक्तीच्या जोरावर त्यांनीं प्रवासापायीं आजपर्यंत जो भरीव अनुभव मिळ-विला आहे त्याचा उपयोग वेळोवेळीं आपल्या भाषणातून ते करतात.

लेखनाच्या बाबतींत जो त्याना कंटाळा तोच पत्रें लिहिण्याच्या बाबतींत. अतिशय निकडीच्या पत्रांना मात्र ते उत्तर देतात. सन्मित्रांमधील पत्रव्यव-हाराला वाङ्मयदृष्टया महत्त्वाचें स्थान आहे हें ते जाणत असले तरी या बाबतींत ते मुळीच नियमितपणा पाळीत नाहींत ! वाङ्मयेतिहासाच्या बाबतींत प्रत्यक्ष संभाषणांत ते मित्रांशीं तासचे तास चर्चा किंवा गप्पा-गोष्टी करतील पण एखाद्या पत्राचें उत्तर देण्याच्या कामीं मात्र हटकून आळस करतील ! आपल्या जीवनांतील कोणत्याहि बाबतींत त्यांनीं अचूक नियमबद्धता किंवा कठोर शिस्त अशी आपणास लावून न घेतल्यामुळें त्यांच्या या स्वभावाची पारख असलेली मंडळी त्यांच्या इयगयीबद्दल मनास लावून घेत नाहीं, परंतु तिऱ्हाइताचा मात्र तेणेंकरून अपसमज होण्याचा संभव फार !

चित्रकलेंत छाया व प्रकाश यांच्या साहचर्याला महत्त्व आहे; तीच

गोष्ट कांही अंशीं व्यक्तिचित्राची. सर्वज्ञता ही जशी ईश्वराची खूण तसेंच सदोषता ही मानवाची खूण मानतात. वर्ण्य व्यक्तींत दुर्गुणांपेक्षा सद्गुणांचा ठेवा अधिक असतो म्हणून तिचे चहाते समतोलपणें किंवा भडक रीतीनें त्या व्यक्तीचें व तिच्या प्रभावी सद्‌गुणांचें शब्दचित्र काढतात, इतकेंच. आतां दत्तोपंताविषयीं त्याच्या चहात्यांच्या काय अपेक्षा आहेत हें थोडक्यांत सांगितल्यानें चित्रामागच्या पार्श्वभूमीचें हें कार्य कांही प्रमाणात उरकल्यासारखें होईल. त्यांची वृत्ति नियमित लेखनानें बद्ध होण्यास अनुकूल नाहीं ही गोष्ट खरी; परंतु चालू काळ मुख्यतः लेखनाचाच होय ही जाणीव त्यानीं कृतींत उतरविण्याचें मनांत आणल्यास त्यांच्या चहात्यांवर उपकार होतील. वक्तृत्वाचें युग मागें होऊन गेलें. आपले उन्नतिप्रद व तेजस्वी विचार आपल्या कीर्तीकरितां नसले तरी बहुजनसमाजाच्या मार्गदर्शकत्वाकरितां जर मागें ठेवण्याचे असतील तर ते नुसते बोलून दाखवून चालणार नाहींत. त्यास नीटनेटकेपणा, सुसंबद्धता व शाश्वति येण्याकरितां ते नीट काळजीपूर्वक लिहून काढले पाहिजेत. दत्तोपताच्या इतिहासाचा तौलनिक सूक्ष्म अभ्यास, शिक्षणशास्त्रातील त्यांचा दीर्घकालीन अनुभव व अधिकार, महाराष्ट्रीय संतवाङ्मयाविषयीं त्यांस वाटत असलेला परम जिव्हाळा, महाराष्ट्र-धर्म, संस्कृति व विद्यापीठ याजविषयीं यापुढें जोरांत प्रचारकार्य करण्याची त्यांची उत्कट तळमळ, यांचा एकत्र विचार करतां असें वाटतें कीं, त्या त्या विषयांसंबंधींचा आपला विशिष्ट दृष्टिकोन जर ते व्याख्यानाच्या भाषेंत लहान लहान पुस्तकांत विशद करून सांगतील तर त्यांच्या विचारांना एक प्रकारचें प्रमाणबद्ध व निश्चित स्वरूप येईल आणि तेणेंकरून साहित्यप्रसारकाच्या टप्प्यातून साहित्यिकाच्या टप्प्यांत लीलेनें पाऊल टाकल्याचेंहि श्रेय त्यांना लाभेल.

प्रस्तुत लेखकाजवळ ते म्हणाले होते कीं, "मी नोकरींतून मोकळा होतांच महाराष्ट्रसंघटनेच्या कार्यास सर्वस्वीं वाहून घेणार आहें आणि महाराष्ट्रभर व्याख्यानांचा दौरा काढणार आहें." त्यांच्यामागें इतरांसारखा संसाराचा लकडा अजून लागलेला नाहीं हें ज्यांना माहीत असेल अशांना तरी त्यांच्या या सदा आनंदी असणाऱ्या वृत्तीबद्दल हेवाच वाटेल.

दत्तोपंतांची वाद करण्याची पद्धत अस्सल खेळाडूला साजेशीच आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, वादांत एकमेकांनीं दोन गुद्दे द्यावे घ्यावे, पण नंतर या गोष्टी साफ विसरून टाकाव्या. त्यांचा उमदा बाणा असल्यामुळें त्यांचें वर्तन त्याप्रमाणें असतें; परंतु प्रतिपक्षाची वृत्ति कित्येक प्रसंगीं तितकी खुल्या मनाची नसते आणि म्हणून कित्येकदा विसंवादी सूर उमटतात. त्यांच्या या खेळाडू पण शूर वृत्तीला जणूं उत्तेजन म्हणून त्यांच्या भाषणाच्या तोंडीं कांही तरुण मंडळी "हरहर महादेव" अशा अर्थ-गर्भ शब्दांनीं त्यांचें स्वागत करण्यास टपलेली असते असें दृश्य पुण्यांतील एका सभेंत मीं पाहिलेलें आहे !

दत्तोपंताचें जीवित पावसाळ्यात अनिरुद्धपणें संचार करणाऱ्या पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें भासतें. परतु उच्छृंखल लोंढा झाला तरी तो पुढें सपाट प्रदेशांत येताच संथपणें वहातोच. आपल्या उत्तर आयुष्यात अशा संथ-पणाचा अवलब करून जर ते त्यास नियमित शिस्तीची उचित जोड देतील तर तें इष्टच होईल.

शेवटीं इतकेंच सांगावेंसें वाटतें कीं, एकवार दत्तोपंतांचा सहवास लाभल्यानंतर त्यांच्याशीं तो पुनः पुनः घडून यावा असें प्रत्येकाला वाटत असतें. मोठमोठ्या पर्वतांत दिव्य औषधी असतील, पण आंत प्रवेशहि मिळणें दुर्लभ ! तेंच समुद्राकडे पहा ! त्याच्या आत काय काय दडलें आहे कुणास ठाऊक ! परंतु त्याचें नुसतें दर्शनच सुखमय व आल्हादकारक असतें. म्हणून टेनिसन् कवीच्या ओढ्याविषयींच्या एका प्रसिद्ध कवनां-तील चरणात थोडासा फरक करून "कोणी येवो कोणी जावो, निर्मल स्मित मात्र आपल्या मुखावर सदैव झळको " असें मी रूक्ष गद्यांत दत्तो-पंतांस म्हटल्यास त्यांच्या जीविताचें रहस्य त्यांत थोडक्यांत उतरविण्याचा अल्पसा प्रयत्न केला आहे असें समजतों !

---

# आमचा गेरसप्प्याचा प्रवास

## ( प्रवासवर्णन )

पुष्कळ वर्षांपासून गेरसप्प्याचा सुप्रसिद्ध धबधबा एकवार पहावा अशी मला उत्कट इच्छा होती. ती सफल होण्याचा योग नुकताच आला. अमेरिकेसारख्या दूरदूरच्या देशातून हा धबधबा पहाण्याकरितां नाताळांत प्रवासी येत असतात, पण त्याच्या जवळपास रहाणारे लोक मात्र तो पहाण्याचें टाळतात ! ही स्थिति पाहून 'अतिपरिचयानें अवज्ञा होते' या अर्थाची म्हण थोडीशी बदलून 'सानिध्यामुळें अनास्था उत्पन्न होते' असें येथें म्हणणें जास्त सयुक्तिक ठरेल.

### कारवार ते माविनगुंडी

आम्ही कांही हौशी मंडळी ता. २९-१२-१९३२ रोजीं गेरसप्प्याला जाण्याकरितां कारवारहून सकाळीं मोटरनें निघालों. सायंकाळीं आम्हीं सिर्सींत वसती केली. दुसऱ्या दिवशीं आम्हांस पुरेल इतकें फराळाचें सामान घेऊन सिर्सीहून सकाळीं मोटरनें निघालों तों एका तासानें सिद्दा-पुरास पोचलो. तेथें थोडा वेळ विश्रांति घेऊन तेथून दहा मैल दूर असलेल्या माविनगुंडी नावाच्या खेड्याच्या ठिकाणीं गेलों. सर्व्हिसची मोटर असल्या-कारणानें आम्हास तेथेंच उतरावें लागलें; आणि तेथून चालत चालत वाटेंत मौजेनें संभाषण करीत शरावती नदीजवळ पोंचलों. हें अंतर माविन-गुंडीहून सुमारें तीन मैल आहे. तेथें नदीचें पात्र लहानच आहे. तरीही मैसूरच्या हद्दींत असलेल्या या नदीच्या पैलतीरास नावेंतून जाण्यास दर माणशीं दोन आणे घेतात !

## गर्द झाडी व रम्य झरे

सिर्सीहून सिद्दापूरपर्यंत आणि पुढें गेरसप्प्यापर्यंत दिसणारी निसर्गाची शोभा अत्यंत भव्य, उदात्त व रमणीय आहे. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनीं उंच उंच झाडांची इतकी दाट गर्दी लागलेली आहे कीं, सूर्याचे किरणहि तेथें फिरकणें कठिण! म्हणून भर माध्यान्हीच्या वेळीं सुद्धां या टापूंतून जातांना अतिशय गारवा वाटतो! उन्हाचा त्रास किंवा तिरीप मुळींच बाधत नाहीं! आणि थकवा तर मुळींच येत नाहीं! सभोंवार जिकडे तिकडे पाण्याचे लहान लहान झरे वनराजींतून संथपणें स्रवत असतांना दृष्टीस पडतात. गेरसप्प्यास मोठ्या धबधब्याचें किंवा "राजा"चें दर्शन प्रेक्षकास करून देण्यापूर्वी या झऱ्यांच्या रूपानें लहान सरदारांचें दर्शन घडवून आणून त्याची उत्कंठा उत्तरोत्तर वाढविण्याचा विडा निसर्गानें येथूनच उचलला आहे कीं काय असा भास होतो!

### एक गोड फसवणूक

स्वतंत्र मोटर नसल्यास मैसूर बंगल्यापर्यंतच्या पुढें मैलभर अंतर पायींच चालत जावें लागतें. परंतु यांतील मोठा फायदा हा कीं, प्रेक्षकाला चालतांना रम्य वनराजी आणि पाण्याचे लहान लहान झरे डोळे भरून पहाण्याचें आयतेंच भाग्य लाभतें. हें अंतर चालून जात असतांना गेरसप्प्याचा धबधबा आतां तरी जवळ आला का, त्याचा गंभीर घोष आतां तरी दुरून ऐकूं येतो का, अशी उत्कंठा सारखी वाढत असते! म्हणूनच हें अंतर मोटरीसारख्या शीघ्र वाहनांत बसून आक्रमण केल्यानें ह्या उत्सुकतेचा अधीर अनुभव अवीटपणें उपभोगण्यास सांपडणें कठिण! कारण ही उत्सुकता एकसारखी वाढत जाते आणि "दुःखाअंतीं सुख" या म्हणीप्रमाणें प्रवासी वाट चाल-चालून, थकून, शेवटीं एकदांचा प्रत्यक्ष धबधब्याजवळ येऊन पोंचल्यानंतर त्या भव्य दृश्यानें त्याच्या डोळ्यांचें पारणें फिटतें व क्षणभर थकवा कोठल्या कोठेंच गडप होऊन तहानभूक विसरल्यासारखी स्थिति होते! चालतांना धबधब्याविषयीं उत्कंठा इतकी वाढते कीं, वाटेंत खडकांवरून नदीचें अरुंद पात्र नागमोडी वळणावळणांनीं जात असतां जो एक प्रकारचा घुमणारा, मंजुळ

अखंड ध्वनि निघतो तो दूरच्या धबधब्याचा प्रतिध्वनि की काय असा भास वारंवार जाणवल्याशिवाय रहात नाहीं !

## धबधब्याच्या टापूंत

मैसूर हद्दींत सुमारें मैलभर किंवा अधिक चालून गेल्यानंतर दुरून मैसूर बंगला दिसूं लागतो. आणि तेव्हा मात्र "धो धो" असा मोठा प्रचंड घोष स्पष्टपणें ऐकूं येतो. मग प्रवाशाच्या मनाची अशी चलबिचल उडते कीं मघापासून आपण जो मधुर, अस्पष्ट ध्वनि ऐकला तो या प्रचंड धबधब्याचा नव्हे तर ! आपणास इतका वेळ धबधब्यानें चकविलें खरें ! मनुष्यावर निसर्गानें कांही काळ मात केली खरी !

## पिंजलेल्या कापसाचे प्रचंड पांढरे धागे

मैसूरच्या बंगल्याकडे पोंचल्यानंतर गेरसप्प्याच्या चारहि धबधब्यांचें संपूर्ण दृश्य एकाच वेळीं डोळ्यांपुढें दिसतें. तें अतिशय भव्य, रमणीय व चिरंतन स्वरूपाचेंच होय ! थोडथोड्या अंतरानें चार प्रवाह प्रपातांच्या रूपानें उंच टेकडीवरून खालीं खोऱ्यात जोरानें उडी घेतात. मैसूर बंगल्यापासून हें दृश्य बरेंच दूर असल्यामुळें पाण्याचे प्रत्यक्ष असे तुषार दिसत नाहींत; मात्र, कापसाचे अतिशय प्रचंड लाबचे लांब पिंजलेले पांढरे शुभ्र धागे क्षणाचाहि उसंत न करतां एकामागून एक असे कड्यांच्या माथ्यावरून उडत उडत येत आहेत आणि जोरात खालीं पसरून अदृश्य सृष्टीच्या धुक्यांत विलीन होत आहेत असा पदोपदीं भास होतो !

## "राजा" नांव कसें पडलें ?

ब्रिटिश हद्दींत पडणाऱ्या धबधब्याचें नाव "राजा." तो कड्यावरून सुमारें ८३० फूट सरळ खाली उडी घेतो. त्याच्या पाण्याच्या लोंढ्याची रुंदी फार आहे आणि तो चारहि धबधब्यांत अतिशय भव्य दिसतो. म्हणून त्यास "धबधब्यांचा राजा" हा श्रेष्ठ पदवीचा मान यथार्थ दिला जातो.

## गर्जणारा धबधबा

या धबधब्यापासून जवळच 'गर्जणारा' धबधबा आहे. तो राजा धबधब्याप्रमाणें एकदम सरळ उडी न घेतां सुमारें पंचवीस अंशाच्या कोनानें

जोरानें खालीं पडतो. त्याचा घोष फार गंभीर आणि भयंकर असल्यामुळें त्यास 'गर्जणारा' असें नाव आहे.

### दारूचा बाण

या गर्जणाऱ्या धबधब्यापासून थोड्या अंतरावर 'रॉकेट' म्हणजे (दारूचा बाण) नांवाचा धबधबा आहे. तो प्रथम एका लोंढ्यांत पडून पुढें तीन चार बारीक सरींत विभागला जातो.

### राणीचें सौजन्य

त्याच्या अलीकडे विनयबुद्धीनें शातपणें पडत असल्यामुळेंच कीं काय 'राणी' म्हणून संबोधला जाणारा चौथा धबधबा मिळून चारहि धब-धब्यांची ही मालिका पूर्ण होते. या धबधब्याजवळ रानपारवे कळपांनीं उड-तांना दिसतात. पाण्याच्या प्रचंड घोषामुळें वेडावून गेल्यामुळें ते तेथेंच सभोंवार वर्तुळाकार घिरट्या मारीत असल्यास नकळे !

### मैसूर बंगल्याखालची उतरण

मैसूर बंगल्यापासून खाली धबधब्याच्या पायथ्याशीं टेंकडी उतरून जाण्याकरितां मैसूर सरकारानें रानांतून पायवाट केली आहे. सुमारें मैल-भर या अरुंद वाटेनें उतरून गेल्यानंतर 'लेडी अर्विन सीट' नांवाची बसण्याची जागा लागते. ती दगडांनीं बांधलेली असून तेथून चारहि धब-धब्यांची शोभा अधिक जवळून आणि म्हणून ज्यास्त स्फुट दिसते. तेथून पुढचा रस्ता मात्र अरुंद, खडकाळ आणि पाण्याच्या तुषारांनीं डबडबलेला असा आहे. पाय निसरून पडण्याची भीति असते. धीट इसम मात्र पुढें उतरून जातात. मात्र जड पोशाख व जोडे असून चालणार नाहीं ! ही टेंकडी फार जपून सावकाश उतरत उतरत जेथें धबधब्यांचें पाणी पडून भली मोठी खिंड पडली आहे तिच्या जवळपास प्रवासी जाऊं शकतात. चालतांना प्रत्येक पाऊल स्थिर घातल्याविना गत्यतर नसतें. कारण जरा पाऊल चुकल्यास 'कपाळमोक्ष'च व्हावयाचा !

### तुषारांचें अखंड स्नान

ही मैलभर उतरण उतरत असताना मुळींच कष्ट होत नाहींत ! मौज ही कीं, धबधब्याच्या खिंडीजवळ एखाद्या खडकावर बसलें असतां भर

माध्यान्हीचें रखरखीत ऊन पडलें असतांहि सर्व अंगावर शिंपडणाऱ्या पाण्याच्या अखंड तुषारांमुळें तें ऊन जाणवतें मात्र, पण बाधत नाहीं! उन्हाच्या व तुषारांच्या या अखंड पाठशिवणीच्या खेळांत तुषारच उन्हावर मात करतात आणि प्रवाशाची मनसोक्त सेवा करून त्याचा शीण घालवितात!

## इंद्रधनुष्यांची चढती कमान

या तुषारांशीं कायम निगडित असलेलें दुसरें मनोहारि दृश्य म्हणजे इंद्रधनुष्यांच्या चढत्या कमानींची रांगच रांग, हें तें होय! आणि प्रेक्षकाला विस्मय वाटतो तो असा कीं, मैसूर बंगल्यासन्निधच्या उंच पठारावरून पहातांना खालीं दिसणारी इंद्रधनुष्याची ही सप्तरंगी रांग टेंकडी उतरून धबधब्याच्या पायथ्याशीं गेल्यावरहि वर वर दिसूं लागते आणि टेंकडी चढत असलेल्या प्रवाशांची सोबतीण होऊन त्याजबरोबरच पुन्हा वर चढून त्याच्या मनास निरंतर आल्हाद देते. म्हणून असेंहि कल्पितां येईल कीं, धबधबे व त्यांच्या खालचें शरावती नदीचें अरुंद पात्र याना झुलत्या पुलासारखे जोडणारे तरंगते दुवे म्हणजेच तर हीं इंद्रधनुष्ये नव्हेत ना?

## भाकरीचे भारवाहक पण पाण्याचे विसराळू

आम्ही धबधब्यांच्या पायथ्याशीं पोंचलों तेव्हा माध्यान्हीं बारा साडेबारा वाजण्याचा सुमार झाला होता. तेथें धबधब्याचें दृश्य डोळे भरून एकसारखें पाहिल्यानंतर सुमारें दीड दोन तासांनीं आम्ही लेडी अर्विन सीटजवळ जाण्याकरितां टेंकडीचे कडे चढूं लागलों. चढताना मात्र फारच त्रास होतो. पाय चुकून डोकें फुटण्याच्या भीतीमुळें कित्येक अवघड ठिकाणीं तर पायांबरोबर हातांचाहि उपयोग करण्याचा प्रसंग येतो व कांही काल तरी चतुष्पाद प्राण्याची गति अनुभविताना कौतुक वाटतें! अर्विन सीटवर आम्ही कांही वेळ बसलों व विश्रांति घेतली. तेथून पुढें लीलेनें उतरून आलेली मैलभर उतरण कष्टानें चढू लागलों. आतां मात्र चढण चढत असतांना तहानेनें घसा कोरडा पडूं लागला! आम्हीं बरोबर भाकर नेली होती खरी पण तिचा उपयोग करण्याची तितकीशी आवश्यकता भासली नाहीं! पण पाण्याचे भरलेलें भांडें बरोबर घेण्यास आम्ही विसरल्यामुळें मात्र अतिशय त्रास झाला! भूक आणि तहान यांजमधील

झगड्यांत केव्हांहि तहानेचीच सरशी अधिक होत असते हा आम्हांस या वेळीं पुरेपूर अनुभव आला !

## मैसुरी कडवट कॉफी !

टेंकडी चढून आम्हीं मैसूर बंगल्याची हद्द गांठली. तेव्हां आम्ही तृषेनें अतिशय व्याकुल आणि घाट चढण्याच्या श्रमानें घामाघूम होऊन गेलों. जवळच्या कॉफी-दुकानांत (कारण मैसूर-मद्रासकडे चहाऐवजीं कॉफी पितात) कॉफी मागितली. पेल्याला दोन आणे असा दर आहे. ही मैसुरी कॉफी कडवट असल्यामुळें तोंड आंबट करीत हें पेय आम्हीं कसेंबसें घशाखालीं ओतलें आणि तहान भागविली !

## अर्धवर्तुळाकार खोरें

ब्रिटिश बंगल्यापासून मैसूर बंगल्यापर्यंत खोऱ्यांतून वर्तुळाच्या काल्पनिक मध्यरेषेनें घेतलेलें अंतर सुमारें ७१० यार्ड भरतें असें तज्ज्ञांचें मत नमूद आहे. मैसूर बंगल्यासमोरच हा ब्रिटिश बंगला दिसतो. परंतु ब्रिटिश बंगल्यापासून या खोऱ्याला अर्धवर्तुळाच्या परिघानें प्रदक्षिणा घालून आणि शरावती नदीचें लघु पात्र ओलांडून चार पांच मैल अंतर तोडल्यानंतर मैसूर बंगल्यापाशीं जातां येतें.

## शरावतीचें खळखळणारें पात्र

चारी बाजूंनीं उंच टेकड्यांचे कडे, त्यांजवरील गर्द हिरवी झाडी, मध्यंतरी असलेलें लांबट आकाराचें खोरें आणि त्यांतून वाहणारें शरावती नदीचें लहानसें खळखळणारें पात्र पाहून होन्नावर बंदराजवळ समुद्रास मिळणारी रुंद व विस्तीर्ण पात्राची शरावती नदी ती हीच काय असा अचंबा वाटल्यावाचून रहात नाहीं !

## दोन दृश्यांमधील अवस्थांतर

मैसूर बंगल्यावरून दिसणाऱ्या दृश्यापेक्षा अलीकडच्या ब्रिटिश बंगल्यावरून दिसणारें दृश्य अधिक जवळचें आणि म्हणून भयानक व गंभीर भासतें. तेथील कड्यावरून निरनिराळ्या ठिकाणांहून पहातां 'राजा' व 'गर्जणारा' असे दोन धबधबे आणि 'रॉकेट' व 'राणी' असे बाकीचे दोन दिसूं शकतात. परंतु मैसूर बंगल्यावरून एकाच दृश्यांत, दुरून का

होईना, जें चारहि धबधब्यांचें मनोहर दर्शन घडतें त्याचें समुचित सौंदर्य काही निराळेच! मैसूर बंगल्यावरून दुरून जें हें धबधब्यांच्या सौंदर्याचें एकत्र संघटन झालेले दिसतें त्याचें जवळून विघटनात्मक दृश्य पहाण्याचें असल्यास तें ब्रिटिश बंगल्याच्या हद्दींतून दिसूं शकतें. ब्रिटिश बंगल्या-सन्निधच्या टेंकडीवर चढून ओणव्यानें खाली पहाता 'राजा' व 'गर्जणारा' हे दोन धबधबे जवळून दिसतात. परंतु वरून खालीं पहाण्याच्या या क्रियेंत भोंवळ येते व अधिक वेळ टक लावून पाहवत नाहीं. जवळून धो धो असा गंभीर घोष करीत जोरानें उडणाऱ्या प्रवाहांची प्रचंड गर्जना, तुषाराची रेलचेल, आणि लोंढ्यांचा विलक्षण धांवता वेग, जवळून ऐकताना व पहातांना सौंदर्यापेक्षा अद्‌भुततेचा व भयानकतेचाच परिणाम अधिक होतो. आणि सौंदर्य व भयानकता या दोहोंपैकीं दुसऱ्या गुणधर्मा-विषयीं किंचित् आपलेपणा किंबहुना पक्षपात वाटूं लागतो यात आश्चर्य नाहीं. मैसूर बंगल्यावर खालच्या पृष्ठभागावरून किंचित् वर पहावयाचें तर ब्रिटिश बंगल्यावर वरून खालीं खोऱ्यांत दृष्टिक्षेप करावयाचा अशीं हीं संघटन-विघटनात्मक दोन दृश्यें पुरेपूर न पहाणारा आणि त्याचें सौंदर्य व भयानकता पूर्णत्वानें न अनुभवणारा इसम अरसिकच म्हटला पाहिजे.

## दृश्यांचे निरनिराळे समय

आम्हीं दुपारीं बारा वाजल्यापासून संध्याकाळीं सुमारें चार वाजेपर्यंत या चारहि धबधब्यांचीं हीं दुहेरी दृश्यें पाहिलीं. अनुभविक लोक सांगतात कीं, धुक्याचे लोळ आणि तुषाराचे लोळ एकवटण्याच्या वेळचें अरुणो-दयाचें राजस दृश्य, आरक्त सूर्यकिरणांच्या संयोगानें तळपणारें सायंकाळचें ताम्र सात्त्विक दृश्य आणि शीतल रुपेरी चांदण्यांत त्याच्याच हसिताची जणूं प्रतिकृति असणारें रात्रीचें तामस दृश्य, अशीं तिहेरी दृश्यें फारच हृदयंगम असतात आणि त्या त्या समयीं पहाणाऱ्याच्या अंतरंगांत विविध उत्कट भाव उत्पन्न करूं शकतात. मात्र ग्राहकाचें अंतरंग निसर्गांतील गूढ सौंदर्य शोधून तें आकर्षून घेण्यास समर्थ असलें पाहिजे.

## दृश्यें पहाण्याचा काल

हिंवाळ्याचा काळ हे धबधबे पहाण्यास योग्य असा मानण्यांत येतो.

पावसांत चारहि धबधब्याचे लोढे एकवटून त्याचा एकच प्रवाह होतो आणि तेणेंकरून त्याचे व्यक्तित्वच जाणवत नाहीं ! आणि उन्हाळ्यात प्रवाहाची धार सुकून आटून क्षीण होत असल्यामुळें डोळे भरून पहाण्याच्या आनंदास मुकावें लागते ! मिळून हे धबधबे पहाण्याचा उत्तम काल म्हणजे नोव्हेंबर व डिसेंबर हे महिने होत.

## तारुण्यांतील पेटत्या असंतोषाची कल्पना

तात्पर्य, क्षणभरहि विसावा न घेता गंभीरपणें प्रचंड घोष करीत जोरानें खालीं उडी घेणाऱ्या या धबधब्यांकडे पाहून प्रेक्षक कांही काळपावेतों देहभान विसरून निसर्गाशीं पूर्णपणे तन्मय झाल्याविना रहाणार नाहीं ! कोठें कृत्रिम मानवी जीवन आणि कोठे अनिरुद्धपणें संचार करणारे, प्रचंड घोषांत जोराने उडी घेणारे, हे निसर्गाचे प्रपात ! पर्वतांतील खडक, काटे व खांचखळगे पाहिले म्हणजे जखडणाऱ्या अनेक धार्मिक रूढींची जशी आठवण होते, तसेंच शांत व गंभीर समुद्राकडे पहातां तो स्वातंत्र्याचाच जणूं अवतार कीं काय असा भास होतो ! हे पाण्याचे प्रचंड प्रपात पाहून समुद्राच्या स्वातंत्र्यास मिळूं पहाणारा तरुणांचा असंतोष जोरानें सळसळतो आहे कीं काय असें भासतें ! अनादींतून अखंडाप्रत वहाणारे हे प्रचंड प्रवाह अनंतत्वांत विलीन होतात अशीहि कांहीशी कल्पना करितां येईल ! असे भव्य देखावे—निसर्गाची ही दुर्मिळ दृश्यें—एकदा तरी डोळे भरून पाहिल्याविना धन्यता कशी लाभेल !

———

# फोटोची हौस पुरी फिटली !

कै. वा. गो. आपटयांची "माणिकबाग" ही उत्कृष्ट कादंबरा पाहिल्या-बरोबर माझ्या मनात सुमारें तीन वर्षांपूर्वीची एक तापदायक आठवण उभी रहाते. ती कोणती म्हणाल तर भावना व तर्क यांजमधील उभ्या विरोधाची होय. भावनेवर तर्काची सरशी होत असते हें सत्य मला पुढें कटु अनुभवांती पक्के कळायचें होतें ! आणि अंतःकरणाच्या या द्विविध कप्प्यांची सूक्ष्मपणें छाननी करावयाची होती !

कित्येक वर्षांपासून घरच्या सर्व मंडळींचा एकत्रित फोटो काढून घेण्याचें माझ्या मनात एकसारखें घोळत होतें. पण एक ना एक अडचण उभी राही आणि बेत मागें पडे. शेवटीं मे महिन्यातील एक दिवस लाभला आणि फोटो काढण्याचें काम कित्येक वर्षांपासूनचा आमचा शेजारी बाळू याजकडे देण्याचें मी ठरविलें.

"तुमचे फोटो अस्से काढून देतो घ्या कीं, मुंबईच्या स्टूडिओंत काढलेले हे फोटोदेखील त्याच्यापुढे फिक्के पडतील !" अशी फुशारकी मारीत बाळूनें कांही सिनेमा नटींचे सुंदर व सुबक फोटो माझ्यापुढे ठेवले आणि ते आपण मागें मुंबईच्या एका मोठ्या सिनेमा कंपनींत फोटोग्राफर असतांना काढल्याचें सांगितले.

"छान ! पण इथें तुझा स्टूडिओ नसतां तूं या फोटोंप्रमाणें फोटो कसे काढशील ?" मी विचारलें.

"त्याची नको तुला काळजी ! पहाशील तर खरें !"—बाळू.

"पण तुझा काय तो 'चार्ज' सांगशील कीं नाहीं ?"—मी.

बाळू म्हणतो–"अरे, तुझ्या बालपणापासून तूं माझा जानी दोस्त ! तुजकडून का मी अधिक घेईन ? तुमच्या कुटुंबांतील मंडळींच्या ग्रूपच्या तीन प्रतींना अवघे दहा रुपये, तुझ्या बस्टच्या तीन प्रतींना सहा रुपये आणि तुझ्या व बायकोच्या ग्रूप फोटोला सहा रुपये मिळून बावीस रुपये दिलेस म्हणजे डोक्यावरून गेलें ! खरोखर हें काम तीस रुपयांचें आहे ! पण तुला म्हणून बावीस रुपये सांगितले ! त्यांतच तुझ्या आईचा मोठ्या साईजचा 'बस्ट' मोफत काढून देईन तो निराळाच !"

हां हां म्हणतां फोटो काढण्याचा दिवस एकदांचा उजाडला आणि दुपारीं चार व पांच यांच्या दरम्यान वरीलप्रमाणें निरनिराळे फोटो काढण्यांत आले. ग्रूप फोटो काढतांना आमचा कृष्णा किंचित् हलला. अर्थात् त्याची छबी निगेटिव्हवर नीट उमटली नाहीं. तेव्हां माझ्या वडील बंधूनें लगेच तो फोटो फिरून एकवार घेण्यास बाळूला बजावलें.

पण बाळू काय म्हणतो ! "आय् से, तुमच्या मुलांनाच नीट कसें तें बसतां येत नाहीं ! त्याला मी काय करूं ? हें काम तुमचें-माझें नव्हे हो ! तुमच्या चुकीबद्दल फिरून फोटो घेण्याची दगदग मला हो कां म्हणून !"

माझा बंधु–"पण आधीं मुलांना नीट बसविण्याचें व त्यांचें लक्ष कॅमेऱ्याकडे वेधण्यासाठीं घंटा वाजविण्याचें काम कुणाचें ? तुजजवळ घंटा नाहीं ती नाहींच ! पण नेणत्या मंडळींनीं व अजाण मुलामुलींनीं फोटोकरिता नीट बसावें म्हणून वेळोवेळीं बैठकी बदलण्याच्या साध्या सूचनाहि तूं देऊं नयेस !"

पण वरील उद्गारांनीं नरम पडण्याऐवजीं बाळू जेव्हां अद्वातद्वा बरळूं लागला आणि प्रसंग घातघाईवर येऊन ठेपला तेव्हां मला मध्यें पडणें भाग झालें. कारण बाळूकडे फोटोचें काम सोंपविण्याची जबाबदारी सर्वस्वीं माझी होती ! पण सुरवातीसच त्याच्या या चुकारतट्टू व कांगावखोर समर्थनामुळें माझ्या मनांत 'धस्स्' झालें आणि मी या मानीव मित्रावर ठेवलेला विश्वास अनाठायीं तर नव्हता ना अशा प्रकारची आत्मवंचनेची भावना मनाला क्षणांत चाटून गेली !

माझ्या खास विनवणीला जुलमाचा रामराम म्हणून कांहीं दिवसानंतर

बाळूने तो बिघडलेला फोटो फिरून घेण्याचे कबूल केले ! पण 'जादा' आकार पडेल म्हणून बजावण्यास कमी केलें नाहीं !

पण सांगण्याची मौज ही कीं, जो बाळू माझ्या बंधूशीं मोठे तावातावाने तुटून बोलत असे तोच बाळू मजकडे बोलताना जें एक प्रकारचें मोहक मार्दव दाखवायचा, तें पाहून मी माझ्याशींच अशी भावना करून घेतली होती कीं माझ्या बंधूच्या तिखट बोलण्यामुळेंच त्याला तितक्याच तीक्ष्ण शब्दशरांनीं बाळूनें प्रतिटोला दिला असावा ! जातीचा काही तो तितकासा चढेल नसावा !

फोटो काढल्यानंतर तीन चार दिवसांनी बाळू दीनवाणीने म्हणतो—

" ...राव, काय करूं ! तुझ्यासाठी मुद्दाम फोटोच्या सामानाची व्ही. पी. मी मुंबईहून मागविली आहे ! ती सोडवून घेण्यास पदरचे पैसे असते तर ते मी तुजकडे का म्हणून आगाऊ मागितले असते ? मुंबईच्या सिने-माच्या स्टूडिओंत मी तीनशें रुपयाच्या पगारावर 'चीफ फोटोग्राफर' होतो ! पण आजारी पडल्यामुळें हवापालट करावा म्हणून या कंगाल गावीं यावे लागलें ! आणि इकडे माझ्या कामाचें कसें काय चीज होत आहे हें तूं पहातोसच ! कृपा करून तूर्त दहा रुपये दे. पोस्टातून व्ही. पी. आणतो. बाकी रुपये काम झाल्यानंतर सवडीनें दे."

मुकाट्यानें त्याच्या हातावर मी दहा रुपयाची नोट ठेवली.

पलीकडचेंच बाळूचें घर होतें. मी दररोज तेथें जाऊन बसें आणि आमचें फोटोचें काम किती व कसें होत आहे हें त्याच्याकडून समजून घेण्याचा प्रयत्न करीत असें. पण जे काम इतरांकडून व्हावयाला एक आठवडा पुरा-यचा त्याला बाळूनें सोळा दिवस घेतले ! तरी ते सरून सरेना ! शेवटी वरातीमागून वराती केल्यानंतर त्यानें फोटोच्या तीन 'नमुनाप्रती' मला दिल्या ! तीन फोटोंपैकी घरच्या सर्व मंडळींचा 'ग्रूप' फोटो तेवढा साधा-रणसा उतरला होता ! दुसरे दोनहि फोटो फिक्के, फटफटीत व अयथार्थ दिसत होते !

लगेच ही गोष्ट मी बाळूच्या नजरेला आणून दिली. माझ्या बंधूने मजवर एवढाले डोळे केले ! घरच्या मंडळींकडून एकसारखा 'गिल्ला' सुरू

झाला, "तुला आम्ही पूर्वीच सांगितलें होते किनई बाळू 'असला' म्हणून ! नमुन्यासाठी फार तर एकच फोटो त्याच्याकरवी काढून घ्यायचा होतास ! तीनहि फोटो एकदांच त्याच्याकडे देण्यात तूं जी घिसाडघाई केलीस तिचा परिणाम भोग आता !"

आणि मी तरी त्यांचें सांत्वन कोणत्या तोंडानें करूं शकतों ? फोटो काढून घेण्याची माझी ही पहिलीच खेप होती ! मी या बाबतींत पुरता नेणता होतों ! पण अजून मी बाळूला माझा जुना मित्रच समजत होतों ! आणि त्याच्या लंगड्या समर्थनाला वरवर 'हूं' 'हूं' म्हणत होतों ! मात्र आंतून विवेकाचा अंकुश हृदयाच्या भावनाना सारखा टोचीत होता !

दरम्यान फोटो लगबगीनें मौंटवर चढवून त्यांच्या तीन तीन प्रती बाळूनें माझ्या गळयात बांधल्या देखील ! आणि मग त्यानें बाकी रुपयाबद्दल मला येतां जातां सारखा लकडा लावून अतिशय बेजार देण्यास सुरवात केली !

बाळूसारख्यावर अधपणे विश्वासून त्याला आगाऊ रुपये दिल्याबद्दल घरची सारी मंडळी मला उपहासविषय करीत आणि बिघडलेले फोटो तसेच त्याला परत कर म्हणून निकरानें सांगत. पण बाळू ते फोटो परत घेण्यास राजी असता तर ना ?

उलट तो मलाच रागारागानें विचारतो,— "कोणी ...नें सांगितलें तुला मी काढलेले हे फोटो वाईट म्हणून ? त्या ...ला फोटोग्राफीचा गंध तरी आहे का ? आण त्या ...ला मजसमोर ! पहातों मजपुढें तो कसा काय बोलतो तो ? खरोखर हे फोटो तर फोटो उतरले आहेत ! हिंमत काय त्याची पारख करण्याची येथील बाजारबुणग्याची ? त्याची खरी परीक्षा करावी तर मजसारख्यांनींच ! !"

पुढची हमरीतुमरी टाळण्याकरिता ते फोटो मुकाट्यानें घेऊन मी परतलों ! आणि ते हळूच माझ्या पेटींत दडवून टेवले !

कांहीशा पोळलेल्या मनःस्थितींत पुढें मी बाळूच्या घरापुढील रस्त्यानें जाण्याचेंच टाळूं लागलों ! पण बाळूच्या चिकाटीपुढें तर मी सर्दच झालों ! कारण प्रातःकाळीं, दुपारीं, संध्याकाळीं व रात्रीं अशा दिवसांतून चार पांच

खेपा "तुका बाळून बोलायलां !" असा एका बहिऱ्या म्हातारीबरोबर नेमानें निरोप पाठवून माझा अंत पहाण्याचा त्यानें जणूं निर्धारच केला होता !

आतां माझी खात्रीच पटली कीं, मी या मोहजालांत पुरता अडकलों ! त्यांतून आणखी विशेष गाजावाजा न करतां एकदाचें कसें सुटावें या कटु विवंचनेंत मी पडलों ! बाळूच्या लागोपाठ माऱ्यानें मी दमलों व आणखी पांच रुपये त्याच्या अंगावर फेंकले ! बाकी रकम लवकरच देण्याचें कबूल केलें. फोटो जुन्या निगेटिव्हवर काढलेले ! म्हणून ते फिके दिसत होते ! हें मी उघड पहात असूनहि ते मी स्वीकारले व जिवावर येऊन त्यांचा आकार देण्याचें कबूल केलें ! यांत माझ्या विवेकाची खंबीरी कशी ती आढळत नाहीं असें कोणी म्हणतील हें खरें ! पण अशा मित्राचें खरें स्वरूप असें मजवर लादण्यांत आल्यावर त्याच्यावर उलट प्रतिक्रिया करण्याचा माझ्या मनाचा निर्धार—माझ्या हळुवार अंतःकरणांतील पश्चात्तापाच्या धगीमुळें, पाण्याची वाफ व्हावी तसा वरवर विरून गेला—हेंहि तितकेंच खरें ! !

पैशामागील टुमण्यामुळें एका बाजूनें बाळूकडून सतत मजवर होणारा मारा व घरच्या मंडळीच्या भेदक उपहासाची दुसरीकडून होणारी गोलंदाजी यांच्या कात्रींत माझी स्थिति दुतोंड्या मृदंगासारखी झाली ! फोटोबरोबरच माझी लाजहि दडविण्याची मी तेव्हां धडपड करीत असेन काय !

अखेर या जाचाला अतिशय कंटाळून दलदलीवर माती टाकावी त्याप्रमाणें हें अंगलट आलेलें किटाळ कसें तरी मिटवावें म्हणून मी बाळूला तिसऱ्या हप्त्याचेहि पांच रुपये देऊन टाकले आणि म्हटलें:—"तुला दिलेले एकूण वीस रुपयेच माझ्या डोक्यावरून गेले ! तुझ्याशीं हा सौदा कशाला केला म्हणून मला घरची मंडळी नित्य टोंचीत असते ! आमची जुनी मैत्री मानून व फोटो बिघडले आहेत हें पाहून उरलेले दोन रुपये तूं मला सोडून दे कसे !"

बाळू—"माझा स्वतःचा स्टूडिओ येथें असता तर मी तुला सारेच फोटो निम्म्या दरांत काढून दिले असते बघ ! काय करूं रे ! मी कसकसे हाल काढतों हें तूं पहातोस ना ! मला पैशाची फार निकड आहे.

उरलेले रुपये केव्हां देतोस सांग! कसेंहि करून उद्यां देच !"

"बघूं", इतकेंच म्हणून मी जड पावलांनीं परतलों. त्या मार्गानें जातां येतां बाळू मला वारंवार हटके व या बाकी रकमेसंबंधीं विचारी. बाळूनें विश्वासानें म्हणून मला दिलेला सवलतीचा दर गावांतील योग्य दरांहून अधिक होता हें मला चौकशीअंतीं पुढें आढळून आलें ! फोटो तर बिघडले होते ! म्हणून मी ही बाकी देण्याचें नाकारलें ! तेव्हां मात्र बाळूची मैत्री कसोटीला लागली ! आतां तो येतां जातां मला व घरच्या मंडळींना नांवांनीं शिव्या हांसडूं लागला ! व या बाकीबद्दल दिवाणी कोर्टात मजवर दावा मांडण्याची भाषा देखील बोलूं लागला ! ! अधिक तोंडातोंडी नको म्हणून त्याच्या घरापुढील रस्त्यानें जाण्याचें मी फिरून टाळूं लागलों ! पण हें प्रकरण इतक्यावर मिटण्याचें नव्हतें ! कसें तें पहा. एके दिवशीं बाळूनें आमच्या शेजारच्या गृहस्थापुढें आपली कैफियत गुदरली. बरोबर त्यानें माझ्या आईच्या फोटोची निगेटिव्ह-कांच आणली होती!

"या ...चा फोटो काढल्याबद्दल मला अजून बाकी मिळाली नाहीं !" इत्यादि हातवारे करीत मोठ्यानें ओरडून बाळू आम्हाला उघड नांवानिशीं शिव्यांची लाखोली वाहूं लागला ! शिव्याचा वाढता जोर माझ्या बंधूला सहन होईना ! त्याचें पित्त खवळलें आणि तो धांवत माडीवर गेला. तो व बाळू यांच्यामध्यें निकराचें भाडण जुंपलें ! बाळूच्या हातांत निगेटिव्हची कांच होती ! त्याच्याशीं एकदम दोन हात करणें धोक्याचें होतें ! शेवटीं त्या गृहस्थानें व मी मिळून हा अतिप्रसंग शांति-तुष्टीच्या मंत्रांनीं कसा तरी सुधारून नेला आणि बाळूला घरीं पोंचविलें ! बाळूचें शिव्यांचें व्रत मात्र थांबण्याचें चिन्ह मुळींच दिसेना ! आणि पुढें तर तें वर्षभर सारखें चालू होतें ! !

मात्र, आम्ही त्याच्या शिव्यांकडे लक्षच देण्याचें टाळूं लागलों आणि गेंड्याच्या पाठीप्रमाणें मन घट्ट केलें ! शेवटीं तोच कंटाळून शिव्यांचें प्रमाण कमी पडलें असावें !

सहज गोष्टीवरून गोष्ट निघाली. गतवर्षी एक क्रिश्चन पेनशनर डोळ्यांत आंसवें आणीत म्हणतो, "काय सांगूं तुम्हांला ! माझ्या

मुलीच्या शवाचा फोटो देखील साफ बिघडवून टाकला कीं हो त्या ...ने! पैसे मात्र आगाऊ घेऊन मेलेल्या मुलीचाहि द्रोह या भामट्याने अस्सा साधला! देव त्याचें भलें करो!!"

परवा येथील छापखान्याचा मुसलमान मालक भेटला. तो म्हणतो "तुम्हाला बाळूनें फोटो दिले हीच मुळीं नशिबाची खैर झाली समजा! माझ्याहि फोटोसाठीं फोटोच्या सामानाची व्ही. पी. आणण्याकरितां म्हणून त्यानें आगाऊ दहा रुपये घेतले! आज या गोष्टीला दहा वर्षे लोटलीं! परंतु तो अजून फोटो काढतोच आहे!!"

अशीच आणखी चौकशी करता बाळूच्या जाळ्यात अडकलेलीं मज-प्रमाणेंच कित्येक सावजें आढळलीं! पण माझ्या भावनाचे मोहपटल दूर सारून विवेकसूर्याचें दर्शन घेण्याची सुबुद्धि मला तेव्हा सुचती तर......!

बाळूनें काढलेल्या सर्व फोटोचे मी माडीवर प्रदर्शनच मांडलें आहे! ते वाईट निघाले असूनहि हें अरसिकत्व मी पदरीं का घेतलें! तर माझ्या कोंवळ्या भावनाप्राधान्याच्या झाडाला आलेलीं हीं कडू फळे मला सदैव दिसावीं म्हणून! कारण दुष्ट अनुभवाची पुनरुक्ति प्रत्यक्ष तोटा करते; पण त्याची नुसती संवेदना फायदा करणार नाहीं कशावरून!

नाहीं तर, पदरचे वीस रुपये गमावून, वरती बाळूकडून सतत शिव्यांची सेवा सेवून, पुढें त्याच्याशीं बोलणें टाकून, घरच्या मंडळीची व स्वतः माझ्या मनाची भेदक टोंचणी सहन करून फोटो काढून घेण्याची फारा दिवसांची माझी हौस सुखासुखी का मी फेडली!

आता सुरवातीसच सागितलेल्या 'माणिकबाग' कादंबरीशीं आणि या अनुभवाशीं अर्थाअर्थी संबंध तो काय? तोच सांगून या प्रसगावर पडदा पाडतों. हे फोटो काढण्यापूर्वी "माणिकबाग" कादबरीची जुनी प्रत मी माझ्या एका मित्राकडून आणली होती. वाचण्यासाठीं 'एखादी कादंबरी देच' म्हणून बाळू माझ्यामागें दररोज लागायचा! म्हणून मी ती त्याला दिली होती. परंतु बाळूच्या शीलाचें हें हिडीस प्रदर्शन पाहून मला इतका तिट्कारा आला कीं, त्या दिवसापासून मी मुळीं त्याच्याशीं अबोलाच धरला आहे!

'माणिकबाग' कादंबरीची दुसरी कोरी प्रत विकत घेऊन मालकाला मी नुकतीच परत केली आहे !

अलीकडे बाळू आमच्या आळींतील गटारात नेहमी लोळतांना दिसतो !! त्याच्या तोंडाला कसलीशी घाण येते म्हणतात !!!

---

# साहित्यांतील ब्रह्मराक्षस

## प्रास्ताविक

मैसूर विश्वविद्यालयाचे माजी कार्यवाह, उच्च दर्जाचे कन्नड वक्ते कवि व ग्रंथकार व तेथील विश्वविद्यालयांत इंग्रजी व कन्नड साहित्य सारख्याच अधिकारीवाणीनें शिकविणारे रसिकवर, विद्वद्वर्य प्रो. बी. एम्. श्रीकंठय्या, एम्. ए., बी. एल्. यांचें आगमन कारवारांत भरणाऱ्या सतराव्या कर्णाटक साहित्यसंमेलनाच्या निमित्तानें येथें झाल्यावेळीं ता. २३-१२-१९३१ रोजीं "आधुनिक कन्नड साहित्य व त्याचीं ध्येयें" या विषयावर अस्खलित, उद्बोधक व स्फूर्तिदायक असें कानडींतून व्याख्यान झालें. त्यांतील विवेचन कन्नडेतर साहित्यप्रेमी जनासहि विचारप्रवर्तक होण्यासारखेंच असल्यानें त्याचा अनुवाद मराठी वाचकांकरिता पुढें दिला आहे.

साहित्याची ध्येयें कोणत्याहि भाषेच्या आवरणापासून अतीत अशींच होत असें त्या भाषणावरून उत्तम रीतीनें विशद झालें. त्यांच्या भाषणांत आलेल्या अनेक विषयाच्या रत्नभांडारांतून "साहित्यातील ब्रह्म-राक्षस" या विषयाचें आधुनिक मराठी साहित्याच्या कलाच्या दृष्टीनें आवश्यक असें विवेचन करण्याचें योजिलें आहे. प्रस्तावनेदाखल विद्वान् व्याख्यात्यांचे साहित्याच्या ध्येयासंबंधीं काही स्थूल विचार संक्षेपानें मांडणें अपरिहार्य आहे.

## गद्याचीं व काव्याचीं लक्षणें

प्रो. श्रीकंठय्यांच्या मतें "खरें काव्य कानडींतील एका प्रसिद्ध कवीच्या

कवनाप्रमाणें 'सुलिद बाळेय हण्णिनंददि' म्हणजे 'सोललेल्या केळ्याप्रमाणें आस्वाद घेण्यास व भूक भागविण्यास समर्थ' असलें पाहिजे." येथें काव्य म्हणजे पद्यवाङ्मय या विशिष्ट संकुचित अर्थानें घेतलेलें नसून अभिजात विदग्ध वाङ्मय म्हणजे उच्च दर्जाच्या गद्य व पद्य कृति यांचा समावेशहि "रसात्मकं वाक्यं काव्यम्" या उदार व्याख्येखालीं येतो. उच्च दर्जाच्या साहित्यसेवकाला कोलारसारख्या सोन्याच्या खाणींतून काम करणाऱ्या मजुराची उपमा देतां येणार नाहीं. तर या भिश्र सोन्याचें परिश्रमाने संशोधन करून जो थोर व सौंदर्योपासक कारागीर त्याच्या अव्यवस्थित खंडांपासून रेखीव विटा तयार करतो त्याचीच उपमा त्यास यथार्थतेनें देतां येईल. आतां या सोन्याच्या विटादेखील कित्येकास उचलण्यास जड भासतात हा अनुभव येतोच. म्हणून त्याच्या ठायीं जशी शक्ति पाहिजे तसेच वाचकांच्या अंगींहि कांहीं तप, मनाचा कल, हृदयाची आंतरिक भावना, लेखकाशीं तादात्म्य पावण्यास समर्थ अशी सूक्ष्म व सहृदय चिकित्सक बुद्धि, यांची जोड अवश्य पाहिजे. लोकसंग्रहार्थ निष्कामबुद्धीनें साहित्य निर्माण झालें पाहिजे. आपल्या अनुभवामृताचें सार परोपकारबुद्धीने लोकाच्या दारांत आणून सोडण्याची लेखकाची दुर्दम्य हौस हीच साहित्यसेवेची जन्मदात्री होय.

## साहित्याचा उद्देश

कोणत्याहि अभिजात साहित्याचा मूळ उद्देश, सोप्या व सुबोध भाषेंत जगाचें ज्ञान वाचकाच्या दारांत आणून सोडून त्याच्या सुप्त विचारांना चालना देऊन त्याच्या मनोव्यापाराचा उत्तरोत्तर विकास करण्याचा असला पाहिजे. क्षणिक परिणामशून्य मनोरंजनापेक्षा उच्च ध्येयगर्भ मनोविकास जेणेंकरून होत जाईल, किंबहुना वाढत्या ज्ञानलालसेच्या तृप्तीकरतां ज्याच्यामुळें विचारस्वातंत्र्याचा पाया गाठण्याची स्फूर्ति होईल, असेंच साहित्य खरें मार्गदर्शक होय आणि तेंच अक्षय होऊन राहील.

## साहित्यांतील ब्रह्मराक्षस

आमच्या प्राचीन संस्कृत कवींची व जॉनसन्‌सारख्या कांहीं इंग्लिश लेखकांची अशी समजूत होती कीं, जो लेखक कठिण पांडित्यदर्शक शब्दांनीं

युक्त असें साहित्य काव्य किंवा नाटक लिहितो तोच थोर दर्जाचा साहित्यभक्त होय! म्हणूनच बाणभट्टानें संस्कृत साहित्यातील आपल्या कादंबरीकथेंत लांबच लांब समासांची रांगची रांग उभी करून त्यांचा आस्वाद घेऊं इच्छिणाऱ्या पामरांना भिवविलें आहे! कविकुलगुरु कालिदासानें मात्र, त्याचें मेघदूत काव्य सोडल्यास, शाकुंतल नाटक, रघुवंश, कुमारसंभव आदि महाकाव्यांत सोपी, सुबोध, संक्षेपकारक पण खोल अव्यक्त व भावगर्भ अशीच शब्दयोजना केली आहे. आणि संस्कृत साहित्याचा प्रसार केवळ विशिष्ट पंडितमन्य "ब्रह्मराक्षसा"च्या डोक्यांतच मर्यादित करून त्यांच्याबरोबरच त्या साहित्याचाहि अस्त होण्याची साधार ठरलेली भीति दूर केली आहे.

आतां व्याख्यात्याचें विवेचन येथेंच सोडून जुन्या मराठी साहित्याकडे जर आम्हीं नजर फेकली तर असें दिसून येतें कीं, कविवर्य मोरोपंतांचें काव्य पंडिताच्या दृष्टीनें कितीही अर्थगर्भ असलें तरी त्याची क्लिष्टता, लांबच लांब संस्कृतप्रचुर समास व शब्दार्थांचें काठिन्य यांमुळें त्याची संपूर्ण गोडी स्वतंत्रपणे चाखण्यास समर्थ असे कितीसे मराठी भाषेचे भक्त आढळतील! त्याची गोडी विशद करून घेण्याकरितां काव्यविवेचनाचा निराळा टीकाग्रंथ विकत घ्यावा लागतो. आणि म्हणूनच मोरोपंतांचें काव्य खेड्यापाड्यांतून महाराष्ट्रभर पसरण्याची आशा कधीं काळीं शक्य आहे काय! असो. हे विचार उत्कटतेनें सुचण्याचें कारण म्हणजे संस्कृतमिश्रित कठिण शब्दांच्या आच्छादनामुळें भारावून गेलेल्या कित्येक ग्रंथाचा जनतेत प्रसार करण्याकरितां काव्यचिकित्सक, टीकाकार व मधले दलाल याची आज आवश्यकता भासत आहे आणि तिची पूर्तीहि केली जात आहे. टीकाकारांची भूमिका थोर असली पाहिजे याबद्दल दुमत असणें शक्य नाहीं. पण काव्यचिकित्सकांची प्रथा कायमची रूढ होणें व ती जनतेच्या बोकांडीं बसणें कोणत्याहि साहित्याच्या उच्च ध्येय वृत्तीच्या दृष्टीनें हितावह होणार नाहीं. आर्थिक बाबतींत आम्हीं पहातों कीं गरीब शेतकऱ्यांच्या किंवा मजुरांच्या घामाचें पुरेपूर फळ त्याच्या पदरात पडण्यास जर कोणी आड येत असतील तर ते मधले उपरे किंवा दलाल

होत. व्यापाराच्या उत्कर्षासाठीं या परपुष्ट दलालांची उचलबांगडी करण्या-करिता जर सूचनामंडळें नेमण्यांत येत आहेत, तर साहित्यांतील "ब्रह्म-राक्षसां"ची घोर रूढि बंद करण्याकरितां थोर साहित्यसेवकांनीं झटून का मार्गदर्शक होऊं नये ! एखाद्या काव्यांत ध्येयवत्ता असल्यास ती त्यातूनच वाचकांच्या हृदयास भिडून गेली पाहिजे. अव्यक्त, खोल विचार त्यांत असतील तर गोष्ट वेगळी; पण कठिण शब्दाचें अवडंबर, कुतर्क, पांडित्याचें प्रदर्शन व चमत्कृतिपूर्ण शब्दाची कसरत यांच्या दडपणामुळें जर एखाद्या कवनाचा अर्थ वाचकांस लागत नसेल तर तेणेंकरून लेखकाच्या व वाचकांच्या अशा उभयतांच्याहि वेळेचा व बुद्धीचा अपव्यय होतो याची वाट काय ! अशा वेळीं काव्यचिकित्सक किंवा "ब्रह्मराक्षसांचे दलाल" निर्माण होऊन त्यांनी आपल्या गुरूवरहि ताण करून पाल्हाळिक भाषेंत जरी मल्लिनाथी करण्याचा उसना आव आणला तरी त्याचा उपयोग भरीव न होतां पोकळ होतो आणि सर्वांचे श्रम फुकट जातात.

वरील व्याख्यात्यांनीं आपल्या भाषणांत विशद करून सांगितल्याप्रमाणें कोणत्याहि साहित्याचें मुख्य ध्येय असें असलें पाहिजे कीं, त्याचा प्रसार सुशिक्षितांबरोबरच खेड्यांपाड्यातील अज्ञ जनतेंतहि अविरोधानें झाला पाहिजे. नहून, केवळ अनेक संस्कृत विशेषणांची व शब्दांची योजना साहित्यांत करून बहुजनसमाजास समजण्यास व पचण्यास कठिण असें साहित्य लिहिणें, किंवा आपल्या पांडित्याचा दाखला देण्याकरिता स्वतः भरीव वाङ्मयसेवा करण्याच्या भरीस फारसें न पडता दुसऱ्यांचे दोष दाखविण्यां-तच चूर होऊन त्यातच एक प्रकारचें विलक्षण आसुरी समाधान मानणें म्हणजे वर उल्लेखिलेल्या ब्रह्मराक्षसास पाचारण करणें होय ! असलें कठिण किंवा विध्वंसक साहित्य बहुजनसमाजाला कळत नसल्यामुळें साहित्याचा मूळ उद्देश, म्हणजे सुशिक्षित किंवा वरच्या दर्जाचा समाज व अज्ञ जनता यांजमधील बौद्धिक व सामाजिक विषमतेची थोरली भिंत खणून काढणें, त्यासच पायबंद बसतो. सोपें व सुबोध जानपदसाहित्य निर्माण करणाऱ्या लेखकाच्या हृदयांत आत्मविश्वास व सहृदयता हीं तेवत असतात. याच्या उलट ब्रह्मराक्षसाच्या कोटींत वहात जाणाऱ्या लेखकाच्या ठायीं

कृत्रिमता, तत्त्वगर्भ उच्च विचारांपेक्षां शब्दांचें काठिन्य व श्रीमंती यांच्या-वरच सारी मदार ठेवण्याची बुद्धि, आणि आपण इतर समाजांपासून उच्चतर किंबहुना निराळ्याच भूमिकेवर आरूढ झाल्याच्या जाणीवेपासून त्यांच्या सुखदुःखांकडे व मनःस्थितीकडे डोळेझांक करण्याची प्रवृत्ति दिसून येतात. समाजांतील वरच्या दर्जाच्या विशिष्ट घटकाचेच तेवढें शब्दचित्र काढण्याची आमच्या हल्लींच्या साहित्याची प्रवृत्ति इतर देशातील वाङ्मयाचें अंध अनुकरण करणारी आणि म्हणूनच काहींशी एकांगी म्हणतां येईल. उदाहरणार्थ, रशियांतील प्रसिद्ध तत्त्ववेत्ता कौंट टॉलस्टॉय, फ्रेंच तत्त्वज्ञ रोमा रोला, नॉर्वेचा इब्सेन, इंग्लिश लेखक रसेल, शॉ, गॅल्सवर्दी, बंगालचा रवींद्रनाथ टागोर, इत्यादि लेखकांस थोर दर्जाचे साहित्यसेवक म्हणून जगाकडून मानण्यांत येतें; याचें मुख्य कारण त्यांनीं आपल्या वाङ्मयांत गरीब व विषम समाजाच्या परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन करून त्यांचे शब्दचित्र त्यांच्या ओळखीच्या, नित्य परिचयाच्या, सोप्या, सुबोध माय-बोलींत काढलें हें होय. तेणेंकरून समाजाच्या सर्व थरांत क्रमानें विचार-क्रांति व आचारक्रांति झाली आणि असें साहित्य झाडावरील निरर्थक बांडगुळाप्रमाणें न होतां, भरीव सर्वांगीण व समाजपोषक बनलें. प्राचीन ऋषींच्या किंवा तत्त्वविदांच्या गहन सूत्रांचें सार आपापल्या सोप्या मातृभाषेंत सर्व समाजांच्या गळीं सहजपणें उतरविण्याचा स्वयंस्फूर्तीनें प्रयत्न करणें म्हणजेच अशा मोठ्या सूत्रांचा व लहान सूत्रांचा समन्वय करणें होय. अशा सूक्ष्म अवलोकनाअंतीं योग्य समन्वय झालेला ज्या साहित्यांत दृष्टीस पडत नाहीं तें साहित्य चिरकालपर्यंत टिकत नाहीं; म्हणजेच त्यांतील विचार जनमनांत न फांकतां क्रमेण त्याचें अस्तित्वच नष्ट होतें आणि साऱ्या समाजाचा अधःपात होत जातो. असलें कठिण साहित्य सोन्याच्या बेडी-प्रमाणें असतें. बेडी सोन्याची केली तरी ती जशी पारतंत्र्याचीच दर्शक असते, त्याचप्रमाणें असल्या साहित्याच्या काठिन्यामुळें भांबावून जाऊन कोणीहि विचारस्वातंत्र्य सोडून देऊन पारतंत्र्य पतकरूं नये. रत्नाकर धीर-गंभीरवृत्तीनें आपल्या पृष्ठभागावरील कल्मष बाहेर फेंकतो व तें पुढें तीरास जाऊन पडतें. परंतु तेवढ्यावरून त्याच्या अगाध पोटांत दडलेल्या असंख्य

रत्नांची कांही कल्पना येत नाहीं! त्याचप्रमाणें अनिष्ट समाजचित्रें जाहीर-रीत्या रंगविणारे कुशल कारागीर हीन दर्जाचे असे न लेखतां त्यांच्या हृदयांत वसलेल्या सहृदयतेस व शब्दचित्रद्वारा समाजदोष नष्ट करूं धांव-णाऱ्या उदार परोपकारबुद्धीस मान दिला पाहिजे. कारण कोणतेंहि चिरंतन साहित्य झालें तरी तें सहृदयता, तादात्म्य, सहानुभूति, वात्सल्य आणि आर्त जनांचें दुःख किंवा दोष नष्ट करण्याची तीव्र जिज्ञासा याची जोड लेखकाच्या ठायीं असल्याविना उत्पन्न होत नाहीं! आणि जसें आम्ही वरील भाव मनांत आणून सोपें बोलतों तसेंच जास्त पद्धतशीर रीतीनें मंडित केलेलें सुबोध लेखन म्हणजेच साहित्य होय.

## ब्रह्मराक्षसाच्या आख्यायिकेचा उगम

एकदा वामन पंडित आपल्या संस्कृत पांडित्याच्या जोरावर गांवोगाव पंडितांशीं तार्किक वादविवाद करीत आणि आपल्या पंडिती ज्ञानानें त्यांस तर्कांत व वादांत जिंकून त्याजकडून अजिंक्यपत्रें घेत घेत काशीकडे चालले होते. वाटेंत रात्रौ एका थोरल्या वडाच्या झाडाखालीं ते उतरले असतां त्यास झाडावर बसलेला एक तेजस्वी ब्रह्मराक्षस दिसला. त्यांची दृष्टि त्याच्याकडे वळतांच तो ब्रह्मराक्षस त्याना म्हणाला, "अहो पंडित, मला पाहून असे भयचकित होऊं नका! गेल्या जन्मीं मीहि आपल्याप्रमाणेंच मोठा संस्कृत पंडित म्हणवून घेत होतों! घटपटाच्या खटपटात तर मी माझ्या अपार ज्ञानानें सर्व विद्यमान पंडितांस जिंकलें होतें! अखेरीस तर मला जिंक-ण्यास कोणीहि पंडित शिल्लक राहिला नाहीं! जन्मभर मी माझ्या मायबोलीची तुमच्याप्रमाणेंच अक्षम्य हेळसांड केली! समाजाशीच काय पण आप्त-स्वकी-यांशींसुद्धां मिळूनमिसळून प्रेमानें वागलों नाहीं! त्यांच्या सुखदुःखांचें प्रति-बिंब भावनारूपी आरशांत पहाण्याचा प्रयत्न केला नाहीं! रूक्ष जीवन कंठन करणारा झालों! समाजाचे कल्याण साधलें नाहीं! जगातील साऱ्या लेखकांच्या, वक्त्यांच्या व इतर जनांच्या दोषैकदृष्टीने चुका शोधून काढून त्यांच्यापासून प्रसिद्धि मिळविण्याच्या हावेंतच गढून गेलों! स्वतः फुकाची साहित्यसेवा किंवा समाजसेवा कधींही केली नाहीं; नव्हे, टीकास्त्राच्या प्रयोगाच्या भरांत माझ्या उभ्या आयुष्यांत मला तुमच्याप्रमाणें तशी फुर-

सतच सांपडली नाहीं म्हणाना ! माझ्या ज्ञानाचा फायदा सामान्य बहुजनांस लाभेल अशा परोपकारबुद्धीनें सोप्या भाषेंत त्याचा प्रसार केला नाहीं ! हे पडिता, आणि काय सांगूं ! अज्ञ जनता व सुशिक्षित समाज यांजमध्यें तुझ्या-प्रमाणेंच पूर्वजन्मीं मी अभेद्य भिंतीप्रमाणें राहिल्यामुळें माझ्या कृत्रिम जीवनाचें प्रायश्चित्त म्हणून माझा या जन्मीं ब्रह्मराक्षसाच्या योनींत संभव झाला ! पूर्व-जन्मांतील माझ्या ध्येयशून्य कृतकर्मांचा मला आतां किती किती पश्चात्ताप होतो आहे म्हणून सांगूं ! परंतु त्याचा आतां काय उपयोग ? माझें आजचें जीवन म्हणजे झाडावरील एखाद्या बाडगुळाप्रमाणेंच ! त्यामुळें माझ्या विचारांचा प्रसार इतरांत होऊन त्यास ते उपयुक्त व्हावे अशी माझी उत्कट इच्छा असूनहि तसें करणें आज माझ्या हातीं नाहीं !"

ब्रह्मराक्षसाच्या वरील झणझणीत अंजनामुळें वामनपंडितांना आत्म-निरीक्षणाअंतीं उपरति झाली, आपल्या आयुष्याचें खरें ध्येय समजलें, संस्कृत महापंडित होण्याचा आपला बेत त्यांनी रहित केला आणि विरक्त होऊन त्यांनी सोपी व सुबोध मराठी कविता रचली. तेणेंकरून महाराष्ट्र-जानपदाची त्यानी कशी सेवा केली आणि आपल्या मातृभूमीचें वैभव कसें वाढविलें ही गोष्ट प्रसिद्धच आहे.

---

# कन्नड साहित्य व त्याचीं ध्येयें

बेंगळूरच्या सेंट्रल कॉलेजांतील इंग्रजीचे व कानडीचे अध्यापक विद्वद्वर्य श्रीमान् बी. एम्. श्रीकंठय्या, एम्. ए., बी. एल्. यांचें सतराव्या कर्णाटक साहित्यसंमेलनाच्या निमित्तानें कारवारांत आगमन झाल्यावेळीं गेल्या ता. २३-१२-१९३१ रोजीं येथील "मित्र-समाज हॉल"मध्ये "कन्नड साहित्य व त्याचीं ध्येयें" या विषयावर कानडींत अत्यंत उद्बोधक व्याख्यान झाले. त्याचा पूर्वार्ध वर दिला आहे. उत्तरार्धाचा साराश खालीं दिला आहे.

## साहित्याचें विश्वकुटुंबत्व

कानडी साहित्याच्या उत्कर्षाचा काल कोणता हें ठरविताना इतर प्राचीन द्राविड भाषांचा उल्लेख केल्याविना गत्यंतर नसतें; कारण या भाषाचें आवरण कानडी साहित्यावर पडलेलें असून त्यातील उत्तमोत्तम प्रकार त्यांत नकळत आलेले आहेत. प्राचीन प्रौढ तामिळ साहित्य खिस्तशकाच्या पहिल्या व दुसऱ्या शतकांत उत्कर्ष पावलें. नंतर नवव्या शतकात कानडी साहित्यांत क्राति घडवून आणणारा नृपतुंग कवि उदयास आला आणि त्यानें स्वतंत्र प्रतिभेनें कानडी काव्यें रचून त्या भाषेची अमोलिक सेवा केली. जगांतील कोणत्याहि रूढ भाषेची गोष्ट घ्या, तिला इतर भाषांतील चांगल्या प्रकारांची परस्पर देवाण-घेवाण केल्याविना गत्यंतर नसतें. किंबहुना तसें संपूर्ण शुद्ध साहित्य सांपडणें कठिणच. आतां इतर कोणत्याहि साहित्याप्रमाणेंच कानडी साहित्यानें सुद्धां

संस्कृत साहित्यांतील उत्कृष्ट विचार व तत्त्वें घेतलीं आहेत ही गोष्ट खरी. पण तसा विचार करूं गेल्यास कानडीच काय, इतर कोणतेंहि सारस्वत संपूर्ण व स्वतंत्र आहे असें म्हणता येणार नाहीं! जवळपासच्या नित्यनैमित्तिक संबंध येणाऱ्या इतर सारस्वतांतील विचार, वाक्प्रचार, म्हणी इत्यादि प्रकार इतर भाषांत आल्याप्रमाणें कानडींतहि आलेले आहेत! त्याबद्दल आपल्याला विषाद वाटण्याचें कारण नाहीं! कारण भाषा हें मानवांचे विचार व विकार एकमेकांना स्फुट होण्याकरितां उत्पन्न झालेलें एक महत्तम साधन असल्यामुळें त्यांच्या मनोव्यापाराचें व भावनांचें प्रतिबिंब निर-निराळ्या साहित्यावर पडणें अयुक्त तर नाहींच, पण तें कोणत्याहि साहित्याच्या विश्वकुटुंबी ध्येयास पूरकच होत आलें आहे. यावर कोणी येथें अशी शंका काढील कीं, आम्ही दुसऱ्या भाषांतील प्रकार कानडी भाषेंत आणून तिचें धवल यश मलिनच करीत नाहीं काय? यास उत्तर असें देता येईल कीं, आजपर्यंत आर्यावर्तांत निरनिराळ्या भिन्न भिन्न संस्कृति उदयास आल्या व येऊं ठेपल्या आहेत. त्याचें संघटन आम्हीं नको नको म्हटलें म्हणून थोडेंच थांबणार आहे! समुद्राच्या प्रचंड लाटाप्रमाणें या विभिन्न संस्कृति एकमेकींवर आघात करीत आल्या आहेत! म्हणून कोणत्याहि साहित्यानें अशा परकीय संस्कृतींशीं तत्सम होऊन आपली विशिष्ट संस्कृति व मातृभाषा क्रमेण विसरण्याच्या किंवा तिलाच हीन लेखण्याच्या भरीस पडूं नये हेंच खरें शहाणपणाचें होईल. कारण विहिरींतील बेडकाप्रमाणें "माझी भाषा तेवढी उच्चतम व श्रेष्ठतम आहे, इतर भाषाची मला तादृश निकड नाहीं!" असें म्हणून त्यांतील उत्कृष्ट प्रकार आपल्या पचनीं पाड-ण्याचें जर साहित्यसेवकांनीं हेतुपूर्वक टाळलें तर साचलेल्या डबक्यांतील पाण्याप्रमाणें त्यांच्या साहित्याची स्थिति होऊन तें उत्तरोत्तर प्रगतीचे मार्ग आक्रमिणार नाहीं ही गोष्ट निश्चित! कारणांतरानें एकच काय, पण शक्य असल्यास अनेक इतर भाषा शिकाव्या लागतात. आपली संस्कृति न विसरतां अन्य भाषांतील ज्ञानगर्भ प्रकार, उत्कृष्ट ध्येयें, मार्गदर्शक वचनें व समाजपोषक सिद्धांत निरभिमानपणें मनन करून ( परंतु त्याच्या आहारीं स्वतः जाण्याचें टाळून ) आपल्या भाषेंत आणावे लागतात. अशी सत्या-

न्वेषणाची उदार दृष्टि सतत डोळ्यांसमोर ठेवून आधुनिक कानडी साहित्य-भक्तांनीं योग्य व चिकाटीचे प्रयत्न केल्यास त्यांच्या भूतकालाइतकाच वर्तमान व भविष्यकालहि उज्ज्वल होईल यांत शंका नाहीं.

## कानडीच्या उत्कर्षाचे काल

### (१) जैनांचा उदय

कानडी सारस्वताच्या उत्कर्षाच्या कालाविषयीं विचार करूं लागलों तर स्थूल मानानें असें म्हणतां येईल कीं, खिस्ती शकाच्या ९०० सालापासून इ. स. १९०० सालापर्यंत म्हणजे सुमारें १००० वर्षेंपर्यंत त्याची एकसारखी वाढच होत गेली आहे. उत्तर कानडा जिल्ह्यांत सिर्सी तालुक्यांतील बनवासी हें इतिहासप्रसिद्ध ग्राम आज दैवाच्या दुर्विलासानें "वनवासी" झालें आहे! ही कालाची गोष्ट आहे! परंतु प्रतापी कदंब राजांच्या कालीं तें वैभवाच्या शिखरावर चढलें होतें आणि कन्नड साहित्यांगांस व कला-कृतींस त्या कालीं भरपूर राजाश्रय मिळत जाऊन त्यांचा दिवसेंदिवस उत्कर्षच होत होता! आजहि तेथील प्राचीन देवालयें व राजवैभवाचे अवशेष एके काळीं द्राविड संस्कृति तेथें किती उत्कर्षाप्रत पोंचलेली होती याची उज्ज्वल साक्षच देत आहेत!

### बनवासीचा पंप कवि व त्याचीं काव्यें

आदिपुराणकर्ता सुप्रसिद्ध पंप कवि याच वेळीं बनवासींत उदयास आला. तो पुलिकेशी या चालुक्य राजाच्या दरबारांत होता. त्याचा जन्म सोमयाजी ब्राह्मणकुलांत खि. श. ९०२ सालीं झाला. त्याच्या बापानें आपला पूर्वापार ब्राह्मणधर्म सोडून मुक्तीकरतां जैनधर्म स्वीकारला होता. सोंवळ्या ब्राह्मणधर्मांतील निरनिराळे रूढिगत विषम आचारविचार पाहून त्यास उपरति झाली आणि त्या धर्मांत राहून आपणास समाजसेवा करणें सुकर होणार नाहीं असा त्याचा निश्चय ठरून त्यानें आपल्या नैतिक व बौद्धिक उन्नतीकरितां जैनधर्माची दीक्षा घेतली अशी आख्यायिका आहे. पंपाची पहिली काव्यकृति "आदिपुराण" ही होय. त्यांत त्यानें आपल्या नूतन जैनधर्माची उदार व्याख्या मनांत ठेवलेली जागोजाग दिसून येते. आपला जैनधर्मच काय पण इतर सारे धर्महि यथामति

अभ्यासिले पाहिजेत म्हणून तीव्र जिज्ञासा व आदर या कवीच्या ठिकाणीं आढळतात. अशीं उच्च दर्जाचीं काव्यें आज रचलीं जाण्यास दोषारोपण-बुद्धीचा प्रथम त्याग केला पाहिजे; केवळ सात्त्विक श्रद्धा, सहृदयता व सहानुभूति इतकींच पुरणार नाहींत, तर त्यांस वैषम्यानें अंध न होणारी निष्काम एकतानता व निदिध्यासपूर्वक सतत परिश्रम करण्याची संवय यांचीहि जोड अवश्य पाहिजे. पंपकृत या आदिपुराणाच्या पूर्वपीठिकेंत त्यानें मानवी जिवाचें पूर्वचरित्र अत्यंत कुशलतेनें रेखाटलें आहे आणि जिवानें संपादण्याचे विषय खालीलप्रमाणें सांगून त्यांचें विशदीकरण केलेलें आहे.

(१) सम्यक् (म्हणजे संपूर्ण) ज्ञान;
(२) सम्यक् दर्शन; व
(३) सम्यक् चारित्र्य.

या तिहींस मिळून आदरार्थी "रत्नत्रय" अशी कवीनें संज्ञा दिली आहे. या निरूपणाचें सार थोडक्यांत असें सांगतां येईल कीं, मानवानें भोगतृष्णा सोडावी आणि निष्काम कर्मयोगाचा व त्यागाचा मार्ग आचरावा. सर्व कानडी काव्यांतील सार सूत्ररूपानें हेंच आहे असें म्हणतां येईल. तेणेंकरून जगांतील सर्व धर्मांच्या विविधत्वांत एकच एक गूढ एकत्व भरलेलें पहाण्यास सांपडतें आणि तें त्यागाची महति कंठरवानें सांगतें. म्हणून मानवी धर्म संकुचित, व्यक्तिनिष्ठ किंवा देशनिष्ठ न होतां तो विश्व-व्यापक व विश्वकुटुंबी बनतो. या अमोघ तत्त्वज्ञानाचें स्वरूप कर्णाटकस्थ जनतेला सुकर करून देण्यासाठींच पंप कवीचा अवतार झाला होता असें अभिमानानें म्हणता येईल. पंपाचा काव्यौघ अतिशय सखोल व गंभीर आहे. त्यांत कविहृदय व काव्यरस यांचें प्रतिबिंब जागोजाग आढळतें. नंतर पंप कवीनें भारत काव्य लिहिलें. त्यात चौदा अध्याय आहेत. तें लिहिण्यास आपणास तीन महिन्यांचा अवधि लागला असें त्यानेंच काव्याच्या आरंभीं म्हटलें आहे. त्याच्या सुरवातीस त्यानें आपलें त्रोटक जीवनचरित्र दिलें आहे. त्यांत आपल्या निवासस्थानाचें म्हणजे बनवासी राजधानीचें अत्यंत रसभरित व मार्मिक वर्णन केलें आहे. पूर्वकालीं कानडा

जिल्ह्यांतील बहुतेक भाग कुंतल देश म्हणून प्रसिद्ध होता. तसा उल्लेख प्राचीन कानडी काव्यात कित्येकदा आढळतो. पंपकृत काव्यकृतीचें महत्त्व आणखी एका दृष्टीनें अपूर्व आहे. तें म्हणजे त्यांत प्राचीन कानडी कवींप्रमाणें संस्कृत शब्दांचें किंवा समासांचें मिश्रण करण्याच्या मोहास कवि बळी पडलेला नाहीं! तर त्यानें अभिजात कन्नड म्ह. शुद्ध "हळेगन्नड" शब्दांची व प्रयोगांची सुंदर योजना करण्याचा अत्यंत यशस्वी प्रयत्न केला आहे. आणि म्हणूनच कानडी भाषेच्या कोणत्याहि अभ्यासकाला शुद्ध साहित्याच्या आलोडनाकरितां पंपाच्या अनेक काव्यांचें परिश्रमपूर्वक संशोधन केलें पाहिजे. कानडी साहित्याचें पोषण केल्याचा पहिला मान या अत्यंत प्रतिभाशाली जैन वागीश्वराला यथार्थतेनें दिला जातो. जैनानी सुमारें तीन शतकापर्यंत अभिजात जुन्या काव्यवाङ्मयाची निर्मिति व जोपासना केली आणि साहित्यातील "काव्य" या थोरल्या दालनास अवर्णनीय शोभा आणली. आपली साहित्याभिवृद्धींची हौस त्यांनीं येथवरच न सोडता कलाकौशल्याच्या कारागिरींत, अनेक सुंदर देवळें व यूपस्तंभ बांधण्यात आणि दगडी बस्तींवर (देवळांवर) कानडी शिलालेख कोरून आपल्या द्राविडी संस्कृतीचे दुवे एखाद्या इतिहासांत ठेवल्याप्रमाणें अभंग राखण्यात वाङ्मय व इतिहास यांच्या संवर्धनाच्या दृष्टया मोठीच कामगिरी केली. आता कित्येक संशयात्मे किंवा प्रतिनिविष्ट जन असें म्हणतांना आढळतातच कीं, "तुमच्या कानडींत काय आहे?"

## कानडींत काय आहे ?

असले आक्षेपक इतर भाषांसहि लाभलेले आहेत! अशांनी हृदयात थोडा आत्मविश्वास बाळगावा. प्राचीन कानडी काव्याचें शक्य तों परिशीलन करावें. त्या भाषेंत आजपर्यंत अनेक कवि, तत्त्वज्ञ, गमकी (गाणारे), यक्षगान (कानडी नाटकांतील कवनांचा प्राचीन प्रकार) करणारे, कीर्तनकार वगैरे होऊन गेले आहेत. अशा थोर पूर्वजांविषयीं योग्य तो अभिमान धरून खोल विचार केल्यास "कानडींत काय आहे!" अशासारखी अज्ञानमूलक किंवा निराशाजनक उक्ति कोणीहि विचारी जन काढणार नाहीं! कारण नसतां आपला आपणच तेजोभंग करून घेणें किंवा त्यांतच

एक प्रकारचें समाधान मानणें हें एखाद्या भाषेच्याच काय, पण जनागाच्या किंवा राष्ट्राच्या उन्नतीच्या दृष्टीनेंहि केव्हाहि उचित व हितावह होणार नाहीं ! आज जगभर छापखान्याची सोय झाल्याकारणाने अतिशय थोड्या चागल्या साहित्याबरोबरच पुष्कळच वाईट व हीन साहित्याची भराभर निर्मिति होत आहे ही गोष्ट खरी ! परंतु प्राचीन काळीं मुद्रणाची सोय नसल्यामुळें गद्यापेक्षा पद्याकडेच सरस्वतीभक्तांचें लक्ष वेधलें जावें यांत आश्चर्य नाहीं ! कारण गद्यापेक्षा कविता पाठ करण्यास सोपी असल्यामुळें तिच्या रक्षणाकरितां हस्तलिखितें साभाळण्याची दगदग चुकत असे ! पिढ्यानूपिढ्या काव्ये मुखोद्गत करण्यांत येऊन त्याची परंपरा अबाधित राखण्यांत येऊं लागली ! इतर देशी साहित्याप्रमाणेंच कानडी साहित्याचीहि पण अशीच स्थिति झालेली दृष्टीस पडेल ! ताडपत्रावरील अनेक हस्तलिखित काव्यें, लेख, राजशासनें इत्यादि अवशेष यापूर्वीच नाश झालेले आहेत; अजूनहि कित्येक अज्ञात स्थितींत आहेत ! म्हणूनच या दिशेनें आस्थेनें व चिकाटीनें संशोधन होणें अवश्य आहे. मुद्रणयुगापासून स्मृतिनिष्ठा कमी झाली आणि परंपरागत काव्यगायन व पठनहि तितक्याच प्रमाणांत पुढें कमी कमी होत गेल्यामुळें किती प्रासादिक कानडी काव्यें, गीतें, लोककथा, यक्षगानें वगैरे नष्ट झालेलीं असतील याची कल्पनाच केलेली बरी ! कानडी ग्रंथनिर्मिति तुटपुंजी आहे असें म्हणणाऱ्यांनीं आधीं या तापद दुःस्थितीकडे दृष्टि द्यावी म्हणजे त्यांचे निराशेचे किंतु कमी झाल्याविना रहाणार नाहींत. धर्मग्रंथाच्या प्रामाण्याविषयीं अज्ञ व विवेकशून्य बहुजनसमाजांत कमालीची श्रद्धा व आस्तिक्यबुद्धि असते; विचारस्वातंत्र्याच्या अभावीं तीच पुढें धर्मांधतेस व अंधश्रद्धेस पोषक होते ! हा कटु अनुभव जगांतील सर्व राष्ट्रांस व समाजांस आहेच. द्रविडसंस्कृतिप्रणीत कानडी धर्मग्रंथांपासून उत्पन्न झालेली ब्राह्मणाची सोंवळी धर्मनिष्ठाहि वरील नियमास अपवाद म्हणतां येणार नाहीं ! म्हणून साहित्याच्या उन्नतीसाठीं असली विनाआधार अंधश्रद्धा लोपली पाहिजे आणि या दिशेनें कानडी साहित्यांत त्वरित पुढें पाऊल पडून तें समाजसुधारक आणि मार्गदर्शक झालें पाहिजे.

## (२) वीरशैवांचा काल

शुद्ध साहित्यनिर्मितीच्या दृष्टीनें जैनांनंतर वीरशैवांनीं कानडीची अमोलिक सेवा केली. त्यांचा काल साधारणपणें खि. श. १२०० पासून १४०० पावेतों होता. त्यांची दृष्टि साहित्यांतील ध्येयनिष्ठ काठिन्यापेक्षां प्रसरणशील सुबोधतेकडे अधिक होती. जुनें "हळेगन्नड" 'कठिण' म्हणून तें समाजांतील झाडून सर्व थरांत प्रसार पावणें कठिण ही गोष्ट त्यांस पूर्णपणें पटलेली होती ! म्हणूनच त्यांनीं कानडी साहित्यांत इष्ट ती पुनर्घटना करून त्यात लोककथा, सुबोध संतवचनें, सोपीं भक्तिपर कवनें इत्यादींचा समावेश केला; भक्तिवाङ्मय निर्माण करून बहुजनांचीं हृदयें आकर्षिलीं आणि त्यांच्यात एक प्रकारचें सात्त्विक चैतन्य निर्माण केलें. उत्तर कानडा जिल्ह्यांत वीरशैव वाङ्मयाची चलती एके काळीं होती ही गोष्ट इतिहासच सांगतो. सुप्रसिद्ध राष्ट्रकूट राजांच्या या काळांत कनक, पुरंदरदास आदि कित्येक सुप्रसिद्ध भक्तिमार्गपंथी कवि उदयास आले आणि त्यांनीं निर्माण केलेलें जानपद काव्य आजहि सर्व समाजांस मार्गदर्शक झालेलें आहे. साहित्याच्या सुबोधतेमुळें हा नवीन भक्तिमार्ग उदयास आला आणि त्याला बहुजनसमाजहि मनापासून मिळाला.

### जगाचा "चक्रनेमिक्रम"

चक्रनेमिक्रमाचा किंवा जगाच्या घटनेच्या वर्तुल फेऱ्यांचा नियम साहित्याच्या अंगोपांगास लावून पाहिला तरी स्थूलपणें असेंच दिसून येतें कीं, मानवी प्राणी बाल्यावस्थेंत सोपें बोलतो, त्याच्या उन्मादी यौवनावस्थेंत कृत्रिमपणास व बाह्य देखाव्यास भाळून लेखनभाषणांत पांडित्यप्रदर्शनाची हौस मिरवितो, पोक्तपणांत अनुभवांतीं परिपक्व विचार करून सुबोध साहित्यनिर्मितीकडे व सोप्या संभाषणाकडे वळतो आणि वृद्धपणीं कर्मयोगापेक्षां व सौंदर्यदृष्टीपेक्षा भक्तियोगाकडे व निर्मळ ज्ञानलालसेकडे त्याचें लक्ष अधिक वेधलें जातें. व्यक्तीविषयीं जी घटना लागू पडते तीच गोष्ट साहित्याच्या प्रसवासहि थोडीफार लावतां येते; कारण कोणतेंहि साहित्य झालें तरी तें व्यक्तीच्या अंतरंगाचें सरळ व संपूर्ण प्रतिबिंबच होय ! त्याचप्रमाणें कानडी साहित्याच्या यौवनांत जैनांनीं पांडित्य-

प्रदर्शक, चमत्कृतियुक्त, ध्वनियुक्त, सौंदर्यमुग्ध साहित्य निर्माण केलें. नंतर तारुण्यांत त्यास पोक्तपणा आल्यामुळें वीरशैवांनीं सोपें जानपदसाहित्य व रसाळ भक्तिवाङ्मय निर्माण केलें. अजून कानडी साहित्य या दुसऱ्या अवस्थेंतच आहे.

## (३) ब्राह्मणांचा काल

वीरशैवांनंतर ब्राह्मणांचा काल सुरू झाला. चैतन्य नांवाचा कवि याच कालीं जन्मला. मध्वाचार्य, वल्लभाचार्य, रामानुजाचार्य यांच्यासारखे तपोनिष्ठ स्वामी व जनतेचे मंत्रद्रष्टे नेते याच वेळीं उदयास आले आणि कर्णाटकांत फिरून धर्मवाङ्मयाची चलती झाली. भक्तिमार्गाऐवजीं द्वैतमार्ग व कर्ममार्ग जनतेंत प्रसार पावला.

## "यक्षगान" व कानडी नाटकें

प्राचीन कानडी साहित्यात एकहि नाटक नाहीं ही वस्तुस्थिति विचारार्ह आहे खरी! चिक्कदेवरायाच्या कारकीर्दींत "रत्नावली" नावाचें एकच नाटक हळेगन्नड भाषेंत लिहिलें होतें; पण तें यक्षगानाच्या उज्ज्वल परंपरेची एक इवलीशी छायाच होय असें मानता येईल! यक्षगान नांवाची काव्यगायनाची अपूर्व पद्धत कर्णाटकात अत्यत प्राचीन कालापासून चालत आली आहे. हरिकीर्तनाची व संगीत नाटकाची पद्धत अलीकडची आहे. शेंकडों वर्षांपासून पुराणातील उत्कृष्ट प्रसंगावर कवींनीं सुरस चालींत रचलेलीं प्रासादिक लघु कवनें म्हणजेच यक्षगानें होत. त्याचें गायन भागवत म्हणवून घेणाऱ्याकडून करण्यांत येत असे व पुढें तो त्याचा गद्यात अर्थ सांगे. संदर्भानुसार या काव्याच्या कथानकांतील पात्रें रंगभूमीवर येऊन नाचत. कारण त्यांचीं भाषणें तंबोऱ्याच्या स्वरांत व दुतोंड्या मृदंगाच्या तालात कवितारूपानें भागवतदादाच सांगत असत. हाच यक्षगानाचा प्रसंग कानडींत 'आट' किंवा कोंकणींत 'खेळ' म्हणून संबोधण्यांत येतो आणि त्याचा प्रसार जत्रेच्या वेळीं कर्णाटकांतील बहुतेक खेड्यांपाड्यांत दृष्टीस पडतो. सुप्रसिद्ध मराठी नाटककार कै. अण्णा किर्लोस्कर हे कानडा जिल्ह्यांत फिरतीवर आल्यावेळीं त्यांच्या नूतन नाटकाच्या कथानकाच्या रचाईत या कर्णाटकी यक्षगानपद्धतीच्या कथानकाची, सजावटीची व कांही प्रसिद्ध कर्णाटकी

रागाची त्यांना बहुमोल साह्य मिळालें होतें असें म्हणतात.

## उच्चवर्णीयांनीं केलेली ज्ञानाची कुचंबणा !

उच्चवर्णीय म्हणवून घेणाऱ्या कित्येक जनाचा स्वार्थ धर्माच्या नांवा-खाली खालच्या समाजांचें रक्तशोषण करणाऱ्या अन्याय्य सामाजिक रूढींची तळी उचलून धरण्यांत, त्यांस विद्यादान न करण्यात, अज्ञ जनतेच्या अज्ञानाचा पुरेपूर फायदा घेऊन त्यांस झुलविण्यात व आपला अशा रीतीनें चरितार्थ चालविण्यांत असतो. किंबहुना, तसा तो शेंकडों वर्षां-पासून चालत आलेला आहे ! त्यास प्राचीन किंवा अर्वाचीन कानडी ब्राह्मणच तेवढे अपवाद होत असें म्हणणें धाष्टर्याचें होईल ! त्यांनीं वेदांताचे व तत्त्वज्ञानाचे गहन ग्रंथ सुबोध कानडींत लिहिल्यास यापूर्वीच सर्व कर्णाटकी समाजांत जास्त कार्यक्षमता आली असती आणि प्राचीन द्रविड संस्कृति मूळ इतकी उज्ज्वल असता आज इतर संस्कृतींच्या मागें पडली नसती ! सामाजिक विषमतेबरोबरच निरनिराळ्या समाजांच्या घटकामधील बौद्धिक नैतिक व सांस्कृतिक विषमता अभंग राखण्याकरितां कित्येक प्राचीन उच्च म्हणवून घेणारांनीं जे अश्लाघ्य प्रयत्न केले त्यांचा आधुनिक कर्णाटकस्थांनीं अवश्य दूरवर विचार करून ही जाचक परिस्थिति यापुढें तरी बदलविण्याकरिता सतत आस्थापूर्वक झटलें पाहिजे. धर्मांत व आचारांत जसें जातिभेदांचें व श्रेष्ठ-कनिष्ठतेच्या खोट्या कल्पनांचें उच्चाटण करण्यांत यावें त्याचप्रमाणें साहित्यासहि हा नियम लागू करावा. असें वाङ्मय ब्राह्मणांनींच वाचण्याचें म्हणून त्यांत बुद्ध्या कठिण शब्दांची योजना केलेली नसावी. ब्राह्मणांनीं आपली विद्या इतर कनिष्ठ जातींच्या होतकरू व अधिकारी शिष्यांस दिल्यास तिचा ऱ्हास न होता, उलट स्वाध्यायामुळें तिचा किती तरी पट विस्तार व प्रसार होतो ही औदार्याची व त्यागाची गोष्ट प्रत्येक उच्चवर्णीय म्हणवून घेणाराला पटली किंवा पटवली गेली पाहिजे; आणि पवित्र विद्यादानाच्या व सारस्वतप्रसाराच्या कामीं त्याप्रमाणें त्याच्याकडून अन्तःकरणपूर्वक योजना आंखली गेली पाहिजे. म्हणजे जुन्या कानडी साहित्यांतील 'ब्रह्मराक्षसगिरी'स चांगलाच आळा बसून आधुनिक साहित्य तेजस्वी, ओजस्वी आणि समाजपोषक बनेल.

## कानडी साहित्याचीं ध्येयें

येथपर्यंत प्राचीन कानडी साहित्यांतील कांही अंगोपांगाचें त्रोटक दिग्दर्शन केलें. आता आधुनिक कानडी साहित्याचें ध्येय कोणतें असावें याचा अंमळ विचार करूं. साहित्याच्या ध्येयाबद्दल अनेक साहित्यकोविदांनीं निरनिराळया शब्दांत व्याख्या केलेल्या असल्या तरी त्यातील अंतिम सत्य एकच आहे. म्हणून त्या व्याख्यात आणखी एका नवीन व्याख्येची भर न घालता त्या सत्याचा सोप्या भाषेत उलगडा करणें विहित होईल. सहृदय महात्म्यांकडून जगातील सर्व जनाच्या उद्धाराकरिता व कल्याणाकरितां त्यागवृत्ति अंगीं बाणून लिहिलेलें विश्वकुटुंबी विचाराचें सत्यपूर्ण लिखाण म्हणजेच साहित्य होय. अशा नूतन साहित्याची निर्मिति स्वतंत्रच असावी असें नाहीं; जुन्या साहित्याचें सार व परंपरा नव्या साहित्यास अवश्य पाहिजे; कारण पायारूपी ही जुनी लेखनपरंपराच एकदम तुटल्यास नव्या साहित्याची इमारत उभारणें कठिण जाईल ! साहित्याचा उद्देश मुक्ति असावी. येथें कर्मसंन्यासपूर्वक प्राप्त करून घेण्याचा ज्ञानान्त मुक्तिमार्ग सांगावयाचा नसून कर्मयोगपूर्वक ज्ञानानंदापासून उत्पन्न होणारी मुक्ति असा अर्थ घ्यावयाचा. अशी उच्च ध्येयगर्भ मुक्ति जेणेंकरून याच जन्मीं साध्य होईल आणि तापदायक संसारसागरात अखंड चित्तशांति देण्यास समर्थ अशी मनोभूमिका तयार होईल असलें कानडी गद्य, काव्य, नाटकें, इतिहास, अनुभवामृताचीं वचनें, जिज्ञासापोषक सिद्धांत, शास्त्रीय ग्रंथ, तत्त्वज्ञानाचे सुबोध ग्रंथ इत्यादि अवश्य लिहिण्यात यावेत. आजचा काल विमर्शात्मक आहे. प्रत्येक नवविचार टीकेच्या ऐरणीवर ठोकून स्वयंप्रकाशानें तावून सुलाखून कार्यक्षम होऊन निघाला पाहिजे. म्हणूनच असे थोर विचार जातिनिरपेक्ष मानण्यांत आले पाहिजेत ! हा ब्राह्मण, तो क्षत्रिय, हा वैश्य, तो शूद्र असा चार वर्णांचा व त्यांतील असंख्य पोटजातींचा भेदभाव करतां कामा नये ! अनिंद्य व तेजस्वी विचार—मग ते कोणाकडूनहि येईनात—आम्हांस सारखेच शिरसावंद्य झाले पाहिजेत आणि आमची आध्यात्मिक उन्नति या विचाराबरोबर झाली पाहिजे. म्हणूनच आधुनिक कानडी साहित्य सर्वांगीण व सर्वांगसुंदर व्हावयाचें असेल

तर त्यांत विश्वाचें ऐक्य, सत्य, समता व स्वातंत्र्य यांचा उगम व संगम त्यांतील प्रत्येक शब्दाच्या रोमरोमातून संपूर्णतेनें भिनला पाहिजे ! आजचे कित्येक लेखक इंग्लिश साहित्यांतील स्वातंत्र्याच्या वाऱ्यानें भान हरपल्याप्रमाणें दिसत आहेत ! एका साहित्यानें एखाद्या परकी संस्कृतीच्या असें आहारीं जाणें स्वतत्रतेचें लक्षण खास नव्हे ! तें अंध अनुकरण किंवा तत्समता असें म्हणता येईल. खऱ्या विचारवान् साहित्यभक्ताने इतर साहित्याचें परिशीलन करताना त्यांत आपणच एकरूप होऊन आपल्या संस्कृतीचेंच व्यक्तित्व व वैशिष्ट्य गमावून न बसतां व आपली मनोभूमिका न सोडता त्यातील वेंचीव, इष्ट व समाजानुकूल प्रकार तेवढे कुशलतेनें पचविले पाहिजेत; आणि नंतर राष्ट्रीयत्व व आतरराष्ट्रीयत्व अशीं दुहेरी ध्येयें यथाक्रम राखून त्याचा उपयोग स्वतंत्र प्रतिभेच्या जोरावर आपल्या साहित्याच्या उन्नतीकरिता केला पाहिजे. आधुनिक कानडी साहित्य बहुतांशीं इंग्रज आदि पाश्चात्याच्या व इतर साहित्याचा व काव्यप्रकाराचा अनुवाद करून जगणारें आहे. ही अनिष्ट वस्तुस्थिति त्वरित बदलण्या-करिता प्रतिभाशाली साहित्यभक्तानीं झटणे हें त्यांचे आद्य कर्तव्य होय. इंग्रजी साहित्यात Materialistic (म्हणजे जड आधिभौतिकपर) व Realistic (म्हणजे वस्तुस्थितिनिदर्शक) असे दोन प्रमुख प्रकार विशेष प्रिय झाले आहेत. पाश्चात्य संस्कृतीस जे अमृत पचेल तेच आमच्या विभिन्न संस्कृतीस अपथ्यामुळे विष न होईल याची ग्वाही काय ? भार-तीय संस्कृति आधिदैविक व विशेषतः आध्यात्मिक पायावर उभारलेली असल्याकारणानें आधुनिक साहित्यनिर्मात्यानी जागतिक संस्कृतीचे सूक्ष्म-पणें इतिहासदृष्ट्या अवलोकन करावे. साहित्याला आणि धार्मिक रूढींना जिव्हाळ्याचा संबंध नाहीं असेहि कित्येक विद्वानाचे मत आहे; कारण धार्मिक नीतिअनीतीच्या कित्येक क्षुल्लक कल्पना साहित्यसूर्याच्या प्रखर सत्य प्रकाशापुढें—त्याच्या उज्ज्वल तेजापुढें—पार वितळून जातात हा अनुभव कोणास नाहीं ! म्हणून कानडी साहित्याचा उद्धार व्हावयाचा असेल तर त्यांत प्राचीन द्राविड संस्कृतीचे परिष्करण व अंतर्भाव अवश्य झाला पाहिजे. नसल्यास त्यात मूलग्राही जिवंतपणाच राहणार नाहीं !

## आधुनिक कवि व त्यांचे टीकाकार

वर्तमान कानडी काव्याकडे सभोंवार नजर फेंकली तर असें आढळतें कीं, तरुण कवींचा ओढा जुन्या धर्तीचीं वीरशृंगारादि रसाचीं महाकाव्यें किंवा पौराणिक खंडकाव्यें रचण्याकडे नसून, त्याच्या आकांक्षाचीं प्रतिबिंबें सुनीतें, भावगीतें (Patriotic poems) व वस्तुस्थितिनिदर्शक (Realistic) निसर्गवर्णनाचीं कवने रचण्याकडे आहे. त्याबरोबरच प्राचीन वृत्तदर्पणकारानीं घालून दिलेले वृत्ताचे नियम झुगारून हे कवि सुनीतें, इंग्रजींतील विनावृत्त कवनें (Blank verse), गद्य काव्यें इत्यादि रचीत आहेत. साहित्य काय, काव्य काय, त्याची स्फूर्ति लेखकाच्या आंतरिक सद्भावनाचा उद्रेकच दर्शविते. या दृष्टीनें अवलोकन केल्यास, सामाजिक आर्थिक व राजकीय विषम परतंत्रता झुगारून देण्याची आजच्या कवींची हृदयाची तीव्र तळमळ, सामाजिक किंवा राजकीय विषम प्रकारांबरोबरच काव्यवृत्ताचे व नियमांचे जुने प्रकार गुंडाळून ठेवून आपल्या सळसळणाऱ्या भावनाना वाचा फोडण्यासाठीं धडपडते व जोरजोरानें बाहेर उसळी मारूं लागते यांत नवल कसलें ! म्हणून टीकाकारांनीं अशा तरुण कवींचा उत्साहभंग करण्याचें पाप जोडूं नये; त्याच्या उच्च ध्येयाच्या भरारीची होता होईल तों तारीफच करावी आणि त्यांचें काव्य स्वातंत्र्यापासून पुढें उच्छृंखल व नियमरहित होऊं नये म्हणून त्यास प्रेमानें उपदेश करावा. जुन्या काव्याची मनोभूमिका आज अवश्य नसली तरी त्यापैकीं काहींचे तरी सूक्ष्म ज्ञान आधुनिक कवींस व्हावें म्हणून जाणत्या साहित्यभक्तानीं व्याख्यान-संभाषण-लेखनद्वारा त्यांच्यात योग्य जागृति उत्पन्न केली पाहिजे. पुढें त्याच्या यौवनापासून प्रसवणाऱ्या उद्दाम विचाराना स्वतःच्या अनुभव-निरीक्षणाचे धक्के खाण्यास आणि जगाचें सूक्ष्म तारतम्यानें अवलोकन करण्यास त्या सर्वभक्षक कालास मुभा दिली पाहिजे. कारण कोणाचीहि नैतिक व बौद्धिक उन्नति शाश्वत व्हावयाची असेल तर ती सावकाशीनें व अंतर्मुख रीतीनें झाली पाहिजे. वरकरणी बाह्य उपाधींपासून ती होणें जितकें सोपें तितकेंच तें क्षणभंगुर होय. हा अढळ सिद्धांत चोखंदळ पण निष्ठुर टीकाकारांनीं ध्यानांत आणल्यास त्यांचे व कमी दर्जाच्या प्रतिभाशून्य

कवींचे असे उमपत्नांचेहि प्रयत्न निष्फळ होणार नाहींत; आणि कानडी सारस्वतातील काव्यौघ पूर्वीप्रमाणेंच धीरगंभीरतेनें दुथडी तुडुंब वाहून तो बहुताचींच काय, पण सर्वांचींहि अंतरें राखण्यास व तोषविण्यास समर्थ होईल यात शंका नाही.

---

## आधुनिक कवींची काव्याची दृष्टि*

उत्तर कानडा जिल्ह्यातील सुंदर प्रदेश एकवार पहावा म्हणून मला फार इच्छा होती. ती सफल होण्याचा योग आज साधला म्हणून कारवारच्या स्वागतमंडळाचा मी फार आभारी आहें.

### अचल पर्वत व गंभीर सागर

तुमच्या उत्तर कानडा जिल्ह्यातील सह्याद्रीच्या रांगा म्हणजे समुद्राला आपले पाय भिडवून राहिलेले जणूं स्थिर राक्षसच ! समुद्र व पर्वताच्या रांगा जणूं प्रकृतिरूपी देवीचीं जुळीं मुलेंच ! या दोहोंच्या जीवनात दोन मोठ्या तत्त्वांचा आविष्कार आहे ! पर्वतांच्या रांगा, अचल नियमांच्या जणुं थोरल्या भिंती; सागर, अनंत स्वातंत्र्याचा प्रपंच ! या दोहोंचा सुंदर संगम जेथें झाला आहे असा तुमचा प्रांत पुण्यशाली नव्हे तर काय ! आमच्या संचाराला आड येणाऱ्या या नियमांच्या व रूढींच्या पंक्ति दाटून खालीं उतरून आल्याविना स्वातंत्र्याचे दर्शन आमच्या डोळ्याना सुलभपणे साधणार नाहीं. आतां माझें म्हणणे असें नव्हे कीं, नियम केव्हांहि

---

* सतराव्या कर्णाटक साहित्यसमेलनाचे अधिवेशन दिसेंबर १९३१ च्या अखेरच्या आठवड्यांत कारवार येथे यशस्वितेनें पार पडले. या प्रसंगी कविसंमेलनहि भरलें होते. कविसंमेलनाचे अध्यक्षस्थान बेंगळूरचे प्रसिद्ध कानडी कवि प्रो. व्ही. सीतारामय्या, एम्. ए. यांनी मंडित केले होते. त्यानी छापील भाषण तयार न करतां केवळ स्फूर्तीनें जे भाषण केले ते फारच उद्बोधक झाल्यामुळे काव्यप्रेमी मराठी वाचकांसाठीं त्याचा सोपा मराठी अनुवाद केला आहे.

वाईट म्हणून; परंतु पुष्कळ काळपर्यंत त्यांच्या पाशातच बाधून घेतल्यास स्वातत्र्याच्या अनुभवाचाच विसर पडतो व तो हळूहळू लोप होत जातो. आणि सत्याला स्वातंत्र्य हें एक मुख व अंग आहे याचाहि विसर पडूं लागतो ! असें झाल्यामुळें चांगल्या वस्तूच्याहि उत्कर्षास आणि चलन-वलनास आडकाठी बसते आणि ती वस्तु चागली असूनहि स्वातंत्र्याचा मार्ग सुकर करूं शकत नाहीं.

## कारवारचें सौंदर्य

खरोखर तुमचा गांव किती सुंदर आहे ! मी अशी कल्पना करीन कीं, सह्याद्रीनें आपल्या प्रीतीची मुले म्हणून तुम्हांस आपल्या पायथ्याशीं रहाण्यास स्थान दिलें ! परंतु आपल्या अचल धैर्यामुळें तुम्हीहि अचल व निर्भय होऊन हळूहळू जीवनाचें दुसरे म्हणजे स्वातंत्र्याचे सुख विसराल कीं काय या भीतीमुळें त्यानें आपल्या सागरबंधूशीं हितगुज केलें आणि तुमच्या दृष्टीसमोर तो निरंतर नवीन नवीन रूपे धारण करून हंसेल गागडेल अशी खास व्यवस्था केली ! लहान लहान पर्वतरूपी स्वयंसेवक वाटेंत दुतर्फा उभे करून सागराचे तो स्वागत करीत असला पाहिजे ! म्हणून मी म्हणतों कीं, तुम्ही लोक खरोखरीच इतके भाग्यवंत आहांत कीं तुमच्या प्रातात नियम व स्वातंत्र्य याची शुभ सागड जुळून आली आहे ! अशा नियम स्वातंत्र्याच्या संगमस्थानीं कारवारात कानडी कवि-संमेलन भरणें म्हणजे ही कांही सामान्य संघटना नव्हे ! तींत ध्वनीचा समावेश झालेला आहे; आणि ती आमच्या साहित्याच्या प्रपंचाच्या उज्ज्वल भाविष्यास सूचकच आहे !

## आजच्या कवितेचा काल

आजपर्यंत कानडी कविता केवळ प्राचीन संप्रदायानींच जखडली गेली होती. कोठें कोठें कानडी लोकाच्या स्वातंत्र्याच्या प्रीतीमुळे कानडी कविता नवीन तानात नटून नाट्य करीत असताहि, ती बहुतकरून जुन्या नियमांच्या बधनानाच जखडून खिळून गेली होती ! परंतु आतां काळ झपाट्यानें बदलत आहे ! त्याबरोबर जीवनाची तऱ्हाच बदलत आहे ! नवनवीन संपर्कामुळें नवीन दृष्टि आली आहे. सौंदर्याच्या अभिनव तऱ्हा, विविध

काव्यरसांचे अनुभव, पवित्र रुचि इत्यादि प्रकार आमच्याकडे झपाट्यानें येत आहेत. पुष्कळ दिवसाच्या निर्बंधांमुळें कवीचें हृदय कोमेजून गेलें होतें; त्याला आतां आपल्या निजसामर्थ्याची जाणीव झाली असून बाहेरील स्वातंत्र्याच्या संचारामुळें आपणहि जागृत होऊन त्याच्याशीं समरस होऊन कृतार्थ व्हावें म्हणून आंत ऊर्मी उठत आहेत! रूपात, रीतीत, आशेत, साधनांत, चित्रात, रुचींत, रचनेंत, तानाच्या नृत्यात व तांडवात, ध्वनीच्या मधुर विलासात, सर्व ठिकाणीं—आपल्या स्वातंत्र्याच्या इच्छेप्रमाणें वर्तन घडावें अशी तीव्र संवेदना उत्पन्न झाली आहे.

## काव्यांतील जुनें-नवें

एका दृष्टीनें विचार केल्यास साहित्यात काय, काव्यात काय, हें जुनें तें नवें असा नव्याजुन्याचा भेदभाव नाहीं! जुन्या काळचें जुनें, आजचें नवें, अशा तऱ्हेची भावना सर्वथा उचित नव्हे! खि. श. नवव्या शतकांत उत्पन्न झालेलें एखादें काव्य आज उद्या किंवा कालकालींहि नवीनच भासू शकेल! आजच लिहिलेली कविता तींतील सत्य किंवा सत्यत्व पड-ताळू जाता फारच जुन्या विचारांची वाटू शकेल! म्हणजेच दिसतें तें नवीन सर्व काही खरोखर नवें नव्हे; तसेंच सर्व जुनेंहि तसें जुनें नव्हे असें म्हटल्याप्रमाणें झालें. जें साहित्य मानवी हृदयाच्या घटना सरस रीतीनें विशाल दृष्टि बाळगून सर्वतोमुखानें चित्रित करतें, आणि त्यांतील सूक्ष्म संवेदना, त्यांतील सुखदुःखें व आवेग यथार्थपणें प्रतिबिंबितें, असें साहित्य, मग तें भाषारीतींत नवीन असो, जुनें असो,— जिवंत व अमृतच होय! वास्तविक कवि काय करतो? आपल्या कालांतील लोकाविषयीं व घटनां-विषयीं काव्यें रचतो. आपल्या कालांतीलच भाषाशैली, संप्रदाय इत्यादि पद्धतींना अनुलक्षून कवनें रचीत असला तरीहि तो सूक्ष्म रीतीनें सर्व कालाला सहज व मानवी प्रपंचाला सामान्य अशी एक प्रकारची अद्भुत रसाची सृष्टि आपल्या प्रतिभेच्या योगानें रचून त्याबरोबरच सौंदर्याचा सारीपाट खेळत असतो. जगांतील शुभ आवेशांची तो आशा करितो आणि आनंदानें फुलून त्यांचें गान करितो. त्या समयीं त्याच्या प्रतिभेला जें सौंदर्य चमकून जातें तें तो आपल्या बुद्धीच्या पिंजऱ्यांत क्षणैक कोंडून

ठेवतो. आणि पुढें त्यास एक भव्य मंदिर बांधून देऊन तें तेथून च्युत न होईल अशा रीतीनें कालाच्या अतापर्यंत सहृदय जनाचें सात्त्विक रंजन करील अशी तरतूद करण्यास निःस्वार्थपणें झटतो. अशा कवीनें आपल्या कालीनांना मात्र पटण्याजोग्या गोष्टी लिहिल्या असत्या, तर त्या त्या काळानंतर साहजिकच लोप पावल्या असत्या. इतर कालाच्या लोकांना त्याचा अर्थ कळला नसता किंवा त्यांतील विचारसरणीहि त्यास पटली नसती. म्हणून खऱ्या काव्याचा मोठा गुण हा कीं, त्यात कालातीत, देशातीत, मानवी वर्गांना समकालीन होऊन संतोष उत्पन्न करण्यास समर्थ आणि त्यासर्वेंच सर्वांच्या मनोमंदिरात एक प्रकारची उच्च उत्तानता साधणारा सत्यपूर्ण संदेश असतो.

## काव्य, जीवनाचें प्रतिबिंब

साहित्य काय, किंवा कोणतीही कला काय, सभोवतालचा जीवनक्रमच तीं वर्णितात. ज्या रीतीचें जीवन असेल त्या रीतीचे काव्य प्रसवेल. त्यांत जर आवेश असेल तर यांतहि आवेश आलाच पाहिजे ! त्यांत ओज नसल्यास अर्थात् यांतहि ओज चमकणार नाहीं ! सर्व जिवंत कालात आणि देशांत अत्युत्तम नसलें तरी दुसऱ्या प्रतीचें काव्य विपुल आढळतेंच. जन्मला, झोंपला, कांहींहि कीर्ति साधली नाहीं, एके दिवशीं कोणास ठाऊक नसतां मेला, अशा प्राण्यांना जिवंत ही पदवी कशी लावता येईल ! श्वासोच्छ्वास केल्यामुळेंच कोणत्याहि प्राण्याला जिवंत असें म्हणतां येणार नाहीं ! जाणीव, सहसंवेदना, उत्साह, वीर्य, साहस याच्या अस्तित्वाशिवाय जगणें म्हणजे जिवंतपणें जगण्याची थट्टा करणेंच होय ! ज्या जीवनात चैतन्य खेळत आहे त्यांतील प्रत्येक भाव व आशा श्रद्धेनें युक्त असून कार्यमुख असतात, वर्तन शीलपूर्ण असतें आणि ध्येय उन्नत असतें. अशा आवरणात शास्त्र, कला, चर्चा, कार्याचा उत्साह, सिद्धता याचा उगम होतो आणि तीं जीवनाची ज्योत प्रकाशित करतात. अशा जीवनांतूनच काव्याला पूर्ण आवेश मिळावयाचा असतो. म्हणून मोठमोठे उत्साह, संतोष, संकटें व समारंभ नसल्यास मोठमोठीं काव्यें उद्भवणें अशक्यच.

## स्वानुभव व वास्तव यांची कसोटी

प्रत्येक कालांतील कवि तरी काय करतो ! आपल्या डोळ्यांपुढील प्रपंचा-

चेंच कवि वर्णन करीत असतो. त्याला प्रतिभेच्या योगानें काव्याचा आवेश व अनुभवाचा परिपाक तो जोडीत असतो. कोणीहि असेना, स्वतःच्या अनुभवास जें कांही येत नाहीं तें तो चांगल्या रीतीनें वर्णन करूं शकतच नाहीं! समुद्र किंवा युद्ध प्रत्यक्ष न पाहिलेला इसम जर त्याचें काल्पनिक वर्णन करूं लागला तर त्यात कितपत सत्त्व उतरेल? बरें, इतकेंही करून तो वर्णनच करूं लागला तर त्यांत जीवकळाच उतरणार नाहीं! आपल्या कृति कितीहि सरळ किंवा सरस लिहिल्या, त्यांत अत्यंत मृदु विन्यास केला, त्यांत मधुर तानांचीं कितीही सुंदर आंदोलनें घातलीं, तरी अशा कल्पक कवींच्या काव्यांत जिवाची खरी रुखरुख, तळमळ किंवा सहृकंप उद्भवणार नाहीं! म्हणूनच कोणत्याहि देशातील किंवा कालांतील कवि झाले तरी केव्हाहि आपल्याच कालातील आपल्या अनुभवाच्या विषयांनाच अनुलक्षून काव्यें रचतात; तसें करणेंच आपला धर्म व आपलें कर्तव्य असें ते मानीत असतात. आपापल्या अनुभवाचा मार्ग धरून दुडुदुडु धांवण्याचा प्रयत्न करणें व त्यांत जीवकळा घालून गान करणें म्हणजेच त्याचें स्वातन्त्र्य! आपण पाहिलेलें, ऐकलेलें, अनुभवलेलें सर्व ज्ञान कवि एकत्र करतात आणि त्यास आपल्या प्रतिभेचीं पुटें देतात. तेणेंकरून हर्षानें ते फुगतात आणि कलेचा रस व सृष्टि त्यांत घालतात. आपल्या शिक्षणाच्या संस्कारामुळें संपादिलेलें सारें कौशल्य त्यांत एकत्र करून जें गीत ते रचतात त्यास काव्य म्हणतात. आतां काव्याच्या अणुपरमाणूंचें असें विघटन किंवा विश्लेषण करणें एका दृष्टीनें सदोष व असत्यच होय! कारण काव्याच्या निर्मितींत प्रतिभेचा भाग इतका, कथावस्तूचा भाग अमुक, रचनेच्या कौशल्याचा भाग इतका, सात्त्विकतेचा आवेश अमुक, त्यातील छंदोरचना इतकी, येणेप्रमाणें प्रमाणाचें पृथक्करण व मिश्रण करून कोणीहि कवि झाला तरी काव्य निर्मीत नाहीं. आवेशाच्या सामुग्रीनें प्रतिभा उद्दीप्त होऊन तिचा पाक होतो, ती शिजते, आणि एक प्रकारचा रस बनल्यानंतर तो पुनः कवीच्या मनांतच जिरतो, तेथें नाट्य करतो, तांडव करतो, आणि सतत ध्वनि उत्पन्न करणाऱ्या एक प्रकारच्या नादाच्या प्रपंचांत किंवा ब्रह्मांत तो विलीन होऊन एकतानतेच्या एका विशिष्ट लयांत एकरूप होतो, आणि आपल्याच

एका विशिष्ट रीतींत संपूर्णपणें एकजिनसी रूप धारण करून अंतःस्फूर्ती-मुळें बाहेर पडून रसिकांचें हृदय रिझविण्यास समर्थ होतो. वास्तविक असें काव्य वाचून व ऐकून नंतरच आम्ही त्याचें विभजन करतों आणि त्यांत प्रतिभेचा अमुक भाग, रसाचा अमुक भाग इत्यादि काव्यचर्चा करीत असतों. तरीहि अशा काव्याचें अंतरंग असेंच आहे, येथेंच आहे असें ठासून सांगणें कठिण. काव्यांतील विषय, शैली, रूप, छंदोरचना, याचा परस्परसंबंध देह आणि आत्मा याच्या संबंधाप्रमाणें. तो प्रत्येकीं फोडून दाखविणें शक्य नाहीं! त्या त्या भागाचें विच्छेदन करूं गेल्यास काव्याचा आत्मा केव्हाच उडून जाईल!

## प्राचीन व अर्वाचीन दृष्टिकोनांतील फरक

प्राचीन कवींनीं आपल्या काव्याकरितां आपणांस इष्ट अशाच कथावस्तु निवडून घेतल्या; आपल्या अनुभवानीं त्यांचें पोषण केलें; त्याच्याविषयीं गान केले; आणि प्रपंचाला दिव्य साहित्याच्या दानाची जोड दिली. अशा कवींचा काल त्याच्याबरोबरच गेला! परंतु आज आमच्या सभोंवतीं प्रपंचाच्या रीतींतच मोठा फरक झाला आहे. इतका कीं, पन्नास वर्षांपूर्वी जिवंत असलेले आमचे आजे पणजे आज पुनः येथें अवतरल्यास या प्रपंचांतील बहुतेक भाग ओळखूंहि शकणार नाहींत! आमचा आकार, वर्तन, अभिप्राय यापैकीं कशाचाहि त्यास नीट अर्थ लागणार नाहीं! आजच्या पिढीचा उत्साह, भक्ति वगैरे पाहून ते आश्चर्य पावतील! त्याच्यापेक्षां आमचा प्रपंच जास्त विस्तृत झाला आहे, विविध घडामोडींत आणि पारतंत्र्याच्या पाशात तो जास्त जास्त अडकत आहे, आणि त्यांतून बाहेर सुटून येण्या-करिता पंख फडफडावून धडपडत आहे! अखंड मानवी प्रपंच आज आमच्या डोळ्यांपुढें उभा रहात आहे आणि आमचे सर्व संशय नाश करीत आहे. आमच्या बाहूंना जोराचें स्फुरण देऊन वीरवृत्तीला पोषक असे उच्च वाता-वरण निर्मीत आहे आणि कवीचे मन आपल्या बाजूला वळवून आपल्या-बरोबर धैर्यानें उभा राहून निर्वाह कर, म्हणून तो कानींकपाळीं ओरडून सांगत आहे! आजच्या आशा-निराशा, आवश्यकता, कार्याच्या रीति, जीवनाचे हेतूच निराळे! ते केवळ आमचेच होत असें आम्ही मोठ्या अभिमानानें

म्हणतों. म्हणून माझें सांगणे इतकेंच कीं, आमच्या कृति आमच्या जीवनाचीं प्रतिबिंबें असावींत.

## आमच्या काळांत काय कमी आहे ?

आणि म्हणून असें म्हणूं कीं, आम्ही प्रथम आमच्या कालाचेच आहों. आणि नंतर पाहिजे तर दुसऱ्या कालात प्रवेश करूं शकूं. आमच्या कवनाचा आवेश आमच्या आजच्या प्रपंचाच्या प्रश्नांमुळें, विघ्नामुळें, उत्साहाच्या साधनामुळें, संतोष-उत्साहामुळें, पराजय व निराशा यांच्यामुळेंच उत्पन्न होईल; त्याच्या गौरवामुळेंच आमच्या काव्यांना गौरव येईल. हें सोडून आम्हास परिचित नसलेल्या दुसऱ्या एखाद्या घटनेस आम्ही चिकटून पाहिल्यास तेणेंकरून आत्मवचना केल्याचें पाप मात्र आमच्या माथा बसेल ! खरेंच, आजचें जीवित सोडून आम्ही दुसऱ्या अद्भुत घटनासाठीं हुडकीत का जावें बरें ? वर्तमानकाळीं रहाणाऱ्या आमच्यासाठीं ईश्वराने पाहिजे तीं भरपूर साधनें निर्माण केलेलीं नाहींत काय ? आम्हांसहि अंग, हात-पाय, डोळे, कान, नाक हीं नाहींत काय ? मन व जीभ नाहींत काय ? आमच्या प्रपंचातहि पूर्वीप्रमाणेंच प्रातःकाल, संध्याकाल, चंद्र व सूर्य, विविध रंगच्छटा, सावली, उन्ह, तारारूपी अग्निकण, हिमरूपी अश्रूंचे सर, इंद्रधनुष्यरूपी तापलेलें सुवर्ण, हीं शोभिवंत होऊन प्रकाशतच असतात ! पूर्वीप्रमाणेंच पानें, फुलें, फळे, लता, पक्षी, मृग, नदी, सरोवर, सागर याचा सुंदर प्रपंच आमच्याहि कालात आहे ! विशाल समुद्राचीं पाळें पूर्वीप्रमाणेंच आवेशाने घोष व गर्जना करीत पाढरा फेण बाहेर फेंकतात आणि एक प्रकारची गंभीर मोहकता उत्पन्न करून आजहि आमच्या डोळ्यांचें पारणे फेडतात ! मानवी हृदय पूर्वीप्रमाणेच ज्ञान-अज्ञानात, राग-द्वेषांत, उन्नति-अवनतींत, गटंगळ्या खात किंवा बुडत एकसारखें नवरसांच्या सृष्टीला उपकरणांची सामग्री पुरवीतच आहे ! असें असतां आम्ही दुसऱ्यांच्या उसन्या डोळ्यांनीं पहाण्याचें पाप का करावें ? त्यांच्या बुद्धीच्या पिंजऱ्यांत स्वतःला कोंडून घेऊन कां पाहिलें पाहिजे ? त्यांच्या भावांचे दास कां झालें पाहिजे ? म्हणून आम्हांस दिसणारीं दृश्यें आम्हीच चित्रण करू. आमच्या कालातहि शृंगार नाहींत काय ? हरएक बाबतींत मोकळीक व स्वाधीनता

लाभण्याविषयीं धडपड करून—होईल तें होवो—परंतु त्यांची सिद्धि मिळवूंच मिळवूं म्हणून निश्चल निश्चयानें पुढे पुढें जाण्यास धडपडणाऱ्या आमच्या जनतेंत आज वीरवृत्तीचा लोप झाला आहे काय? शौर्याचें वैभव दृष्टीस पडत नाहीं काय? अन्याय, काठिन्य, संकटें, याच्यामुळें गहिंवरून येणारी करुणा व शोक नाहींत काय? सुंदर हास्याला स्थान नाहीं काय? एकाच दिवशीं शंभर भयानक प्रसंगानीं परिपूर्ण अशा एखाद्या अद्भुत कथेची घटना आमच्या कानीकपाळी कधींहि ओरडत नाहीं काय? हृदय उलटें पाडून, पिळवटून काढून, त्याचा आंतल्या आत दाह होईल अशी स्थिति घडवून आणणारे व्यथा, संशय, प्रवृत्ति, युद्ध इत्यादि प्रकार आजहि नाहींत काय? त्याच्याविषयींच आमचे कवि आजकाल कवनें रचितात. यांची जाणिव नसलेले—याचें वर्णन करण्यास असमर्थ असलेले—आपणास अपरिचित आणि दुसऱ्या कोठल्याहि घटनेशीं सबद्ध असा प्रपच कसा वर्णितील बरें? आमच्या कल्पनाना आधार किंवा पाया म्हटला म्हणजे आमच्या नित्य जीवनाचा प्रपंच. या प्रपंचामुळेंच आम्हास इतर प्रपंचाचें स्वरूप व ज्ञान कळण्याचें आहे. आणखी एक पाऊल पुढें टाकून आम्ही असेंहि कां म्हणूं नये कीं, कशाचें वर्णन केलें तरी कोठेंहि आम्ही आमच्या अनुभवाच्याच घटना वर्णन करीत राहूं.

## जुन्या काव्यांतील ठराविक शृंगाररस

आतां आम्हीं मागील काव्याकडे दृष्टि फेंकली तरी आम्हांस काय दिसून येतें? त्या काव्यातील कथावस्तु कोणत्या? कोणी राजे, त्याचीं राजघराणीं, त्याचीं दुःखें व सुखें, अभिसार, विरह, भोग, पुराण, इतिहास, धर्म, बोध, ऋषि, मुनि, योगी अशाचीं वर्णनें, दिव्यात्म पुरुषांच्या जन्मकथा, नीतिविषयक विचार, राजाचीं युद्धें, भक्ति, वैराग्य,—बहुतेक यांच्या आविष्कारातच तीं काव्यें संपून जात असत; जीवनाचें चित्र त्यांत विशेष रीतीनें प्रतिबिंबित केलेलें नसे. सर्व प्रवृत्ति पचवून धैर्यानें जीवन केलें पाहिजे म्हणून वाटणारा एक प्रकारचा निर्धार तितक्या तीव्रतेनें जुन्या लोकांना जाणवत नव्हता! त्या काळीं ते शांतीच्या मागें लागले होते व वैराग्याला तेव्हां जास्त किंमत होती! त्याची सुखभोगविषयक अभिलाषाहि

एका विशिष्ट प्रकारची होती ! आमच्या कालात त्या तऱ्हेचें राजकीय सामाजिक किंवा आर्थिक आवरण नाही ! आजच्या कालात उत्तम ठरलेल्या अनेकाना जुनीं पुराणें व इतिहास याजविषयीं पूर्वीच्या लोकाइतकी श्रद्धा राहिलेली नाहीं ! आजचें जीवन पूर्वीच्या इतपत विरक्तिमुख नाहीं ! आता असें म्हणतां येईल कीं, भोगांत सुद्धां एक प्रकारचें नावीन्य व स्वातंत्र्य हुडकण्यासाठी आजचे लोक धडपड करीत आहेत ! मनाच्या कप्यात ज्या अनेक सत्प्रवृत्ति उगम पावतात त्यांना सतत पायबंद घालणें जीवनाच्या आरोग्याला विघातक आहे किंवा कीर्तीला बाधक आहे हें आज कळूं लागलें आहे ! बाहेरच्या नित्य व्यवहारात परस्पर स्नेह, राजकीय स्वातंत्र्य, सर्वांविषयीं समदृष्टि, एकमत, समता, सहानुभूति, हृदयाचें विशालत्व, याजविषयी समाजांतील जनाना ज्याप्रमाणें एक प्रकारची उत्कंठा वाटत होती तशीच ती मानसिक व्यवहारातहि त्याना आज वाटत आहे ! वेद, धर्म, शास्त्रें यातहि आपणास प्रामाणिकपणें वाटणारे संशय उचलून धरून, त्याजविषयीं चिकित्सा व चर्चा करून, त्यांतील गूढ तत्त्वें उकलण्याकरिता आजची पिढी प्रयत्न करील. चार्वाकापासून तों वेदांताचे अनेक सिद्धात प्रस्थापित केलेल्या तत्त्वविदांच्या वशजाना—यमाचा पाठलाग करून, त्यास जर्जर करून त्याजकडून सत्याची माहिती काढू शकलेल्यांच्या वंशजांना—अशा प्रकारच्या योजनेचें स्वातंत्र्य असणें इष्ट नाहीं असें म्हटल्यास कोण गप्प राहील ? केवळ आचारालाच अंधपणें चिकटून 'आचार म्हणजेच धर्म' असा हट्ट धरून बसणाऱ्यांना मात्र हें वर्तन नास्तिकता किंवा अधिकप्रसंग असें दिसले, तरी आजची पिढी दुर्दम्य श्रद्धेनें युक्त होऊन धर्माचें खरें व वास्तविक स्वरूप आपापल्या बुद्धीला निश्चित पटण्याच्या धैर्यानें तसा स्वतंत्रपणें प्रयत्न करीतच आहे. आजचे तरुण एखादी घटना चारित्रिक दृष्टीने पहातात; विमर्षेच्या दृष्टीनें पडताळतात; विषयांचा तोलनिक अभ्यास करून आपल्या आजच्या संप्रदायांस परस्परतारतम्यें योजून आणि त्यांचा खोल विचार करून परीक्षा करतात. धर्माला धर्माचीं निजतत्त्वें योजण्यांत गुण कोणता ? त्याचा डोळे मिटून अंगीकार का केला पाहिजे ? स्वर्ग आणि नरक खरोखर आहेत काय ?

शुचि जीवनाचें खरें लक्षण कोणतें ! प्रपंचाचे थोडक्यात सार काय ? असे आपणच प्रश्न विचारून त्याचें निवारण करण्याकरितां निरंतर प्रयत्न करीत असतात. आता पूर्ण विचारांतीं त्यांस धर्मविषयक कित्येक जुन्या कल्पना किंवा सिद्धात पटतील, नाहीं असें नाहीं. तरीहि आजच्या पिढीचा विशेष हा कीं, आपणास योग्य दिसणाऱ्या रस्त्यानें ती धैर्यानें आक्रमण करण्यास कचरत नाहीं आणि त्यांतील सत्य हुडकून तें आपल्या रक्तांत भिनविण्यास पराकाष्ठेचे प्रयत्न केल्यावांचून रहात नाहीं ! त्याचें म्हणणें असें कीं, आपल्याला पटून आचरण्याचा धर्म सर्वथा आपलाच असला पाहिजे. आज कोठेहि दृष्टि फेंकली तरी त्याच्या सभोंवार अगाध समस्या विघ्नें आणि असंबद्ध घटना याचाच सुकाळ दिसून येतो ! न संपणारे, न उकलणारे संदेह उत्पन्न झालेले दृष्टीस पडतात !

> "Wandering between two worlds, one dead,
> The other powerless to be born,
> With nowhere yet to rest my head."

भावार्थ—"मी जणूं दोन जगांत वावरत आहें, एक मृत अवस्थेंत आहे, आणि दुसरें जन्म घेण्यास असमर्थ आहे–मला डोकें टेकण्यासहि आधार नाहीं !"

या कवनात म्हटल्याप्रमाणे दोन संस्कृतींच्या या संक्रमणावस्थेंत भाव संप्रदाय, सिद्धात, वगैरे गोष्टीत परस्परसंगति व मेळ नाहींत–किंबहुना त्यांत विसंगति व विरोध आहे–असें पाहून ते भीतीनें कातर झाले आहेत ! त्याचा समन्वय कसा करावयाचा ? कोणतें खरें ? कोणतें खोटें ? या परस्पर द्वंद्वामधील खरा धर्म ओळखावयाचा कोणता ? त्यातील हुडकण्याजोगें लक्ष्य कोणतें ? म्हणून आपल्याशींच तीव्रतेनें विचारणा करीत आहेत ! म्हणून आजच्या सर्व प्रक्रियांत व कार्यरंगांत सत्याचा शोध एकसारखा लागलेला दिसतो आणि त्याच्या मदतीला अजून तितपत स्वतंत्र नसलेली विचारस्वातंत्र्याची दृष्टि धांवत असते. आणि पुढें हीच दृष्टि साहित्याला आणि साहित्यशाखेचें अतिसुंदर पुष्प जी कविता यानाहि लागू पडल्यास त्यांत आश्चर्य वाटण्याचें कारण नाहीं.

## जुनें तें सर्व सोनें नव्हे !

मुख्यतः सांगण्याचा आशय इतकाच कीं, जुन्या रीति, जुने नियम नीति व बंधनें आज पुरत नाहींत ! त्यात सार असलेल्या गोष्टी निवडून काढून इतर अप्रयोजक केरकचरा झाडून दूर बाहेर लोटला पाहिजे ! त्याचा उपयोग आजच्या जीवनाच्या प्रयोजनाला व साधनाला योग्य रीतीनें भरपूर करून घेण्याकरितां प्रयत्न चाललेले आहेत. आम्ही प्रेत अशुचि म्हणून जाळून भस्म करितों; परंतु तेच मनोराज्याचीं प्रेतें बाळगणें शौच्याला खास साधक नव्हे ही गोष्ट विसरून चालणार नाहीं ! खरोखर जुन्या व नव्या जीवनाविषयक ध्येयांतच किती मोठा विरोध दिसून येतो बरें ! तुम्हांला ठाऊकच आहे पूर्वकालीं प्रपंचात वैराग्याला आणि शांतीला किती गौरव होता तो. त्या लोकाना खाण्यापिण्याला पाहिजे तितकें होतें. बाहेरील कोणतीहि आपत्ति त्यांस शांतीपासून ढळविण्यास तितपत समर्थ होत नसे किंवा त्यांच्या जीवनाच्या क्रमाला दुसरी दिशा दाखवूं शकत नसे. असतील तितके दिवस सुखानें कंठून, गाढ विचार करून, या संसाराचा शेवटीं कंटाळा आला म्हणजे त्याची असारता पाहून त्यातून सुटका करून घेण्याकरितां पूर्वीचे लोक प्रयाण करीत. संसाराची सारता-असारता केवळ बुद्धिगम्य ज्ञानानेंच जाणून त्याजविषयीं वासनाच उद्भवू न देता प्रपंचाचा त्याग करणारेहि कित्येक होते ! त्या कालच्या जीवनात प्रत्येक अंश एखाद्या संपूर्ण अवयवाप्रमाणें दुसऱ्याशीं संलग्न होता. म्हणून त्या काळची शांति किंवा वैराग्य हीं समग्र नागरिकतेचीं ध्येयेंच होतीं !

## शांतीच्या मार्गे प्रवृत्तिपर लोकसेवेचा 'गुप्त पोलीस'

अशा प्रकारचें जीवन आज लोपलें आहे हें उघडच दिसतें. जीवनांतील सुख काय ! दुःख काय ! उत्साह काय ! खंती काय ! सत्य काय ! मिथ्या काय ! याजविषयीं ज्याचे विचारच पोंचत नाहींत अशा कोवळ्या मुलां-पुढें वैराग्याचें ध्येय ठेवणें हा न्याय कोठला ! सभोंवार दृष्टि फेंकल्यास आमचा देश परकीयांची भोगभूमि झालेला दिसत आहे आणि म्हणून आम्हास सदैव यातना होत आहेत ! ऐश्वर्यांत,कार्यदक्षतेंत, युक्तीत, सत्त्वांत आणि नयांत सर्वव्यापक झालेल्या पाश्चात्य राष्ट्रांतील जनाना पाहून आणि

त्यांच्या रीति, नीति, सुख, सौकर्य इत्यादि पाहून या असमान पार्श्वभूमीवर आपापली हीनदीन स्थिति–उठून दिसणारी–पहाणाऱ्या आजच्या जनाना वैराग्याचा बोध करणें न्याय्य होईल काय? ते एक असो, असार म्हणून परमार्थानें कळेतोंपर्यंत तरी हें जीवन ससारच नव्हे का! कळण्याचा काळ येईल तेव्हा कळण्यास समर्थ असलेल्याना कळायचे तें कळो! त्याना खरोखर तत्त्वाचें आकलन झाल्यासच त्या विरक्तीची किंमत; नसल्यास नाहीं! विरक्तीला एकच मुख आहे का? जीवनांत मध्यें गुरफटूनहि विरक्ताप्रमाणें विलसणारी विरक्ति ही एक प्रकारची आहे; तर कावेची भगवीं वस्त्रे धारण करून संन्यासाचा आश्रम स्वीकारणारी विरक्ति दुसऱ्या प्रकारची! या दोहोंपैकी बहुतेक जनाना यशाचें साधन होण्यास योग्य अशी विरक्ति पहिल्या प्रकारचीच होय! आजच्या प्रपंचात सुख नाहीं काय? सौंदर्य नाहीं काय? त्यागबुद्धि नाहीं काय? सौजन्य-सौहार्दाचें अस्तित्व नाहीं काय? स्नेह, भक्ति, वात्सल्य, करुणा, औदार्य याचें अस्तित्वच नाही काय? आजच्या प्रत्येक आचारविचारानें श्रेय साधणें शक्य असता, आत्म्याचें ज्ञान करून घेणे सुगम होत असतां, लोकहित साधत असता, धर्माची सेवा करणें सुलभ असतां, या सर्वांचा 'त्याग करा' असें म्हणणें बरोबर असल्याची ग्वाही मन कसें देईल? आतां शाती-विषयीं अंमळ विचार करूं. साधनाचें ध्येय म्हणून शांतीला महत्त्व देणें न्याय्यच. प्रत्येकानें तिच्या प्राप्तीचा ध्यास धरल्यास प्रपंचाला सुलभपणें मुक्तीचा लाभ होईल. परंतु अशा प्रकारच्या शातींत आणि प्रपचाच्या दिनचर्येंत पुष्कळ अंतर आहे. अशा शातीशीं युक्त होणें ठीक होईल. युक्त होऊनहि युक्त किंवा आसक्त नसल्याप्रमाणें असणें हेंच खरें बुद्धितेजाचें लक्षण. विरक्ति ही शातीची पायरी आहे. विरक्ति न मानणारे शांतीचा हव्यास कसा धरतील बरें? बरें, शांतीला त्यांनीं एकवार मान्यता दिली तरी तिचें साधन करण्याचा राजमार्ग कोणता? आपआपली शाति प्रत्ये-कानें साधावयाची असते. ती रानावनात साधता येईल; घरांतहि साधतां येईल! जशी संगात साधता येईल; त्याचप्रमाणें निःसंग आचरणांतहि साधतां येईल! बाहेरील नागरिकता, संकटें, संतोष कसेहि असोत; प्रत्येकानें

आपल्या शक्तीला, स्वभावाला, आपल्या जीवनात आलेल्या अनुभवाना अनुरूप अशी साधना केली पाहिजे. ही शांति सुद्धा व्यक्तीच्या जीवनाला मात्र अखेरचें साधन—आत्मशासनाच्या दृष्टीनें अखेरची पायरी—इतकेंच ! तिजपासून प्रपंचाला खरा उपकार व्हावयाचा असेल तर ती केवळ साधन किंवा उपाय म्हणून मात्र राहील ! परंतु ती ध्येयाच्या पथात येणार नाहीं ! 'शांतम् शिवम्, अद्वैतम्' अशा वचनानी अद्वैत पंथाचे लोक ज्या प्रकारच्या शांतीचें वर्णन गातात, तीत परम सौंदर्य आहे, आनंद आहे; परंतु ती शांति साधणें सर्वांच्या भाग्याच्या वाट्याला येणें नाही ! युगायुगात सर्वसामान्य जनाना अशा शांतीचें महत्त्व मोटमोठे महात्मे दिव्य संदेशद्वारा सांगत आले आहेत ही गोष्ट खरी आहे. तरीहि सभोंवार पाहिल्यास असें दिसून येतें कीं, वर्तमानकाल पूर्वीप्रमाणेंच या चिरंतन शांतीला सुदूरच आहे ! आणि जी आजची स्थिति तीच भविष्यकाळाची ! आज आमच्या देशातील अनेक श्रद्धाळू लोकाच्या मनांत एक प्रकारची नवीन दृढतेची शक्ति आणि दिव्य सहनशक्ति उत्पन्न झाल्या आहेत ! शांति आणि समाधान-केवळ रूपानेंच शांति व समाधान—वसत असल्यास त्याच्या मनाचें समाधान होणार नाहीं; तितक्यानेंच तृप्ति उत्पन्न होणार नाहीं ! प्रपंचातील कष्टांत तसेंच सुखात भागीदार होऊन आपापल्या शक्तीस व बुद्धीस योग्य असा वाटा अवश्य उचलावा म्हणून ते हव्यास धरतात, विश्रांति न घेता श्रम घेतात. बाहेरच्या एखाद्या कृमिकीटकासहि अन्याय, अज्ञान, दारिद्र्य यांचा ताप झाल्यास त्याना तो मुळींच सहन होणार नाहीं ! ते कष्ट पाहून त्याचें हृदय फुटून पाणी होईल ! त्याचें निवारण करण्याकरितां कंबर बांधणें म्हणजेच त्याची क्रिया व त्यांचें समाधान. तें कार्य न करतां त्यास शांति मिळणें नलगे. तें कार्य साधत नसल्यास दुसऱ्या उपायानें शांति मिळत असूनहि त्या शांतीची त्यास तमा नसते ! कारण त्याच्या दृष्टीनें शांति हा शब्दच एका ध्येयाची परमावधि नव्हे ! तिच्यापासून लोकहित साधत असेल तर मात्र तिचा स्वीकार करावयाचा किंवा मानावयाचें असा त्याचा उघड बाणा आहे.

## विजेप्रमाणें तळपून जाणारी प्रतिभा

परंतु ही स्थिति सर्वांसच सिद्ध आहे असें मात्र म्हणतां यावयाचें नाहीं !

कोणीहि का असेना, त्याच्यांत ती सपूर्णतेनें सिद्ध झाली आहे असें म्हणणें काठिण ! साहित्यांत किंवा अशाच धर्तीच्या कार्यक्रमात रमणाऱ्या कित्येकांच्या जीवनविषयक आकांक्षांचा किंवा ध्येयांचा अर्थ करू गेल्यास असें दिसून येतें कीं, अशा ध्येयवादी जनाच्या मागें राहून प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें प्रतिभा चेतना देतच असते. अशी ही प्रतिभा कवींना वश असते आणि ती त्यांच्या भविष्यकाळावर उज्ज्वल प्रकाश पाडूं शकते. तिचें थोडेंसेंहि दर्शन लाभलेले भक्त तेणेकरून पुलकित होऊन उज्ज्वल भविष्यकाळाकडे दृष्टि फेंकून जोराने कार्य करीत असतात. म्हणूनच कवींना जनतेच्या आशा-आकांक्षाच्या ज्योति असेंहि संबोधिता येईल.

## सद्भावनांचा परिपोष व अन्यायाची चीड

इहलोक उत्तम गतीच्या परलोकाला एक साधन होय अशा पवित्र विचारानीं युक्त झालेला इसम आपल्या अंतःकरणातील सद्भावनांचा आवेश जनतेच्या कल्याणाकरिता बाहेर फेकतो. असे वृत्तविचाराचे खड म्हणजेच काव्ये होत ! जगातील प्रत्येक निसर्गाच्या घटनेत कवि ईश्वराचा अंश पडताळण्याचा प्रयत्न करीत असतो. आणि अनेक तत्त्वात एकच एक होऊन सूक्ष्मत्वानें नटलेल्या त्या अमोघ शक्तीचें आश्चर्यानें युक्त होऊन वर्णन करतो. खऱ्या काव्याचे एक प्रमुख लक्षण म्हणजे त्यात असंतोषाची जोराची उसळी असावी हे होय. यास प्रतिक्रियेचे काव्य असे म्हणता येईल. इंग्रजींत त्याला Literature of revolt अशी संज्ञा आहे. काव्याचा परिणाम केवळ आत्मिक आनंदातच विरून जाऊ नये. जगातील अन्याय, असंतोष, आर्तता ह्यांना परिपोष सन्रास भीषण थैमान घालीत असेतोंपर्यंत कवीला 'शांति' या शब्दाची जाणीव किंवा सहानुभूति कशी भासणार ! तरच तो कवि धन्य आणि तरच त्याचे काव्य जनतेच्या हृदयाचा सारखे भिडून तेथे कालांतराने अखंड स्थान पावेल; एरवीं वरकरणी शांतिपाठाने आत्मवंचना आणि तेथून समाजवंचना केल्याचे पाप मात्र त्याच्या माथीं बसावयाचें ! When Rome was burning Nero was fiddling ! (रोम शहर जेव्हां प्रचंड आगीनें जळत होतें तेव्हां तेथील नीरो नामक राजा सारंगी वाजवून आपली वैयक्तिक करम-

णूक साधीत होता ! ) या वचनांतील न्यायाप्रमाणें अशा कवींच्या कवनांची स्थिति व्हावयाची ! आजच्या काव्यांतील एक ठळक दोष म्हणजे कित्येक कवि वास्तविक घटनांपेक्षां कल्पनेला व गूढवादालाच जास्त महत्त्व देत असतात आणि म्हणून त्यांचें काव्य कित्येकदा कृत्रिम व नीरस होतें.

## कवींचा धर्म कोणता ?

धर्माची व्याख्या अनेकांनीं अनेक रीतींनीं केली आहे. "धारयतीति धर्मः" ( जीवनाचें धारण करतो तो धर्म ) किंवा विवेकानंदाच्या मतें "Religion is the manifestation of Divinity already in man." ( मनुष्याच्या अंगात जें देवपण सुप्त स्थितींत असतें त्याचा बाहेर स्फोट होणें म्हणजेच धर्म होय ). कवीच्यापुरता त्याचा धर्म कोणता म्हणाल तर तो वर सांगितल्याप्रमाणें दुःखितांच्या किंवा आर्तांच्या पीडेचें निवारण काव्यद्वारा करण्यास झटणें हा होय, केवळ मनोरंजन नव्हे व नसावा ! कालिदासाच्या वचनाप्रमाणें 'बल आर्तभयोपशान्तये' म्हणजे बलाचा उपयोग पीडितांच्या दुःखाच्या निवारणाकरितां करावा. अशी जाणीव कवीच्या हृदयापासून अखंड जनतेच्या हृदयाला तितक्याच प्रखर तीव्रतेनें जेव्हां जाणवेल तेव्हांच अशा कवीचें अवतारकार्य पूर्ण झालें असें म्हणता येईल.

## अव्यक्त सुलभतेची महती

कवीचे विचार सोप्या शब्दांनीं युक्त असावेत. शब्दातील गौरवापेक्षां अर्थातील गहनतेला किंवा गौरवाला खचित जास्त महत्त्व आहे. भाषा ही पोशाखाप्रमाणें आहे. तो नीटनेटका असणें अनुषंगानें महत्त्वाचें. त्याची सरशी कवीच्या अंतःकरणातील पवित्र आवेशाला किंवा स्फूर्तीला येणे शक्य नाहीं. सांगण्याचा मुद्दा हा कीं, थोडक्यांत पुष्कळ अव्यक्त अर्थाचे गांभीर्य व खोली उत्पन्न करण्यास समर्थ असे 'वेडे' जीवच पुढें शेंकडों वर्षांनंतर मोठे कवि म्हणून चमकत असतात ! असले थोर कवि केव्हांहि फारच थोडे असणार ! पण पुढें ते होणार नाहींतच असें आजच कोणी सांगावें ?

## गद्य व काव्य यांची उलट सुलट व्याख्या

आमच्या प्राचीन संस्कृत महाकाव्यांकडे दृष्टि फेंकल्यास तीं सर्वच

काव्याच्या मालिकेंत बसविता येणें कठिण आहे. केवळ वृत्त आणि मात्रा यानीं बांधलेली शब्दांची सांखळी म्हणजे काव्य नव्हे ! भावनेचा उद्रेक जर गद्यांतहि स्पष्ट दिसेल तर तें काव्य किंवा गद्य-काव्यच होईल. उलट-पक्षीं एखाद्या पद्यांत भावनेचा मुळींच ओलावा नसून जें केवळ वृत्तांतवजा असेल तें काव्य नसून पद्याचा दिखाऊ सांगाडा होय असेंच म्हणता येईल ! म्हणून क्रौंच पक्ष्यांच्या जोडीला जेव्हां व्याधानें क्रूरपणें बाणांनीं मारलें तेव्हां त्या घटनेपासून आर्तत्वाला मुख फुटून करुणरसाची निर्मल भावना जनांच्या मनोरूपी पवित्र खोऱ्यांतून वाहवून नेण्याकरितां रामायणाचा इतिहास जरी कविश्रेष्ठ वाल्मीकीनें लिहिला तरी त्याच्या हृदयाच्या भूमिकेचा ठाव घेतां तो इतिहास नसून वस्तुतः तें काव्यच होय ! उलटपक्षीं महाभारत वृत्तबद्ध पद्यात असलें तरी त्यांत भावनेचा प्राथमिक उगम तितक्या प्रमाणांत नसल्याकारणानें त्यास काव्य न म्हणतां प्रपंच असेंच म्हणता येईल ! कारण, तो प्रचंड नीतिविषयक आधारग्रंथ किंवा आर्यांच्या सामाजिक व राजकीय जीवनाचा चालता बोलता इतिहासच होय ! कित्येक त्यास काव्य व इतिहास यांचें मधुर मीलन म्हणतात ! याच विचार-सरणीच्या अनुरोधानें पुढें गेल्यास कालिदासाच्या रघुवंशाला (काव्य) व मालविकाग्निमित्राला (नाटक), काव्य व नाटक असें न म्हणता इतिहास म्हणतां येईल आणि कुमारसंभव, मेघदूत, ऋतुसंहार या पद्यकृतींना काव्यें असें संबोधणें ठीक होईल. केवळ काव्यमय भाषाशैलीनें युक्त अशा बाणभट्टाच्या सुप्रसिद्ध कादंबरीकथेला उच्च दर्जाचें गद्य काव्य असें कां म्हणूं नये ? तात्पर्य, सद्भावनाचा परिपोष निःस्वार्थबुद्धीनें करून जनतेची सेवा करण्याची दुर्दम्य स्फूर्ति जेव्हां कवीच्या ठायीं उमटते तेव्हांच खरें काव्य निर्माण होतें.

## विश्वसंचारी सहृदयतेची अपेक्षा

इंग्रजींत म्हटल्याप्रमाणें "A great poet should have the power of wing to extend over vast expanse" (विशाल अंतराळांत उडणाऱ्या शक्तिमान् पक्ष्यास जसे मजबूत पंख असावे लागतात तशीच थोर कवींच्या प्रतिभेची गोष्ट आहे). जात, गोत, देश, पंथ इत्यादि कृत्रिम

बंधनें झुगारून देऊन जगातील गूढ तत्त्वांचें आकलन करण्याकरितां आणि तीं जनतेच्या मनांत निर्मलपणें बिंबविण्याकरितां कवीच्या हृदयाची खोली व विशालता तशीच मोठी व उंच असली पाहिजे. सहसंवेदना सहानुभूति किंवा सहृदयता म्हणतात ती हीच. म्हणून कवीला गद्य लेखकाची तर्कनिष्ठ विवेचक बुद्धीच असून तेवढेंसें भागणार नाहीं; तर तिच्यापेक्षा कांकणभर जास्तच विश्वसंचारी, सहृदय भावनेचा प्रेमळ ओलावाहि पाहिजे. पवित्र भावनाची स्फूर्ति प्रतिभेला घांसली म्हणजे एखाद्या क्षणीं काव्याचा उगम होतो. अशा थोर कवींच्या कर्णरंध्रात निसर्गाच्या द्वारें जणूं अखिल जड व चर सृष्टि आपले सर्व व्यापार अत्यंत सहानुभूतीनें ओतीत असते. आणि म्हणून कवीला काव्य सुचतें आणि त्याच्या प्रतिभेला भरारी मारण्यास पंख फुटले असें आम्ही म्हणतों.

## गायक व कवि यांजमधील साम्य

चागला गायक व कवि यांजमध्यें साम्यच आहे. गायक जसें मुख्यतः आपल्याच आत्म्याच्या आनंदाकरितां देहभान विसरून प्रथम गातो आणि त्याच्या मधुर गळ्यातून उमटणाऱ्या सुरेल स्वरालापाकडे त्यास बुद्ध्या म्हणून लक्ष पुरवावें लागत नाहीं, तशीच थोर व सहृदय कवीची गोष्ट. दोघानाहि आत्म्याचा आनंद प्रधान, जनतेचा आनंद गौण ! गायक नादरूपी ब्रह्मांत तल्लीन तर कवि भावनेच्या विकासांत व परिस्फोटांत दंग ! एक शांतीस प्रसवतो, दुसरा कित्येकदा शोकान्त आनंदाचा उगम करतो ! पहिल्याच्या गळ्यांतून तालबद्ध, लयबद्ध, सुरेल स्वरखंड आयासाविना बाहेर पडतात, तर दुसऱ्याच्या भावनेच्या योग्य आविष्काराला व आर्तांच्या परित्राणाला तेजस्वी शब्द आपोआप सुचतात ! भावनेचा आवेग प्रबळ झाला आणि प्रतिभेची गाडी एकदांची नीट रुळावर आली म्हणजे कवीच्या मनापुढून अनेक समर्पक विचार लहान मुलाप्रमाणें दुडुदुडु धावत असतात ! आणि त्यांपैकीं थोडेच कां होईनात सर्वोत्कृष्ट विचारांचे प्रकार त्यानें आपल्या स्मृतींत सांठवून ठेवले तरी त्याचा कार्यभाग साधतो. म्हणूनच इंग्रजींत एक वचन असें आहे कीं —"There is delight in singing to none other than the singer himself."

( गाण्यात जो एक प्रकारचा आत्मानंद गायकाला वाटत असतो तो इत-रांच्या अनुभवास येणें कठीण ! )

### व्यक्तित्व विविधतेंतहि उमटलें पाहिजे

काव्यांत नादाच्या ध्वनीचें महत्त्व अर्थांतच आहे. उत्कृष्ट भावनेला आणि अंतिम सत्याच्या दर्शनाला पूरक म्हणून काव्यातील शब्दांतून ध्वनियुक्त नादमाधुरी स्रवत असल्यास दुधांत साखर पडल्याप्रमाणें होतें. असलें थोर सौभाग्य जेथें संमीलित झालेलें असतें तेथेंच थोर काव्य जन्मास येतें. त्यास प्रतिभेची पुटें देऊन पुढें प्रपंचातील दोषाच्या निवारणाकरितां भावगर्भ, वस्तुनिदर्शक शब्दचित्रें काढल्यास कवीचें कार्य निर्दोष होईल. पण त्यातहि त्यानें स्वतःचें व्यक्तित्व व देशाचें राष्ट्रीयत्व मुळींच गमावतां उपयोगी नाहीं ! कारण, कवि झाला तरी जर तो स्वतःचें व्यक्तित्व किंवा अस्तित्वच विसरूं लागला तर आपल्या अन्तःस्फूर्तीचा स्फोट कसा करणार ! ( इंग्रजींत याच अर्थाचें एक वचन आहे —"If there be no self, how then to make self-expression ?" ) आपल्या अंतरात गूढपणे असलेले आणि अनुभवानें तावून सुलाखून निघालेले चांगले चांगले विचार बाहेर सोडून त्यांची उज्ज्वल प्रभा फांकावयाची असेल तर कवीनें कृत्रिम लाजाळूपणा सोडला पाहिजे आणि भावनेच्या व्यक्तीकरणाची आपली शक्ति चिकाटीनें व परिश्रमानें वाढविली पाहिजे. "हत्ती व आधळे" या गोष्टींत चित्रित केल्याप्रमाणें एकाच शाश्वत सत्याचें आकलन करविणारे विविध भाग व प्रकार निरनिराळ्या कवींना निरनिराळ्या दृष्टींनीं दिसतात आणि त्याप्रमाणें त्या त्या घटनांचें त्याज-कडून वर्णन करण्यांतहि येतें. कदाचित् तें संपूर्ण नसेल, म्हणून तें खोटें आहे असें म्हणतां येणार नाहीं ! खरा कवि तोच कीं, जो या विविध घटनातूनहि एकाच एका गूढ तत्त्वाचा प्रकाश शोधून काढतो. वाल्मीकि, कालिदास, होमर, शेक्स्पिअर, गटे, टागोर इत्यादि थोर कवि अशा योग्यतेचे होत म्हणूनच ते जगाचाच ठेवा होतात.

### प्रतिभेनें अंतःशुद्धीचा ठाव घ्या

काव्याला प्रतिभा आणि संवेदनेचें परिष्करण किंवा आवरण यांची

अपेक्षा आहे. प्रतिभेचें अंकित काव्य आहे; काव्याची अंकित प्रतिभा नाही! मात्र कित्येक वेळा काव्याची भावना व प्रतिभा याचा उगम अन्तःकरणात एकदांच होऊन त्यात दोहोंचा खेळ सुरू झाल्याचा भास होतो! पण तो सर्वदा प्रभावी नसतो आणि म्हणून त्याच्यावर सर्वस्व विसबून रहाणें फार कठीण! प्रपंचातील एखाद्या लहान गोष्टींतील आशयाचाच का असेना, भावनाच्या दृष्ट्या उत्कृष्ट परिपोष व परिस्फोट झाल्यास आणि तसा तो अनुभव उत्तम व निर्दोष उतरल्यास असे ल काव्यहि उत्कृष्टच होईल. तात्पर्य, काव्याचा आणखी एक प्रमुख उद्देश म्हणजे अन्तःशुद्धि हा होय. म्हणून होतकरू कवींनीं आपल्या कथावस्तूंच्या पसाऱ्यात ईश्वराचा अंश हुडकण्यासाठीं झटलें पाहिजे. विभूतिपूजनाचें युग निघून गेले आहे. व्यक्तीच्या निवळ व्यक्तित्वापेक्षा तिच्या गुणवत्तेकडे अधिक लक्ष पुरविण्याची आज फार आवश्यकता आहे.

## संवेदनेची देवाण-घेवाण

कवीची भूमिका एखाद्या निःस्वार्थी पुजाऱ्याप्रमाणे असावी. फलाविषयीं आसक्ति न बाळगता आपल्या हृदयातील संवेदनाशक्तीचा पारा जनतेच्या अंतरंगांतहि तितक्याच सहृदय सहानुभूतीने चढविण्याच्या उद्देशाने त्याने वेडा म्हणवून घेऊन सुद्धा झटले पाहिजे. किंबहुना, असा ध्येयशून्य वेडा म्हणून उपहासाला पात्र झालेला इसमच कालातराने कवींच्या मालिकेंत बसेल! कारण, संगीत किंवा काव्य अशा विषयाची खोली व गांभीर्य तितक्याच रसिकतेने जाणण्यास समर्थ असे जन फारच थोडे असतात असा आजपर्यंत जगातील अनुभव आहे! म्हणून कविहृदयाच्या स्वातंत्र्याच्या भरारींतच त्याच्या काव्यापुरता धर्म संपूर्णतेनें सांठविलेला आहे असें निःशंकपणें म्हणतां येईल. आणि जी गोष्ट धर्माची तीच कवीच्या अर्थ, काम व मोक्ष या त्रिपुटीची समजावी.

## उगवत्या पिढीला नाउमेद करणें पाप आहे!

आता लहान सहान कवींना नाउमेद करण्याचा प्रकार सर्वथा निंद्य आहे. त्यांना मोठ्या लोकानीं मदत पाहिजे तर करूं नये परंतु त्याच्या मार्गांत उपहासाचीं नसतीं विघ्नें तरी त्यांनीं आणूं नयेत!. ‘मागील

कवींच्या आंगठ्याची सर या पोरांच्या आत्म्यालाहि नाहीं!' असें म्हणून त्यांची हेटाळणी करूं नये! जुन्या कवींची निंदा करून कांहीं आजचे प्रमुख कवि झालले नाहीत. जुन्या कवींनीं त्यांस जें शक्य होतें तें त्यांनीं केलें आणि ते कृतार्थ झाले. त्याचप्रमाणें आजच्या कवींनीं ध्येय धरलें पाहिजे. आजचे कवि जुन्याच्या कार्यांचा गौरव चांगला जाणतात. त्याची स्तुति करण्याच्या उत्साहाच्या भरात ते कोणासहि हार जाणार नाहींत! साहित्य देश व भाषा यांना एका मजल्यावर आणून सोडण्याचें थोर कार्य या जुन्या कवींनीं केलें, आपल्या कृतींनीं जनतेचीं मनें आकर्षिलीं आणि जीवनात मूक क्रांति केली. त्याच्या अलीकडचे आम्ही. त्याना जन्म दिलेल्यांना ज्याप्रमाणें त्यांनीं तिरस्काराने वागविलें नाहीं तशीच आमची स्थिति असावी. खरोखर आम्हांस जन्म दिलेल्यांचा आम्ही कां व कसा तिरस्कार करावा बरें? त्याच्यावाचून आम्ही जगूं शकलो असतों काय? आमच्या भाषेला जीव, कांति, मार्दव, वीर्य इत्यादींची जोड देऊन तिला त्यांनींच उजळा दिला आणि त्याला एकप्रकारची व्यक्तिगुणाची मर्यादाहि त्यांनींच जोडली. तिचें उल्लंघन करून कसें चालेल? आजापणजापासून नातवडाची उत्पत्ति म्हणून त्यांनीं संपादलेल्या वस्तूंची आम्ही जोपासना व संग्रह करूं नये काय? त्या ठेवीस योग्य वारसदार होण्याचें ध्येय आम्ही डोळ्यांपुढें ठेवूं नये काय? त्या ठेवीस आमचीहि म्हणून जोड मिळवून देणें आमचें कर्तव्यच नव्हे काय? जुनें पडकें घर पाडून त्याच्या जागीं प्रशस्त दगडी इमारत उठविल्यास उगवत्या पिढीस कोणीहि दोष देणार नाहीं. आणि आज उद्यां पडून धुळीस मिळणारें घर गेले ना, म्हणून पूर्वजहि दुःख करणार नाहींत. जुन्या घराची जी गोष्ट तीच काव्यप्रपंचाची. काव्याची जीवकळा कोठें जाईल? ती कोण बरें हिरावून नेईल? आजचें काव्य नवीन पोशाखानें सज्ज झालेलें दिसलें म्हणून त्याच्या आत दडलेलें जिवाचें वैशिष्ट्य, रक्ताच्या नाळातून वहाणारी, हाडांतील जोमाला कारणीभूत होणारी चिच्छक्ति हीं जुनींच नव्हेत काय? तीं कोठें जातील? म्हणूनच आजच्या तरुणांचे प्रयत्न व कार्यप्रपंच पाहून थोरांमोठ्यांनीं उपहास करूं नये. मुलगा दुर्बल झाल्यास बाप औषध देतो

आणि पथ्याची योजना अमलांत आणतो, त्याचप्रमाणें काव्यप्रपंचांतील थोर लोकांनीं आजच्या तरुण कवींविषयीं वात्सल्याची भावना हृदयांत बाळगावी. आपल्यापासूनच मुलांना सौंदर्यविषयक दृष्टि लाभलेली आहे हें नीट जाणून तींत उत्तरोत्तर नवा प्रकाश व नवी शक्ति घालण्याकरितां त्यांनीं झटलें पाहिजे. मुलांनीं उडण्याकरितां पंख फडफडावल्यास ते कातरून काढण्यास धांवूं नये, गाण्याकरिता तोंड उघल्यास जीभ छाटूं नये किंवा गळा दाबूं नये.

## उच्च ध्येयविषयक श्रद्धा

बहुतेक लोक असें म्हणतांना आढळतात कीं, "आतां काय, आळीआळींत व सांदीकोपऱ्यांत कवींचें पेंवच फुटलें आहे!" परंतु ही गोष्ट खरी नाहीं. सर्व लेखकांचें एकच वय नसतें; सारख्याच प्रकारचें मन, शिक्षण व संस्कार नसतात; एकाच अनुभवाची खोली नसते; लहान असो, मोठा असो, सामान्य असो, सिद्ध असा अधिकारी विद्वान् असो, काव्याच्या प्रांतांत आपापला प्रवेश व्हावा या उत्साहामुळेंच अनेक तरुण तेथें वळतात असा अनुभव आहे. त्या सर्वांना अत्युच्च काव्यें रचण्याची योग्यता नसली तरी पुढें मागें तशीं तीं रचूं असा दुर्दम्य हव्यास व श्रद्धा त्यांच्यात नाहींतच काय? या श्रद्धेपासून अभिमान व संतोष प्रसवत नाहींत काय? म्हणून असें म्हणता येईल कीं, असे श्रद्धावंत तरुण आपापल्यापरी जनतेंत एक प्रकारचें उत्साहाचें वारेंच खेळवतात; साहित्यसाधनेंत आपणास आवडेल ती सेवा करण्यास पुढें सरसावतात; आणि एक प्रकारचें सौहार्दाचें उत्तेजित आवरण उत्पन्न करितात. कोणत्याहि देशांतील कोणत्याहि कालांतील लेखकांकडे स्थूलपणें नजर फेंकली तर असेंच दिसून येतें कीं, लिहिणारे आपापल्या शक्तीप्रमाणें लिहीत असतात व प्रचारक आपलें प्रचारकार्य करीत असतात. जुनें आपल्या तेजानें व शक्तीनें स्वतःच्या पायावर उभे रहाण्यास पूर्णपणें समर्थ आहे याची जाणीव असूनहि हे लोक नव्या नव्या प्रकारांविषयीं आस्थेनें प्रचारकार्य करणें इष्ट आहे म्हणून निश्चय बाळगून, आणि त्या क्रियेंत एकदोन गोष्टी जास्त फुगवून सांगितल्या तरी त्यांत तितकासा अपराध होत नाहीं असें मानून नव्यांना

उत्तेजन देत असतात.

## मोठ्याबरोबर लहानहि पाहिजे

कोणत्याहि कालाकडे नजर फेंकल्यास असें दिसून येतें कीं, मोठ्या कवींच्या संख्येपेक्षां लहान व साधारण कवींची संख्याच किती तरी जास्त. त्या त्या लहान कवीच्या कालातहि मोठमोठे म्हणवून घेणाऱ्या टीकाकारांनीं सुद्धा त्याजविषयीं कमीपणाचे उद्गार काढले असले पाहिजेत आणि 'महाकाव्यें लोपलीं ना,' म्हणून निराशेचे सुस्कारे काढले असले पाहिजेत. तसें पाहूं गेल्यास काव्यसृष्टींत निखालस पहिल्या पंक्तींत बसणारे असे महाकवि कितीसे आढळतील? लेखकात सुद्धा उत्तम, मध्यम, अधम असा वर्णभेद नाहीं काय? साऱ्या कवींची तुलना होमर, वाल्मीकि, कालिदास, व्यास, शेक्स्पिअर याजबरोबर करणें आणि ती पुरी भरत नाही अशी टीका करणे ठीक होईल काय? मोठमोठे कवि थोडेच झाले असले तरी इतरहि कवीच नव्हत काय? प्रत्येक वर्णनाच्या काव्यरूपी कुसुमाला त्याच्या त्याच्या योग्यतेस फावेल असे स्थान आहे, गुण आहे आणि प्रयोजनहि आहे. मोठ्या काव्याचा मोठेपणा 'अन्वयव्यतिरेका'च्या तुलनेमुळें लहान काव्याच्या लहानपणावरूनच कळत नाहीं काय? कोणीहि झाला तरी सतत आकाशातच विराजमान होणें शक्य नाही; एका ना दुसऱ्या प्रसंगी तरी सर्वांना खालीं जमिनीवर उतरून यावेंच लागतें! जमिनीवर वाढलेला आहारच खावा लागतो! म्हणून सामान्य अशाच वस्तु जास्त, दिव्य वस्तु कमी! यात आश्चर्याला किंवा निराशेला जागा कोठली?

## आधुनिक काव्यांतील विशेष प्रकार

आजच्या काव्यांकडे पहाता आणखी एक विशेष प्रकार डोळ्यात भरल्यावाचून रहात नाहीं. तो हा कीं, त्यात सर्वांना रुचेल असें गांभीर्य सौंदर्य, स्वाभाविकता आणि शुचिता आहे. काव्याला आणि अंतःस्फूर्तीच्या आवेगाला कितपत साहचर्य आहे हें आजकालच्या काव्यावरून उघडपणें दिसून येईल. त्याच्या वर्णनांत जुन्या पद्धतीचा क्वचित् अश्लील भासणारा शृंगार आढळत नसला तरी आपल्या समाजात आईबहिणींच्या नित्य अनुभवास येणारे अन्याय, अश्रूंनीं डोळे भरून दाखविणारें कोमल हृदय

आहेच आहे. स्त्री-पुरुषांच्या संमिश्र समाजांत कोणासहि लाज वाटणार नाहीं अशा धर्तीच्या बायकांनीं वाचण्यास योग्य अशा शुद्ध व सात्त्विक विनोदगर्भ शृंगाराच्या काव्य-कृति आजकालहि होत आहेत. स्त्री ही केवळ पुरुषाच्या भोगासाठीं दिलेली दासी नव्हे; तिलाहि स्वतंत्र व्यक्तित्व आहे; मन, इच्छा, अंतःकरणप्रवृत्ति आहेत; इत्यादि पवित्र अंश चांगल्या रीतीनें विशद करणारे उदार धर्मगुण आजच्या काव्यांतहि आढळत असतात. ही लोकमाता पवित्र सीतादेवी, ती लोकैकवीर जे पांडव त्यांच्याकडून मान्यता पावलेली द्रौपदी देवी, अशी क्षिति तितकीशी न बाळगतां स्त्रियांच्या अंतरंगाचे वीराप्रमाणे सूक्ष्म रीतीनें वर्णन करण्याची जुनी रीत लोप पावली म्हणून चिंता करण्याचें कारण नाहीं. आजच्या वीर्याच्या वर्णनात पोकळ बडबडीपेक्षा वीर्य सळसळूं लावणारी प्रचंडता आहे.

## कवीच्या ध्येयाचें समाधान

हें सर्व इतरानीं कविवृंदाला करण्याच्या साह्याविषयी झालें. पण स्वतः कवीचें असें अवतारकार्य काय ? त्याचे जीवन व पंथ कोणते ? कवितेचें किंवा काव्याचें थोडक्यात असे वर्णन करता येईल की, ते कविहृदयांत उत्पन्न होऊन तेथून इतराच्या हृदयाला नेमके पोंचते आणि फिरून वर्तुळाकारानें एखाद्या तानेच्या प्रतिध्वनीच्या आंदोलनाप्रमाणें कवीच्या हृदयाशीं पुनः भिडून एकरूप होते, म्हणजे ते वर्तुळ पूर्ण होतें. सर्व काव्यांच्या बुडाशीं कवीचें मन व हृदय हीं असतात. तें मन जितकें उन्नत होईल जितकें विशाल व शुचि होईल, तितक्या प्रमाणात कविताहि उन्नत, विशाल व शुचि होईल. कवीच्या कवितेला बाहेरील प्रपंच आवेश व सामग्री पुरवीत असतो. ही आवेशसामग्री पुढें असतांना म्हणा, किंवा स्मृतीच्या साह्याने कवि तिचे चिंतन करून तिचा वारंवार अनुभव घेत असतांना म्हणा, काव्याच्या कथावस्तूबरोबर अनेक प्रकारचे राग व भाव संमीलित होत असतात. मनात एक प्रकारचा दाह उत्पन्न होत असतो. अशा समयीं कवीचे सारे जुने संस्कार, आत्मशक्ति, त्या काळची त्याची मनःस्थिति, त्यानें निर्माण करू घातलेल्या पद्य-कृतीला सजीवता व कळा देतात आणि वैशिष्ट्याची छाप त्याच्यावर बसवितात. लहान सहान काव्यांत

असें दिसून येतें कीं, ही आवेशसामग्री कवितेच्या आवरणाशीं जणूं अत्यंत निगडित आहे. या काव्यांचा विस्तार लहान असल्याकारणानें त्या वेळचा आवेग किंवा स्फूर्ति त्यांच्या निर्मितीला अत्यंत प्रभावी होऊं शकते यांत आश्चर्य कसलें ! महाकाव्यांत कथावस्तूला संबद्ध असणारा आवेग जास्त कालपावेतों टिकावा लागतो. प्रतिभा आकांक्षेप्रमाणें जास्ती कमी होऊन प्रमाणाला सारखी होऊन तिची योजना असावी लागते. दूर उडणाऱ्या पक्ष्याला मजबूत पंखांची जशी अपेक्षा, तसेंच महाकाव्यांत कवीच्या प्रतिभेची संचारशक्ति त्याला पुष्कळ दूर नेण्यास समर्थ असली पाहिजे. म्हणून अशीं काव्यें रचणाऱ्या कवींच्या ठायीं हा काव्यविषयक आवेग दीर्घकालपर्यंत टिकून राहिला पाहिजे. उपजत कवि झाला म्हणून काय झालें ! त्यानें सुद्धां आपला स्वभाव, कविताशक्ति, अंतःसार अभ्यासामुळें आणि निरतर प्रयोगामुळें वाढवीत त्यांचा उत्कर्ष करीत गेलें पाहिजे. तरच त्याच्या प्रतिभेचा विकास होईल. ही एक सतत करण्याची उग्र तपस्याच होय. मोठ्या कवितेंत मोठ्या हृदयाचा गुण बुद्धि व धर्म यांचा समावेश होतो. कवीच्या काव्यावरून त्याचें जीवन प्रतीत होतें. त्याच-प्रमाणें त्याचे संस्कार वाचकांवरहि होत असतात. सर्व कवींना मुख्यतः सौंदर्यविषयक सूक्ष्म दृष्टि, स्पष्ट आवेश, अंतःकरणाची शुद्धि, ती कृतींत उतरवून शाश्वत राखण्यास लागणारें बुद्धीचें चातुर्य, आपल्या अनुभवाचे सार बुद्धीला जोडून जनांना त्यापासून एक प्रकारचें नवीन स्थैर्य आणि आनंद उत्पन्न करण्यास लागणारी आत्मशक्ति अवश्य असावीं लागतात. काव्यांत प्रपंचाचा अनुभव जितका परिपूर्ण असेल तितक्या प्रमाणांत तें काव्य जिवाच्या चालनेला शक्ति व स्फूर्ति देईल. म्हणूनच कवीचें साधन व तपस्या निरंतर व उग्र असावीं लागतात. कितीहि धीरगंभीर असलें तरी कवीचें हृदय प्रसंगीं कोमल पल्लवाप्रमाणें मृदु असून जास्त जास्त फुलण्यास समर्थ असलें पाहिजे, वाऱ्याच्या लहानशा झुळुकेनेंहि तें फडफडलें पाहिजे. ज्याप्रमाणें सूर्यप्रकाश झाडें व पानें धारण करीत असतात त्याचप्रमाणें सत्य, सौजन्य व सौंदर्य यांचा विमल प्रकाश ज्या ज्या वाटेनें पडेल त्या त्या वाटेंत आपली प्रतिभा ठेवून कवि प्रीतीच्या व

सहानुभूतीच्या आनंदानें त्याची आपल्या हृदयांत योजना करतो, आपल्या मनांत त्याचें पोषण करतो आणि आपल्या काव्य-प्रपंचांत त्याचें प्रतिफल उमटेल असें करतो. आपलीं ज्ञानेंद्रियें सदा जागृत ठेवून सरस्वतीच्या दर्शनाला तो सिद्ध असतो.

## प्रतिभेच्या भावनेला विमर्शेची जोड

कवीच्या प्रतिभेच्या जोडीला विमर्शेची किंवा चिकित्सेची बुद्धीहि अवश्य असावी लागते. तीच ती कविता दरखेपेस नवीन अशी भासविण्याकरितां वस्तूंतील विविधता आणि रचनेंतील कुशल चातुर्य यांची अपेक्षा आहे. त्या त्या कथावस्तूला व भावाला जुळणारी पद्यरचनेची शक्ति असावी लागते. कितीहि खऱ्या काव्यस्फूर्तीचा कवि असेना, त्याच्यांत बहुश्रुतता आणि रचनेंतील अभ्यास व नैपुण्य नसल्यास अशा काव्याच्या श्रेष्ठतेला थोडी उणीव रहाणारच. म्हणून स्फूर्तीच्या आवेगात जसें सुचतें तसें कवीनें काव्य रचलें तरी फुरसतीच्या वेळीं त्यानें सावकाशीनें विचार करून त्याची विमर्शा करावी लागते. असें केल्यानेंच काव्याला उजळा येईल. आजच्यापेक्षां उद्या जास्त जास्त चागल्या पद्य-कृति रचीन असें साहस व महत्त्वाकांक्षा कवीनें बाळगली पाहिजे. आपण लिहिलेलें तें सर्व चागलें व निर्दोषच होय असा मोह व अविवेक त्यानें बाळगणें म्हणजे मात्र आपल्या ध्येयाच्या मोक्षापासून दूर चळणें होय. आपल्या आत्मतृप्तीकरतां कवि मुख्यतः काव्यें रचीत असला तरी त्याचा संतोष इतरांनाहि व्हावा आणि ते त्यांत सहभागी व्हावे अशी त्याची उत्कंठा असते. म्हणूनच तो काव्य प्रकट करतो. म्हणून कवीला सर्वांची प्रीति पाहिजे. कोणालाहि वगळून तितकेसें चालणार नाहीं.

## भक्ताची निःस्वार्थी भूमिका

कवि हा सरस्वतीदेवीचा निःसीम व निःस्वार्थ उपासक. इतर अर्चकाप्रमाणें तिच्या मंदिरांत त्यानें आपलाच अधिकार स्थापूं नये किंवा इतरांस येण्यास प्रतिबंध करूं नये. त्यानें दक्षिणेकरतां काव्य रचूं नये. कवीनें आपल्या ध्येयाच्या देवाला दररोज नवीन शृंगार करून चित्राच्या नादानें आणि ध्वनि व अर्थ यांच्या रसानें देवाची पूजा केली पाहिजे.

आपलें हृदय मोकळें करून, श्रम झाला असें न म्हणतां, मोठ्यानें गान केलें पाहिजे आणि दुसऱ्यांनाहि मोठ्या आनंदानें पाचारून त्यांत अंशभागी केलें पाहिजे.

## काव्याचा परिणाम—अखंड आनंद

काव्यामुळें तेवढ्या क्षणापुरता ऐकणाऱ्याना संतोष झाल्यानें कृतार्थता होत नाहीं. त्या संतोषाचे पुढें अखंड व निरंतर आनंदांत रूपांतर झालें पाहिजे. देह आणि मन याचा आत्म्याशीं संबंध आहे. आत्म्याचा आनंद प्रतीत होण्याकरिता त्यास चैतन्याची जोड दिली पाहिजे. म्हणून कवीला अन्तःस्फूर्ति व तिचा अनुभव अवश्य असावीं लागतात. सुख, शांति, करुणा, शोक, वीररस, हास्य इत्यादि रसामुळें अंतरंग स्वच्छ धुतलें जातें आणि त्यातील चैतन्यरूपी आनंद जास्त जास्त शुचि व पवित्र होतो. भावनेची उन्नति आणि सत्त्वाचा आवेश तो घडवून आणतो. साहित्य कितीहि स्वयंपूर्ण असलें तरी तें आदर्श जीवनाला एक साधन व प्रकाश, आत्मशक्तीचें पोषण करण्यास समर्थ अशी ती सत्त्वाची वस्तु. त्याचें केवळ विनोदात पर्यवसान झाल्याने तितपत कार्यभाग साधणार नाही. कालदेश-वर्तमानाला अनुसरून मृदु, शांत, भीषण किंवा प्रचंड अशी कवितेंतील कार्यशक्ति असावी लागते. आता तीत आत्म्याचें सत्त्व असल्याविना तिला जीवकळा यण कठिण. हा आत्म्याचा गुण जितक्या प्रमाणात मोठा, विशाल, उन्नत असेल तितक्या प्रमाणात त्या काव्याचा अर्थ व आकांक्षा मानववर्गाला अधिकाधिक जाणवूं लागतील.

## कवि व प्रकृति यांजमधाल अन्योन्य संबंध

प्रकृतींतील सर्व सामग्री कवीचे हृदय उचंबळून सोडीत असते. प्रकृतीच्या बाह्य रूपांतील चित्रांचें सौंदर्य, सुकुमारता, वैभव, काठिन्य, क्रूरता याजविषयीं मन गान करतें आणि बाह्य प्रपंचाची जाणीव करून देतें. परंतु ही घटना पहाणारी दृष्टि जितकी सूक्ष्मग्राही असेल तितकी तिची वस्तूच्या विकासाची क्रिया प्रभावी व निर्दोष होईल. कवीच्या व्यक्तिगुणाचा पडसाद काव्यांत उमटतोच. म्हणून, सत्यापेक्षांहि सत्य, सुंदरापेक्षांहि सुंदर असा देखावा रंगविण्याकरितां त्याची प्रतिभा धडपड करीत असते. हें सौंदर्य वाचकांपर्यंत

पोंचतें, कविहृदयाचा परिचय त्यासहि करितें आणि एकाच आनंदानें स्फूर्त होतें. कवीच्या प्रपंचाची स्वतंत्रता व निर्मळता जितकी अधिक तितक्या प्रमाणांत इतरांच्या मनात ती प्रवेश करून त्याच्या जीवनाची दिशा बदलतात, आणि त्यांच्या अंतःकरणात दडून बसलेले दर्प, नय, धैर्य, स्थैर्य इत्यादि विकारांस बाहेर आणतात. अश्रूंमुळें त्याचें काठिन्य वितळेल आणि करुणेचा भाव बाहेर पडेल असें करितात.

## कवीचे उत्तम भाव

मुख्यतः वाचकांना काव्यापासून लाभणारा म्हणजे कवीचा सहवास आणि त्याच्या आंत दडलेला जीव. कितीहि मोठा कवि असूं दे, त्याने काव्यांत उत्तम भावरसांची योग्य योजना केली पाहिजे. तसें न करता आक्रोश, नीरसता, काठिन्य यांची भरती केल्यास पाणी पिऊं आलेल्या आर्त जनांना विष देऊं केल्याचें पाप त्याच्या माथीं बसेल; आत्मद्रोह आणि साहित्यद्रोह केल्याप्रमाणें होईल.

## तामसी अन्यायांविषयीं सात्त्विक चीड

उत्तम काव्यांत कसल्याहि अप्रामाणिकतेला ठाव व वाव नाहीं. तसेंच भावनांचें दास्य, कृत्रिम सौंदर्य, फलाची आशा, धर्माचें दौर्बल्य व भीड यांनाहि स्थान नाहीं. कसलाहि संनिवेश असेना—कुकल्पना, अन्याय, विकार, असत्य, दुष्टपणा, अरसिकता, उद्धटपणा—याची आणि कवि-जीवनाची कधींहि मैत्री होणार नाहीं. त्याचा नाश करण्याकरिताच कवींचा अवतार म्हटल्यासहि चालेल. हें कार्य कवींचेंच काय, तर कलेचें, शास्त्राचें, धर्माचें, मताचें–सर्वांचेंच आहे. जोंपर्यंत हीं विषबीजें जीवनात माती कालवून संकटें वाढवीत आहेत, तोंपर्यंत कवींच्या आत्म्याना शांति नाहीं, जिव्हेला विराम नाहीं आणि त्यांची लेखणीहि संपुष्टात येत नाहीं. तरीहि कवीनें कठिणाचा प्रत्याघात कठिणानें, अन्यायाचा प्रतिकार अन्यायानें, असें करूनच आपलें काव्य रचूं नये. त्याचीं मुख्य आयुधें म्हणजे करुणा, प्रीति, सहानुभूति, सहसंवेदना, विशाल बुद्धि, क्षमा व औदार्य. यांच्या योगाने त्याने सात्त्विक वृत्ति अंगीं बाणविण्याचा प्रयत्न करून तामस-वृत्तीचें निवारण करण्यासाठीं शक्य तों चंग बांधला पाहिजे. वाईटाचें

वाईटपण, त्याचें त्यासच बोचून विचाराअंतीं असह्य होईल अशा खुबीनें घटना रचून दुर्जनांचें अंतरंग कुशल कुंचल्यानें नाजुक रीतीनें त्याने उकललें पाहिजे. आतां ज्या ठिकाणीं ही मृदुतेची मात्रा चालतच नाहीं अशा ठिकाणीं मात्र अतिशयं व्यापक झालेल्या दुष्टाव्याचा प्रतिकार करण्याकरितां म्हणून निरुपायानें कवीला तात्पुरती निष्ठुर दीक्षा घ्यावी लागते आणि तुतारीप्रमाणें तारस्वर करून अन्यायाविरुद्ध जाहीर घोषणा करावी लागते. परंतु तेथेंहि आपल्या जीवितध्येयाला काळिमा न लागेल अशा रीतीने कवीला फार खुबीनें जपावें लागतेंच. सत्य, न्याय यांनीं केलेली जनतेची निष्काम सेवा त्यांच्या मनातील किल्मिषें सर्व धुऊन काढते, त्याच्या जीवनाला एक प्रकारचें नवीन रक्त व चैतन्य देते आणि सत्य, शुचिता व सौंदर्य याविषयीं कमालीची श्रद्धा व सहानुभूति उत्पन्न करण्यास समर्थ होते. अशा पवित्र कार्यास लाभाची तादृश अपेक्षा ती काय ! त्याला प्रमाण तेंच आणि त्याच्या यशाचे माप व फलहि स्वयंसिद्धच. असलें थोर कविहृदय काव्यांत प्रकाशित झाल्यास मात्र मनुष्याचे मनुष्यत्व वाढते आणि असें काव्य मनुष्याच्या अत्यंत उदात्त कल्पनांचें माहेरघर बनते. अशा मोठ्या ध्येयाकडे ध्रुवदृष्टि ठेवून नित्यशः आक्रमण करणें प्रत्येक कवीचें कर्तव्यच होय आणि असें भव्य व उदात्त ध्येयच साहित्याच्या प्रांतात सेवा करणारांचें दैव होतें. या ध्येयाची साधना करणें म्हणजेच त्या देवीची पूजा करणें होय. आणि त्याची सेवा आणि प्रचार म्हणजेच देवाची सेवा नव्हे तर दुसरें काय ! असलें उच्च कविजीवन अंगीकारणें सर्वांच्याच भाग्याला येत नसतें; परंतु त्याचे नीट आकलन करण्याचा मनःपूर्वक प्रयत्न करून आणि आपल्या शक्तीप्रमाणे सेवा करून तें ध्येय जवळ आणण्यास निःस्वार्थी बुद्धीनें झटणें मात्र सर्वांच्या आटोक्यांतले आहे. आणि या स्तुत्य उद्यमात उत्तरोत्तर अधिक लक्ष पुरवून अशा पुण्यकार्यात आपला देह झिजविणे सर्व उगवत्या साहित्यसेवकांचें व कवींचेंहि ध्येय असलें पाहिजे हे उघड आहे.

---

# साहित्यविमर्श

## (इतर लेख)

## संस्कृति व साहित्य यांजमधील स्थित्यंतरें

### संस्कृतीची व्याख्या

जीवनातील एकंदर अनुभवांवरून जनतेच्या मनोधर्मावर जो परिणाम किंवा संस्कार होतो तीच संस्कृति. संस्कृति प्रांतभेदाने व भाषाभेदानें बदलते. उदाहरणार्थ, इटलींतील प्राचीन रोमन संस्कृति, ग्रीस देशातील ग्रीक संस्कृति, इजिप्तांतील सुमेरी संस्कृति इत्यादि अनेक संस्कृती एके काळीं राजाश्रयाच्या जोरावर वैभवाच्या कोंदणांत चमकत होत्या. परंतु त्यांचें तें उज्ज्वल तेज आज कोठें आहे ! त्या स्मृतिशेष म्हणण्यापेक्षा कीर्तिशेष झाल्या असें म्हणणें जास्त उचित होईल. या संस्कृतींत कित्येक साम्यस्थळें असतील; परंतु त्या त्या देशांतील व कालांतील लक्षणें व इतिहास याना अनुसरून त्यांत महत्त्वाचे फरक असे असणारच. त्यांतील मुख्य तत्त्व सामान्यतः एकच असलें तरी त्यांचे घटक निरनिराळे होत. बीजगणितांत जसें एखाद्या संख्येपासून निरनिराळ्या अवयवांच्या जोड्या काढतां येतात तद्वत् संस्कृतीच्या निरनिराळ्या घटकाच्या पृथक्करणाविषयीं कांहींशी कल्पना करतां येईल. महाराष्ट्रदेशातील हवापाणी, राजकीय व सामाजिक परिस्थिति, जनतेच्या अडचणी यास अनुलक्षून जो अनुरूप मतप्रसार व नीतिधर्माची शिकवण करणें तुकाराम-रामदासांसारख्या संतविभूतींना अवश्य वाटलें आणि महाराष्ट्रभाषेच्या योगानें जो उपदेश महाराष्ट्रांतील सामान्य जनसमूहाला पटला आणि ज्याचा त्यानें आपल्या आचारविचारांत आस्थेनें समावेश केला, तीच महाराष्ट्रीय संस्कृति होय असें स्थूलपणें म्हणतां

येईल. जी गोष्ट महाराष्ट्राची उदाहरणादाखल घेतली तीच स्थूल मानानें जगांतील इतर संस्कृतींना देखील तितकीच लागू आहे. संस्कृतीची लहानशी ठिणगी मतप्रसार करणाऱ्या थोर व अधिकारी आचार्यांकडून म्हणा किंवा उदार साधुसंतांकडून म्हणा चेतविण्यांत येते खरी; पण तिची वाढ व विस्तार झाल्यावांचून जनतेची सर्वांगीण प्रगति होणें कठिण. म्हणून संस्कृतीची वाढ कशी काय होते हें पहाणें उद्बोधक होईल.

## संस्कृतीची वाढ कशी होते ?

संस्कृतीची वाढ कशी होते याचें थोडक्यात उत्तर असें कीं, खेडयातील जीवनाचा ती एक आवश्यक घटक बनल्यानें. हिंदुस्थानांत तरी संस्कृतीची वाढ प्रथम ग्रामजीवनांत झाली आणि तेथून ती पुढें शहरांकडे पसरली. हिंदुस्थानात प्राचीन काळीं ज्या कित्येक संस्कृती अस्तित्वात आल्या त्या सर्व निरूपणपद्धतीनेच. आजच्याइतका सार्वत्रिक साक्षरतेवर तेव्हां भर नव्हता. मुद्रणयुगाचें सौकर्यहि तेव्हां अर्थातच नव्हतें. समाजाला साक्षरतेपासून अनेक फायदे आहेत खरे, पण निवळ साक्षरतेपेक्षांहि ज्ञानतत्त्वांसंबंधीं जिज्ञासेची अंतरींची तळमळ जर प्रथम जनतेंत उत्पन्न झालेली असेल तर तिच्या मनोधर्मांत कोणत्याहि अनुरूप संस्कृतीचें ठाणें पक्कें बसणें जास्त सुलभ आणि म्हणून तें पुढे शाश्वतहि होतें. याचें एक स्थूल कारण असें कीं, पुष्कळ व विविध विद्या शिकूनहि मानवी जीवनास आवश्यक अशीं मूलतत्त्वें सर्वांसच सुगम होतील असें म्हणतां येणार नाहीं. ग्रंथ हे 'परोक्ष गुरु' असले तरी, त्याच्या वाचनानें उपलब्ध ज्ञानांत अधिक भर पडत असली तरी, तेणेंकरून सर्व संशय फिटत नाहींत. अर्थात् तितक्या प्रमाणांत संस्कृतिप्रसाराचें कार्य लुळेंच पडतें. म्हणून जीवनविषयक व धर्मविषयक मूलतत्त्वें प्रेमानें समजावून सांगणारे गुरूच आपापल्या प्रांतापुरती किंवा टप्प्यापुरती विशिष्ट संस्कृतीची वाढ करण्यास समर्थ ठरतात. उदाहरणार्थ, शिवाजीमहाराजाच्या कालीं मुसलमानी राज्याच्या वरचष्म्यामुळें व राजकीय, सामाजिक, आर्थिक अशा सर्वांगीण दास्यामुळें महाराष्ट्रीय जनतेच्या जीवनांत एक प्रकारचे मालिन्य व औदासीन्य प्राप्त झालें होतें. त्याचें निवारण करून महाराष्ट्रीय संस्कृतीचें

दिव्य आत्मतेज दाखविण्याचें प्रचारकार्य रामदासस्वामींनीं केलें. तात्पर्य, आगीवर राख सांचावी तशी कित्येकदां जनागांच्या मनोधर्मांची स्थिति होते. स्वकीय व स्वायत्त संस्कृतीविषयीं योग्य अभिमान त्यांस नसतो असें नाहीं. परंतु अज्ञानाच्या मोहनिद्रेंतून खडबडून जागें करून त्यांच्या निजस्वरूपाची जाणीव जे महात्मे, आचार्य किंवा साधुसंत करून देतात तेच त्या त्या संस्कृतीचे पाईक ठरतात. हिंदुस्थानात शहरांपेक्षां खेडयांचीच संख्या किती तरी पटींनीं जास्त असल्यामुळें त्यातील विविध संस्कृतींची वाढ प्रथम खेडयांपाडयांतून झाली. पूर्वकाळीं खेडयांतील एखाद्या देवस्थानासारख्या सार्वजनिक ठिकाणातून संस्कृतीची वाढ होणें फार सुलभ होत असे. म्हणून पुराण, श्रवण, कीर्तन, कथानिरूपण, स्वाध्याय यांच्या योगानें खेडयातील समाजाच्या सर्व घटकात त्या त्या सस्कृतीविषयीं आपलेपणा वाढत गेला आणि उत्तरोत्तर तिला त्यांच्या आस्तिक्यबुद्धीची व श्रद्धेची जोड मिळून तिचें पाऊल प्रगतीच्या दृष्टीनें पुढें पुढें पडूं लागलें. ग्रामजीवनातील निरनिराळ्या घटकांचा एक-मेकांशीं नित्य संबंध येत असतोच. अशा वेळीं संस्कृतीचे दुवे न कळत जोडले गेले आणि कालांतरानें तिची प्रतिष्ठा स्थिर झाली. व्यव-हारांतहि असा अनुभव येतोच कीं, आपल्याशींच एखाद्या गहन तत्त्वाचें मनन करण्यापेक्षां त्याचें पंडितांकडून झालेले विशदीकरण ऐकण्यास श्रोत्यांस फार कमी श्रम पडतात आणि म्हणून मन फार प्रसन्न व ताजेंतवानें रहातें. हिंदुस्थानांत आर्य संस्कृतीचा प्रसार होतांना या निरूपणपद्धतीचा विशेष अवलंब करण्यांत आला आणि तेणेकरून ती ग्रामजीवनांतील ज्ञानप्रसाराचें एक प्रधान अंग होऊन बसली आणि अनुषंगाने जनतेची नीतिमत्ता व शील यांत जास्त जास्त विशुद्धि होत गेली.

## संस्कृति-साहित्याला राजाश्रयाची अपेक्षा

कोणत्याहि गोष्टीला राजाश्रयाची अत्यंत अपेक्षा असते. त्यामुळें तिचा उत्कर्ष सुगम, सुकर व शीघ्र होतो. हीच गोष्ट सस्कृतीच्या प्रसारासहि अर्थातच लागू पडते. हिंदुस्थानांत नांदलेल्या संस्कृतींपैकीं बौद्ध संस्कृतीचेंच उदाहरण जरी घेतलें तरी असें दिसून येतें कीं, भगवान् गौतमबुद्धानें

स्थापन केलेली ही अहिंसात्मक संस्कृति प्रतापी अशोक राजाच्या कार-कीर्दीनंतर फार काळ टिकली नाहीं! अशोक-चंद्रगुप्तांचा वैभवशाली राजाश्रय जोंपर्यंत या संस्कृतीला पोषक होता तोंकाळपावेतों तिचा प्रसार हिंदुस्थानातच काय पण चीन, जपान, जावा, सुमात्रा, कांबोदिया इत्यादि पूर्वेकडील बेटातहि जोरानें जारी झाला. परंतु दक्षिणेंत आद्य शंकराचार्यांनी बौद्ध मताचे खंडन करताच पुनः सनातन हिंदुधर्माचे वैदिक तेज तळपूं लागले आणि त्याला असलेला राजाश्रय उलट वैदिक धर्माच्या प्रसाराकरिता राबू लागला. अर्थात् बौद्ध संस्कृतीच्या वाढत्या उत्कर्षाला पायबंद बसून पुन्हा प्राचीन हिंदु संस्कृतीची प्रतिष्ठापना झाली आणि बौद्ध संस्कृतीप्रमाणेच हिंदु संस्कृतीच्या प्रसारार्थ वक्ते, कवि, नाटककार व हरिकथानिरूपक राजाश्रयाच्या पाठबळामुळें एकदम पुढे सरसावले. उदाहरणार्थ, कर्णाटकी साहित्य-संस्कृतीकडे अवलोकन केल्यासहि उचित राजाश्रयामुळे कार्याचे केवढाले डोंगर किती झपाट्याने उभारता येतात याचा पुरावा सापडतो. कर्णाटकी साहित्याच्या प्रारंभीं चांगले व व्युत्पन्न कवि जैन मताचे होते. याचे कारण त्या वेळी कर्णाटकात जैन राजांची वैभवशाली कारकीर्द गाजत होती हे होय. राज्यातील शांततेच्या काळात चांगले चांगले जैन राजे स्वतः साहित्यसेवक, तत्त्वजिज्ञासू व उत्कृष्ट कवि होण्याचा ध्यास धरीत असे आढळते. किंबहुना त्यापैकीं कित्येक उत्कृष्ट कवि म्हणून प्रसिद्ध आहेत. आता स्वतः राजा जेथें साहित्य-संस्कृतीच्या प्रसाराकरिता इतक्या आस्थेने जातीने लक्ष घालीत असे तेथे सामान्य संस्कृति-साहित्य-प्रसारकांनाहि किती व कसे सक्रिय उत्तेजन मिळत असेल आणि अशा विद्वान् व काव्यकलाकोविद राजाची मैत्री जोडून संस्कृतिप्रसाराच्या काव्यकथानिरूपणादि मार्गांनीं त्यास तोषविण्याची अशा प्रचारकात कशी चढाओढ लागून राहिलेली असेल याची आजहि थोडीशी पुसट कल्पना करता येईल. संस्कृतीच्या उगमालाच तेवढी राजाश्रयाची अपेक्षा असते असें नाहीं. सनातन धर्माचीं नीतितत्त्वें सुंदरपणे गोंवलेलीं वचनें व काव्यें एखाद्या कवीने रचलीं आणि तीं ऐकून एखाद्या विद्वान् राजानें त्याचा योग्य तो गौरव केला आणि त्यास दान दिलें

एकट्यानें संस्कृति व साहित्य यांची पुरती वाढ होत नाहीं. नीतितत्त्वें कवीला, राजाला आणि तेथून फार तर त्याच्या आस्थानातील आस्वादेच्छु ज्ञात्यांना कळलीं किंवा वळलीं म्हणून संस्कृतीच्या प्रसाराची चलती होत नाहीं. कवीपासून राजाला, राजापासून अधिकाऱ्यांना, तेथून नगरींतील व ग्रामातील साऱ्या जनागांना अशा क्रमानें संस्कृतींतील नीतितत्त्वें उत्तरोत्तर सबंध ग्रामजीवनाशीं जोपर्यंत निगडित व एकरूप होत नाहींत तोपर्यंत ती संस्कृति पसरत नाहीं आणि तिची वाढ होत नाहीं. हें अवि-रतपणें करण्याचे प्रचंड कार्य एकट्याकडून किंवा व्यक्तिगत स्वार्थत्यागानें कसें होणार ! म्हणून ग्रामजीवनातील झाडून सारे घटक म्हणजे शेतकरी, मजूर, शिंपी, लोहार इत्यादि साऱ्या कर्मकाऱ्यांच्या नित्याच्या आयुष्यक्रमांत आणि तेथून त्याच्या मनोधर्मात या संस्कृतीच्या भले-पणाचा प्रचंड जाहीर घोष एकाच वेळीं व्हावयाचा असेल तर तो राज्यागातील वरील घटकांकरवीं झाला पाहिजे हें उघड होय. अशी कल्पना करूंया कीं, शेतकऱ्यासारख्या एखाद्या अज्ञ जनास संस्कृतींतील नीतितत्त्वें हेरून तीं उकलता यावीं अशी स्थिति साधण्याची आहे; पण ती साधण्यास त्याच्या घरीं जाऊन त्याच्या फुरसतींत, त्याच्या भाषेत सोप्या पद्धतीनें उपदेश करणाऱ्या कष्टाळू प्रचारकाचें फार अगत्य आहे. अशीं हजारों खेडीं दर प्रांतांत आहेत. म्हणून खेड्यातील अज्ञ व निरक्षर लोकाची एकंदर स्थिति सुधारण्यासाठीं अशा अनेक प्रचारकाची हेतुपूर्वक योजना झाली पाहिजे हें उघड आहे. परंतु प्रत्यक्ष अनुभव असा असतो कीं असे अत्यंत स्वार्थत्यागी प्रचारक मिळणें फार कठिण ! तरीहि खेड्यांची संघटना व त्याच्या जीवनांत इष्ट ती सुधारणा करणें केव्हांहि अवश्य असल्यामुळें, असे पगारी प्रचारक नेमणें व एखादें स्वतंत्र खातें उघडून त्याच्याकरवीं त्यांच्या कामकाजावर योग्य ती देखरेख करणें अतिशय अगत्याचें असतें. आणि हें प्रचंड कार्य एकट्या व्यक्तीकडून होणें अशक्य असल्यामुळें त्याला पदोपदीं राजश्रयाचें प्रयोजन भासतें. तात्पर्य, संस्कृतीचा व तिच्या द्वारें साहित्याचा प्रसार खेडयांपाडयांतून समाजाच्या सर्व घटकांतून, सर्व थरातून, झाला पाहिजे. आणि हा प्रसार उत्कृष्ट, निर्दोष व सत्वर व्हाव-

याचा असेल तर तो फिरत्या प्रचारकांनीं "फिरत्या साहित्या"च्या म्हणजे उपदेश-निरूपणाच्या रूपांनीं निरलसपणें व स्वार्थत्यागपूर्वक केला पाहिजे. म्हणून संस्कृति, साहित्य व राजसत्तेचें पाठबळ या त्रिवेणीसंगमाची किती व कशी अपेक्षा आहे याची कांहीशी कल्पना येईल.

## संस्कृतीच्या प्रसारांत फरक

पूर्वी ग्रामजीवनाचें एक अत्यंत महत्त्वाचें उपांग म्हणून संस्कृतीचा व साहित्याचा प्रथम खेड्यांतून उगम व प्रसार होत असे. परंतु आजकाल पहावें तों मुद्रणयुगाचें सौकर्य इतकें परमावधीनें वाढलेलें दिसतें कीं, छापील वर्तमानपत्री वाङ्मयाचे अजस्र भारे, नाटकें, चित्रपट, बोलपट इत्यादि विविध साधनांच्या योगानें विदेशीय संस्कृतीचा प्रसार हिंदुस्थानात फार झपाट्यानें होत असून तिचें सरांस अंध अनुकरण जपानसारख्या पौर्वात्य देशाकडूनहि होत आहे. पूर्वी अशी स्थिति असे कीं, संस्कृतीचा उगम प्रथम खेड्यांत होई आणि तेथून राजाश्रय हुडकीत ती राजधानीकडे धांव घेत असे. आजची स्थिति उलट आहे. आज पाश्चात्य संस्कृतीचा उगम व प्रसार न्यूयॉर्क, पॅरीस, बर्लिन अशा राजधानीच्या मोठमोठ्या शहरांतून प्रथम होतो; परंतु खेड्यांतून तिचा तसाच जोमानें प्रसार व प्रचार करणाऱ्या आस्थेवाईक प्रचारकाची तेथे वाण भासूं लागली आहे. म्हणून ती शहरांतील कृत्रिम मानवी जीवनाचें एक प्रमुख अंग होऊन बसली आहे. परंतु ती समाजांतील सर्व थरांचा म्हणजे ग्रामजीवनाचा संपूर्ण ठाव घेण्यास अजून समर्थ झालेली नाहीं! म्हणून रस्किनसारख्या पाश्चात्य विचारवंतांत याविरुद्ध प्रतिक्रियेची मोठी मानसिक क्रांति झालेली आहे. "Back to nature, back to villages" (पुनः निसर्ग व खेडीं यांचा आश्रय करूं या) अशी कौंट लियो टॉलस्टॉय, कार्लाईल, इमर्सन, रस्किन, लॉंगफेलो आदि तत्त्ववेत्त्यांची प्रचंड घोषणा पाश्चात्य जनतेच्या कानांवर जोरानें आदळली असून त्यांच्या आचारविचारांत तेणेंकरून फार मोठी क्रांति झालेली आहे. आणि ग्रामजीवनांतील शुचिता, पावित्र्य, आनंद, समाधान व एकान्त यांचा पुरेपूर आस्वाद घेण्याकरितां यंत्रमय व गजबजलेल्या मोठ्या शहरांत राहून राहून कंटाळलेली तेथील जनता अत्यंत उतावीळ झालेली आहे. तेव्हां

संस्कृतीचें हें एक स्थित्यंतरच होय असें म्हणण्यास हरकत नाहीं.

## संस्कृतीचा ऱ्हास

कोणतीहि संस्कृति तिच्यांतील गुणांच्या किंवा दोषांच्या अतिरेकामुळें नाश पावते. प्राचीन ग्रीक लोक उच्च प्रतीचे कलाभ्यासी व वाचनाचे मोठे शोकीन होते. याचा परिणाम असा झाला कीं, कालांतरानें त्याच्यांतील लढाऊ गुणधर्मच कमी कमी होत जाऊन त्याची संस्कृति अस्ताला जाण्याच्या पंथाला लागली. तसेंच एके काळीं रोमन संस्कृतीहि विद्येचें, वैभवाचें व पराक्रमाचे माहेरघर होती. परंतु पुढें पुढें याचा अतिरेक होत जाऊन सुखविलास व ऐषआराम यातच मोठमोठ्या शूर रोमन सरदारांचें आयुष्य वाया जाऊं लागलें. हिंदुस्थानांतील डाक्क्याचीं उंची व अत्यंत तलम मलमलें आणि दक्षिण हिंदुस्थानांतील रत्नें व वैडूर्यें याच्याशिवाय मोठमोठ्या सरदारांच्या सभा व समारंभ अडूं लागले आणि प्लिनीसारख्या त्या वेळच्या इतिहास-काराला या 'महाग' शोकाबद्दल उघडपणें उद्वेगाचे निःश्वास सोडावे लागले! याचा पुढें असा परिणाम झाला कीं, रोमन राज्यव्यवस्थेंत बेबंद-शाही माजली आणि रानटी व क्रूर हूण लोकांच्या टोळधाडीपुढें रोमचें अत्यंत वैभवशाली साम्राज्य अस्ताला गेलें! कोणतीहि संस्कृति काय किंवा साहित्य काय, आलस्याच्या किंवा अकर्माच्या चिखलात रुतल्यास, किंवा स्थितिशील बनूं लागल्यास, त्याचा नाश लवकरच ओढवतो असा इतिहासां-तील अनुभव आहे. म्हणून संस्कृतीचा विकास व परिपोष व्हावयाचा असेल तर ती घड्याळांतील लंबकाप्रमाणें सदा गतिमान् राहून कालाच्या लाटेच्या ओघाप्रमाणें परिस्थित्यनुरूप बदलली पाहिजे. म्हणजे तिच्या मूलतत्त्वांत बदल न झाला तरी प्रतिक्रियेच्या तपशिलाप्रमाणें तिनें बदलत्या काळाच्या लाटेला योग्य वेळीं सावधपणें बगल दिली पाहिजे. तरच ती तगेल व जगेल. बौद्ध धर्मात वेळीं अवेळीं अहिंसा व सत्तेचा संन्यास यांचा पुरस्कार जेव्हां अतिरेकाला पोंचला तेव्हा त्याचा अस्त झाला. आजहि आमची हिंदु संस्कृति वैदिक धर्मातील मूळ उज्ज्वल शिकवणुकीला पारखी झालेली आहे. तिला मूळ धर्माच्या उदार तत्त्वांचा विसर पडला असून तिनें त्यांजकडे कानाडोळा केला आहे आणि केवळ रूढिगत तपशिलाच्या गतानुगतिक बंधनांनीं ती

जखडली गेल्यामुळें वरकरणीं तरी पाश्चात्य भौतिक संस्कृतीची तिजवर मात झाली असून तिची ही पकड अजूनहि सुटलेली दिसत नाहीं ! केवळ शुद्ध ज्ञानाची महती वर्णन करून सांगण्यांत आणि थोर, पराक्रमी पूर्वजांच्या निष्फळ गुणवर्णनात चालू पिढीचा काळ जाऊं लागला आणि संस्कृतीच्या प्रसाराचें प्रत्यक्ष विधायक कार्य तिच्याकडून मुळींच होईनासें झालें.

## चिकित्साबुद्धीचा उदय

युरोपखंडात ख्रिस्त शकाच्या १६ व्या शतकात चिकित्सेच्या युगाचा प्रारंभ झाला आणि तेणेकरून पाश्चात्य जनतेस श्रद्धेबरोबरच विवेकाचें व चिकित्सेचें महत्त्व पटत चालले. याचा परिणाम असा झाला कीं, त्यांना शुद्ध ज्ञानाबरोबरच विज्ञानाची म्हणजे भौतिक शास्त्राची महती व आवश्यकता पटली. त्या काळापासून त्या खंडांतील बुद्धिमान शोधक विज्ञानशास्त्रात महत्त्वाचे शोध लावूं लागले आणि मानवी जीवनांतील सौकर्यात मोठी क्रांति घडवून आणूं शकले. आत्मज्ञान मिळवून एखाद्या महात्म्याकडून वैयक्तिक किंवा फार तर कांही थोड्या शिष्यांची मुक्ति साधतां येईल; परंतु पाश्चात्य संस्कृतींत चिकित्सायुगाच्या उदयामुळें जी प्रचंड नवीन स्फूर्ति उत्पन्न झाली तेणेंकरून त्याचे लक्ष्य व्यक्तीच्या उद्धारापेक्षा उत्तरोत्तर सबंध समाजाच्या उद्धाराकडे अधिक वेधूं लागलें आणि सूक्ष्म विचारांतीं असें खास म्हणता येईल कीं, शुद्ध ज्ञान्याची बुद्धि जितकी कुशाग्र व निःस्वार्थी तितकीच पाश्चात्यांचीहि समाजसेवेची तळमळ अलौकिकच ! तात्पर्य, आधिभौतिक ज्ञानाच्या किंवा विज्ञानाच्या बळावर पाश्चात्य संस्कृतीनें वैदिक संस्कृतीचा आत्मा जिंकला नसला तरी तिचा देह जो हिंदुस्थान तो जिंकला हें निर्विवाद होय ! मग पाश्चात्य संस्कृति आसुरी म्हणा किंवा सैतानी म्हणा, तिची पकड आम्हाला अजूनहि पूर्णपणें सोडविता आलेली नाहीं हें प्रांजलपणें सागण्यास हरकत कोणती ?

## दोन आत्यंतिक टोकें सारखींच त्याज्य

मूळ वैदिक धर्मांत न कल्पिलेले अनेक पंथ, भेद व रूढी स्मृतींच्या व पुराणांच्या काळांत उदयास आल्या आणि याचा परिणाम असा झाला कीं, त्यांची भीषण प्रतिक्रिया हिंदु संस्कृतीस आणि तिच्या

पोकळ अभिमान बाळगणाऱ्या हतबल हिंदु समाजास आज सर्वत्र भोसावा लागत आहे. अतिशय वाईटपणा जसा, तसाच अतिशय चांगूलपणा व सोशिकपणाहि तितकाच वाईट व त्याज्य होय. म्हणून हीं दोन विरुद्ध टोकें वगळून जर संस्कृति मध्यमार्गी राहील तर तिचें संवर्धन व पोषण सुलभ व प्रभावी होईल. वाटल्यास संस्कृतीच्या व साहित्याच्या प्रचारकांनीं घड्याळाच्या लंबकाप्रमाणे दोनहि बाजूंकडे आंदोलनें घेऊन सभोंवारच्या परिस्थितीचा कानोसा अवश्य घ्यावा. पण स्वतः आपण स्थिर रहावयाचें असल्यास परिस्थितींतील सुवर्णमध्य गाठून तेथें दृढ आसन मांडल्यावांचून त्यांना गत्यंतर नाहीं. केवळ ज्ञानावरच सारी भिस्त ठेवून विज्ञानशाखेची आम्हीं मनस्वी हयगय केली म्हणून आमच्या संस्कृतीच्या तेजावर मालिन्याचें धुकें घनदाट पसरलेलें आहे.

## प्रवृत्ति व निवृत्ति

महाराष्ट्र-साहित्यांतील स्थित्यंतराकडे स्थूल मानानें दृष्टि दिल्यास असें दिसून येतें कीं, प्रत्यक्ष प्रवृत्तीचा जळजळीत उपदेश करीत आलेल्या संतांत रामदासस्वामी अग्रगण्य होत. त्यांनीं शिवाजीमहाराजांस अत्यंत उज्ज्वल उपदेश केला आणि त्याच्याकरवीं विशेषतः महाराष्ट्र-धर्माची तेजस्वी परंपरा त्यांनी राखली व टिकविली. पुढे या तत्त्वाचा लोप होत गेल्यामुळें ही संस्कृति क्षीण व निस्तेज होत गेली आणि अखेर पेशवाईच्या काळात पाश्चात्य संस्कृतीने तिचा पुरा पराजय केला. कर्मयोग व कर्मसंन्यास अथवा प्रवृत्ति व निवृत्ति या दोन मार्गांपैकीं प्रवृत्तिमार्गच संस्कृतीच्या वाढीला तरी पोषक होतो. प्रवृत्ति व निवृत्ति किंवा चैतन्य व संन्यास हीं दोन विरुद्ध टोकें होत. निवृत्ति क्वचित् व्यक्तिमात्राला कल्याणकारी असली तरी बहुजनसमाजांत संस्कृतीचा व साहित्याचा जोराचा प्रसार व्हावयाचा असेल तर प्रवृत्तीचा म्हणजे चेतनेचा मार्गच उपयोगी पडेल. कारण गति असल्याविना संस्कृतीचें चाक चालणार कसें आणि तिचा प्रसार होणार कसा ? या प्रवृत्तीला श्रद्धेची अपेक्षा असली तरी ती अंधश्रद्धा नसावी. अशा अंधश्रद्धेच्या आहारीं गेल्यामुळेंच हिंदु संस्कृतीला प्रथम मुसलमानी व नंतर पाश्चात्य संस्कृतींचे आघातांवर आघात बसले

असून तेणेंकरून ती अत्यंत दुबळी झालेली दिसत आहे. म्हणून या युगांत कोणत्याहि संस्कृतीला अभिमानानें जगावयाचें असेल, तर तिनें सदा जागरूक राहून आततायी जनांचा प्रतिकार करण्याकरितां दंडनीतीचा अवश्य आश्रय केला पाहिजे हें उघड आहे.

## संस्कृतींत इतर मतांचा समावेश

मूळ वैदिक संस्कृति एखाद्या विशाल वटवृक्षाचा मधला बुधा असें कल्पिल्यास, वेळोवेळीं इतर मतप्रवाहाच्या शाखा त्याजपासून फुटून ज्या उपसंस्कृति हिंदुस्थानात उदयास आल्या त्या मूळ बुंध्याच्या जीवनरसाला पूरकच होत गेल्या. वास्तविक सनातन वैदिक धर्म जातिनिरपेक्ष आहे. त्यांतील नीतितत्त्वें शाश्वत म्हणजे सर्व देशाना सर्व कालीं उपयोगी पडण्यासारखीं आहेत. बौद्ध, जैन, स्मार्त, वैष्णव, द्वैत, अद्वैत इत्यादि विविध मतें तत्त्वाच्या बाबतींत नसली तरी तपशिलाच्या बाबतींत वेगळीं होत. परंतु मूळ वैदिक संस्कृतींतील आद्य गुण जो दुसऱ्यांच्या विचारस्वातंत्र्याविषयीं सोशिकपणा, तोच या विविध मतांचे अनुयायी उत्तरोत्तर विसरूं लागले आणि पंथ व उपपंथ निर्माण करून व तत्त्वाची कांस सोडून केवळ तपशिलाकरितां क्षुद्र बुद्धीनें जोरानें भांडूं लागले. तेव्हां वैदिक संस्कृतीच्या प्रसारास आळा बसला. बंगाल्यांत केशवचंद्र सेनांचा ब्राह्मोसमाज, रामकृष्ण-विवेकानंदाचे फिरत्या प्रचारकांचे पंथ, पंजाबांतील आर्यसमाज असे विविध पंथ या शोचनीय परिस्थितीस तोंड देण्याकरितां उदयास आले. त्यांस पुष्कळ बंडखोर पण बुद्धिमान, कर्तबगार व प्रामाणिक अनुयायी मिळून त्यानीं आपआपल्या पंथांचा जोरानें प्रसार करून जनतेच्या विचारात व आचारात मोठीच क्राति घडवून आणली. कालातरानें सनातन हिंदु धर्माची व्याप्ति पंथनिष्ठ व संकुचित मनोवृत्तीच्या जनाकडून आवळून काढण्यात आली होती ती या नवमतांच्या अनुयायांनीं पुनः विस्तृत केली. आणि याचा परिणाम असा झाला कीं, परागतीपासून संस्कृतीचें व साहित्याचें पाऊल प्रवृत्तीच्या व प्रगतीच्या मार्गांनीं पुढें पडूं लागलें आणि येथीलच काय पण इतर देशांतीलहि विचारवंत नेत्यांची मनें आकर्षू शकलें.

## प्रवृत्तिमार्ग व भक्तिमार्ग

जगांत ईश्वर किंवा त्याचा अंश आहे किंवा नाहीं, त्याचें स्वरूप व इहलोकांतील संबंध याचा उलगडा कोणाला कसा व्हावयाचा हें कळणें अर्थातच सर्वांना साध्य नाहीं. परंतु ईश्वर केव्हांहि एकच. तो जसा सर्वांना समान तसेंच त्यालाहि सर्व समान ही दृढ श्रद्धा मनांत बाळगून त्याप्रमाणें त्याला किंवा त्याच्या स्वरूपाला व शक्तीला परम भक्तीनें आळविणें हाच भक्तिमार्ग होय. हाच मार्ग तुकाराम-कबीरादिकांनीं चोखाळला. कर्णाटकांत रामानुजाचार्योंनीं याच पंथाचा सक्रिय पुरस्कार करून तो प्रथम तामीळ देशांत पसरविला. सर्वांनीं मुक्त होऊन श्रद्धायुक्त अंतःकरणानें ईश्वरास शरण जाणें हाच या मार्गाचा मूलमंत्र होय. आणि याचा चोहींकडे प्रसार करण्याचें पवित्र कार्य हरिदास व कथेकरी यांनीं आस्थेनें केलें. परंतु हा प्रश्न शिल्लक रहातोच कीं, केवळ 'अव्यभिचारिणी' भक्ति बरी कीं तर्कावर आधारलेली चिकित्साबुद्धि बरी ! चिकित्सासंपन्न नसलेल्या भाविक जनांकरितां हा भक्तिमार्ग सांगितलेला आहे खरा. परंतु अंध भक्तिमार्गानें समाजाच्या थरात ईश्वरविषयक श्रद्धा जितक्या त्वरेनें उदित होते तितक्याच त्वरेनें ती ओसरूं लागते असा इतिहासात अनुभव आढळतो. ढोंगी व मायावी "साधुसंतां"कडून अशा भाविक भक्तिमार्गाचा कसा व किती दुरुपयोग केला जातो व किती बाया व प्रसंगीं सुशिक्षित पुरुषसुद्धां या अंधश्रद्धेच्या मोहामुळें कसे चकतात व फसतात हें व्यवहारांत पदोपदीं आढळतें ! म्हणून हा मार्ग सर्वांसच उपयोगी पडेल असें म्हणतां येणार नाहीं ! मात्र मोक्षास जाऊं इच्छिणाऱ्या एखाद्या अपवादभूत व्यक्तीपुरता तो लागू पडेल. म्हणून तो फार काळपावेतों प्रभावी होऊं शकत नाहीं. आजच्या कमालीच्या धकाधकीच्या परिस्थितींत चिकित्सक व प्रतिक्रियेच्या प्रवृत्तिमार्गाची अत्यंत अपेक्षा आहे. म्हणून आमच्या संस्कृतींत व साहित्यांत आवश्यक तीं स्थित्यंतरें व्हावयाचीं असतील तर आम्ही चिकित्सायुक्त प्रवृत्तीकडे उत्तरोत्तर अधिक लक्ष्य पुरविलें पाहिजे. अहिंसेचा किंवा कोणत्याहि तत्त्वाचा अतिरेक सर्वस्वीं त्याज्य मानला पाहिजे. सनातन वैदिक धर्माचीं मूलतत्त्वें बदलत नाहींत; परंतु त्यांतील रूढी व आचारविचार मूलतत्त्वांच्या कलानें

परिस्थितीप्रमाणें बदल पावूं शकतात. हें तत्त्व निर्विकार मनानें वेळींच ओळखून प्राप्त काळास धैर्यानें तोंड दिलें पाहिजे. जर तसें करण्यास आम्ही वेळींच चुकूं तर इतर जगप्रसिद्ध संस्कृतींप्रमाणेंच आमची संस्कृति कालांतरानें अस्त पावणार नाहीं अशी कशी ग्वाही देता येईल ?

# टागोरांचें ओजस्वी तत्त्वज्ञान

कविवर्य महर्षि रवींद्रनाथ टागोर याच्या वाङ्मयात सूत्ररूपानें आढळ-णारें ओजस्वी तत्त्वज्ञान त्रोटकपणें सांगण्याचें या लेखात योजिलें आहे.

रवींद्रबाबूंचें तत्त्वज्ञान मानवी जीवनातील सत्य, सौंदर्य व प्रगति-प्रियता यांच्यावर मुख्यतः अवलंबून आहे. केवळ भौतिक सुधारणांची व मानवी गरजांची चक्रवाढीनें वाढ करीत राहिल्यानें खरी मानसिक, नैतिक व आत्मिक शक्ति लाभत नाहीं! तर "हविपा कृष्णवर्त्मेव भूय एवाभि-वर्धते" या श्लोकार्धात म्हटल्याप्रमाणें अशा आधिभौतिक सुधारणांच्या एकांगीपणामुळें जगात जिकडे तिकडे अशातता, निराशा व दुःख याचीच चलती झाली आहे असें त्याचें मत आहे. खरी सास्कृतिक सुधारणा व्हाव-याची असेल तर ती सत्य, विश्वबंधुत्व व विश्वप्रेम या त्रयीमुळेंच होईल. नुसतें जड शरीर किंवा चंचल मन म्हणजेच कांही मानवांची निजस्वरूपें नव्हत कीं, ज्यांच्या लालनपोषणापासून त्यास अखंड समाधान व शांति लाभतील !

भौतिक सुखांच्या मागें लागलेल्या जनाना केवळ वैषयिक सुखोप-भोगापासून एक प्रकारचा वीट येत असतो. मृगजलामागें लागल्यानें जशी तहान भागत नाहीं तशी त्यांची स्थिति असते. आत्मिक शाश्वत शांति उत्पन्न करण्यास समर्थ असें तत्त्वज्ञान ऐकण्यास व आचरण्यास ते अति-शय भुकेलेले असतात. आणि ती मिळेपर्यंत त्यांचें जीवन आलस्य, निराशा, अशांतता व दुःख यांनीं होरपळून निघत असतें. अशा वेळीं

त्यांच्या आत्म्यांत सुप्त स्थितींत असलेलीं सत्य, सौंदर्य व विश्वबंधुत्वाची निःस्वार्थी भावना यांची यथार्थ जाणीव करून देणाऱ्या ओजस्वी व जीवनदायक तत्त्वज्ञानाची त्यांना तीव्र अपेक्षा भासते. आत्म्याची प्रचंड अशी शक्ति एकदां ओळखली म्हणजे मग माणूस आपला आपणच उत्कर्ष साधण्यास कसा समर्थ होतो याची शिकवणूक रवींद्रबाबूंनीं आपल्या अनेक ग्रंथांतून दिलेली आहे. प्रत्येकास त्याचा आत्मा व त्याची आध्यात्मिक शक्ति यांची पुरेपूर जाणीव व्हावी आणि ती तशी होतांच त्यानें लगेंच आळस सोडून व अज्ञान झाडून आपल्या समाजाच्या, आपल्या देशाच्या आणि अखिल मानवजातीच्या सर्वांगीण उन्नतीसाठीं अहर्निश झटावें अशी त्याची उद्बोधक शिकवणूक आहे आणि ती आर्यांच्या प्राचीन उपनिषदातील उच्च तत्त्वज्ञानाला साजेशीच आहे.

कवींद्र रवींद्रबाबूंच्या मतें पाश्चात्य तत्त्वज्ञान प्राधान्येंकरून बुद्धि, तर्क आणि अधिकात अधिक लोकांचें हित याच्यावर उभारलेलें आहे; तर पौर्वात्य तत्त्वज्ञानाची भूमिका केवळ आध्यात्मिक शांति व ऐक्य यांच्या पायावर आधारलेली आहे. जगात आधिभौतिक सुधारणाचा अतिरेक होऊन सुखविलासाचीं यांत्रिक साधनें मुबलक मिळालीं तरी तीं उपभोगणारांच्या हृदयाचें मुळींच समाधान होत नाहीं हें दृश्य जिकडे तिकडे पहाण्यास सांपडतें. रवींद्राच्या अनेक लघुकथा, कादंबऱ्या, नाटकें, काव्यें, टीकालेख, संदेश इत्यादि या आध्यात्मिक शांतितृप्तीच्या तत्त्वज्ञानाने पानोपानीं भरलेलीं आहेत. त्यात श्रीमद्भगवद्गीतेंतील यज्ञ, दान, तप, भक्ति, कर्म, योग, ज्ञान यांचें महत्त्व अनुषंगानें पण अत्यंत कुशलतेनें रेखाटलेलें आहे. किंबहुना हें तत्त्वज्ञान रूक्ष किंवा कठीण होऊं नये म्हणून, त्यांतील 'ब्रह्मराक्षस'गिरीस आळा बसावा म्हणून, कादंबरीच्या कुशल पण नाजूक कुंचल्यानें, स्वभावचित्रणाच्या व स्थलदर्शनाच्या मिषानें, गद्यकाव्याच्या स्वातंत्र्यगर्भ लकेरींनीं, त्यांनीं तें अत्यंत हृदयंगम रीतीनें वाचकांच्या गळीं उतरविलें आहे. आणि म्हणूनच त्याच्या या समन्वयबुद्धीचें जितकें कौतुक करावें तितके थोडेंच होणार आहे.

कोणतेंहि वाङ्मय केवळ एकांगी बुद्धिनिष्ठ असल्यामुळें तें जनजीवनाला

तितपत पोषक किंवा अचूक मार्गदर्शक होत नाहीं. उदा० गणित किंवा भूमिति यांसारख्या विषयांपासून होणारें मनाचें समाधान व एक प्रकारचा अननुभूत आनंद बुद्धिप्रधान म्हणता येईल. कारण एखादें गणिताचें कठिण कोडें सोडविल्यानें होणारा आनंद बुद्धीला भिडत असल्यामुळें तो तितपत चिरपरिणामी म्हणता येणार नाहीं! रवींद्रबाबूंचें म्हणणें असें आहे कीं, जो विषय बुद्धीबरोबरच हृदयस्थ आत्म्याला भिडून जातो (That which touches both the head and soul of man) तोच खरा मार्गदर्शक होय! भगवद्गीतेंतील उच्च तत्त्वज्ञानाचा विषय या दुसऱ्या कोटींतील आहे. स्वतःच्या आत्म्याचा थांग लावून घेतल्यानंतरच त्याची खोली, त्याचें गांभीर्य व तपःसामर्थ्य अजमावल्यानंतरच, इतरांच्या आत्म्यांशीं विचारविनिमय करणें सुकर होत असतें. नाहीं तर आपले वरवरचे क्षीण विचार इतरांना जाऊन भिडणार कसे! आणि त्यांची सर्वांगीण सुधारणा होणार कशी! विहिरींतच नाहीं तर पोहऱ्यांत कोठून येणार! या न्यायाने रवींद्रबाबूंचें ओजस्वी तत्त्वज्ञान कंठरवानें सांगत आहे कीं, लेखकांनो, विचारवंतांनो, समाजसुधारकांनो व व्याख्यात्यांनो, आधीं आपआपलें आत्मिक व नैष्ठिक सौंदर्य शोधून हस्तगत करा आणि नंतरच दुसऱ्यांस उपदेश करून त्यांची सुधारणा करण्याचें कंकण हातीं बांधा!

या बाबतींत टागोरांचीं मतें कर्मसंन्यासापेक्षां कर्मयोगाकडेच अधिक झुकतीं आहेत व तीं ब्र. स्वामी रामतीर्थ, ब्र. रामकृष्ण परमहंस, ब्र. विवेकानंद व कै. लो. टिळक याच्या उज्ज्वल शिकवणुकीशीं जुळतीं आहेत. कर्मसंन्यासाच्या नावाखालीं आळसात वेळ घालवूं नका; जगाचा अकारण त्याग करूं नका; उलटपक्षीं त्यांतील सत्य, सौंदर्य व सौजन्य आत्मसात् करण्याचा प्रयत्न करून स्वतःची उन्नति व उत्कर्ष साधून घ्या आणि जगांतील वस्तुजाताचा उपयोग आपल्या तसेच अखिल जीवसृष्टीच्या अभ्युन्नतीकरितां निःस्वार्थबुद्धीनें अविरतपणें करा असा उपदेश रवींद्रबाबू आपल्या प्रत्येक संदेशांत करीत आले आहेत. या दृष्टीनें विचार केल्यास कर्मसंन्यासाच्या मोठ्या नांवाखालीं वृत्तित्याग करून

दुबळ्या नैष्कर्म्यवादाकडे किंवा वंचित दैववादाकडे झुकणाऱ्या परंपराप्रिय हिंदु समाजास प्रत्यक्ष तत्त्वज्ञानात्मक ग्रंथामुळें नसलें तरी, कादंबरी, काव्य, निबंध इत्यादि विविध वाङ्मयप्रकारांच्या द्वारें त्यांनीं उज्ज्वल कर्ममार्गाकडे वळवून त्याच्यात न कळत मोठीच विचारक्रांति व आचारक्रांति केली आहे यात शंका नाहीं. म्हणूनच त्यास भारताचे किंबहुना आशिया खंडाचे थोर कवि व मंत्रद्रष्टे ऋषि असें यथार्थतेनें संबोधण्यांत येतें.

त्याचा दुसरा सिद्धांत हा कीं, कोणतीहि अज्ञेय वस्तु ज्ञेयांतूनच उत्तरोत्तर साध्य होत असते. ईश्वराशीं तादात्म्य पावण्यासाठीं अविरत ज्ञाननिष्ठापूर्वक प्रयत्न केल्यामुळें या ज्ञात स्थितींतून आता अज्ञात आणि म्हणूनच प्रथमदर्शनीं दुर्गम भासणारी आत्म्याची आध्यात्मिक शांति पुढें पुढें क्रमानें ज्ञात होऊं लागते, ज्ञानाचा उज्ज्वल प्रकाश सावकाशीनें पण निश्चित पडूं लागतो आणि तेणेंकरून अज्ञानतिमिराचा संपूर्ण नाश होत जातो असें त्याचें म्हणणें आहे. आणि म्हणूनच "अज्ञात" धर्माच्या गूढ नांवाखालीं राजरोसपणें होणाऱ्या अज्ञानजन्य सामाजिक "ज्ञात" अन्यायांविरुद्ध त्यांची लेखणी व जिह्वा सात्त्विक संतापानें जेवढीं उठलीं आहेत आणि त्यांनीं जितकीं टीकेचीं अंजनें चुकणाऱ्या समाजाच्या डोळ्यांत घातलीं आहेत, तितकीं इतर लेखकांनीं क्वचित्च घातलेलीं असतील !

मानवी जीवन धार्मिक निर्बंधांपेक्षां केव्हाहि उच्चतर होय हा त्यांचा आणखी एक ठाम सिद्धांत आहे ! प्रमाणबद्धतेपेक्षां सौंदर्याचें महत्त्व अधिक आहे तसेंच रुचिप्रिय वास्तववादापेक्षां निर्भेळ सत्य सदैव श्रेष्ठतर आहे असें ते प्रतिपादतात. अशा शाश्वत जीवनतत्त्वांचा योग्य तो परिपोष व विकास करून आपल्या वाङ्मयात त्याची जोड ते अशा उत्कृष्टपणानें करतात कीं, त्यांत विचारांच्या व्यक्तीकरणापेक्षां तत्त्वगर्भ पण अव्यक्त विचारांना आणि स्थायीभावापेक्षां अज्ञेय व मनोविकासदर्शक भावांना जें महत्त्व देण्यांत येतें, त्याचें प्रत्यंतर ते तंतोतंत पटवितात. त्यांचें तत्त्वज्ञान उच्च स्वरानें व धीरगंभीर भावानें सांगतें कीं, आपल्या रोमरोमांत असे मोठे विचार सतत भिनूं द्या कीं, जग हें मोठें खरें, पण त्याचें आकलन

करणारा कूटस्थ चिमुकला आत्मा आध्यात्मिक दृष्टया त्याहून किती तरी मोठा आहे ! !

त्याच्या मतें धार्मिक नियम व रीतिरिवाज मानवी जीवन सह्य व सुयंत्रित होण्याकरिता रचण्यात आले आहेत. अर्थात् ते शाश्वत नव्हेत. आणि त्याच्याप्रमाणें मानवी जीवनाची दिशा बदलणें किंवा त्याच्या शांतींत व्यत्यय आणणें असा त्या नियमाचा उद्देश व प्रसार नसावा. तर जीवनांतील आत्मिक शांतीला, सत्यदर्शनाला, सौंदर्यदृष्टीला, नीतिमत्तेला, परहिततत्परतेला आणि निःस्वार्थ लोक-संग्रहाला ते पोषक असावेत. या गोष्टी तशा नसल्यास त्या झुगारून देणे व परिस्थित्यनुरूप आपल्या सदसद्विवेकबुद्धीस पटेल त्याप्रमाणे त्यात इष्ट ते फेरफार करणें आपले आद्य कर्तव्य होय. तसेंच अन्याय्य धार्मिक रूढींखालीं मुकाट्यानें भरडून निघणाऱ्या समाजाना तारणें व त्यांची सामाजिक, नैतिक, सांस्कृतिक व बौद्धिक स्थिति सुधारण्याकरिता निष्ठा-पूर्वक झटणें हेंहि ज्ञानी जनाचें कर्तव्यच आहे.

एखादें फूल एरवीं प्रमाणबद्ध असूनहि जर त्यात सौंदर्य नसेल तर तें जसें प्रतीस पात्र होत नाहीं, तशी रवींद्रबाबूंच्या मतें जनजीवनाची गोष्ट आहे. एखादा न्यायनिष्ठुर किंवा काटेकोर इसम आपलें नेमलेलें काम अत्यंत काटकसरीनें वेळच्या वेळीं करतो. तो मिताहारी आणि मित-वचनी आहे अशीहि आपण कल्पना करूं. पण जर त्याच्या अंतःकरणांत सहनशीलता, मार्दव, आत्म्याची नैतिक सौंदर्यदृष्टि, सहानुभूति, प्रेम व वात्सल्य याचा ओलावा नसेल तर त्याचें जिवन रूक्ष होईल आणि त्याला व त्याच्या कुटुंबांतील माणसांना मानसिक व आत्मिक शांति लाभ-णार नाहीं ! म्हणून रवींद्रबाबूंचा संदेश असा आहे कीं, कांटेकोर टापटीप व कठोर न्यायनिष्ठुरता यांच्या जोडीला, किंबहुना त्यांच्यापेक्षां कांकण-भर ज्यास्तच आत्मिक सौंदर्याला व भावनेंतील वात्सल्याला महत्त्व द्या आणि त्यांची अवीट गोडी प्रत्यक्ष चाखण्यास शिका !

रवींद्रनाथाचें वाङ्मय व त्यांचा जीवनसंदेश हीं विश्वबंधुत्व व विश्वप्रेम यांनीं ओतप्रोत भरलेलीं आहेत. त्यांत (१) आध्यात्मिक जीवनांतील

सत्य, सौंदर्य, सौजन्य व अन्तर्मुखता; (२) निष्क्रिय संन्यासवादाचा समाजघातकी फोलपणा; आणि (३) प्रेम, सहानुभूति व वात्सल्य यांचा यथाक्रम मिलाफ किंबहुना मधुर मीलन झालेलें असल्यामुळें त्यांचे विचार बंगाल्यांतीलच काय, पण अखिल जगांतील लोकांनाहि मार्गदर्शक व शांतिदायक झालेले आहेत यांत नवल तें काय !

कित्येक जित लोक जयिष्णु किंवा जेत्या परक्या संस्कृतीच्या मोहानें भांबावून जाऊन आपलें जीवितकार्य, व्यक्तित्व, बुद्धि व आत्मा यांस विसरतात आणि आपलें सांस्कृतिक वैशिष्ट्य न कळत गमावून परकीयांच्या आहारीं जात असलेले दृष्टीस पडतात ! रवींद्रनाथांचें तत्त्वज्ञान असलें क्षीणबल नाहीं ! त्यांचा सिद्धांत असा आहे कीं, प्रत्येक राष्ट्रानें आपली विशिष्ट संस्कृति व व्यक्तित्व पूर्णपणें राखून व त्यांच्या पायावर उभें राहून नंतरच इतर जागतिक भिन्न संस्कृतींचें चांगलें असेल तें अवश्य घ्यावें ! कारण तसें केल्यानें विश्वबंधुत्वाच्या त्यांच्या व्याख्येला बाध येत नाहीं किंवा कनिष्ठपणाची भावनाहि (Inferiority complex) जाणवत नाहीं ! म्हणूनच त्यांच्या प्रत्येक लेखांतून, संदेशांतून व भाषणांतून आर्त मानवांना दुःखांतून दिव्य आत्मसुखाकडे आणि तेथून पायरीपायरीनें ईश्वरतत्त्वाकडे आकर्षिण्यास समर्थ अशी विद्युत्स्फुलिंगांप्रमाणें तेजस्वी विचारांची मालिकाच लागलेली असते ! आणि ती तारकापुंजांच्या तेजोवलयाप्रमाणें सर्वांचें लक्ष एकदम वेधून घेतल्याविना रहात नाहीं ! जागतिक ऐक्याचा व विश्वप्रेमाचा संदेश मुक्तकंठानें सांगणारे रवींद्रनाथांसारखे तत्त्वज्ञ, जातिनिष्ठ, पंथनिष्ठ, प्रांतनिष्ठ किंवा देशनिष्ठ न रहातां ते सबंध जगाचाच ठेवा होतात तें यामुळेंच !

कित्येकांच्या मतें टागोर आजकाल राष्ट्रीयत्वापेक्षां आंतरराष्ट्रीयत्वाकडे अधिक झुकत आहेत. म्हणून त्यांचा भारतास पाहिजे तेवढा फायदा मिळत नाहीं ! यास त्याच्या शिष्यांचें उत्तर असें कीं रवींद्रबाबू पूर्णपणें राष्ट्रीयहि आहेत व आतरराष्ट्रीयहि आहेत ! म्हणजे ते जसे व्यक्तित्व व संस्कृति राखून भारताची चिंता वहाणारे आहेत, तसेच ते भारतासहित सबंध जगाच्या कल्याणार्थ थोर बुद्धीनें झटणारे असे तत्त्वज्ञानी पुरुषहि

आहेत. परकीय राष्ट्रांशीं रवींद्रबाबूंचें संघटन पुष्कळ वाढलें म्हणून ते स्वकीय संस्कृतीशीं पारखे होतात हा या आक्षेपकांचा समज चुकीचा आहे. वस्तुतः टागोरांचें तत्त्वज्ञान असें आहे कीं, आज जगांतील प्रत्येक व्यक्तीचा आपापल्या देशाखेरीज निरनिराळ्या आंतरराष्ट्रीय व्यक्तींशीं त्यांच्या संस्कृतींशीं व त्यांच्या शोधांशीं नको नको म्हटलें तरी हरघडी संबंध येतोच येतो ! येथें केवळ अनधिकारी संन्यासाची भूमिका पत्करून साधत नाहीं. तसें केल्यास कार्यनाश होतो. आपली सनातन आर्य संस्कृति विसरूं नये हें यथार्थ असलें तरी परकीय संस्कृति केवळ तुच्छ मानून अज्ञानी व पक्षनिष्ठ कूपमंडूकवृत्तींतच सारी इतिकर्तव्यता मानणाऱ्या अदूरदर्शी आत्मवंचित शिष्टांच्या विचारसरणीविरुद्ध मात्र ते सर्वस्वीं आहेत. त्याचें यासंबंधीं म्हणणें असें आहे कीं, संपूर्ण समानत्वाच्या भावनेनें आपली बाजू कमी आहे असें उगाच न लेखतां व आपली संस्कृतीहि न विसरतां जगातील कोणत्याहि इतर संस्कृतीमधील आपणास इष्ट व अनुकूल असे गुणविशेष आपण का घेऊं नयेत ?

त्याच्या अभिजात राष्ट्रीयत्वाविषयीं शंका घेणारानीं त्यांनी पचवीस वर्षांमागें बंगालच्या फाळणीविरुद्ध लेखनव्याख्यानद्वारा सर्वत्र केलेल्या जळजळीत जागृतीकडे किंचित् लक्ष द्यावें. आणि हल्लींसुद्धा वार्धक्या-मुळें (कारण त्यांस सत्तर वर्षें झाल्याबद्दलचा गौरव नुकताच झाला आहे) ते प्रत्यक्ष धकाधकीच्या राजकारणात भाग घेत नसले तरी बंगाल्यां-तील हिजली व चितागांग येथील राजबंद्यावर सरकारकडून झालेल्या अन्यायानें चिडून सात्त्विक संतापानें त्यांनीं केलेल्या खरमरीत टीकेकडे लक्ष द्यावें म्हणजे आंतरराष्ट्रीयत्वाच्या काचेमधून धगधगीतपणें प्रकाशणारा त्यांचा उज्ज्वल राष्ट्रीयत्वाचा प्रखर दीप दिसल्यावाचून रहाणार नाहीं !

तात्पर्य, रवींद्रबाबूंनीं भारतीय आध्यात्मिक संस्कृतीचें उच्चत्व प्रवास-व्याख्यानलेखनद्वारा सर्व जगभर प्रसृत केलें आहे. त्याची ही विश्वबंधु-त्वाची, आध्यात्मिक शांततेची व भारतीय संस्कृतिसंवर्धनाची तेजस्वी व ज्ञानपोषक शिकवणूक आणि बौद्धिक, शैक्षणिक, कलोपासक व निरनिराळ्या भिन्न संस्कृतींत ऐक्य घडवून आणून 'विविधत्वात एकत्व' आणूं पहाणारे त्यांचें प्रचंड प्रचारकार्य खरोखर अपूर्व होत यांत शंका नाहीं !

# वेदकालीन स्त्रियांची सामाजिक स्थिति

## आर्य धर्माचा जुनाट वृक्ष

आज आमच्या हिंदु धर्माची स्थिति शेंकडों वर्षे वाढलेल्या एखाद्या जुन्या वडाच्या झाडासारखी झाली आहे ! त्यातील मूल जिवंतपणाचें वैदिक धर्मरूपी नवचैतन्य अस्त पावलें आहे आणि सुकलेला पालापाचोळा त्याच्या सभोंवार इतका साचला आहे कीं, त्याच्या ढिगाऱ्याखालीं म्हणजे अज्ञ रूढींच्या बुरख्याखालीं, आर्य धर्माचीं सत्तत्त्वे विलक्षण विपर्यासामुळें दृष्टीसहि पडूं शकत नाहींत ! वटवृक्ष पूज्य खरा, म्हणून आम्ही हिंदूंनीं त्या वृक्षास सोडून केवळ इतस्ततः फांकलेलीं त्याचीं सुकलेलीं पानें गोळा करूं लागावें आणि त्या सनातन वृक्षाचें पावित्र्य त्या बिचाऱ्या सुकलेल्या पानांच्या माथीं मारावें यापेक्षा अधिक अज्ञानजन्य व दुःखद स्थिति दुसरी कोणती !

## रूढी व नीति

वेदकालोत्तर पुराणाच्या कालीं स्मृती रचण्यात आल्या आणि त्या ग्रंथांच्या निर्मितीपासून हिंदु स्त्री-पुरुषांमधील सामाजिक विषमतेस प्रारंभ झाला असें म्हणता येईल. आमच्या स्त्रियावरील सामाजिक अन्याय्य रूढीस या पुरुषप्रणीत एकपक्षी स्मृतींचेंच पाठबळ असून, त्यामुळें स्त्रियांची स्थिति उत्तरोत्तर पुरुषवर्गाच्या आर्थिक दास्यांत रहाण्यांतच परिणत होत गेली ही गोष्ट इतिहासप्रसिद्ध असून, त्याचीं कटु फळें आज आम्ही भोगीतच आहोंत ! या वस्तुस्थितीचा शांतपणें विचार करतां पुरुषवर्गाच्या विशेष स्वार्था-मुळें व अधःपातामुळें ईश्वरी प्रतिक्रियेनुसार त्यांस आपल्या कृतकर्मांची

कडू फळे वरीलप्रमाणें भोगावीं लागत आहेत किंवा काय अशी शंका मनास शिवल्यावाचून रहात नाहीं ! कोठें तो आमचा प्राचीन वेदकालीन उज्ज्वल विश्वव्यापी धर्म, आणि कोठें अधःपातामुळें व विषम दृष्टी-मुळें जन्मास आलेला रूढिरूपी आजचा स्मृतिग्रंथांतील कोता धर्म ! आजच्या समाजांतील स्त्रीजीवन पहावें आणि प्राचीन वेदकालांतील आमच्या आर्य पूर्वजांच्या स्त्रियाची समाजस्थिति पहावी म्हणजे उत्तुंग नगाधिराज हिमालय व लहान डोंगर, किंवा धीरगंभीर महासागर व खळ-खळणारा ओढा याजमधील फरक कोणाच्याहि लक्षात येईल !

## स्त्रियांचें आर्थिक स्वातंत्र्य

आज स्त्रियाना पुरुषाच्या बरोबरीनें आर्थिक स्वातंत्र्य नाहीं ही आमच्या समाजात मोठीच उणीव दाखविण्यांत येते. परंतु वेदकालीं स्त्रिया व पुरुष यांचीं बहुतेक कार्ये जोडीनेंच होत असत असे पुरावे सापडतात ! यावरून हजारों वर्षांपूर्वीच्या आर्यांच्या त्या सुवर्णयुगाची चांगलीच कल्पना येते. प्रत्येक यज्ञ पुरुष व स्त्री मिळून दोघेहि यथासांग करीत. सोमवल्लीचा रस काढणें, तो गाळणें आणि आपल्या पतीबरोबर यज्ञाच्या सांगतेंत समानाधिकारानें हातभार लावणें हीं प्रत्येक संसारी स्त्रीचीं प्रमुख कर्तव्यें मानण्यांत येत. असें केल्यानें पति-पत्नींस जोडीनेंच स्वर्ग मिळेल अशी त्यांची आकांक्षा असे. त्या काळीं यज्ञ करणें हें नित्यनैमित्तिक क्रियेंत येत असे. आणि त्या निमित्तानें स्त्री-पुरुषांमध्यें किती संघटन वाढत असलें पाहिजे आणि एकमेकाच्या विचारस्वातंत्र्यास कशी पूर्ण मुभा मिळत असली पाहिजे याची चागली कल्पना येईल. यज्ञासारख्या तत्कालीन महत्तम क्रियेंत ज्यांचा सहवास समान भूमिकेवर रूढ होता अशा गृहस्थ-गृहिणींचे इतर कार्यक्रमहि तसेच एकमेकांच्या सान्निध्यांत व विचारविनि-मयात जात असले पाहिजेत हें उघड आहे. अशा प्रेमाचें आर्यांच्या गृह-जीवनांत सुखसाम्राज्य पसरलें होतें ! याचाच संघदृष्टया विकास होऊन तो उच्चतम विश्वबंधुत्वाप्रत पोंचला असल्यास नवल काय !

## शिक्षणाचें स्वातंत्र्य

गृहकृत्यांतील स्वातंत्र्याबरोबरच आर्य स्त्रियांना शैक्षणिक स्वातंत्र्यहि

दिलेलें होतें. मात्र, या पवित्र स्वातंत्र्याचा परिणाम आज जिकडे तिकडे उतू पहाणाऱ्या रंगेल उच्छृंखलपणांत मोडणार नाहीं याविषयीं आमच्या प्राचीन आर्यांनीं चांगलीच काळजी घेतलेली दिसते ! कारण वेदकालीं आजन्म ब्रह्मचारिणी राहिलेल्या कित्येक स्त्रियाहि आढळतात आणि त्यांचा सामाजिक, नैतिक किंवा बौद्धिक दर्जा वंद्य ऋषीश्वरापेक्षां कोणत्याहि रीतीनें कमी लेखण्यांत येत नव्हता ! हा आर्यांच्या समानत्वाच्या तत्त्वाचा प्रत्यक्ष आचरणांत दिसून येणारा पुरावाच होय असें मानण्यास हरकत नाहीं. विश्ववारा नावाची वेदकालीं एक ब्रह्मचारिणी होऊन गेली. ती यज्ञासाटीं स्तोत्रे रची, यज्ञ करी आणि अग्निदेवतांची भक्तिभावानें उपासना करी. ज्या कालीं पुरुष व स्त्री यांजमध्यें सामाजिक, नैतिक वा बौद्धिक विषमता मानण्यांत येत नसे, किंवा ती रूढीच्या पांघरुणाखालीं 'धर्म' म्हणून ढोंगीपणानें किंवा आत्मघातकी दंभानें बळेंकरून लादण्यात येत नसे, अशा वेदकालीं आर्यांची उत्तरोत्तर सर्वांगीण प्रगति होत गेली; वीर मातांपासून वीर पुत्र प्रसवले; विद्वान आईबापांच्या पोटीं उत्तम संतति निर्माण झाली; आर्यमानवधर्मरूपी रोपट्यास चैतन्योत्पादक पालवी फुटली आणि तो वृक्ष लौकरच फोंफावून वाढूं लागला ! हें हृदयंगम चित्र पाहून कोणा हिंदूचें मन आनंदानें उचंबळून येणार नाहीं ! आणि आजच्या तीव्र जीवनकलहाच्या तळमळींतून तें उडून जाऊन थोडा वेळ तरी आमच्या प्राचीन सामाजिक सुस्थितीचे शीतल वायु सेवण्याकरितां धडपडणार नाहीं !

## वैवाहिक कृत्रिम बंधनांचा अभाव

पुराणकालीन चातुर्वर्ण्याचा व जातिसंस्थेचा तेव्हां सुदैवेंकरून उगम झालेला नव्हता ! आज असंख्य जातींमुळें व पंथांमुळें हिंदु समाजाचीं इतकीं शकलें झालीं व होत आहेत कीं, हिंदु संघटनेचा प्रश्न शक्यतेच्या पलीकडे जाऊं पहात आहे आणि या हिंदु-जाति-संस्थारूपी खिंडारांतून पुनः पुनः चाल करण्यासाठीं परधर्मीय शत्रूंनीं कंबरा बांधल्या आहेत ! अशा रीतीनें आमच्या विस्कळितपणामुळें हिंदुसमाजरूपी अफाट वृक्ष अत्यंत जीर्ण झालेला आहे आणि मिळेल तो उपटसुंभ वाटसरू त्याच्या डहाळ्या व फांद्या एकसारखा तोडीत आहे ! असें होतां होतां 'म्हातारा आणि त्याच्या दोन बायका'

या कथेतील शेवटाप्रमाणें अखेर हिंदुधर्मरूपी झाडाचा बुंधा तेवढाच शिल्लक राहिला म्हणजे मिळविली असें म्हणण्याची पाळी आमच्यावर खात्रीनें येईल अशीं दुश्चिन्हें आजच स्पष्ट दिसत आहेत ! असो. प्रत्येक स्त्रीनें लग्न केलेंच पाहिजे अशी सक्ति वेदकालीं नव्हती; आणि याच्यापुढील वैवाहिक बंधनांतील मुलां-मुलींच्या खेळांपर्यंत मजल जाणें प्राचीन आर्य स्त्री-पुरुषांच्या स्वप्नींमनींहि नसलें पाहिजे असें एकंदर त्या कालाच्या बनावांतील समाजस्थितीचें शब्दचित्र पाहिल्यास दिसून येतें. कित्येक स्त्रिया ब्रह्मचारिणी राहून पित्याच्या घरींच वास करीत आणि पितृसपत्तीचा हिस्साहि त्यांस पुत्राप्रमाणेंच मिळत असे ! यावरून मुला-मुलींस सामाजिक, नैतिक बौद्धिक व आर्थिक बाबतींत त्यांच्या पालकांकडून संपूर्ण समानतेचें स्वातंत्र्य दिलें जात असे असें दिसतें ! मनुस्मृतिकालापासून अल्प वयांतच स्त्रियांचीं सक्तीनें लग्नें लावून देण्याची रूढि पाडण्यांत आली आणि या स्वार्थांध रूढीमुळें पित्याच्या प्रातीच्या वांट्यास आर्य मुली कायमच्या मुकल्या. आणि त्यांचें सामाजिक व आर्थिक जीवन कसल्याहि पतिदेवाच्या केवळ दृष्टिक्षेपावर अवलंबून रहाण्याची घातकी रूढि उत्तरोत्तर सर्वत्र बळावूं लागली !

## प्रौढ व प्रेमोत्तर विवाह

वेदकालीं मुलींचीं प्रौढपणींच लग्नें होत ! बालविवाहाची चाल तेव्हां मुळींच अस्तित्वांत नव्हती ! तसेंच मुलांमुलींच्या परस्परपरिचयाच्या अंतीं एकमेकांच्या पसंतीस तीं उतरल्यास मात्र त्यांचीं लग्नें लावून देत असें दिसून येतें. मात्र, या गोष्टी उच्छृंखलपणात परिणत होऊं नयेत म्हणून उभयतांचे पालक योग्य ती देखरेख ठेवीत व काळजी घेत. परस्पर अनुरूपतेच्या वेदीवर वास्तविक आरूढ होण्यास योग्य असलेल्या आमच्या या विवाहसंस्थेला मनुकालापासून दानाचें स्वरूप प्राप्त झालें; तेणेंकरून आपल्या जन्माचे सोबती पसंत करण्याचा स्त्रियांचा जन्मसिद्ध पवित्र हक्क अचानकपणें हिरावून घेण्यांत आला आणि आर्थिक स्वातंत्र्याबरोबरच त्यांच्या हक्करूपी स्मरणीचा आणखी एक मोठा मणी हट्टानें पुरुषाकडून तोडून टाकण्यात आला ! याचें पाप पुरुषवर्गाच्या माथीं बसलें असून त्याचें परिमार्जन करण्यासाठीं यथाशक्ति झटणें हें प्रत्येक विचारी व स्वाभिमानी भारतीयाचें कर्तव्यच आहे. वेदकालीं

चतुर, प्रौढ वयाच्या मुली कित्येक विवाहेच्छु पुरुषातून आपणास योग्य असा पति स्वतःच पसंत करीत! पति पसंत करण्यास लागणारें धैर्य प्रौढपणींच येणें संभवनीय असल्यामुळें बालविवाहपद्धति तेव्हां प्रचारांत असणें शक्य नव्हतें असें ओघानेंच ठरतें! या पत्नि-पति-शोधनाच्या पद्धतीपासूनच पुढें पुराणकाळीं क्षत्रियांत 'स्वयंवर' पद्धति प्रचारांत आली असावी. परंतु इतर तीन वर्णांत या न्याय्य प्राचीन विवाहपद्धतीचा जो एकदांचा लोप झाला तो कायमचाच! आणि ही स्थिति आज असह्य झाल्यामुळें सुबुद्ध बंडखोर स्त्रीवर्गाचा असंतोष आतां जोरानें डोकावूं लागला आहे आणि पुरुषवर्गाला आपलें सुप्त तेज कटाक्षानें दाखवूं लागला आहे!

## विधवाविवाहहि मान्य!

ऋग्वेदांतील एका ऋचेंत विधवाविवाहाचा पाठपुरावा करणारा खालील उल्लेख आहे :—

"हे स्त्रिये, तूं निर्जीव पतीजवळ अंग टाकलें आहेस! सजीव जनांच्या सान्निध्यांत ये आणि तुझ्या पसंतीस जो उतरेल त्या अनुरूप वराचें करग्रहण करून त्याची गृहस्वामिनी हो!" डॉ. राजेंद्रलाल मित्र नांवाचे प्रसिद्ध बंगाली विद्वान् याविषयीं म्हणतात, "वेदकालीं विधवाचे पुनर्विवाह होत असत, किंबहुना ती एक राष्ट्रीय रूढीच होती! यासंबंधीं कित्येक दाखले व प्रमाणें आढळतात! प्राचीन संस्कृत भाषेंतील 'दिधीषु'=विधवेचा दुसरा पति, 'परपूर्वा'=दुसऱ्या पतीस जिनें वरलें आहे अशी स्त्री, 'पौनर्भव' म्ह. दुसऱ्या पतीमुळें स्त्रीच्या पोटीं उत्पन्न झालेला पुत्र, इत्यादि शब्दच विधवाविवाहपोषक अचूक प्रमाणें होत!" आज हिंदु समाजाला विधवाविवाहाच्या प्रश्नाचा परिस्थित्यनुरूप जोरानें विचार करावा लागत आहे. केवळ स्मृतींनीं विधवाविवाहाच्या प्राचीन रूढीला एकदम अर्धचंद्र दिला म्हणून त्याचीच आम्ही री ओढीत बसणें म्हणजे सामाजिक सुधारणेच्या दृष्टीनें असमंजसपणाचें किंवा मुमूर्षावस्थेचें होईल! पुरुषांना एका बायकोवर, किंवा ती वारल्यास, दुसरी बायको करण्यास आमच्या रूढिदेवीची पूर्ण मुभा आहे असा समाजाचा ग्रह असावा व तो त्यानें मोहानें उराशीं घट्ट बिलगून धरावा; उलटपक्षीं, स्त्रियांनीं मात्र पतिनिधनाअंतीं केशवपन करून घेऊन तरुणपणीं

सक्तीचा ब्रह्मचर्याश्रम घ्यावा ही आमच्या समाजांतील विषमतेची परमावधीच म्हटली पाहिजे ! ! विवेकबुद्धीच्या टोंचणीपुढें असले रूढीकडून संमत झालेले कितीहि अन्याय क्षणमात्रहि टिकणे शक्य नाहीं ! सक्तीनें कोणतीहि गोष्ट करवूं गेल्यास त्याचा परिणाम विपरीतच होतो ! उघड मनमोकळेपणाची जागा गुप्त उच्छृंखलपणा स्वीकारते आणि स्त्री-पुरुषांमधील पवित्र नीतिबंधनें कोंडून ठेवल्याकारणानें तीं गुदमरून त्याचे अनिष्ट परिणाम पुढें सर्व समाजास भोगावे लागतात ! याचे परिणाम आपल्या हिंदुसमाजास वेळोवेळीं भोंवतच आहेत ! त्यानें आपल्या अज्ञाननिद्रेंतून जागें होणें व आपल्या तर्कयुक्तिवादास न पटणारे रूढिगत अन्याय निर्मूल करण्यासाठीं कनिष्ठ समाजाला बरोबर घेऊन झटणे हे आपलें आद्य कर्तव्यच मानलें पाहिजे.

## सिंहावलोकन

तात्पर्य, वेदकालीं आमच्या आर्य स्त्रियांची सामाजिक व आर्थिक स्थिति बऱ्याच उच्च दर्जाची होती असें वरील त्रोटक वर्णनावरून दिसून येईल. प्राचीन आर्यांची विशाल दृष्टि, स्त्री-पुरुषांना पूर्ण समान लेखण्याची त्याची विश्वबंधुत्वाची उदार कसोटी, जाति-वर्ण-भेदांचा संपूर्ण अभाव, स्त्रियांना पुरुषांबरोबरच संपूर्णतेने मानसिक, नैतिक व बौद्धिक विकास उपभोगण्यास असणारा वाव, आजच्या विषम व अन्याय्य रूढींचा अभाव, विधवाविवाहाला मान्यता, क्वचित् मुलींना आजन्म कुमारिका ठेवून आपल्या संपत्तीचा वारसा देण्याची सहृदय बापांची तयारी, इत्यादि स्त्रीजीवनाच्या भरदार वाढीस अत्यंत पुष्टिदायक अशा सामाजिक परिस्थितीमुळें, प्राचीन आर्य स्त्रियांत पुरुषाच्या बरोबरीनें विद्वान व वादविवादकुशल स्त्रिया, तेजोबलसंपन्न ब्रह्मचारिणी, राजकारणी पतिव्रता आणि युयुत्सु वीरा निपजाव्यात यांत आश्चर्य तें कसलें ! इंग्रजींतील एका सुप्रसिद्ध म्हणींत म्हटल्याप्रमाणें "जी माता लहान मुलांचा पाळणा हालविते ती राष्ट्रांचा उदयास्त घडवून आणण्यास समर्थ ठरते" हेंच खरें ! कारण अशा तेजस्वी मातांचे संस्कारजन्य परिणाम त्यांच्या लहान मुलांवर न कळत होत असतात आणि म्हणूनच पुरुष व स्त्री या संसार-

रथाच्या दोन चाकांमध्यें दुसरें चाक जर सामाजिक रूढिरूपी पिढीजाद अन्यायांनीं अकारण लुलें पाडले तर त्याचे घोर परिणाम स्त्रीसच काय तर तिच्या पतीस, तिच्या मुलांस, सर्व समाजाला आणि तेथून सबंध राष्ट्राला वर्षांतरीं भोगावे लागतात आणि पुढें त्यांचें एकदम परिमार्जन करणें उभ्या राष्ट्रासहि जड जातें! म्हणून आमच्या प्राचीन स्त्रीजीवनांत व आजच्या स्त्रीच्या सामाजिक स्थितींत कोणत्या बाबतींत विरोध आहेत हें चांगलें लक्ष्यांत वागवून त्यांतील न्यूने जागृतिकिरणांच्या उज्ज्वल तेजानें घालविण्यास धैर्यानें झटणें हें समाजधुरीणांचें आजचें महत्त्वाचें कर्तव्य होऊन बसलें आहे.

# भारतीय नौकानयनाचा इतिहास

## प्रास्ताविक सिंहावलोकन

प्रस्तुत कालीं भारतीय नौकानयनाची व्यापारोत्कर्षाकरिता अतिशय आवश्यकता आहे. आज हिंदुस्थानचा परदेशांशीं होणारा सर्व व्यापार अमेरिकन, इंग्लिश, फ्रेंच, जर्मन, इटालियन व जपानी आगबोटींच्या द्वारें होत आहे. स्वराज्यांतील या भारतीय नौकानयनाच्या प्राचीन व्यवसायाला दुर्दैवानें कायमची मूठमाती मिळाली आहे आणि म्हणूनच आम्हांस परदेशी आगबोट कंपन्यांना व्यापारी सामानाच्या ने-आणीकरितां अपरिमित वाहतुकीचें भाडें द्यावें लागत आहे ! हीच अनुकंपनीय स्थिति बळावत चालल्यास उत्तरोत्तर हिंदुस्थान देश पुरता कंगाल बनत जाऊन व हिंदी लोकांच्या हातांत आज असलेलीं थोडथोडकीं व्यापाराचीं साधनेंहि जपानादि पौर्वात्य व अमेरिका, इंग्लंड, इटली इत्यादि पाश्चात्य राष्ट्रांतील व्यापाऱ्यांच्या हातीं जाऊन या देशास आर्थिक पारतंत्र्याची पुरेपूर जोड मिळाल्यावाचून रहाणार नाहीं ! म्हणून भारतीय नौकासामग्रीची आवश्यकता प्रतिपादण्यापूर्वी स्वराज्यांतील भारतीय नौकानयनाचा त्रोटक इतिहास देण्याचें योजलें आहे. नंतर आजच्या भारतीय नौकानयनाच्या आत्यंतिक ऱ्हासाचीं कांहीं कारणें सांगून ही स्थिति सुधारण्याचे उपाय आहेत किंवा काय व त्यांची रूपरेषा कोणती याविषयीं त्रोटक चर्चा करून आटोपतें घेऊ.

## भारतीय स्वराज्याचेंच नौकानयन उपांग

भारतीय नौकानयनाचा प्राचीन इतिहास भारतीय स्वराज्याशीं निगडित

आहे. मुसलमानी संस्कृतीची टोळधाड अकराव्या शतकांत हिंदुस्थानावर येईपर्यंत जो दोन हजार वर्षोपर्यंतचा स्वराज्याचा व राजकीय शांततेचा काळ हिंदुस्थानांत गेला त्यांत सबंध हिंदुस्थानाची सामाजिक, राजकीय, नैतिक, आर्थिक, आध्यात्मिक व कलाविषयक अशी सर्वांगीण उन्नति होत गेली. त्या काळांत हिंदुस्थानाचें व्यापारी दळणवळण सबंध जगांतील बाजारपेठांशीं पसरलेलें होतें आणि व्यापाराच्या अनुषंगानें आर्य लोकांनीं इजिप्त, आफ्रिका, इराण, चीन, जपान, मलाया द्वीपकल्प, जावा बेट, सिंहलद्वीप इत्यादि ठिकाणीं जहाजांच्या मार्गांनीं जाऊन तेथें जिंकण्याच्या बुद्धीनें वसाहतीहि स्थापन केल्या होत्या ! तसेंच इजिप्तमधील अलेक्झाड्रिया, रोम, अथेन्स आदि रोमन व ग्रीक लोकांच्या राजधानींत भारतीय मौर्य राजांचे कारभारी होते. प्राचीन काळापासून खनिज संपत्ति, रत्नें, तलम कापड, मसाल्याच्या वस्तू, कलाकौशल्याच्या वस्तू इत्यादि इतर देशात दुर्मिळ असलेल्या वस्तूंबद्दल हिंदुस्थान प्रख्यात आहे. आणि या वस्तूंची निर्गत आफ्रिका, अरबस्तान, इराण, तुर्कस्तान, ग्रीस, रोम इत्यादि सुप्रसिद्ध देशांत भारतीय नौकांच्या साधनांनीं एकसारखी होत असल्याचे आधार सांपडतात.

## नौकानयन व भिन्न संस्कृति

जगांतील ग्रीक, रोमन, मिसर, इराणी, अरबी, चिनी, जपानी इत्यादि निरनिराळ्या संस्कृतींचे अवशेष हिंदुस्थानात सापडतात ! यावरूनहि नौकानयनाचा धंदा भारतांत एके काळीं किती ऊर्जितावस्थेंत होता आणि व्यापाराच्या मिशानें जगांतील सर्व देशांचे प्रमुख व्यापारी भारतांत कशा तऱ्हेनें येऊन राहिले होते याची कल्पना येते. धार्मिक बजबजपुरी आज हिंदु धर्मांत जिकडे तिकडे बोकाळलेली दिसून येते ! सोंवळ्या-ओंवळ्याचें बंड, म्लेच्छांना अस्पृश्य लेखण्याची रूढि, असंख्य जातिभेद इत्यादि आत्मघातकी प्रवृत्ति भारतवर्षांत प्राचीन काळीं नव्हती. आणि म्हणूनच जगांतील सर्व धर्मांच्या लोकांना प्रवासाच्या, सृष्टिनिरीक्षणाच्या, शिक्षणाच्या वा व्यापाराच्या निमित्तानें हिंदुस्थानांत येण्यास मूळ उदार वैदिक धर्मांची किंवा नंतरच्या बौद्ध धर्मांची मुळींच आडकाठी नव्हती ! जगांतील अशा भिन्न संस्कृतींचा एकच एक दुर्लभ संगम झालेला कोणता देश असेल तर

तो हिंदुस्थान होय असे कित्येक पाश्चात्य विद्वानानींहि आमच्या प्राचीन स्वराज्यांतील स्थितीबद्दल प्रशंसेचे उद्गार काढलेले आहेत! आणि इतक्या जागतिक भिन्न संस्कृती या देशात स्थिर होण्यास व त्या हजारों वर्षेपर्यंत टिकण्यास भारतीय नौकानयनाची विलक्षण वाढ आणि तेणेंकरून भारताचा सर्व जगातील प्रमुख राष्ट्रांशीं झालेला व्यापारोत्कर्ष व विचारविनिमय हीं दोन कारणें प्रमुख होत अशी ग्रीक, रोमन आदि प्राचीन इतिहास-कारांनींहि मुक्तकंठानें ग्वाही दिली आहे!

## आर्यांची हिंदुस्थानांतील दौड

आफगाणिस्थानाच्या हिमप्रदेशांतील अरुंद दरीच्या द्वारें मध्य आशियां-तून आर्यांचे प्रथम आगमन हिंदुस्थानात जेव्हा झालें तो काल संस्मरणीय होऊन राहील यात शंका नाही. हिंदुस्थानातील सुपीक जामिनी, निरोगी हवा, विपुल नद्या, अजस्र पर्वत, धनधान्यसमृद्धि पाहून आर्यांनीं पंजाबातील नद्यांच्या सुपीक खोऱ्यात वसाहत केली, द्रविड आदि हिंदु-स्थानांतील मूळ संस्कृतीशीं त्यांनीं विरोध केला आणि क्रमेण त्या जुन्या संस्कृती या नव्या आर्य संस्कृतीशीं तत्सम होण्याच्या पंथास लागल्या. नंतर गौतम बुद्धाचा उगम झाला आणि आर्यांच्या सनातन धर्माला या नूतन बौद्ध धर्मामुळें बराच धक्का बसला.

## बौद्ध धर्माचा उगम

बौद्ध धर्माचा विकास गौतम बुद्धानें हिंदुस्थानांत मात्र न करतां अनेक फिरते प्रचारक परदेशीं पाठविले. बौद्ध भिक्षुक हिंदुस्थानाच्या उत्तरेकडील तिबेट, चीन, जपान आदि प्रदेशांतील आणि पूर्वेकडील ब्रह्मदेश, मलाया द्वीपकल्प, जावा बेट इत्यादि सर्व पौर्वात्य देशांतील लोकाना बौद्ध धर्माची दीक्षा झपाट्यानें देऊं लागले! आणि त्या धर्मास त्या काळापुरता राजाश्रयहि भरपूर लाभल्यामुळें चीन, जपान, मलाया, जावा इत्यादि पूर्वेकडील प्रदेशात व्यापाराच्या मिशानें धर्मशिक्षणाच्या उद्देशानें आणि वसाहतीच्या निमित्तानेंहि अनेक नौकाच्या द्वारें असंख्य बौद्ध लोक भारतां-तून देशपर्यटनार्थ जाऊं लागले यांत आश्चर्य नाहीं. हा बौद्ध वसाहतींचा इतिहास भारतीय नौकानयनाच्या उत्कर्षाचा मध्यबिंदु होय आणि त्याचा

उज्ज्वल प्रकाश आजहि भारतीय स्वराज्यातील धार्मिक, आर्थिक व राजकीय वैभवानें आमचे डोळे दिपवीत आहे !

## परकीय संस्कृतींची झळ

बौद्ध धर्माच्या ऱ्हासानंतर या नौकायनाच्या व्यवसायाला थोडा आळा बसला. इराणाचा राजा डेरियस यानें हिंदुस्थानावर स्वारी करून सिंध आणि पंजाबांतील कांही भाग आक्रमिला. नंतर सुप्रसिद्ध ग्रीक योद्धा अलेक्झांडर याची दौड हिंदुस्थानावर झाली आणि त्यानेंहि पंजाबांतील पोरस राजाचा पराभव करून त्यास मांडलिक बनवून ठराविक खंडणी द्यावयास भाग पाडलें. परंतु त्याच्या ग्रीक सैनिकाच्या प्रकृतीस हिंदुस्थानातील उष्ण हवा न मानवल्यामुळें त्यांची पंजाबात वसाहत करण्याची इच्छा जागच्या जागींच विरून गेली आणि ते हिंदुस्थान सोडून आपल्या गावीं गेले ! ग्रीक संस्कृतीचा हिंदुस्थानांत अस्त झाल्या-नंतर इटलीतील रोमन संस्कृति येथें आली आणि रोमन व्यापारी उत्तरेकडील कुशन राजघराण्याच्या काळीं आणि दक्षिणेकडील चोळ घराण्याच्या काळीं एकाच वेळी दोन्ही प्रदेशांत व्यापार करूं लागले. त्यानीं या बाबतींत संघटन वाढवून भारतीय व्यापाराच्या प्रगतीचीं साधनें बरींच जवळ आणिलीं आणि तेणेंकरून भारतीय नौकासंचाराच्या व्यवसायाला पुनः जोराची भरती यावयाला बरेंच साह्य केलें.

नंतर अकराव्या शतकांत इस्लामी संस्कृतीची दौड हिंदुस्थानांत झाली आणि ज्या दिवशीं आफगाणिस्थानाच्या मार्गानें बाबरानें हिंदुस्थानांत कूच केलें तो दिवस भारतीय स्वराज्याला अत्यंत अशुभसूचक गेला असें म्हणण्यास हरकत नाहीं ! इस्लामी संस्कृतीच्या जोराच्या आघातांमुळें एकदांचा धार्मिक जुलूमजबरदस्तीचा पायंडा हिंदुस्थानात बसला त्याची आठवण कोणालाहि असह्यच होते ! या धार्मिक बाटवेगिरीमुळें उत्तरे-कडील स्वराज्यांतील भारतीय राज्याचीं शकलें झालीं आणि पूर्वेकडील शूर व कडवे धर्माभिमानी रजपूत योद्धेहि आपला क्षत्रिय बाणा उत्तरो-त्तर विसरत जाऊन मोंगल संस्कृतीशीं तादात्म्य होईपर्यंत त्यांची अधो-गति झाली ! अपवाद म्हणून या परराज्यांत मराठ्यांनीं मात्र, कोंकणपट्टी-

जवळ आपलें चिमुकलें आरमारवर्धनाचें काम सुरू केलें. इस्लामी संस्कृतीमुळें भारतीय नौकानयनाला गुजराथेंत व बंगाल्यांत प्रचंड धक्का बसला ! आतां तो प्राचीन व्यवसाय नामशेष होण्याच्या पंथाला आला होता. त्याचें महाराष्ट्रापुरतें पुनरुज्जीवन करून शिवाजीमहाराजांनीं आपलें भारतीयत्व उत्तम रीतीनें सिद्ध केलें असें म्हणण्यास मुळींच संदेह नाहीं.

इ. सन १६०० पासून आधिभौतिक युरोपीय राष्ट्रें आपल्या मोहनिद्रेंतून जागीं होऊन व्यापाराच्या, वसाहतींच्या व नवीन प्रदेशांच्या शोधाच्या निमित्तानें जिकडे तिकडे जलयानांतून आपल्या धाडसी नाविकाना पाठवूं लागलीं. आणि प्रारंभीं तरी या निरनिराळ्या खिस्ती राष्ट्रांतील नाविकांनीं व्यापाराच्या मिशानें हिंदुस्थानाच्या पूर्वकिनाऱ्यावरील भडोच, मुंबई, दीव, गोवा, कारवार, कालिकत इत्यादि चांगलीं चांगलीं बंदरें आक्रमून ठेवलीं होतीं. इस्लामी संस्कृतीमुळें भारतीय स्वराज्यास आणि त्याच्या अनुषंगानें नौकानयनास जो पहिला धक्का बसला त्यापासून तो सांवरतो न सांवरतो तोंच या खिस्ती व्यापाऱ्यांनीं हिंदुस्थानांतील बाजारपेठा हस्तगत करण्याचा पुरता चंगच बांधला ! परंतु या परदेशस्थ व्यापाऱ्यांपैकीं शेवटीं इंग्रज, फ्रेंच व डच या तीन प्रमुख जनांगातच वरचेवर चढाओढ होत होती. तींत प्रथम डच लोक हरले आणि त्यानीं हिंदुस्थानातून आपला पाय काढला ! नंतर फ्रेंच व इंग्रज या दोन प्रबल व तुल्यबल राष्ट्रांमध्यें इंग्लंडांत व हिंदुस्थानांत एकदमच युद्ध सुरू झालें आणि त्यांत फ्रेंच लोक हरल्यानंतर क्रमेण हिंदुस्थान इंग्रजाच्या ताब्यांत आला व भारतीय स्वराज्यावर आणि त्यासवेंच त्याच्या प्राचीन नौकानयनाच्या उज्ज्वल व्यवसायावर एकदांचा शेवटचा पडदा पडला !

### उत्पत्ति, स्थिति व लय

वरील विवेचनावरून हिंदुस्थानाची भूमि कित्येक जागतिक संस्कृतींची नौकानयनद्वारा उत्पत्ति, स्थिति व लय पाहिलेली जणूं प्रचंड रुद्रभूमि आहे हा भीषण विचार मनास शिवल्याविना रहात नाहीं ! भारतीय नौकानयनाचा तो उज्ज्वल भूतकाल, त्याची कमी कमी होत

जाणारी प्रगति आणि त्याचा अस्त यांचें भीषण दृश्य दिसूं लागतांच भारतांत नामशेष झालेल्या ग्रीक, रोमन, इस्लामी आदि संस्कृतींची रूप-रेषा डोळ्यांपुढून जाते आणि भारतीय संस्कृतीच्या व व्यावसायिक कला-प्रकर्षाच्या गळचेपीवर उभारलेली कोणतीहि विभिन्न संस्कृति या देशांत चिरकालपर्यंत राहूं नये अशी जणू विधिघटनाच आहे कीं काय असा विकल्प मनात डोकावल्याविना रहात नाहीं ! या पारतंत्र्याच्या अन्यायाची चीड प्रतिक्रियेच्या रूपानें ईश्वर व्यक्त करतो आणि भारतीय संस्कृतीच्या अवशेषांबरोबरच जयिष्णु विभिन्न संस्कृत्याहि लोप पावतात हा हिंदु-स्थानांतील गतेतिहासाचा ठळकपणें दिसणारा दाखला कोणास ठाऊक नाहीं ?

## राजाश्रय व व्यापार यांचें साहचर्य

खिस्ती व इस्लामी संस्कृतींच्या पूर्वी भारतीय स्वराज्यात राजाश्रया-मुळें भरतखडातील व्यापार एकसारखा वाढतच होता. व्यापार करून हिंदुस्थानाची आर्थिक स्थिति उत्तरोत्तर अधिक संपन्न केली पाहिजे या उच्च महत्त्वाकांक्षेनें प्रेरित झालेले भारतीय व्यापारी पेगु, कांबोदिया, जावा, सुमात्रा, बोर्नियो व जपानपर्यंत नौकानयनाच्या द्वारें जात, तेथें व्यापार करीत व वसाहतीहि करीत. पश्चिमेकडे अरबस्तान, इराण, इजिप्त, ग्रीक, रोम इत्यादि गतकाळीं प्रसिद्ध असलेल्या प्रमुख प्रदेशांपर्यंतहि त्यांचा व्यापार व दळणवळण अव्याहत असे.

भारतीय व्यापारी दळणवळणाचीं दोन साधनें प्राचीन काळापासून प्रसिद्ध आहेत. मध्य आशियांतून आफगाणिस्थानाच्या मार्गानें हिंदु-स्थानाच्या वायव्येकडील सरहद्दीचा टापू ओलांडून पंजाब प्रांतांत येण्याचा एक मार्ग. परंतु हा मार्ग फार बिकट, खर्चाचा व त्रासाचा असल्यामुळें तो बहुतेक मागें मागें पडत चालला आणि मध्ययुगाच्या कालापासून जगांतील शेंकडा नव्वद राष्ट्रें जलमार्गानें हिंदुस्थानाशीं व्यापार करूं लागलीं. हिंदुस्थान जगाच्या मध्यभागीं असल्याप्रमाणें आहे. म्हणूनच जगांतील सर्व राष्ट्रांशीं जलमार्गानें व्यापारी किंवा राजकीय दळणवळण ठेवणें त्यास जितकें सुकर आहे तितकें दुसऱ्या कोणत्याहि देशास नसावें.

## कांहीं साधनें

भारतीय नौकानयनाच्या इतिहासाचीं साधनें भारतीय व परदेशी प्रवाशांच्या लिखाणावर अवलंबून रहाणार हें उघड आहे. प्राचीन ग्रंथ, चित्रें, अजंठासारख्या कोरीव लेण्यांतील चित्रें आणि इतिहाससंशोधन-खात्यातर्फें लागलेले महत्त्वाचे शोध; संस्कृत, पाली, पर्शियन, तामिळ, मराठी व बंगाली साहित्यातून भारतीय नौकानयनाविषयीं आढळणारे उल्लेख इतक्या साधनांचा विचार करतां या प्रश्नाचा बराच उलगडा झालेला आढळतो. परदेशी साधनांत युरोपीय प्रवाशांनीं लिहून ठेवलेल्या प्रवासाच्या हकीकती, जावा बेटांतील उत्खननामुळें आढळून आलेल्या वस्तू, इत्यादि प्रकार आढळतात. भारतीय नौकानयनाच्या इतिहासाचे खालीलप्रमाणें स्थूल विभाग पाडतां येतील. (१) मौर्यपूर्वकाल, (२) मौर्यकाल, (३) कुशनांचा काल, (४) तामिळांचा काल, (५) गुप्तांचा काल व (६) कोंकणपट्टींतील मराठ्यांचा काल.

## संस्कृत व पाली वाङ्मयीन पुरावे

प्राचीन नौकानयनासंबंधीं संपूर्ण माहिती ज्यात देण्यांत आली आहे असा 'युक्तिकल्पतरु'नामक हस्तलिखित संस्कृत ग्रंथ कलकत्ता येथील संस्कृत कॉलेजच्या ग्रंथालयांत उपलब्ध झाला आहे. त्यात नौकांचे आकार, तऱ्हा, त्या बांधण्याची पद्धति, कोणत्या लांकडापासून त्यांचें बांधकाम करणें प्रशस्त आहे, इत्यादि सर्व माहिती देण्यांत आली आहे. प्राचीन नौकानयनाचार्यांना जहाजें बांधण्याच्या लांकडासंबंधीं चांगलीच माहिती होती. 'वृक्ष-आयुर्वेद'नामक ग्रंथात म्हटलें आहे कीं,

लघु यत् कोमलं काष्ठं सुघटं ब्रह्मजाति तत् ।<br>
दृढाङ्गं लघु यत्काष्ठमघटं क्षत्रजाति तत् ॥<br>
कोमलं गुरु यत्काष्ठं वैश्यजाति तदुच्यते ।<br>
दृढाङ्गं गुरु यत्काष्ठं शूद्रजाति तदुच्यते ॥<br>
लक्षणद्वययोगेन द्विजातिः काष्ठसंग्रहः ॥१॥

लांकडांतहि ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र असे चार वर्णभेद पाडण्यांत आले होते असें वरील श्लोकावरून उघड दिसतें !

नौकाबंधनशास्त्राविषयीं माहिती असलेला 'भोज'नामक प्राचीन ग्रंथकार म्हणतो, "क्षत्रिय जातीच्या लांकडानें बांधलेल्या जहाजामुळें द्रव्य व सुख यांची प्राप्ति होते. बहुतकरून महासागरांत पर्यटन करण्याकरितां अशाच तऱ्हेच्या जहाजाचा उपयोग करावा. परंतु विरुद्ध गुणधर्म असलेल्या निरनिराळ्या जातींच्या लाकडांपासून बांधलेलीं जहाजें अधिक काळ टिकत नाहींत; तीं लौकरच पाण्यांत कुजतात आणि जरा धक्का लागतांच फुटून बुडूं लागतात! भोजानें दुसरीहि एक महत्त्वाची सूचना दिली आहे. समुद्रपर्यटनाच्या कामीं जहाजाच्या तळाच्या फळया एकमेकाना सांधण्याकरितां लोखंडाचा उपयोग करूं नये! कारण, तसें केल्यास या लोखंडाच्या सान्निध्यानें समुद्रांतील खडकांवर जहाज आकर्षिलें जाऊन तें फुटण्याची फार भीति असते!

## भारतीय शिल्पकला, चित्रें व नाणीं

भारतीय कोरीव लेण्यावरून, प्राचीन शिल्पकलेवरून व नाण्यांवरूनहि नौकानयनासंबंधीं बरीच उद्बोधक माहिती मिळूं शकते. अजंठा लेण्यात भारतीय नौकाचीं विविध चित्रें सुंदर रीतीनें कोरण्यात आलेलीं आहेत. ख्रिस्ती शकानंतर सुमारें सातशें वर्षे होऊन गेल्यावर उत्तर हिंदुस्थानांत प्रतापी गुप्ताचें राज्य सुरू होतें. त्या प्रतापशाली राजांच्या कालीं भारतीय लोकांच्या वसाहती पूर्वेकडे जावा, कांबोदिया, सयाम, चीन व जपानपर्यंत पसरल्या होत्या! त्या वैभवशाली कालखंडाचें प्रत्यंतर अजंठा येथील कोरीव लेण्यांतील भारतीय नौकाच्या सुंदर प्रतिकृतींमुळें आजहि प्रतीत होत आहे! त्याच्यापूर्वी बंगालातील विजय नावाचा बौद्ध राजा सिंहलद्वीपाला आपल्या परिवारासहित गेला आणि त्यानें तेथें वसाहत केली असा इतिहास आहे. विजयाच्या नौकात एकूण १५०० प्रवासी होते. अनेक बंदरें करीत विजयानें सिंहलद्वीप गाठलें. ज्या दिवशीं विजय तेथें पोंचला त्याच दिवशीं भगवान् बुद्ध निर्वाणाप्रत पावले! ही गोष्ट सुमारें ख्रिस्तपूर्व सन ५४३ व्या वर्षी घडली. विजयाचें सिंहलद्वीपांतील आगमन अजंठा लेण्यात दाखविलें आहे. समुद्रांतील त्याच्या अनेक नौका, हत्ती, घोडे, सैनिक, पायदळ इत्यादि जमाव किनाऱ्यावर उतरत आहे

अशा प्रचंड घडामोडींचें स्वरूपवर्णन या चित्रांत यथार्थपणें रेखाटलें आहे.

जावा बेटांतील बोरोबुदुर नांवाच्या प्रसिद्ध देवालयाच्या खोदकामांत अनेक भारतीय नौकांचीं चित्रें आढळतात आणि जावांत भारतीयांनीं स्थापलेल्या स्वराज्यातील वसाहतीचें शब्दचित्र मूकपणें दर्शवितात ! खिस्त शकानंतरच्या कालात भारतीय लोक जावाच्या वसाहतीकरितां नौकांतून निघाले आहेत अशा समयाला उद्देशून हीं चित्रें खोदकामात बसवून देण्यांत आलीं आहेत. भारतीय नौकानयनाला व व्यापाराला इतकें सर्वांगीण राजकीय महत्त्व देण्यात येत असे कीं, खिस्त शकानंतर दुसऱ्या शतमानांत दक्षिणेंत राज्य करणाऱ्या आंध्र राजांचीं नाणीं सुद्धा भारतीय नौकांच्या चित्रांनीं मुद्रित केलेलीं आढळतात !

## वेद्कालीन व इतर दाखले

भारतीय नौकानयनाचा सर्वांत जुना दाखला ऋग्वेदांत सांपडतो. एका ऋचेंत वरुणाला सर्व समुद्रपर्यटनाच्या मार्गाचें ज्ञान आहे असें वर्णन आलें आहे. दुसऱ्या एका ठिकाणीं समुद्रांतील प्रत्येक भागात व्यापाराकरितां नौकांच्या द्वारें प्रवास करणाऱ्या धाडसी भारतीय व्यापाऱ्याचा उल्लेख आलेला आहे. आणखी एका ठिकाणीं असें म्हटलें आहे कीं, "तुग्र नांवाच्या राजर्षीनें आपल्या दूरद्वीपस्थ शत्रूंच्या निवारणार्थ भुज्यु नावाच्या आपल्या मुलाला समुद्रमार्गे पाठविलें. परंतु दुर्दैवानें वाटेंत भुज्यु तुफानांत सांपडल्यामुळें त्याची व त्याच्या सैनिकाची अनुकंपनीय स्थिति झाली ! त्यांची सुटका अश्विनीकुमारांनीं आपल्या शंभर वल्ह्यांच्या मोठ्या नौकेंतून केली !" इत्यादि.

रामायणात तर हिंदुस्थान व इतर देश याजमध्यें समुद्रमार्गें परस्परसंबंध दृढ होते याविषयीं अनेक उल्लेख सांपडतात ! किष्किंधाकांडांत सुग्रीव आपल्या कपींना सीतेच्या शोधार्थ धाडतांना रावणानें तिला जेथें जेथें म्हणून लपविणें शक्य होतें असे अनेक देश सांगतो. त्यात 'कोषकार' म्हणून एक उल्लेख आहे. 'कोषकार' म्हणजे रेशमाच्या कोशापासून जेथें रेशीम उत्पन्न होतें असा देश, अर्थात् चीन. तसेंच यवनद्वीप, सुवर्णद्वीप यांचाहि निर्देश आहे. तीं म्हणजे आधुनिक जावा, सुमात्रा व मलाया द्वीपकल्पेंच

होत. 'लोहितसागर' म्हणजे अरबस्तानालगतचा तांबडा समुद्र.

अयोध्याकांडांतील खालील श्लोकावरून रामायणकालीं भारतीय नौकानयनाचें जलयुद्धाच्या कामीं किती महत्त्व लेखण्यांत येत असे याची चांगली कल्पना येते.

> नावां शतानां पचानां कैवर्तानां शतं शतम् ।
> सन्नद्धाना तथा यूनान्तिष्ठन्त्वित्यभ्यचोदयन् ॥
>
> अ.कांड ८४.७४

["शेंकडों कैवर्त तरुण पांचशें नौकांत ओळीनें राहून शत्रूंचा प्रतिकार करण्याकरितां तयारींत असूं द्या."]

रामायणानंतर महाभारताकडे आम्ही वळलों तरी भारतीय समुद्रसंचाराचे दाखले बरेच सापडतात. पांडवांच्या राजसूय महायज्ञाच्या निमित्तानें त्यांनी केलेल्या दिग्विजयांत त्यांचा अनेक द्वीपांशीं संबंध आल्याचीं वर्णनें आहेत. त्यावरून हिंदुस्थानाचा जगांतील सर्व देशांशीं एके काळीं जलमार्गद्वारा व्यापारविनिमय व वसाहती सारख्या होत होत्या याविषयीं शंका रहात नाहीं. सभापर्वांत खालील श्लोक आहेत:—

> सागरद्वीपवासांश्च नृपतीन् म्लेच्छयोनिजान् ।
> निषादान्पुरुषादांश्च कर्णप्रावरणानपि ।
> द्वीपं ताम्राकयश्चैव स नृपं वशे कृत्वा महामतिः ।

["महामति सहदेवानें समुद्रांतील बेटांत दौड करून तेथें वसति करणाऱ्या म्लेच्छाना शिकारींना व रानटी जातींना पादाक्रांत केलें. तसेंच ताम्राक नांवाचें द्वीपहि जिंकलें."]

पांडवांच्या शत्रूंपासून त्यांचें संरक्षण करण्याकरितां विदुरानें एक मोठें जहाज बांधवून त्यांतून पांडवांची सुटका केली असें वर्णन महाभारतांत आदिपर्वांत आलेलें आहे. खालील श्लोक पहा:—

> ततः प्रवासितो विद्वान् विदुरेण तरस्तदा ।
> पार्थानां दर्शयामास मनोमारुतगामिनीम् ॥
> सर्ववातसहां नावं यंत्रयुक्तां पताकिनीम् ।
> शिवे भागीरथीतीरे नरैर्विश्रंभिभिः कृताम् ॥

वेद, महाकाव्यें, सूत्रें, पुराणें यात भारतीय नौकासंचाराचे अनेक उल्लेख सांपडतात. त्याचप्रमाणें संस्कृत कवींच्या कृतींतहि अनेक निर्देश आढळतात. भारतीय स्वराज्याच्या काळीं समुद्रसंचाराचा उपयोग व्यापार वसाहती व नौकायुद्धें याच्याकरितां होत होता असे दिसून येतें. कालिदासाच्या रघुवंशात खालील उल्लेख आला आहेः—

वङ्गानुत्खाय तरसा नेता नौसाधनोद्यतान् ।
निचखान जयस्तंभं गंगास्रोतोऽन्तरेषु च ॥

(रघुदिग्विजयाचा हा समय आहे. राजा रघूने प्रचंड नौकासामुग्रीनें सज्ज होऊन आलेल्या बंगाली राजाचा पराभव केला आणि गंगा नदीच्या खोऱ्यातील अनेक द्वीपावर आपले जयस्तंभ उभारले !)

दंडीच्या दशकुमारचरितात रत्नोद्भव नावाच्या एका व्यापाऱ्याची गोष्ट वर्णिली आहे. तो कालयवन नावाच्या एका द्वीपाकडे प्रयाण करतो आणि तेथेंच एका मुलीशी लग्न करतो. परत येत असता त्याचें जहाज फुटतें. दुसरी गोष्ट मित्रगुप्ताची आहे. तो एका यवनाच्या नौकेंत बसून व्यापारा-पाठीं जातो. परंतु चुकून दुसऱ्याच एका बेटाकडे जाऊन पोंचतो. माघ कवीच्या 'शिशुपालवधा'त श्रीकृष्ण द्वारकेहून हस्तिनापुराला जातांना त्याला परदेशातून समुद्रमार्गे स्वदेशीं परत आलेले अनेक संपन्न व्यापारी कसे दिसले आणि त्याच्या नौकात कोणकोणत्या परदेशी वस्तु दिसल्या त्यांचें वर्णन करण्यात आलें आहे.

भारतीय नौकानयनाच्या उत्कर्षाचें दुसरे एक अचूक उपलब्ध असलेलें साधन म्हटलें म्हणजे हिंदुस्थानातील मोत्यांचा व रत्नादिकाचा व्यापार होय ! रत्नाच्या व्यापाराला व्यापाराचें एक महत्त्वाचें प्रतीक म्हणून भारतांत पहिला मान असे ! या मोत्याच्या व रत्नांच्या व्यापाराकरिता लोकाना समुद्रपर्यटन करावें लागत असे हें उघड आहे. आणि समुद्रात बुडी मारून त्याच्या तळाशीं असलेलीं अमोलिक रत्नें, माणकें, हिरे, मोतीं इत्यादि वस्तु शोधून काढण्यात एके काळीं भारतीय नाविक किती धाडसी व कुशल होते याची प्रतीति पटल्यावांचून रहात नाहीं. त्या काळीं इराणाच्या आखाताच्या हद्दी-पर्यंत सर्व प्रमुख बंदरांत हिंदुस्थानाचा माणिकमोत्यांचा व्यापार असे आणि

या व्यापाराचीं प्रमुख केंद्रें सिंहलद्वीप, सौराष्ट्र, ताम्रपर्णी, पारशव, कौबेर, पाड्यवाटक, हैमदेश इत्यादि होतीं. अगस्त्य नावाचा प्राचीन लेखक म्हणतो कीं, त्या काळीं भारतीय मोत्यांचा व्यापार सिंहलद्वीप, अरबस्तान व इराण यांच्यांशीं अव्याहत चालू असे. या समुद्रमंथनाच्या कामीं दक्षिणेकडील तामिळ लोकाची अत्यंत कुशल म्हणून ख्याति होती आणि शेंकडों वर्षांपर्यंत मोत्यांचा व्यापार यशस्वीपणें चालवून व्यापारोत्कर्षाची गुरुकिल्ली त्या लोकांनीं आपल्या हातांत अखंड ठेवली होती.

बौद्धकालीं उत्पन्न झालेल्या 'जातक'नावाच्या ग्रंथात भारतीय समुद्र-पर्यटनाचे महत्त्वाचे उल्लेख सापडतात. जातकाचा काल ख्रिस्तपूर्वकालीं ५०० पासून १००० वर्षांपर्यंत धरण्यात येतो. बवेरु जातकात अशोक-पूर्वकालीं हिंदुस्थान आणि बाबिलोन याजमध्यें व्यापार असल्याविषयींचा निर्देश आहे. त्या काळीं भारतीय व्यापारी जहाजांतून बवेरूला म्हणजे बाबि-लोनला मोर पाठवीत असत असे उल्लेख आढळतात.

## मौर्यपूर्वकाल

मौर्यपूर्वकालीं हिंदुस्थान उत्कर्षाच्या धवलगिरीवर अत्यत वैभवशाली रीतीनें आरूढ झालेला होता. प्राचीन काळीं फोएनीसियन, ज्यू, असीरियन, ग्रीक, इजिप्शियन, रोमन इत्यादि राष्ट्रांशीं सुमारें ३०० वर्षें-पावेतों हिंदुस्थानाचा व्यापार अव्याहत चालत होता. युरोपांतून येथें येणारे पदार्थ म्हणजे टिन, कथिल, आरसे, प्रवाळ आणि क्वचित् औषधें हे होत. याच्या उलट हिंदुस्थानातून जलमार्गे परदेशांत जाणाऱ्या अनेक वस्तू म्हणजे लोंकर, निरनिराळ्या तऱ्हेचीं रत्नें, रंगीत चादरी, रेशीम, उंची तेलें, मीठ, रग, मसाल्याचे सर्व पदार्थ, इत्यादि. वरील यादीवरून हिंदुस्थानाशीं करण्याच्या व्यापारावर युरोपातील लोकांच्या दैनंदिन गरजा कशा अवलंबून आहेत याची चांगलीच कल्पना येते. आज हिंदुस्थानां-तील सोन्याचा ओघ काळाच्या वक्रगतीमुळें सतत पश्चिमेकडील देशांकडे वहात आहे! याच्या उलट त्या काळाची स्थिति होती आणि रोम, ग्रीस इत्यादि पाश्चात्य देशांतून नौकाच्या द्वारें सोन्याचा ओघ सतत हिंदुस्थानाच्या दिशेनें चाललेला असे! रोमन् इतिहासकार प्लिनी या

स्थितीविषयीं लिहितो, "७०,००० पौंड सोनें दर वर्षी रोममधून हिंदुस्थानात जातें आणि त्याच्याऐवजीं आम्ही निरुपयोगी तेलें दागिने व तलम वस्त्रादि चैनीच्या वस्तु हिंदुस्थानांतून मागावितों!" आफ्रिकेच्या किनाऱ्याला वळसा घालून भारतीय व्यापारी जलमार्गानें किती दूर दूरच्या देशांशीं व्यापार करीत व आपल्या देशाच्या उत्कर्षाची गुरुकिल्ली साध्य करीत याची काहीशी कल्पना वरील स्पृहणीय स्थितीवरून येईल.

वेदकालीं म्हणजे ख्रिस्ती शतकापूर्वी कनिष्ठ ३,००० वर्षांपूर्वी हिंदुस्थान व बाबिलोन याजमध्यें जलमार्गें व्यापारी संबंध अखंडपणें चालू होते असें तज्ज्ञांचें मत आहे. हिंदुस्थानाचें सुप्रसिद्ध 'मजलिन' बाबिलोन शहरांत फार खपत असे. वस्त्रांना 'सिंधु' म्हणून एक नांव जुन्या बाबिलोनिअन कोशांत आढळतें. त्यावरून आर्य लोकांचें किती परस्परसंघटन होतें याचें अनुमान करिता येतें.

## मौर्यकाल (बौद्ध धर्माचा उदय)

मौर्य राजघराण्याचा प्रारभ ख्रिस्तपूर्व २२५ शकापासून होतो. मौर्यांच्या कालात नौका बाधण्याच्या व्यवसायाला राजाश्रय मिळाला आणि त्यास ऊर्जित दशा प्राप्त झाली. लक्षांत घेण्यासारखी गोष्ट ही कीं हा धंदा संपूर्णपणें सरकारच्या ताब्यांत होता आणि तो एक राज्यांग म्हणून मानला जात असे! प्रसिद्ध प्रवासी मेगॅस्थनीस म्हणतो, "हिंदुस्थानांत नौका बांधण्यांत अत्यंत प्रवीण असे कलाकोविद आढळतात. ते सरकारी नोकर असून त्यांना कोणत्याहि खासगी इसमाची नोकरी करण्यास मनाई आहे!" राजाच्या खर्चानें बाधण्यांत आलेलीं जहाजें प्रवाशाना व व्यापाऱ्याना भाड्यानें देण्यांत येत असत. या एकाच गोष्टीवरून व्यापाराला स्वराज्यातील राजाश्रय कसा अत्यत साह्यकारी होतो याची पुरेपूर खात्री पटते! आणि तो राजाश्रय सुटतांच या नौकानयनाच्या व्यवसायाला कशी परागति भोंवत गेली याचीहि कल्पना जाणवल्याविना रहात नाहीं! राजा चंद्रगुप्ताच्या कालांत (ख्रिस्त शकापूर्वी ३२१ ते २९७) या व्यवसायाला परमोच्च उत्कर्ष प्राप्त झालेला होता. याची थोडीशी माहिती 'कौटिलीय अर्थशास्त्र' या चाणक्यकृत सुप्रसिद्ध

-राजकीय ग्रंथावरून खालीं दिली आहे.

चंद्रगुप्ताच्या कालांत आरमारखातें म्हणून राज्याचें एक महत्त्वाचें उपांग मानण्यात येत असे. त्याचा अधिपति म्हणून नावाध्यक्षाची योजना करण्यांत आली होती. त्याचें कर्तव्य म्हणजे समुद्रपर्यटनाच्या व्यवहारावर व अंतस्थ नद्यांवरील जहाजांच्या वाहतुकीवर देखरेख ठेवण्याचें असे. तो प्रत्येक बंदरावर जहाजाकडूनच सरकारी कर वसूल करवीत असे. याप्रमाणें खंडवसुली करण्या-बरोबरच इतर कित्येक कर्तव्येंहि पार पाडण्याचें काम नावाध्यक्षाकडे राही. उदा० त्याच्या बंदराजवळ एखादें तुफानानें फुटलेलें जहाज आल्यास त्यास सर्व साह्य राष्ट्रीय सरकाराकडून देण्यात येई. जहाजाच्या वाहतुकीच्या सुरक्षितपणा-बद्दलसुद्धा या अधिकाऱ्याकडून योग्य काळजी घेण्यात येत असे. मोठमोठ्या नद्यांवरून लहान जहाजाना जाण्यास मुभा नसे. तात्पर्य, नौकानयनाच्या व्यवसायाचें सर्व बाजूंनीं सरक्षण करून त्याचा उत्कर्ष साधण्याच्या कामीं राजा पूर्ण लक्ष घालीत असे असें वरील विवेचनावरून लक्षांत येईल.

राजा अशोकाच्या कालात भारताचा व्यापार सिरिया, इजिप्त, मॅसेडोनिया इत्यादि देशांशीं होता. आणि हा व्यापार वाढत जाण्याचें कारण म्हणजे भारतीय राष्ट्रीय नौकादल हेंच होतें यात शंका नाहीं. प्रसिद्ध काश्मीरी कवि क्षेमेंद्र यानें 'बोधिसत्त्वावधानकल्पलता' नांवाचा एक प्रबंध लिहिला आहे. त्यांत अशोक राजाच्या कारकीर्दीत भारतीय नौकानयन बौद्ध धर्माबरोबरच उत्कर्षाचा उच्च बिंदु गांठून विलसत होतें असें लिहिलें आहे. नाग लोक, म्हणजे चिनी लुटारू, भारतीय व्यापाऱ्यांना कित्येकदां लुबाडीत ! परंतु बौद्ध धर्माचा उदय चिनांत हळू हळू सुरू होतांच या चांचेगिरीस उत्तरोत्तर आळा बसला आणि पूर्वेकडील सर्व देशांत हिंदुस्थानाचा व्यापारी हितसंबंध दृढतर होत गेला.

## आंध्रांचा व कुशनांचा काल

अशोकाच्या कालानंतर उत्तरेंत कुशन राजांचा उदय झाला. याच वेळीं दक्षिणेंत प्रतापी आंध्र राजे राज्य करीत होते. कुशनांच्या कालांत हिंदुस्थानाचे व रोमचे जलमार्गानें झालेले व्यापारी संबंध आघाडीत होते. आणि रोमन संस्कृतीची छाप भारतीय संस्कृतीवर पडण्याच्या

वेतांत होती. इजिप्शियन व ग्रीक व्यापाऱ्यांचा संबंध मसाल्याच्या वस्तु नेण्याच्या मिशानें दक्षिणेकडील आंध्र व्यापाऱ्यांशीं नित्य घडून येत असे. 'यवन' या शब्दानें या पाश्चिमात्य राष्ट्रांना संबोधण्यांत येत असे. त्याची उत्पत्ति मूळ ग्रीक शब्द 'Iaodes' याच्यापासून आहे. त्या काळीं हे ग्रीक यवन मद्य, पितळ, काच इत्यादि वस्तु आंध्र देशांत आणीत आणि त्यांच्या ऐवजीं मिरची, दालचिन्नी इत्यादि मसाल्याचे पदार्थ व हस्तिदंत, मोतीं, रत्नें आणि तलम 'मजलिन' हिंदुस्थानांतून नेत. या ग्रीक व्यापाऱ्याना इजिप्तमधून जुलै महिन्यात हिंदुस्थान गांठण्यास सुमारें चाळीस दिवस लागत. तेथें ते व्यापार करण्याकरिता सुमारें तीन महिने-पर्यंत रहात आणि डिसेंबर किंवा जानेवारी महिन्यात परत आपल्या देशीं जाण्याच्या तयारीस लागत.

हिंदुस्थानाच्या नौकादलाची प्रगति रोमन बादशहा ऑगस्टसच्या काला-पासूनच वाढत गेली आणि हिंदुस्थानातील चैनीच्या वस्तूंपायीं रोमन सरदारांचा सुखविलासीपणा इतका बोकाळूं लागला कीं, या अनिष्ट प्रकारास आळा घालण्याकरितां प्लिनी नावाच्या इतिहासकाराला जाहीर वळसे देऊन त्याच्या डोळ्यांत चरचरीत अंजन घालावें लागलें ! त्या कालीं मलबार किनाऱ्याशीं चालणाऱ्या रोमन व्यापाराविषयीं व्हिन्सेंट स्मिथ हा इंग्रज इतिहासकार म्हणतो, "तामिळ प्रदेशात इतरत्र न मिळ-णाऱ्या अशा तीन वस्तु मिळत होत्या. त्या म्हणजे मिरीं, मोतीं आणि 'बेरील' नांवाचा एक प्रकारचा अमोलिक दगड, या होत. युरोपच्या बाजारपेठात मिऱ्यांना अतिशय मागणी असे. मोत्यां-माणकांच्या व्यापारामुळें दक्षिण हिंदुस्थानाच्या बंदरात परदेशी व्यापारी तळ देऊन रहात ! कोयमुतूर जिल्ह्यांतील पडियूर या गांवीं असलेल्या खाणींतून बेरील नांवाचीं सुंदर रत्नें काढीत आणि त्यांचा खप रोममध्यें अतोनात होत असे ! तामिळ राजांनीं चागलीं आरमारें बाधून ठेवलीं होतीं." पांड्य इत्यादि तामिळ राजाच्या कारकीर्दीत नौकानयनाच्या द्वारें रोमन व तामिळ लोकांचे परस्पर हितसंबंध बरेच जवळ आलेले होते असें खालील वर्णनावरून समजतें. पिले नांवाचा आधुनिक तामिळ लेखक म्हणतो,

"क्वचित् रोमन सैनिकांची नेमणूक तामिळ राजदरबारींहि होत असे! एका पाड्य राजाच्या कारकीर्दीत मदुरा येथील किल्लयाच्या दरवाजाचें रक्षण करण्याकरितां कित्येक रोमन सैनिकांची नेमणूक करण्यांत आली होती!" यावरून म्लेच्छांची नेमणूक करण्याच्या कामीं त्या काळीं धार्मिक आडकाठी नव्हती हें उघड दिसतें! महाभारतातहि राजसूय-यज्ञाच्या प्रसंगीं दिल्ली येथें धर्मराजाकडे अनेक अमोलिक वस्तू घेऊन आलेल्या रोमच्या कारभाऱ्याचा उल्लेख आला आहे!

## गुप्तांचा काल

याच कालात भारतीयाकडून जावाची वसाहत करण्यात आली व भारतीय नौकानयनाच्या धडाडीची परमावधि जगाच्या दृष्टीस भरली! ख्रिस्त शकानंतर सुमारें पाऊणशें वर्षांनीं बंगालातील गुप्तांच्या राज्यांतून कांहीं नाविक जलपर्यटनासाठीं बाहेर पडले आणि नित्यक्रमाप्रमाणें बंगालच्या उपसागरातच घिरट्या मारण्याऐवजीं त्यांनीं आपल्या जहाजाना पुढें पुढें नेलें आणि अखेर जावा द्वीपें गांठलीं! तेथें या धाडसी प्रवाशांनीं वसाहती केल्या आणि तेथून शेंकडों वर्षांपर्यंत हिंदुस्थानाशीं अव्याहतपणें व्यापार केला. जावा द्वीपात आजहि हिंदु देवालयें व मूर्ति दृष्टीस पडतात. तेथील मातृभाषा मलायी असली तरी ऐतिहासिक ग्रंथाची व शिल्पकामांतील कलाकृतींची भाषा बौद्ध म्हणजेच संस्कृताच्या प्राकृतापासून उत्पन्न झालेली आहे! ख्रिस्त शकानंतर चौथ्या शतमानांत एक चिनी प्रवासी म्हणतो, "जावा बेटांत हिंदु लोकाची वसती खचून आहे! हे लोक गगानदीपासून सिंहलद्वीपापर्यंत आणि तेथून जावा तें चीनपर्यंत ब्राह्मण धर्माच्या प्रवाशांनीं भरलेलीं जहाजें नेत असतात!" गुप्ताच्या आणि हर्षवर्धनाच्या कालांत पूर्वेकडील हिंदुस्थानाचा व्यापार चीन-जपानपर्यंत जाऊन पोंचलेला होता. केवळ व्यापाराकरितांच नव्हे तर बौद्ध धर्माच्या प्रसाराकरितांहि अनेक बौद्ध भिक्षू त्या प्रदेशांत नित्य जात असत आणि बुद्धाच्या तत्त्वज्ञानाची महती नीट आकलन करून घेण्यासाठीं आतुर झालेले अनेक चिनी विद्यार्थी हिंदुस्थानांत येत! अशी ही परस्पर-विचारविनिमयाची सांस्कृतिक ये-जा सारखी शेंकडों वर्षेंपर्यंत चालू होती!

भारतीय व्यापार साऱ्या जगाशीं एके काळीं चालत होता आणि या कामीं राष्ट्रीय नौकासामुग्रीचा भरपूर संच चांगला उपयोगी पडत होता याचें विवेचन वर आलें आहे. भारतीय व्यापाराच्या यशाची गुरुकिल्ली खालील तीन महत्त्वाच्या रासायनिक शोधावर अवलंबून होती :—

(१) वस्त्रांना देण्याचा पक्का रंग तयार करण्याची सोपी कृति,

(२) निळीपासून निळा रंग उत्कृष्टपणें तयार करणें,

(३) पोलादाच्या हत्यारांना पाणी देणें.

## मराठ्यांचा काल

मोगलकालात सरकारी आरमार असे. तें बंगालच्या सुभेदाराच्या ताब्यांत असे. याच काळांत प्रतापी शिवाजीच्या आधिपत्याखालीं कोंकणात मराठी आरमार उदयास आलें. शिवाजीमहाराजांनीं प्रतापी चंद्रगुप्त राजाच्या धर्तीवर राष्ट्रीय नौकादल स्थापलें आणि महाराष्ट्रापुरतें या प्राचीन राज्यांगाचें पुनरुज्जीवन केलें. त्यांनीं विजयदुर्ग, कुलाबा, सिंधुदुर्ग, रत्नागिरी, अंजनवेला इत्यादि ठिकाणीं जहाजें बांधण्याचे कारखाने उघडले आणि नौका बाधण्याच्या क्रियेस जोराची चालना दिली. पुढें सन १६९८ सालीं पेशव्यांच्या कालांत या आरमारसंवर्धनाचें काम कानोजी आंग्रे नावाच्या शूर व धाडशी सरदाराकडे सोंपविण्यांत आलें. त्याच्या काळांत मराठा आरमाराची जंजिऱ्याचा शिद्दी, मोगल व इंग्रज या लोकांना फारच दहशत वाटत असे! याप्रमाणें सुमारें अर्ध-शतकावर मराठ्यांच्या आरमाराची प्रगति होत गेली. परंतु पुढें इंग्रजांची सरशी होऊन वाटसन यानें आंग्र्याचा घेरिया येथें पराभव केला. त्या काळापासून मराठ्यांचें राज्य इंग्रजांनीं पोखरण्यास आरंभ केला आणि भारतीयाचा नौकाव्यवसायाचा रवि कायमचा अस्त पावला असें म्हणण्यास हरकत नाहीं.

# कांहीं महाराष्ट्रीय साहित्यसेवकांचे लेखन-व्यवसायाविषयीं मननीय विचार

कित्येकदा होतकरू वाङ्मयसेवकांची स्थिति कुरुक्षेत्रांत लढाईच्या समया मोहानें हताश झालेल्या संशयात्मा अर्जुनाप्रमाणें केविलवाणी होते! हें करूं कीं तें करूं अशा मानसिक टोंचणीच्या स्थितींत कलाविहीन असा आपला पोटाचा व्यवसाय पुरता सोडून देऊन वाङ्मयसेवेला सर्वस्वीं वाहून घ्यावें आणि आपल्या अंतरात्म्याची तळमळ एकदाची तृप्त करावी असें त्यास वारंवार वाटत असतें! अशा क्षुब्ध मनःस्थितींत अनुभवी वडील मंडळीकडे सल्ल्यासाठीं त्यानें धाव घेतल्यास त्यात नवल कसलें! माझीहि जवळ जवळ तीच स्थिति झालेली आहे! म्हणून महाराष्ट्रातील कांही अनुभवी साहित्यसेवकाचीं मतें मीं माझ्या खालील प्रश्नमालिकेला उत्तरें म्हणून १९३३ सालीं मागितलीं. माझी प्रश्नमालिका खालीलप्रमाणें होतीः—

## पत्र

विद्वद्वर्य श्री...............यांस :—

"सादर सा. न. वि. वि. मराठींत थोडीफार साहित्यसेवा करावी असा मीं ध्यासच घेतला आहे! म्हणून आपले तरुणपणींचे एतद्विषयक अनुभव त्रोटकपणें तरी आपण मला कळविल्यास ते मला खचित मार्गदर्शक होतील. मी रहाण्याच्या गांवीं वाङ्मयसेवकांची अशी प्रथाच नसल्या कारणानें अनुभवाकरितां आपल्याकडे पत्रानें मुद्दाम विचारणा करावी लागत आहे. लेखन हा माझा नित्याचा व्यवसाय नाहीं; पण लेखनाची मला अत्यंत

हौस आहे. तरी खालील प्रश्नांचीं उत्तरें पाठविण्याची कृपा करावी.

### प्रश्नमालिका

(१) आपल्या पहिल्या ग्रंथाची रूपरेखा आपण कशी आंखली आणि प्राथमिक लेखनांत कोणता क्रम अनुसरिला ?

(२) माझा अनुभव असा आहे कीं, एकाकी होतकरू लेखकाला एखादा फुटकळ लेखहि लिहिण्याचें लेखनाच्या कंटाळ्यामुळें नसलें तरी श्रमामुळें फार जिवावर येतें ! तीच वाचनाची गोष्ट निराळी व ती लेखनाच्या विरुद्ध आहे ! फावल्या वेळीं नियमित लेखनाची अचूक संवय कशी लावून घ्यावी ? आपले यासंबंधीं अनुभव काय ?

(३) निबध, चरित्र, इतिहास, कादंबरी, काव्य, टीका, तत्त्वज्ञान इत्यादि साहित्यांतील विविध दालनात कोणत्या दालनाविषयीं आपल्याला विशेष आवड आहे हें होतकरू लेखकानें स्वतःशींच निश्चितपणें हेरण्याचें यशस्वी गमक कोणतें ? किंवा जॉर्ज वॉशिंगटन्‌प्रमाणें मिळेल त्या कोंवळ्या झाडावर हातांतील कुऱ्हाडीचा सफाईचा वार चालवून, मगच आपणास जो साधेल असें वाटतें, अशा एखाद्या विषयावर आपले लेखन स्थिर करावें ?

(४) मराठी लेखन आज स्वतंत्र व्यवसाय होऊं शकेल काय ?

(५) आकडेमोडीच्या माझ्या प्रस्तुतच्या व्यवसायात साहित्यसेवेच्या या दुर्दम्य हव्यासामुळें मला चित्ताची एकाग्रता साधेनाशी झाली आहे ! या जाचक मनःस्थितींतून तरून जाण्यास काय करावें ? अशा संशयाच्या समयीं स्वतः आपणास कोणी व कसें उत्तेजन दिलें आणि आपण अशा अडचणीच्या स्थितींतून यशःसिद्धि कशी साधली ?

(६) शेवटीं माझ्या मनोरचनेचा म्हणून एक विशिष्ट धर्म सांगतों कीं, लेखनांतच काय, पण इतर कोणत्याहि व्यवसायात द्रव्य संपादण्याचा ध्यास किंवा लोभ मला नाहीं ! पण द्रव्यलोभ नसला तरी कीर्तिलोभ आहे खरा ! त्याला काय करावें ? आपल्या उत्तराची उत्कंठेनें वाटच पहात आहें. तसदी दिल्याबद्दल माफी असावी. कळावें, लोभ असावा ही वि.''

आपला नम्र,
मारुति अनंत पै

या जाहीर विनंतीला काही नाणावलेल्या साहित्यसेवकाकडून आलेलीं उत्तरें खालीं दिलीं आहेत :—

**(१) श्री. न. चिं. केळकर, बी. ए., एलएल्. बी., पुणें**

प्रत्येक प्रश्नास उत्तर न देता साराशरूपानें उत्तर दिलें तें असें :— "तुमचें पत्र पावलें. त्यावरून तुमच्या आकांक्षेची कल्पना आली. परंतु मला असें वाटतें कीं, हातचें गमावून पळत्यापाठीं लागण्यात पुढें पश्चात्ताप होतो ! आहे हा धंदा साभाळून उरल्या वेळात पुष्कळ वाङ्मयसेवा करिता येईल ! याला **श्री. वि. स. खांडेकर** याचेच उदाहरण लक्षात घ्या ना ! मराठी वाङ्मय हें उपजीविकेचे साधन स्वतंत्र रीतीनें होणें या दिवसात शक्य नाहीं ! तरी, काही तरी पक्की चागली तरतूद झाल्याशिवाय हल्लींची नोकरी सोडूं नये ! हल्लींचा उद्योग साभाळून तुम्हाला रिकामा वेळ बराच मिळत असेल व अवश्य तीं पुस्तकें विकत घेण्याला हौस किंवा व्यसन म्हणूनहि थोडाबहुत पैसा खर्चावा व सर्व प्रकारचें वाङ्मय थोडें थोडें लिहीत जावें. पैसा नाहीं. तरी निदान प्रसिद्धि मिळेल !"

**(२) प्रो. श्री. ना. बनहट्टी, एम्. ए., एलएल. बी., नागपूर**

"मराठींत साहित्यसेवा करावी असा आपल्यास ध्यासच लागला आहे ही फारच आनंदाची गोष्ट आहे. तथापि त्या बाबतींत मजकडून आपणास कसें काय साहाय्य मिळणार हा एक मोठा प्रश्नच आहे !

(१) माझा पहिला ग्रथ 'मयूर-काव्यविवेचन'. त्याचें निबंधात्मक स्वरूप एका सस्थेने निबंधासाठीं दिलेल्या विषयानुसार तयार करण्यात आलें होते. अर्थात् त्या संस्थेनें दिलेल्या विषयानुसार तयारी करून लिहिणें येवढाच कार्यभाग मला करावयाचा होता.

(२) लेखनाचा मलाहि साधारणपणें कंटाळाच आहे ! परंतु उन्नतिकारक व तेजस्वी विचारांचा प्रसार करून तद्द्वारा जनसमाजाची उन्नति घडवून आणावी अशी आकांक्षा लहानपणापासून

माझ्या मनात वसत असल्यामुळे मी तेव्हांपासून थोडेंबहुत लिहूं लागलों. नियमित लेखनाची सवय मला नाहीं. त्यामुळे ती कशी लागते तें सागता येत नाहीं.

(३) वाङ्मयाच्या कोणत्या विशिष्ट दालनाविषयीं स्वतःस विशेष आवड आहे हे ज्याचें त्यास समजण्यास मुळींच अडचण पडूं नये असे मला वाटते. जिलबी, मोतीचूर इत्यादि पक्वान्नांपैकीं कोणतें आपणास आवडतें हें जसें आपल्याला आपोआप समजतें त्याप्रमाणेंच ही गोष्ट आहे असें मला वाटतें.

(४) अगदीं अपवादात्मक उदाहरणाशिवाय इतराच्या बाबतींत मराठी लेखन हा स्वतंत्र धनोत्पादक व्यवसाय आज होऊं शकेल असे मला वाटत नाही ! परंतु आपणास द्रव्य संपादण्याचा हव्यास मुळींच नसल्यामुळे आपल्या दृष्टीनें या प्रश्नाची काही आवश्यकता दिसत नाहीं !

(५) नावडता व्यवसाय आपल्या मनाविरुद्ध पत्करावा लागण्याचा प्रसंग सुदैवानें मजवर आलेला नाहीं ! त्यामुळें या प्रश्नाबाबत मला काही सागता येत नाहीं !

(६) हा प्रश्न नसून आपण केवळ आपला मनोधर्मच यांत सागितला आहे. तो सर्वस्वीं आपणास भूषणास्पद असाच आहे !

या उत्तराचा आपणास कितपत उपयोग होईल हें आपणच पाहावयाचें आहे ! ”

### (३) प्रा. माधव त्र्यंबक पटवर्धन, एम्. ए., कोल्हापूर

(१) “होतकरू लेखकाला द्रव्यलोभ नसावा; कीर्तिलोभ असेना ! सवङ्ग वर्तमानपत्री प्रसिद्धीची हांव धरूं नका म्हणजे झालें ! आपल्यासारख्या मनःस्थितींत आपण अमेरिकन मिशनरी Reverend Todd कृत “Students' Manual” हें पुस्तक वाचावें. म्हणजे आपणास तेणेंकरून काही उपयोग होतो तर पाहा.

(२) साहित्याच्या कोणत्या शाखेस होतकरू लेखकानें स्वतःस वाहून घेतलें असतां यश गांठता येईल हें आधींच कोणाला

कळतें ! लेखकानें ज्ञानलालसा धरून विविध विषयाचें वाचन चालू ठेवावें म्हणजे त्याची आवड त्याला आपोआप कळेल आणि त्या त्या आवडीच्या विषयांचा व्यासंग असला म्हणजे आपणाला नवें काय करावयाचें हेंहि आपोआप दिसूं लागेल.

(३) कांही तरी नवीन सांगण्यासारखें स्वतःजवळ असलें म्हणजे तें सांगावें कसें हें शिकावें लागत नाहीं ! मनुष्य अनुभवानें व अभ्यासानें उत्तरोत्तर शिकत जातो. त्या विषयाचे जे प्रेमी असतात त्याच्या सहवासात योग्य तें परीक्षण होतें व उत्तेजन मिळतें.

(४) मराठी लेखन हा आज तरी स्वतंत्र व्यवसाय होऊ शकत नाहीं ! पोटाची नोकरी सोडून कोणी शुद्ध वाङ्मयनिर्मितीकडे वळूं नये ! आणि सार्वजनिक अभिरुचीच्या आहारीं जावें लागूं नये अशी कोणाची इच्छा असेल तर (वाङ्मयाव्यतिरिक्त) पोटाचा धंदा निराळाच असलेला बरा ! 'वाङ्मयसेवकाचें मन पोटाच्या रूक्ष व नीरस व्यवसायात तितपत रमत नाहीं !' असें तुम्ही लिहितां. पण पोटाच्या धंद्यात मन क्वचित्‌च रमतें ! पण त्याशिवाय तर गत्यंतर नसतें ! वाचन लेखन हा हौशीचा व्यवसाय असावा. म्हणजे त्यात आनंद व विश्रांति दोनहि मिळतात. 'संपादकीय' काम तुम्हाला दुरून मोठें मोहक दिसतें. पण त्यात तर वाचन लेखन हौशीनें करायला सवडच सांपडत नाहीं ! तुम्हाला आज शारदेची सेवा लेखनानें नीट करितां येत नसेल तर ती वाचनानें करा ! पुस्तकप्रपंच आजच बेसुमार वाढला आहे ! मी आज कांही तरी नवीन सांगणार आहें का याचा प्रत्येकानें आपल्या मनाशीं प्रथम नीट विचार केला पाहिजे ! कंटाळूं नका ! वाचा ! आवेग आला तरच लिहा ! प्रसिद्धीची हांव किंवा चिंता करूं नका ! आणि नोकरी सोडूं नका ! ! एवढेंच आज पत्रोत्तरीं सांगतों."

**(४) प्रो. चिंतामण विनायक जोशी, एम्. ए., बडोदें**

"आपला पोटाचा व्यवसाय मुख्य समजून त्यांतच राहावें.

लेखन इत्यादि करमणुकीचें साधन समजावे. पोटाचा व्यवसाय टाकून लेखनांत पडणारांचें कल्याण कधींहि झालेलें नाहीं !''

(५) श्री. वासुदेव विनायक जोशी, बी.ए., एल्एल्.बी., बडोदें

(१) ''सतत लिहीत असावें. मोटा ग्रंथ हाती घेण्यापेक्षा प्रथम लेख, लघुकथा, विनोदी लेख, मोठ्या चुरचुरीत भाषेत लिहावे. त्यानीं माणूस जेवढा पुढें येतो तेवढा पुस्तकांनीं येत नाहीं !

(२) पुस्तक लिहिणे मेहनतीचे आहे आणि ते छापून काढणे फारच खर्चाचें आहे ! लेखनावर पैसा मिळण्याची आशाच नको !

(३) स्वतःशींच शातपणें चिन्तन करून आपल्या मनोव्यापारांचें सूक्ष्मपणें पृथःकरण करावें म्हणजे होतकरू लेखक उत्तम लिहूं शकतील !

(४) सुरवातीस पाहिजे तर काही चागल्या इंग्रजी किंवा पर भाषेंतील लेखांचीं मराठींत भाषातरें करावींत. 'जात्यावर बसलें म्हणजे ओवी आटवते' तसें लिहिण्यास बसलें म्हणजे मजकूर आटवतो ! मात्र श्रम पुष्कळच करावे लागतात !''

(६) कै. वाग्भट नारायण देशपांडे, बी.ए., एल्एल्.बी., सातारा

(१) ''अजून मी स्वतंत्र ग्रंथ लिहिलाच नाहीं ! माझीं प्रसिद्ध झालेलीं तीन पुस्तकें माझ्या पूर्वी प्रसिद्ध झालेल्या लेखाचे व कथाचे संग्रह होत.

(२) ज्याला लेखनाबद्दल खरें प्रेम आहे व ज्याच्या मनात लेखनाचे विषयहि सारखे घोळत आहेत त्याला लेखन त्रासाचे वाटणार नाहीं ! माझा धंदा व आयुष्यक्रम असे आहेत कीं त्यात लेखनासाठीं मला नियमित वेळ ठेवणें शक्यच होत नाहीं ! मला वेळ मिळेल तसें आणि अगत्य पडेल तसें मी लेखन करीत असतों.

(३) निबंध, इतिहास, चरित्र, कादंबरी यांपैकीं आपणास इष्ट व साधणारें कोणतें हें स्वतःशींच ओळखणें होतकरू लेखकास अवघड का वाटावें हें मला समजत नाहीं ! आपल्यास काय चांगलें लिहिता येईल हें प्रत्येकास आपोआपच समजतें ! मात्र, एखाद्यास एक साधलें म्हणून दुसरें साधणार नाहीं असें नाहीं ! परिश्रमानें मनुष्यास लेखनांतील हरएक शाखा व प्रकार साध्य करून घेणें शक्य आहे ! तथापि कवी व कादंबरीकार हे मात्र सामान्यतः उपजतच असावे लागतात !

(४) सद्यःस्थितींत तरी मराठी लेखन हा स्वतंत्र व्यवसाय होऊं शकेल असें मला वाटत नाहीं ! मराठी नाटककार हे एक याला अपवाद होत ! तरी सुद्धा त्यांचे द्रव्यार्जन पाश्चात्य देशांतील लेखकाच्या पुढें कांहींच नाहीं !

(५) माझ्या लेखनात मला अगदी प्रथम कै. द. ब. पारसनीस यांनीं प्रोत्साहन दिलें. श्री. न. चिं. केळकर यांचें व पुढें कै. ह. ना. आपटे यांचें मार्गदर्शकत्व मला मिळालें. या तिघांशीं माझा जो निकट संबंध आला त्याचा मला पुष्कळच फायदा झाला ! सुदैवानें मला लेखनाच्या बाबतींत अडचणी अशा कधीं आल्या नाहींत व त्यामुळें अडचणींतून मार्ग काढण्याचाहि प्रसंग आला नाहीं ! अन्य व्यवसायामुळें व्हावें तसें लेखन करिता येत नाहीं हीच अडचण म्हटली तर तिच्यातून मात्र मला अद्याप मार्ग सापडलेला नाहीं !

(६) द्रव्यलोभ व कीर्तिलोभ यांपैकी कीर्तिलोभ हा प्रत्येकाला असतोच. कारण तो मनुष्यस्वभावच आहे. तेव्हा त्याबद्दल कोणी कोणास कमी लेखण्याचें कारण नाहीं ! मात्र, लक्ष्यांत इतकेंच ठेवावयाचें कीं, केवळ कीर्तीच्या मागें लागण्यानें कीर्ति मिळत नाहीं ! कीर्तिलोभ हा लेखनाचा हेतु असला तरी अध्ययन व परिश्रम हा त्याचा पाया होय ! हा पाया भक्कम भरला व त्यावर लेखनाची इमारत उभारली म्हणजे कीर्तिलाभ आपोआप होईल ! कीर्तीच्या मागें धांवण्याचें कारण नाहीं !"

### (७) प्रो. शंकर दामोदर पेंडसे, एम्. ए., नागपूर

(१) "माझ्या पहिल्या ग्रंथाचा विषय अनेक वर्षे माझ्या डोक्यात घोळत होता ! प्रथमतः उपनिषदांचें व वेदान्त ग्रंथांचें व कांहीं अंशीं वेदांचेंहि अध्ययन झाल्यानंतर मला मराठी कवितेचें अध्ययन करण्याचा योग आला. तेव्हां विचाराची एक मोठी परंपरा आढळून आली ! त्यावर अनेक वर्षे विचार करता करता हे विचार एकदाचे लिहावे असें मनात येऊन कालानुक्रमानें ग्रंथाची रूपरेषा आखली. नागपूरच्या "नवभारत ग्रंथमाले"नें प्रकाशित केलेलें माझें पहिलें पुस्तक ("महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास") लिहिण्यास मला फार थोडा काळ लागला खरा ! पण त्या विषयावरील वाचन व विचार अनेक वर्षे अहेतुक व पुढें कांहीं वर्षें ग्रंथ लिहिण्याच्या बुद्धीनें चालले होते.

(२) लेखनाचा कंटाळा येतो असें आपण लिहिता. माझा तसा अनुभव नाहीं ! कॉलेजांत शिकविण्याचें काम फार असल्यामुळें वाचनलेखनाला मला पाहिजे तितका भरपूर वेळ मिळत नाहीं ही माझी तक्रार आहे ! लेखनाची होतकरू लेखकास खरीखुरी हौस असेल तर त्याच्या आवडत्या विषयावर वाचन, विचार व लेखन करण्यास त्यास वास्तविक कंटाळा येऊं नये असें मला वाटतें !

(३) ज्या विषयावर लिहिण्याचा कंटाळा येतो तो आपला आवडता विषय नाहीं असें खुशाल समजावें ! प्रयोग करून पहाण्याचें कारण नाहीं ! मनुष्य आपल्या आवडत्या विषयावरच लिहितो व वाचतो !

(४) कांहीं अपवाद सोडल्यास मराठी लेखन हा स्वतंत्र व्यवसाय होऊं शकण्यासारखी परिस्थिति आज नाहीं !

(५) आवड एक आणि व्यवसाय दुसरा अशी माझी स्थिति सुदैवानें झाली नाहीं ! कॉलेजांत शिकविणें हें बरेंचसें बौद्धिक श्रमाचें काम असल्यामुळें तें लेखनाला परंपरेनें उपयोगी पडतें मात्र, त्यामुळें प्रत्यक्ष लेखनास वेळ मिळत नाहीं !

(६) कीर्तिलोभ मनुष्यांकडून मोठीं कामें करवितो. तो वाईट नाहीं. "मना सज्जना कीर्तिरूपें उरावें" असें समर्थ रामदासांनींच सागितलें आहे. तारुण्यांत तर हा लोभ अवश्य पाहिजे. मात्र वृद्धपणीं तो सोडावा. पण या लोभाच्याच आहारीं नेमकें जाऊन दुःखीकष्टी होऊं नये! आपल्याकडून होईल तितकें कार्य मात्र अखंड करीत असावें."

(८) श्री. गजानन त्र्यंबक माडखोलकर, नागपूर

"सा. न. वि. वि. आपलें पत्र पोंचलें. त्याला काय उत्तर लिहावें हें सुचेना. कारण आपण विचारता त्या प्रश्नाचीं उत्तरें लिहिण्याइतका माझा अनुभव नाहीं, अधिकार नाहीं व वयहि नाहीं! मीहि एक आपल्यासारखाच होतकरू—फार तर थोडा पुढें आलेला म्हणा—लेखक आहें. मात्र एक गोष्ट आपणास मी निश्चित लिहूं शकेन. ती हीच कीं, मराठींत लेखन हा स्वतंत्र व्यवसाय होऊं शकत नाहीं! तो दुय्यम व्यवसाय म्हणूनच करावा लागेल! आपल्याप्रमाणेंच मलाहि लिहिण्यास त्रास पडतो व मनाची एकाग्रता साधणें कठिण जाते! पण या गोष्टी सरावाच्या आहेत असें मला वाटतें.

विलंबाबद्दल क्षमा असावी. लोभ असावा ही वि."

---

## दोघां साहित्यसेवकांचे लेखनविषयक अनुभव

कामशेतचे सुप्रसिद्ध रियासतकार रावसाहेब गोविंद सखाराम सरदेसाई, बी. ए. आणि शिरोड्याचे सुप्रसिद्ध टीकाकार व लघुकथालेखक श्री. विष्णु सखाराम खांडेकर यांच्याशी मीं पत्रव्यवहार करून त्यांचे लेखनविषयक अनुभव कळविण्याविषयीं विनंति केली होती. ते अनुभव मजप्रमाणेंच इतर होतकरू लेखकांना मननीय वाटतील असें वाटल्यावरून माझी प्रश्नावली व मिळा आलेलीं उत्तरें खालीं दिलीं आहेत :—

(१)

कारवार,

ता. ३-८-१९३४

रा. सा. गो. स. सरदेसाई यांस सादर सा. न. वि. वि. माहे ऑगष्ट १९३४ च्या ताज्या "किर्लोस्कर" मासिकांत आलेली आपली उद्‌बोधक व मननीय मुलाखत वाचली. ती वाचून मनात क्षोभ उत्पन्न झाला हें नम्रपणे सांगणे भाग आहे.

(२) जून १९३४ च्या मुंबईच्या "नवजीवन" मासिकांत बडोद्याचे श्री. वि. स. वाकसकर यांनीं आपण प्रकाशित केलेल्या "श्यामकांताचीं पत्रें" या पुस्तकाची विस्तृत परीक्षा केली आहे. असल्या प्रेमळ व शुद्ध भावनाप्रधान सत्पुत्रास आपण अकाली आचवल्याबद्दल माझ्या डोळयांत अश्रु आले आणि माझ्या हृदयाच्या सहानुभवी तारेंत सहकंप झाला खरा! असो.

आपल्या मोठ्या दुःखांत एक अल्प प्राणीहि सहभागी आहे असें समजावें.

(३) या पत्राचे कारण हें की, माझ्या वाचनलेखनाच्या कामीं एकाच विषयावर चित्ताची दृढ एकाग्रता करणें अजून मला साधलेलें नाहीं! कुठल्याहि पुस्तकातील एखादा विषय दुसरा हातीं न घेतां पिच्छा पुरवून यशस्वीपणें कसा हाताळावा? सुबोध रीतीनें सांगाल का? मी त्वरित शक्य तों अंमलांत आणीन म्हणतों.

(४) मी एका वाङ्मयविषयक स्वतंत्र प्रबंधाकरिता टांचणें गोळा करीत आहें आणि त्या विषयावर नित्य सागोपांग विचार करीत आहें. पण घरात वाङ्मयप्रेमी असा मी एकटाच असल्यामुळें व समान हाशीचा स्नेही जवळपास नसल्यामुळें व जातीनें लिहिण्याच्याहि किचकट श्रमांमुळें, माझें लेखन विचाराच्या वेगानें अपेक्षेइतकें सुरळीत व त्वरित न होता मागें मागें रेंगाळत आहे! यातून मार्ग कसा काढूं? सांगाल का? साहित्यशास्त्रावरील व जीवनविषयक चरित्रभागावरील निरनिराळी पुस्तकें मी अत्यंत आवडीनें वाचीत असतों. आणि तेणेंकरून नवविचारांची एक अंधुक मालिका मनात उद्भवते! पण प्रत्यक्ष परिणामीं तिची योजना करणें मला जड जाते! विचाराच्या या ओघापासून प्रत्यक्ष हुकमी लेखनाचा साठा कसा तयार करावा! हें सांगून मला ऋणी करावें.

(५) आता माझी दिनचर्या सांगण्याची नम्रपणें परवानगी मागतों. माझें वय ३० आहे. मी निरोगी असलों तरी यष्टीनें साधारणच असल्यामुळें आणि येथील हवा फारच उष्ण असल्यामुळें निवळ बौद्धिक श्रमाचीं कामें करण्याचा उत्साह व फलनिष्पत्ति यांचें, निदान माझ्या बाबतींत तरी, व्यस्त प्रमाण पडतें! ...... पण आवडीच्या भिन्नतेमुळें, ग्रहणशक्तीच्या पंगुपणामुळें नव्हे, आकड्यांचें तेंच तेंच काम करणें खरोखर मला मनापासून आवडत नाहीं! किंबहुना तें जिवावरच येतें!!

## माझी दिनचर्या

घड्याळाच्या गजरानें पहाटे पाच वाजता मी उठतों. नंतर शौच मुखमार्जन व विहिरीवर थंड पाण्यानें स्नान करीपर्यंत सुमारें पावणेसहा वाजतात. नंतर जवळच असलेल्या समुद्रकिनाऱ्यावर फिरून येईपर्यंत सुमारें सव्वासात ते साडेसात वाजतात. साडेसात ते आठपर्यंत घरीं गप्पागोष्टी केल्यानंतर सकाळीं ८ ते ११ कचेरींत काम असतें. पुढें ११ ते १२ पर्यंत वर्तमानपत्रवाचन. १२ ते १२-३० भोजन. १२-३० ते १ अंमळ शय्येवर पडून विश्राति. १ ते २ लेखन वाचन. २ ते २-३० संभापण. दुपारीं २-३० ते ६-३० फिरून कचेरींत काम. ६-३० ते ७-३० पर्यंत समुद्र किनाऱ्यावर रपेट. रात्रौ ७-३० ते ८ वाचन. ८ ते ८-३० भोजन. ८-४५ ते १० कित्येकदा लेखन अनेकदा वाचन. पण त्यातहि वाचनाचा मोह इतका अनावर होतो कीं, त्याचा प्रभाव नकळत माझ्या लेखनावर होऊन त्यानें माझ्या लेखनांकुराला मूठमाती दिली आहे असा माझा कटु अनुभव आहे! रात्रौ १० ते १०-३० च्या दरम्यान मी झोंपतों. सांगण्याचा मुद्दा इतकाच कीं, वर्तमानपत्रांच्या मासिकांच्या व नियतकालिकाच्या वाचनात माझे नित्य दोन अडीच तास सहज मोडतात! आतां हें वर्तमानपत्री वाचन उपयुक्त नव्हे का? या वाचनाला आपल्या अनुभविक सल्ल्याप्रमाणें नित्य किमान किती वेळ वेंचल्यास ध्येयांतील प्रमाणबद्धता साधेल? सांगाल का?

(६) आपली दिनचर्या मी वाचली व स्थूलपणें अजमावलीहि. तथापि माझ्या खाजगी संग्रहाकरिता अधिक सूक्ष्मपणें आपल्या दिनचर्येचा आराखडा कालखंडें व त्यांनीं विभागले जाणारे विषय यांची यादी पाठवाल का? विशेषतः तदनुरूप वर्तन करण्यांत आपण जी चिकाटी दाखवितां ती आपल्या अंगी कशी बाणली तिचे उद्बोधक अनुभव लिहून कळवाल तर ते मला खचित मार्गदर्शक होतील!

(७) होतकरू लेखकानें उतावळ्या प्रसिद्धिलालसेपासून सतत रक्षण करून घेण्याचे यशस्वी उपाय कोणते ? या बाबतींत आपण कोणता महत्त्वाचा सल्ला द्याल ?

(८) कटाक्षानें साहित्यसेवक होऊं इच्छिणारा इसम लग्न करून घेऊन गृहस्थाश्रमात पडल्यास त्याच्या निर्मळ कलोपासनेंत व्यत्यय येईल का ? गत विद्यार्थिदशा मला अत्यंत भाग्याची व सुखाची वाटते !

(९) धार्मिक व ईश्वरविषयक अधिष्ठान दैनिक दिनचर्येंत कसें योजावें ? या बाबतींत आपण कोणता उपदेश कराल ?

(१०) प्रथम मराठींत अल्प तरी साहित्यसेवा माझ्या हातून शक्य तितक्या लौकर घडावी म्हणून माझा जीव तिळतिळ तुटत आहे ! म्हणून अलीकडे माझी मनःशांति ढळून चित्ताला संपूर्ण समाधान व आनंद मिळतनाशीं झालीं आहेत !

(११) तरी या चंचल संशयग्रस्त व भेदक मनःस्थितींतून मला वर काढण्यासाठीं आपण एक हात तरी पुढें कराल अशी मला उमेद आहे.

(१२) तसेंच आदर्श साहित्यसेवकाचे जीवितविषयक निरतिशय समाधानाचें व आनंदाचें ध्येय कोणतें असावें तेंहि कळविण्याची कृपा करावी. खरोखर पूर्वी मी काही अंशीं निरिच्छ व समाधानी होतों ! पण कोणत्या वेळीं हें साहित्यसेवेचें वेड किंवा गायना-सारखें नित्यशः डोकें खाणारें हें व्यसन मला बाधून त्यानें माझ्या शांतींत माती कालविली देव जाणे !

आपलें उत्तर सविस्तर पण सवडीप्रमाणें यावें. कारण, तेणेंकरून कदाचित् माझ्या वाट चुकलेल्या वंचित आयुष्यक्रमाला निराळें इष्ट वळण लागेल आणि माझ्या आगामी प्रबंधासहि अनायासें बहुमोल अनुभवाचा ठेवा लाभेल. कळावें, लो. अ. ही वि.”

आपला नम्र,

**मारुति अनंत पै**

कामशेत,
ता. ९-८-१९३४

**रा. सा. गो. स. सरदेसाई यांचें उत्तरः—**

"**सा. न. वि. वि.** तुमचे तारीख ३-८-१९३४ चे पत्र पोंचलें. वर्तमानपत्रांत एखाद्या माणसाचे गतकालीन अनुभव किंवा व्यवसाय प्रसिद्ध होतात ते वाचतांना कितीहि मनोरंजक वाटले तरी व्यवहारांत त्यांचा इतरास विशेष उपयोग होतो असे मला वाटत नाहीं ! शिवाजीचें चरित्र इतकें उज्ज्वल व सर्वांच्या परिचयाचें असता आज प्रत्यक्ष राजकारणात त्याचा कितीसा उपयोग लोकांत होत आहे ? अशा गोष्टी वाचाव्या आणि आपण शक्य तितकें त्यांचें अनुकरण करावें यापलीकडे त्याची किंमत मला वाटत नाहीं ! मानवी स्वभावाची रचनाच अशी आहे कीं, प्रत्येकाचा आयुष्यक्रम ज्याच्या त्याच्या कर्तृत्वानें बनणारा आहे ! दुसऱ्याकडून त्याला फारशी मदत होण्यासारखी नाही ! दुसरे असे कीं, माझ्या आयुष्यक्रमात लोकोत्तर असे काही नाहीं ! तुमच्यासारख्या 'सामान्य' जनांसारखाच मीहि एक आहें ! आपल्या आयुष्यात प्रत्येक इसम काहीना काही उद्योग करीतच असतो. परंतु त्या उद्योगाची फलप्राप्ति मात्र आपल्या हातची नसते ! भगवद्गीतेंतील तत्त्व यासंबंधात विशेष लक्षात ठेवण्यासारखे आहे. उद्योग करणें आपल्या हातचें आहे; यशापयश आपल्या हातांत नाही !

तथापि तुमची पृच्छा ध्यानात घेऊन आणि हल्लींची परिस्थिति लक्षात घेऊन मला इतकेंच सागता येईल की, हल्लीं प्रत्येक विषय व व्यवसाय अत्यंत विशिष्ट अभ्यासाने साध्य होणारा आहे. नुसता लेखनव्यवसाय हा एक विषय नाहीं ! मी इतिहासाचा अभ्यास करतों. त्यात सुद्धा शिवाजीचा काल, पेशव्याचा काल, त्यांतील आणखी पोटविभाग अशा लहान लहान क्षेत्राचे विशिष्ट अभ्यासक बनले आहेत ! एकालाच सर्वच गोष्टी साध्य होण्याजोग्या नाहींत ! तेव्हां मला असे वाटते कीं, तुम्हीं तुमच्या आवडीपैकीं एक

लहानसा विषय आखून घेऊन त्यावरचें सर्व साहित्य जमवावें आणि तेवढ्याचाच अत्यंत उत्कटत्वानें नीट अभ्यास करावा ! भाराभर गोष्टी वाचूं नयेत ! अशा वाचनापासून मनोरंजन होईल, पण हातांतील कामाला मुळींच मदत होणार नाहीं !

आतां अशा एकाच विषयावर कदाचित् तुमचें मन एकदम बसणार नाहीं ! म्हणून एकाग्रता करण्यास एकच उपाय आहे ! तो असा कीं, ज्याप्रमाणें जोर, बैठका, नमस्कार इत्यादि आपण नेमानें थोडथोडे वाढवीत जातो, त्याप्रमाणेच आपल्या त्या आवडीच्या विषयावर या आठवड्यांत एक तास, त्यापुढील आठवड्यांत सव्वा तास, नंतर दीड तास अशा क्रमानें हळूहळू अभ्यास वाढवीत जावा ! म्हणजे वर्ष सहा महिन्यांत फरक दिसून येईल ! एकदा आवड उत्पन्न झाली म्हणजे सर्व काम चोख होईल आणि असें चोख काम होऊं लागलें म्हणजे लोकांत त्याची किंमतहि वाढेल. मात्र, मनाचा निश्चय इतका पाहिजे कीं, कालच्याहून आज कांहीं तरी जास्त काम करावें, कमी करूं नये ! डोंगर चढतांना डोक्यावर ओझें घेऊन जितकी उंची आपण गांठूं तिच्यांतून खालीं येऊं नये ! जास्त वर जातां न आलें तरी निदान आहे तेवढी उंची कायम ठेवावी !

वेळापत्रक इत्यादि गोष्टी आपल्या व्यवसायाला उपयोगी अशा आपोआप बनत जातात. एकाच्या दुसऱ्याला उपयोगी पडतील अशा नाहींत.

मुख्य गोष्ट म्हणजे मनाचा पक्का निश्चय करून प्रत्येक क्षण उपयुक्त कामांत खर्च करीत जावा.

लहान कामे लहान वेळात होऊ शकतात.

यापेक्षा तुमच्या प्रश्नांना पत्रोपत्रीं जास्त खुलाशाचीं उत्तरें देतां येत नाहींत.

तरी माझ्या लिहिण्याबद्दल आपण निराश होऊं नये.

समक्ष भेट झाली असती तर मोकळेपणानें सविस्तर बोलतां आलें असतें. जास्त काय कळवावें ? लोभ असावा, ही विनंति.''

आपला,
**गो. स. सरदेसाई**

(२)

कारवार,
ता. ११-६-१९३४

''श्री. विष्णु सखाराम खांडेकर यांस सादर सा. न. वि. वि. मागें 'प्रतिभा' पाक्षिकात श्री. ग. त्र्यं. माडखोलकर यानीं लिहिलेलें आपलें त्रोटक शब्दचित्र वाचलें.....................
आपण मजपेक्षा वयानें ज्ञानानें व अनुभवानें थोर असल्यामुळें खालील प्रश्नांचीं सविस्तर उत्तरें देण्याची कृपा करावी.

**प्रश्न**

(पण यक्षप्रश्न नव्हेत हो !)

(१) आपल्या पोटाचा व्यवसाय कोणता ?

(२) त्यात दररोज किती वेळ मोडतो ?

(३) या व्यवसायांतून लेखनवाचनाला मुबलक वेळ केव्हा व किती काढता ?

(४) मराठी व इंग्रजी वाङ्मयाचें वाचन किती वर्षांपासून चालू आहे ?

(५) वाचनाचें 'व्यसन' आपणास असल्यास आपली वाचनपद्धति कोणती ?

(६) आपले विशेष आवडीचे विषय कोणते ?

(७) आपण स्थूलपणें दैनिक वेळापत्रक आखलें असल्यास त्याची रूपरेषा कोणती ?

(८) आपण कोणत्या जागीं व वेळीं आपलें वाचन व विशेषतः लेखन करतां ?

(९) आपल्या लिखाणाची पूर्वतयारी कशी काय करता ?

(१०) या कामी आपणास कसकशा अडचणी आल्या किंबहुना येत आहेत ? त्यांतून आपण यशःसिद्धि कशी साधलीत ?

(११) मीहि यशस्वी गद्यलेखक होण्याची प्रबल आकांक्षा मनांत बाळगतों ! पण येथें सहानुभवी वाङ्मयव्यसनी 'तरुण' किंवा 'वरुण' फारसे नसल्यामुळें फार एकलकोंडें वाटते ! आणि कोणी अनुभवी व सहृदय लेखक दुरून का होईना थोडें फार उत्तेजन देईल का अशी मोठी उत्कंठा वाटते !

अशा गोष्टी समक्ष संभाषणात बिनचूक व विनाकष्ट सुटतात हें खरें ! आणि आपली संमति असल्यास केव्हां तरी शिरोड्यास येऊन आपल्या सहवास-संभाषण-सुखाचा लाभ घ्यावा अशींहि एक कल्पना मनाला चाटून जाते !............पण त्याच्यापूर्वी पत्रव्यवहारानें थोडा-फार परिचय झाल्यास त्याचेंहि पूर्वतयारीच्या दृष्टीनें एक प्रकारचें महत्त्व असतें, नव्हे का ?........................ ...................................मी विचारलेल्या वरील प्रश्नाशिवाय आपले लेखनविषयक इतर अनुभव असतील तर तेहि अंतर्मुख दृष्टीनें त्रोटकपणें कळविण्याची कृपा करावी. तसदीबद्दल माफी असावी. कळावें, लो. अ. ही विनंति."

आपला नम्र,
मारुति अनंत पै

श्री. वि. स. खांडेकर यांचें उत्तर :—

श्री

शिरोडें,
ता. ८-७-१९३४

त्रोटक दिनचर्या

"आपलें पत्र पोंचलें. कार्यबाहुल्य व प्रकृतिदौर्बल्य यांच्या

कात्रींत सापडल्यामुळे वेळेवर उत्तर गेलें नाही ! आज त्रोटक लिहीत आहें तें मान्य करून घ्यावें.

## उत्तरें

(१) } पोटाचा व्यवसाय, शिक्षकाचा धंदा. दररोज ११ ते ५
(२) } व शिवाय घरीं १ ते १॥ तास त्यांत जातो.

(३) मुबलक वेळ मिळत नाहीं ! डोळे फार अधू ! त्यामुळें रात्रीं वाचणें शक्य नाही ! सवड मिळेल तसें वाचन करतों. पण तें अपुरें ठरतें !

(४) } मराठी वाङ्मय वयाच्या सहाव्या वर्षापासून व इंग्रजी
(५) } १२-१३ व्या वर्षापासून वाचूं लागलों. वाचलेल्यावर शक्य तर विचार करतों. वाचनाचें व्यसन आहे, पण तहान भागण्या सारखी परिस्थिति नाहीं !

(६) माझ्या आवडीचे विषय वाङ्मयापैकीं नाट्य, कथा, टीका, निबंध. इतर, इतिहास व तत्त्वज्ञान.

## दिनचर्या

(७) सकाळीं ७ ते १० लेखन, वाचन. १० ते ११ स्नान, भोजन. ११ ते ५ शाळा. ५ ते ७ फिरणें व वर्तमानपत्रवाचन. ७ ते १० भोजन, कौटुंबिक गप्पा इत्यादि.

(८) लेखनाची जागा घरांतील निवांत खोली. लेखनाची वेळ बहुधा सकाळची. दुपारहि चालते.

(९) शक्य असल्यास आधीं सर्व दृष्टींनीं विचार करतों.

(१०) वेळ, पुस्तकें व प्रकृतिस्वास्थ्याचा अभाव याच तीन मुख्य अडचणी ! त्यापैकीं कुठलीच दूर करणें माझ्या हातीं नाहीं ! शिरोड्यासारख्या सामान्य खेड्यात रहात असल्यामुळें भोंवतालचें वाङ्मयिक वातावरणाहे नाहीं !.........................
आपण सवड काढून शिरोड्यास आलांत तर मला आनंद होईल ! जें वर त्रोटक लिहिलें आहे तें सविस्तर बोलतां येईल.

जीवन हा संग्राम खरा! पण समरांगणावर सुद्धां शिपाईगडी गप्पागोष्टी करण्याइतकी फुरसत काढतातच कीं नाहीं ?

क. लो. अ. ही वि."

आपला,
वि. स. खांडेकर

---

# जीवितांतील आशानिराशा

( लेखक :— सहानुभवी )

मुंबईच्या "नवजीवन" मासिकाच्या सप्टेंबर १९३४ च्या अंकात 'बलभीम'नामधारी लेखकानें "दोघां साहित्यसेवकांचे लेखन-विषयक अनुभव" संकलित केले आहेत. त्यांत त्यानें प्रारंभीं आपल्या उदासीन मनःस्थितीस अनुसरून तिचें प्रांजल मनानें वर्णन केलें आहे. त्या उदासीनतेचें निवारण कसें करता येईल याविषयीं सुचलेले कांही विचार थोडक्यात या लेखात गोंवण्याचें योजिलें आहे.

कोणीहि आपल्या मनाचा उपजत कल पाहून त्याप्रमाणें जर चरितार्थाचा पेशा पतकरण्याचें धैर्य प्रारंभीं दाखविलें तर प्रवाहाच्या अनुकूल गतीनें पोहण्याचें भाग्य त्याला लाभतें. जाणून बुजून प्रवाहाच्या विरुद्ध दिशेनें पोहण्याचा प्रयत्न केल्यास पोहण्याच्या गतीला प्रवाहाच्या गतीचा अडथळा झाल्यावांचून कसा राहील !

जातिवंत साहित्यसेवकाच्या मनोधर्माला पोषक असे प्रमुख व्यवसाय दोन. एक शिक्षकाचा व दुसरा संपादकाचा. पैकीं पहिलाच अधिक प्रभावी ठरतो. याचें प्रत्यंतर कित्येक प्रसिद्ध साहित्यसेवकांचीं चरित्रें पाहिल्यास आढळेल.

तथापि अवश्य त्या मनोधैर्याच्या अभावीं माणसाच्या तरुणपणीं जीवन बऱ्या वाईट कोंदणाच्या साच्यांत अडकतें तेंच पुढें नियोजित ध्येय सिद्धीला तारक किंवा मारक ठरतें. श्री. न. चिं. केळकर यांनीं आपल्या

अंगांतील लेखनगुण वयाच्या ऐन चोवीसाव्या वर्षी ओळखून टिळकांच्या 'केसरी-मराठा' पत्राना तत्परतेनें येऊन मिळण्यात अभिनंदनीय धैर्य व औचित्य दाखविले यात शंका नाहीं.

कीर्तिलालसेच्या मोहानें 'बलभीमा'ची बुद्धि स्वार्थी झालेली दिसते. त्याला कौटुंबिक प्रेमाची पारखहि झालेली दिसत नाहीं ! "जीवनावीण मीन जैसा" तशी त्याची प्रेमावाचून अशी अनुकंपनीय मनःस्थिति झाली असावी. या चराचर सृष्टींत प्रत्यहीं ज्या अनेक घटना घडत आहेत त्याचा मूलमंत्र कोणता ? प्रेम ! म्हणून भावनाविहीन किंवा भावनांची बुद्ध्या गळचेपी करणाऱ्या इसमाला—त्याने बुद्धीचीच तेवढी कितीहि जोपासना केली तरी—हृदयात शांति कशी लाभणार !

प्रेमाचें विवेचन येथें थोडेंसें करूं. निर्मल मानवी अंतःकरण हा स्फटिकांनीं बांधलेला कोरडा हौद असें कल्पिल्यास त्यात कृतज्ञता व प्रेम या विरुद्ध नळांतून वाहणाऱ्या पाण्याच्या अखंड प्रवाहापासून जीवनाधाराचें पाणी एकत्र साठतें असें मानतां येईल. परंतु प्रेम व कृतज्ञता या प्रतियोगी मनोविकारांचे झरे अज्ञानानें किंवा हट्टानें आटविले गेले तर त्यातून अर्थात् प्रेमाचे व कृतज्ञतेचे संयुक्त प्रवाह अंतःकरणात वाहणार नाहींत ! आणि मग तें अंतःकरण निष्प्रेम व कोरडें राहून विवंचनेचे उष्ण निःश्वास सोडल्यावांचून कसें राहील !

'बलभीम' आपल्या दिनचर्येत ग्वाही देतो कीं, त्याच्या प्रस्तुतच्या गृहस्थाश्रमापेक्षा बालपणींची विद्यार्थिदशा अधिक सुखाची होती ! उघडच आहे. कसलीहि जबाबदारी मागें नसतां मौजेनें खेळण्याबागडण्यांत 'रम्य तें बालपण' जात असतें ! म्हणून गृहस्थाश्रमाची क्रमप्राप्त जबाबदारी कोणाला चुकली आहे ? प्रथमपासून आत्यंतिक ध्येयसिद्धीच्या पायीं ब्रह्मचर्याश्रमात दिवस कंठणाऱ्या इतिहासाचार्य राजवाड्यांसारख्यांची गोष्ट निराळी. पण हीं उदाहरणें केवळ अपवादादाखल समजण्यांत येतात.

पण मला येथें 'बलभीमा'ला असें उघड विचारावेंसें वाटतें कीं, कलासिद्धीची तळमळ किंवा ध्येयाची महत्त्वाकांक्षा त्याला प्रथम केव्हां

स्फुरली ? त्याच्या लग्नापूर्वी कीं लग्नानंतर ? तशी ती पूर्वीच स्फुरली असल्यास आणि त्याच्या भावी 'अर्ध्या भागीदारा'वर प्रेम करून गृहस्थाश्रमाची नूतन जबाबदारी चोख रीतीनें पार पाडण्याइतकी त्याच्या मनाची खंबीरी दिसली नसल्यास, त्यानें लग्न तरी कां करून घेतलें आणि दुसऱ्या एका जिवाचें लोढणे आपल्या गळ्यात कायमचें कां अडकून घेतलें ?

दुसऱ्या पक्षीं त्याच्या विवाहानंतर कलाविषयक अगर ग्रंथकर्तृत्वविषयक दुर्दम्य तळमळ त्याला जाणवूं लागलेली असल्यास त्याला कौटुंबिक प्रेमाची ही नूतन जबाबदारी नीटपणें पार पाडल्यावांचून मुळीं गत्यंतर नाहीं असेंच कोणीहि म्हणेल. आपल्या अंगावर जबाबदारी घेण्यापूर्वी प्रत्येकानें नीट साधक बाधक विचार करावा. एकदा तशी ती पत्करली म्हणजे तिचा अकारण त्याग करूं पहाणें हें दुर्बल मनाचें उघड लक्षणच नव्हे तर काय ? म्हणून 'बलभीमा'ला थोडक्यांत असा सल्ला द्यावासा वाटतो कीं, "प्रेमभावनाविना ध्येयसिद्धि नाहीं ! तर ऊठ ! आजपासून सर्व भूतमात्रावर निर्मल प्रेम करण्यास व हंसण्यास प्रथम शीक !"

विशुद्ध प्रेमाच्या संवेदनेला पारखा होण्यात बलभीमाच्या स्वत्वप्रधान मनोवृत्तीकडून मोठें पाप होत आहे असें मला वाटतें. कारण, रा. सा. गोविंदराव सरदेसाई याना लिहिलेल्या पत्रात तो म्हणतो — "मराठींत साहित्यसेवा करावी म्हणून माझा जीव तिळतिळ तुटत आहे !" इत्यादि. भावी ग्रंथकर्तृत्वाच्या हौसेनें व कीर्तिपरिमलाच्या नुसत्या कल्पनेनें 'बलभीमा'च्या अंतःकरणांत कदाचित् अभिमानाच्या ऊर्मि उठत असतील किंवा डोळ्यांत आनंदाश्रु उभे रहात असतील ! पण त्याच वेळीं त्याचा 'अर्धा भागीदार' त्याच्या प्रेमपूर्ण मृदुवचनाला पारखा होऊन आपल्या नशिबाला बोल देत एकांतीं कदाचित् निराशेचे उष्ण अश्रु ढाळीत असेल याची वाट काय ? स्थलकालादि बंधनांनीं व्यापलेल्या थोर थोर ग्रंथकारांविषयीं 'बलभीमा'ला प्रत्यहीं प्रेमादराचे अनेक मूक विचार सुचत असतील; पण कदाचित् मागें त्याची दुर्दैवी गृहिणी इतर प्रेमळ व संमीलित सुखी जोडप्यांचीं उदाहरणें पाहून समाधानाचा, आणि आपणास या जन्मीं कधीं काळीं तो पवित्र आनंद चाखण्याचें भाग्य

लाभेल का म्हणून सोत्कंठ तळमळीचा, असे दुहेरी निःश्वास एकदांच सोडीत असेल! आता 'बलभीम' पुढें मागें कदाचित् लौकिकवान् साहित्य-सेवक होईल असें क्षणभर गृहीत धरलें तरी त्या भावी अवस्थेचा वासनानंद त्यानें एकट्यानेंच स्वार्थी अधाशीपणानें लुटण्यात न्याय तो कोठला! त्या आनंदात त्याचे आईबाप, पत्नी, भाऊबहिणी, बालकें, सन्मित्र व शेवटीं चहाते अशा क्रमानें जितक्या अधिक व्यक्ति सामावतील तितक्या प्रमाणांत त्या आनंदवर्तुळाचा परिघ वाढून त्याची थोरवी खुलून दिसेल! याचें कारण असें कीं, आनंद ही चीजच अशी अपूर्व आहे कीं ती दुसऱ्यांस देता कमी न होतां उलट विद्येप्रमाणें वाढतच असते! चेतन व अचेतन वस्तूंविषयीं जिज्ञासा उत्पन्न होणें व त्यांचा परिचय करूं पहाणें ही प्रथम पायरी कल्पिल्यास तेथून पुढें त्याच्याविषयीं निर्मल प्रेम करण्यास शिकणें ही दुसरी पायरी म्हणतां येईल. तिसरी पायरी म्हणजे आपण ज्याच्याविषयीं आपुलकीचा प्रेमभाव मनात बाळगतों त्यांच्याकडून कृतज्ञतेचा उलट अहेर स्वीकारणें ही होय. याच न्यायानें अ-नें ब-वर केलेलें निरतिशय प्रेम व ब-नें अ-वर केलेली आपुलकीची कृतज्ञता यांचा सुंदर मिलाफ झाल्यास त्याच्या आनंदाचे किरण एकमेकाकडे परिवर्तित होऊन त्यांची उज्ज्वल प्रभा सभोंवार फाकेल यांत काय शंका!

वासनायुक्त व वासनारहित हे प्रेमाचे दोन प्रमुख प्रकार होत. वैषयिक प्रेमच वासनायुक्त असतें आणि इतर प्रेमाचे प्रकार वासनारहित असतात असें नाहीं. तसेंच केवळ कीर्तिध्येयाच्याच अभिलाषेनें विद्या शिकून व वाचन-लेखन करून पुढें कोणाची ग्रंथकार होण्याची आकांक्षा प्रबळ झाल्यास ती वासनायुक्त प्रेमाच्या सदरांतच पडते. म्हणून गीता सांगते कीं, 'कर्तृत्व करा, पण तें वासना व आसक्ति मनात न बाळगता करा.' म्हणून 'बलभीमा'सारख्या एकलकोंड्या ध्येयासक्तांनीं आपल्या मित्रपरिवाराचें क्षेत्र वाढविण्याचा कसोशीनें प्रयत्न करावा. आणि याला तर प्रवासासारखें दुसरें साधन नाहीं. प्रसिद्ध साहित्यसेवकांच्या पदरमोड करून गांठीभेटी घेणें आणि त्यांच्या दिनचर्येचें व बुद्धिमत्तेचें प्रत्यक्ष निरीक्षण करून त्यांतील आपणास झेपणारा भाग अलग उचलणें, हीं कार्यें होतकरू

लेखकाचें असून तों 'बलभीमानेंाह उचलल्यास वावगें होणार नाही; झाला तर त्याला अमूप फायदाच होईल अशी मला खात्री वाटते.

आता वासनारहित प्रेमाचा येथें ऊहापोह करतों. ज्याला इंग्रजीत 'Platonic love' म्हणतात तें स्त्रीपुरुषामधील कामवासनारहित गुणनिष्ठ प्रेम प्रभावी झाल्यास वाङ्मयसेवकाची उदासीनता पार घालवूं शकते.

सुप्रसिद्ध आंग्ल पंडित जॉन्सन् व थ्रेल बाई व विश्रुत कादंबरीकार कै.ह.ना. आपटे व कानिटकर पत्नी याजमधील प्रेमसंबंध असा वासनारहित व वाङ्मय-निष्ठ होता आणि म्हणून तो त्याच्या आयुष्यात समाधानाचे तरंग उधळ-विण्यास कारणीभूत झाला. सुशिक्षित समाजात असलें वाङ्मयनिष्ठ उच्च धर्तीचें प्रेम विपुल प्रमाणात आढळल्यास नवल नाहीं. म्हणून प्रत्येक होतकरू लेखकानें एका तरी रसिक व सुशिक्षित महिलेच्या अशा प्रेमाची सहानुभूति शक्य तों संपादण्याचा प्रयत्न करावा; निंदकानीं वृथा नांवें ठेवल्यास फारशी चिंता करूं नये !

प्रेम आणि त्याग याचा संबंध निकटचा आहे. प्रेमाच्या साफल्याकरितां माणसानें आपल्या आवडत्या गुणधर्माचा किंवा वस्तूचा क्षणभर त्याग करण्यात त्याला उच्च प्रकारचा आनंद वाटला पाहिजे. किंबहुना अशा त्यागाच्या तपस्येशिवाय प्रेमाची विशुद्धि तळपत नाहीं! सोनें जसें आगींत टाकल्यानें त्याची कीड झडून तें विशुद्ध बनतें, त्याप्रमाणें प्रेम त्यागाच्या दिव्यातून तावून सुलाखून सात्त्विक होऊन बाहेर पडतें. आपले आईबाप भावंडें, बोबडे बोल बोलणारीं चिमुकलीं बालकें, यांच्यापाशीं नेमानें प्रेमाचे चार गोड बोल बोलण्याकरिता वाङ्मयाच्या परिशीलनातून जी थोडीशी बचत एखादा लेखक करूं शकेल, तीच त्याच्या प्रेमापायीं केलेल्या वाङ्मय-त्यागाची पहिली पायरी म्हणता येईल. तिच्यावरून चढून जातां जातां शेवटीं त्याला परम शांतीचा लाभ होईल यांत काय संशय ! विवेकरूपी अंकुश ज्या अपराधी मनाना नित्य टोंचीत असतो असें म्हणतात, त्या अंकुशाची तीक्ष्ण धार बोथट करण्याचें सामर्थ्य त्यागाच्या ढालींतच आहे हें निश्चित. महाकवि कालिदासकृत अभिज्ञान शाकुंतल नाटक, राजा दुष्यंतानें शकुंतलेवर स्थिर केलेल्या अशा त्यागोत्तर दिव्य व प्रभावी

प्रेमाची महती कंठरवानें सांगणारें उज्ज्वल कथानकच नव्हे काय ! प्रभु रामचंद्रानेंहि रावणाकडून सीतेची सुटका करून आणण्यापूर्वी आपले विलासी राजेपणाचे चोचले पुरते टाळलेच ना !

कीर्तीच्या प्राप्तीपासून मिळणारें कौतुकसमाधान अळवावरच्या पाण्याच्या थेंबाप्रमाणें क्षणिक व चंचल असतें ! पण लोकसेवेपासून प्रसवणाऱ्या निःस्वार्थी सुख-समाधानाची सर मात्र आली तर धीरगंभीर महासागरालाच येणार !

प्रत्येकानें बुद्धीच्या जोपासनेबरोबरच–कांकणभर जास्तच–अंतःकरणाची प्रेमपूर्वक विचारपूस अवश्य करायला हवी ! विवेकबुद्धि हा अतिशय कांटेकोर व निष्ठुर न्यायाधीश होय ! मानवी मनाच्या दोन अवस्था कल्पिल्या तर त्यांपैकीं पहिल्या अवस्थेतील बहिर्मुख मनोविकार फारसा सारासार विवेक करण्याच्या भरीस न पडतां कोणत्याहि बऱ्या वाईट कृती तात्काल करण्यास धांवतो. पण अंतर्मुख मनोविकार बहिर्मुख मनानें केलेल्या कृतींचें औचित्य व सरसनिरसता प्रशांत वेळीं आत्मनिरीक्षणानें पडताळतो. मनाच्या या द्विविध क्रिया एकमेकींच्या पूरक मानल्या जातात म्हणून त्यांची जोपासना करणें अवश्य आहे. धनलोभ व कीर्तिलोभ यापैकीं सरसनीरस कोणता हें कांटेकोरपणानें अजमावण्याच्या भरीस कोणी फारसें पडूं नये. कारण धनलोभ काय, कीर्तिलोभ काय, वासनेचींच तीं निरनिराळीं अंगें होत ! त्याचा अतिरेक केव्हाहि वाईटच.

बरें, केवळ कीर्तीचीच प्रबल महत्त्वाकांक्षा मनात धरली आणि थोड्या फार प्रमाणांत तिचा लाभ झाला असें समजूं. म्हणून कीर्तीपायीं फुरफुरणाऱ्या माणसाला खरें समाधान लाभतें का ? मुळींच नाहीं ! एका संस्कृत सुभाषितात म्हटलेलें आहे कीं, 'माणसाच्या बहिर्मुख आकांक्षा त्यांच्या फलाच्या सेवनानें तृप्त होत नाहींत. उलटपक्षीं, तूप टाकल्यानें जसा अग्नि, तशा त्या पुनःपुनः उचल करून जोरावतच असतात !'

फ्रान्स देशात पास्कल नांवाचा थोर गणिती व तत्त्वज्ञानी सुमारें चारशें वर्षांमागें होऊन गेला. केवळ कीर्तिलालसेपायीं इहलोकींच्या खऱ्या जीवितध्येयाची वाट चुकलेल्या अभागी इसमांना उद्देशून तो एके ठिकाणीं

म्हणतो—"मोठेपणा किंवा लोकप्रियता मिळविण्यासाठीं आमचे प्रयत्न व विचार, आमची वेळीं अवेळीं मुखस्तुति करणाराचें एक मोहक आवरण आमच्यासभोंवतीं उत्पन्न करण्याच्या दिशेने नित्यशः चाललेले असतात; पण या बहिर्मुख दृष्टीमुळें तर अंतर्दृष्टीनें आमच्या अंतरंगाचे सूक्ष्म निरीक्षण करण्याच्या कामीं प्रतिबंधच होतो; आणि ही घटना तर सर्वस्वीं अनिष्ट आहे !"

लोकप्रियता किंवा कीर्तीचा अनिवार हव्यास या मुद्यांकडे वळतां या विषयाचें थोडेसें अधिक विवेचन करावेंसें वाटतें. अतीव स्तुतिप्रियतेमुळें सार्वजनिक अभिरुचीच्या आहारीं जाऊन जे आपले बेत रचितात त्यांस अंतीं समाधान लाभणें कठिणच. कारण कीर्तीचा तळपणारा उज्ज्वल मुकुट कांटेरी आहे आणि जो जो तो मुकुट आपल्या मस्तकीं धारण करूं इच्छितो त्याला त्याच्या आंत दडलेले तीक्ष्ण काटे बोंचल्यावांचून खचित रहाणार नाहींत ! किंवा असेंहि म्हणूं कीं, कीर्ति ही कांचनमृगासारखी ! मोहाच्या योगानें ती हातीं आली असें दिसता दिसतां ती नेमकी दूरच पळत सुटते ! दुरून एखाद्या थोर इसमाला भरपूर कीर्तिलाभ झाला असें दिसत असलें तरी त्याच्या जवळ जाऊन अमळ निरखून पाहिल्यास मत्सराचे व ईर्षेचे किती तरी डाग त्याला कलंकित करीत असलेले आढळतील ! कारण कीर्तीच्या शिखरावर उतावीळपणें आरूढ होऊं पहाणारा माणूस झाला तरी 'माणूस हा केव्हांहि स्खलनशीलच' या न्यायानें एखादी चूक तो करणार नाहीं असें नाहीं ! पण जी चूक सामान्य जनांनीं केल्यास सहजीं पचते तीच थोर माणसांनीं अहेतुकपणें केली तरी ती त्यांस क्षणार्धांत अत्युच्च कीर्तिशिखरापासून लोकनिंदेच्या खोल गर्तेत तात्काल लोटून देण्यास समर्थ ठरते !

धन मिळविण्यापेक्षां त्याची नीट जोपासना करणे किती तरी कठीण म्हणतात ! कीर्तीची गोष्टहि तशीच. एखाद्या ग्रंथकारानें एक दोन चांगले ग्रंथ लिहून काही प्रमाणांत कीर्ति मिळविली असें समजूं. पण तेवढ्यानें त्याच्यासंबंधीं वाचकांच्या आकांक्षा पुऱ्या होतात का ! उलट त्या 'अग्नितुपा'च्या न्यायानें एकसारख्या वाढतच असतात ! त्यानें त्यांच्याहिपेक्षां सरस

व उत्तमोत्तम ग्रंथ लिहून आपली कीर्ति एकसारखी वाढवीत राहिलें पाहिजे अशीच बहुतेक वाचकांची अपेक्षा असते! बरें, या आकांक्षा तरी शाश्वत स्वरूपाच्या असतात का? छे! त्यांपैकीं बहुतेक स्तुतिपाठकांच्या आकांक्षा कालाच्या गतिमान् प्रवाहाप्रमाणें नित्य बदलतच असतात आणि त्यांच्या या बदलत्या आकाक्षाप्रमाणें जो इसम ग्रंथ रचील तोच त्याचा आवडता बनून पूर्वपसंतीचा ग्रंथकार सहजच मागें पडतो! आणि म्हणूनच जनतेच्या रसिकतेच्या कल्पना व अभिजात परीक्षणाच्या कसोट्या किती चंचल व बदलत्या असतात हें पाहून तरी अशाकडून शाश्वत कीर्तीची अस्थानीं अपेक्षा कोणी फारशी करूं नये! तशी केल्यास 'बलभीमा'वर आल्याप्रमाणेंच इतरावरहि पस्तावण्याचा प्रसंग यावयाचा! तात्पर्य, आत्मसंतुष्ट रहाण्याचें सोडून माणूस अप्राप्य आकांक्षेच्या आहारी गेला म्हणजे निराशा व विवंचना याची जोड त्याला हटकून बाधायची हें ठरलेलें! म्हणून अशा दिखाऊ लोकस्तुतीच्या वर्षावानें अतिमात्र कंटाळलेला प्रसिद्ध रोमन चक्रवर्ती ज्यूलियस सीझर नेहमी कांहीशा व्याजोक्तीने म्हणे, "मला मिळाली तेवढी कीर्ति बस्स झाली!"

शर्यतींतील घोड्याप्रमाणें केवळ कीर्तीच्याच मागें वर्तुळाकार धांवून घामाघूम होणाऱ्यांनीं हे लक्षांत धरावें कीं, आपल्या मनाजोगती भरपूर स्तुति झाल्यास मनास समाधान होईल हें खरें; पण त्यांत आपल्या अपेक्षेपेक्षा तसूभरहि कमतरता झाली तर तेवढ्यानेंहि त्याच्या मनःशांतीचा फेर ढळून ती चलित झाल्याविना रहाणार नाहीं! मानवी मनाची अंतर्मुख वृत्ति एकदा का सैल सोडली कीं ती लगाम सुटलेल्या घोड्याप्रमाणे स्वैर भटकत सुटते आणि मग तिला कसलाहि प्रतिबंध झाला तरी तो तितकीच दुखःकारी होते. समजा, कीर्तीच्या अभिलाषेनें एखाद्यानें आपल्यापरी एक चांगलासा ग्रंथ लिहिला किंवा उत्कृष्ट भाषण केलें. पण रसिकांच्या बदलत्या व चोखंदळ अभिरुचिला तीं पुरून न राहिल्यास ते त्याचा गौरव करणार नाहींत! परंतु मनोविकाराच्याच आधीन झालेला तरुण—अहंकारानें म्हणा, मोहानें म्हणा—आपल्या पहिल्या कलाकृतीविषयी सदा इतका कमालीचा कीर्तिलोलुप असावयाचा कीं, कीर्तीच्या खऱ्या

साधनाकडे लक्ष पुरविण्यास तो नेमका विसरत असतो ! आणि आपल्या आवाक्याबाहेरचे उंच उंच मनोरे एकदम ढासळल्यामुळें यशाच्या शिखराऐवजीं निराशेचा खंदक मात्र पदरीं यावा ना म्हणून आपल्याशींच विवंचना करीत सुटतो ! केवळ कीर्ति हेच ध्येयसर्वस्व आपल्या डोळ्या-पुढें ठेवून अहोरात्र त्याच्या चिंतनातच दंग असणारा अविवेकी इसम तिच्या अप्राप्तीने तितक्याच प्रमाणात खंगत असतो ! तात्पर्य, कल्पनेचे घोडे चौफेर उधळले म्हणजे कीर्तीच्या चंचल वायूबरोबरच निराशेची विपुल धूळहि इतस्ततः उडत रहाणार !

केवळ कीर्तीच्याच मागें लागून वृद्धपणीं पस्तावणाऱ्या व एकांतीं दुःखाश्रु ढाळणाऱ्या एका थोर ग्रंथकाराचे खालील उद्गार मननीय वाटतील ! तो वृद्ध ग्रंथकार नेहमीं म्हणत असे कीं, "अरेरे, माझ्या तरुणपणीं जे मीं इतके ग्रंथ लिहिले त्याचा मला आतां नीट बोधहि न व्हावा ना !"

श्री. न. चिं. केळकर यांची निदान रसिक, वाङ्मयीन टीकाकार म्हणून कीर्ति निरपवाद असूनहि तिलाहि नाक मुरडणाऱ्या कांहीं व्यक्ति निघाल्याच ना !

कीर्तीवरच सारी भिस्त ठेवूं नये याचें एक प्रमुख कारण म्हणजे तिला ग्रासूं पहाणारा मत्सर हें होय. स्कॉटलंडचा वकील बॉसवेल यानें जॉनसनचें सुप्रसिद्ध प्रचंड चरित्र लिहिलें खरें. परंतु तो उल्लू व उथळ स्कॉट म्हणून आणि त्याच्यांत विचारस्वातंत्र्य नाहीं म्हणून सत्यासत्याचा विशेष कांटेकोर निर्वाळा न धरितां, जिव्हाईनें सजवून दिमाखानें अलं-कारिक भाषेंत लेखन करणारे लॉर्ड मेकॉलेसारखे इंग्रज वाग्भट निघालेच कीं नाहीं ! पण हा प्रातिक मत्सराचा धुरळा उडून आज स्थिरस्थावर झाल्यानंतर बॉसवेलचें 'जॉनसन चारित्र' साऱ्या जगांतील चरित्रवाङ्मयात पहिल्या रांगेत उज्ज्वल प्रभेने तळपत आहेच ना ! परंतु स्वतः मेकॉलेच्या ऐतिहासिक निबंधातील कांहीं आकर्षक सिद्धांतांत मात्र सत्याच्या कसोटीच्या दृष्टीनें बरेंच वैगुण्य आढळतें असें सत्यान्वेषी आधुनिक इति-हाससंशोधक सांगतात ! मग बॉसवेलची सत्यनिष्ठ एकांगी कीर्ति बरी कीं मेकॉलेची कटु सत्याविषयीं तितपत संपूर्ण चाड न बाळगणारी बहुरंगी

कीर्ति बरी याचा कोणींहि विचार करण्यासारखा नाहीं काय! पाश्चात्य लेखकांनीं लिहिलेले कांहीं उत्तम व निवडक चरित्रग्रंथ जरी वाचले तरी एखाद्या होतकरू प्रतिभावान् लेखकाची उगवती विमल कीर्ति मलिन करण्याकरिता निंदक कसकसे निंद्य बेत रचीत असतात याविषयीं कित्येक उदाहरणें आढळतात.

अशा चरित्रांच्या परिशीलनानें एक गोष्ट प्रामुख्यानें मनात भरते कीं, कीर्तीचा उंच डोंगर चढून जावयाचें असल्यास माणसानें नेमानें तो थोडा थोडा चढून क्रमेण त्याचा माथा गांठला पाहिजे. घाईनें पहिल्या खेपेसच तो डोंगर पुरा चढून जाण्याचा उतावीळ अट्टाहास त्यानें केल्यास तो मध्येच थकून घेरी येऊन पडेल, नाहीं का? जी गोष्ट अवघड डोंगर चढून जाण्याची तीच ग्रंथकर्तृत्वाची. एखादा लहानसा निबंधहि लेखकाला एकाच बैठकींत योजून लिहून संपविण्याचें बहुधा अशक्यप्रायच असतें; मग तसा अट्टाहास धरणाऱ्यांना दुःख व आपत्ति भोगाव्या लागणार हें निसर्गाला अनुसरूनच आहे. नवीन घर बांधताना ज्याप्रमाणें दगड, माती, वाळू, चुना, लाकूड इत्यादि अवश्य त्या सामुग्रीचा प्रथम यथाप्रमाण संग्रह करून त्यांचा जसा प्रत्यहीं लागेल तसा उपयोग करतात व फिरून झाल्या कामाचें वारंवार निरीक्षण व परीक्षण करतात, तीच गोष्ट किचकट लेखनाची समजावी. म्हणून उत्तुंग कीर्तिशिखराकडे आशाळभूतपणें डोळे लावून चाळीस पन्नास वर्षांच्या अवधीनंतर मिळण्याचें अनुभवजन्य पक्क ज्ञानविज्ञान एक दोन वर्षांतच मिळविण्याचा हांवरेपणा कोणी करूं नये! आणि तसा तो करून स्वतः इतराचा हास्यविषय बनूं नये!

प्रसिद्ध ग्रीक वक्ता डिमॉस्थेनीस यानें वक्तृत्वाची अवघड कला हस्तगत करण्याकरिता केलेल्या प्रयत्नाना तर सीमा नसावी असें त्याच्या चरित्रावरून दिसून येतें! आपला आवाज कोता असल्यामुळें तो भरीव व पल्लेदार होण्याकरितां तो घोंघावणाऱ्या सागराच्या तीरावर जाऊन तोंडांत लहान लहान गोटे घाली आणि ओरडून व हातवारे करून नेमानें वक्तृत्वाचे पाठ घेई असें सांगतात! संपूर्ण एकाग्रता लाभल्यावांचून बुद्धीला

स्वतंत्र विचार स्फुरत नाहींत. म्हणून अशा एकाग्र चिंतनाकरितां त्यानें खास काळोखी गुहा योजिली होती आणि तींत बसून तो कित्येक तासचे तास दीर्घ विचार करीत असे ! अंधारांत डोळ्याचा उपयोग करण्याचे साधनच नसल्यामुळें, तितक्या प्रमाणात डोळ्याची व इतर इंद्रियांची शक्ति बुद्धीस मिळून ती अतिशय सूक्ष्म व प्रभावी होऊं शकते. म्हणून जेव्हां तेव्हां इतराकडे त्याच्या अनुभवाचा सल्ला घेण्याकरितां कोणी वणवण हिंडण्यापेक्षां स्वानुभव व मार्मिक निरीक्षण याच्या जोरावर आत्मोन्नति साधूं पहाणें अधिक चिरस्थायी होईल. कारण यश ही चीजच अशी आहे कीं, साक्षेपानें तिच्यामागें एकसारखें लागल्यानें ती उलट्या दिशेनें दूर पळतच सुटते ! पण जो कोणी यशाविषयी पूर्णपणें निश्चिंत राहून आपलें कर्तव्य निरलसपणें करतो त्याच्यावर कालांतराने यश प्रसन्न होऊन आपण होऊन चालत येत असतें ! आणि एकदा यशाचा प्रवेश झाला म्हणजे कीर्ति त्याच्या पाठोपाठ सावलीप्रमाणें ठरलेली !

'बलभीमा'सारख्या उदासीन इसमानें आपल्या चित्तस्वास्थ्याकरिता निदान एक तरी समानशील उत्तम मित्र निवडून काढून त्याच्यापाशीं आपलीं नित्याचीं सुखदुःखें ओतलीं आणि त्यानें त्याजवर सहानुभूतीचा प्रेमळ फुंकर घातला म्हणजे त्याच्या उदासीन मनाला खास समाधान वाटेल. उलट, मनात येणारे बरे वाईट विचार दुसऱ्यास सांगून त्याचा पाट वाहूं दिला नाहीं तर कोंडून गुदमरल्यासारखें होईल ! अशा विचारांना मोकळेपणानें वाहण्यास सोडण्याचे प्रकार दोनः—पहिला भाषणद्वारा व दुसरा लेखनद्वारा. पैकीं दुसरा प्रकार गौण व सर्वांनाच साधणारा नसतो. म्हणून बहुजनसमाजाला पहिल्याची कास धरावी लागल्यास नवल नाहीं.

'बलभीमा'च्या दिनचर्येकडे पाहिले तर तींत व्यायामाचा अभाव आढळतो. प्रकृति धडधाकट असली तरच मन निरोगी व तार्जेतवानें रहातें. एरवीं मन व बुद्धि कितीहि संपन्न असलीं तरी शरीर व्याधीनें सदा खंगलेलें असल्यास तीं वाया जातात ! हा अनुभव कोणाला नाहीं !

बुद्धीचाच प्रश्न निघाला म्हणून ज्ञाते लोकांचा महत्त्वाचा एक

अनुभव येथें नमूद करावासा वाटतो कीं, कलासक्तीपायीं बुद्धीचीच तेवढी जोपासना करून हृदयाची आबाळ कोणी करूं नये ! बुद्धि व हृदय यांची सारखीच जोपासना केली पाहिजे. कारण, बुद्धि व हृदय याचें सम प्रमाण तराजूच्या पारड्यांत पडलें तरच विवेकाचा सूक्ष्मोत्तम काटा फेर न दाखविता मधोमध निश्चल राहील आणि पारडीं वर खालीं न होता शांतीचा सुवर्णमध्य गांठतील ! जर का पारड्यात किंचित्‌हि कमी अधिक झालें तर त्याचें आंदोलन झाल्याविना रहाणार नाहीं ! मग मानसिक शांति कोठली ?

व्यायामाबरोबरच 'बलभीमा'च्या दिनक्रमांत संगीताचा व ईशप्रार्थनेचाहि अभाव दिसून येतो ! मनाला शांति लाभण्याकरितां प्रातःकालच्या व सायकालच्या प्रार्थनेची महती मोठी असून ती नेमानें करीत राहिल्यास 'बलभीमा'ला क्रमेण चित्तस्वास्थ्य लाभेल अशी खात्री वाटते.

जे कवि केवळ 'कलेकरितां कला' या दंडकाच्या परिपूर्तीसाठीं निसर्गाची नक्कल करून कवनें रचतात पण त्यातील अणुरेणूंत विनटलेल्या त्या दयाघन परमेश्वराचे गुणानुवाद गाण्यास विसरतात ते एकापरी हतभागीच होत ! कारण "अशा इसमांना निसर्गांतील ललित दृश्यें दिसलीं तरी त्यांतील गूढ चित्तत्त्व दिसत नसतें हेंच खरें !" परमेश्वररूपी ज्या आद्य सनातन चित्तत्त्वाचीं जगांतील साऱ्या चेतन व अचेतन वस्तू इवलीशीं प्रतीकें आहेत, त्या तत्त्वापाशीं आकृष्ट होऊन व अंतीं त्यांतच विलीन होऊन गेल्यावांचून मानवाला शांतीचा अखंड व अव्यय ठेवा कसा लाभणार ?

आतां कीर्तिलोभाऐवजीं किंवा धनलोभाऐवजीं कोणते लोभ कर्तव्य आहेत ? या प्रश्नाला उत्तर असें कीं, परमेश्वरभक्तीचा लोभ व जनसेवेकरतां व विश्वप्रेमाकरता पदरच्या आवडत्या तत्त्वांचा निःस्वार्थपणें त्याग करण्याचा लोभ 'बलभीमा'सारख्या वाट चुकलेल्या हताश इसमांनीं मनांत बाळगून, तदनुरूप आपल्या दिनचर्येंत कसोशीनें आचरण करण्याचा शिकस्तीचा प्रयत्न केल्यास त्यांच्या तळमळणाऱ्या आत्म्यांना शांति लाभेल. मानवी जीविताचें खरें ध्येय म्हणजे ईश्वरी साक्षात्कारापासून भक्तिरूपी निर्मल उदकाचा जो अखंड झरा झुळुझुळु वहात असतो त्याचें

थोडें थोडें प्राशन करण्याचा मनीं लोभ बाळगणें हाच होय! म्हणून 'बलभीम' अज्ञानानें व मोहानें हें खरें जीवितध्येय विसरला आणि वाट चुकून भलत्याच वाटेनें चालला असे त्याच्या दिनचर्येवरून स्पष्ट सांगता येईल.

सुप्रसिद्ध अमेरिकन मिशनरी रे. जॉन टॉड म्हणतो :—

"ज्यांचें हृदय त्या परम करुणामय परमेश्वराप्रत भक्तिपूर्वक अर्पण झालें त्यांच्या मनाला कुविचार, क्षुल्लक कल्पना किंवा दुष्ट मसलती शिवत देखील नसतात! कारण तें पूर्वींच विश्वबंधुत्वानें व प्रेमभावनेनें तुडुंब भरलेलें असून त्यात मुळीं जागाच शिल्लक नसते!

तुम्ही (१) श्रीमतीची आकांक्षा मनांत बाळगूनहि शेवटीं अकिंचन होऊन मराल!

(२) कीर्तिलोभरूपी अंकुश तुम्हाला जन्मभर टोंचूनहि कीर्ति कशी ती नीट पहाण्याचें भाग्य तुम्हाला उभ्या जन्मींहि लाभणार नाहीं!

(३) निःसत्त्व करमणुकीचा प्याला तुम्ही ओठापाशीं नेताच कदाचित् त्याचे तुकडे तुकडेहि होतील! आणि

(४) तुमच्या लोभाचे आप्तस्वकीय कदाचित् तुमचा त्यागहि करतील! पण जर का तुम्हीं परमेश्वराविषयीं दृढ प्रेम व भक्ति मनांत बाळगाल तर वरील दृष्टांतांप्रमाणें तो मात्र कदापि तुम्हाला अंतरणार नाहीं किंवा तुमची शांति ढळविणारहि नाहीं! रात्रौ निजल्यासमयीं विवेकबुद्धीचा हा अंकुश कृतकर्माबद्दल तुम्हाला वारंवार टोंचून अंतःकरण पश्चात्तापानें पोळीत नाहीं काय? विवेकरूपी हा निष्ठुर पहारेकरी आपल्या जागेवर खडा पहारा करीत असून तुमच्या कूटस्थ आत्म्याचा जणूं जाब घेत असतो! तो तुमच्या हृदयाला जणूं चाबकाच्या फटकाऱ्यांनीं झोडपून काढतो! तुमचे सारे अन्याय तो एकदम वर काढतो आणि त्याची भीषण व दुःखद स्मृति तुम्हांला जाणवितो! आणि तेव्हां? तेव्हा मात्र तुमच्या अंतरात्म्याला दाहाचे चटके लागून वाटूं लागतें कीं, "हाय! हाय! नको बाबा ही असह्य आग! इतःपर हा भयंकर दाह सहन करवत नाहीं!" पण तुम्ही आपलीं नियत कर्मे विनम्र भावानें

ईश्वराला अर्पण करून, त्याच्या पवित्र चिन्तनात आपली दिनचर्या वेंचाल तर तो परम कारुणिक प्रभु कसल्याहि महासंकटाच्या कभिन्न काळोख्या रात्रींहि तुमच्या आर्त स्वराला 'ओ' देऊन तुमच्या पिडलेल्या व तळमळणाऱ्या आत्म्याला आशेची व शांतीची दिव्य संजीवनी देईल! आणि खरोखर अशा अखंड शांतींत रमणाऱ्या विवेकी अंतरंगाची सर ज्याची त्यालाच! ती पवित्र जागा सन्मित्रहि पटकावण्यास समर्थ ठरणार नाहींत!"

तात्पर्य, सागण्याचें थोडक्यात सार असें कीं, बुद्धि व कृति किंवा ज्ञान व कर्म याचा सुंदर मेळ घालण्यास प्रत्येकानें अवश्य शिकावें. म्हणजे चित्ताला समाधान लाभल्याविना रहाणार नाहीं! एरवीं ज्ञानाचा सांटा विपुल असूनहि केवळ मनाच्या कमकुवतपणामुळें तदनुरूप प्रत्यक्ष विधायक आचरण जर कोणाकडून होत नसेल तर तें ज्ञान त्याला न पचता भारभूतच होईल! कृपणाप्रमाणें विद्येचा नुसता हुकमी साठा करून काय प्रयोजन! कुरुक्षेत्रीं योगेश्वर श्रीकृष्णानें अर्जुनाला गीता उपदेशिली खरी. पण त्या ओजस्वी शिकवणीप्रमाणें तात्काळ युद्ध करण्याचें टाळून केवळ मानसिक विवंचनेंत व तत्त्वचर्चेंतच अर्जुन गढून जाता तर गीतोपदेश वायां गेला असता! विजेकरितां केवळ प्रवाहाच्या पाण्याचा साठा करून काय उपयोग! त्याच्यापासून संचारी प्रबल विद्युच्छक्ति निर्माण करून तिचा मुबलक उपयोग दूरदूरच्या ठिकाणीं रोषणाईच्या कामीं करतां आला तरच त्या विजेचें चीज! असो. या लेखांतील कांहीं मुद्दे तरी 'बलभीमा'ला मनापासून पटून त्याप्रमाणें त्याच्या विचारांत व विशेषेंकरून आचारांत इष्ट ती क्रांति झाली तर मला धन्यता वाटेल. विशेषतः प्रेम हा आद्य विषय त्यानें अवश्य अभ्यासावा व त्वरित आचरणात आणावा आणि तेणेंकरून त्याचा उत्तरोत्तर उत्कर्ष होत जावा अशी सदिच्छा व्यक्तवून मी आंवरतें घेतों.

---

# होतकरू लेखकाची मनोभूमिका

## ( चिंतनपर लघुनिबंध )

जगाच्या वाङ्मयात जे थोर ग्रथकार धवल कीर्तीच्या उन्नत शिखरावर आज विलसत आहेत त्याच्यापैकीं कांहींचीं चरित्रें वाचून व त्यांच्या वाङ्मयाचें परिशीलन करून आपणहि थोडक्यांत प्रसिद्ध लेखक व ग्रंथकार बनावें आणि कीर्तीचे कोमल तिरपे किरण न्याहाळावे असें कोणत्या होतकरू लेखकाला वाटत नाहीं ! पण लेखकाचा पेशा गुलाबपुष्पाच्या सुगंधानें दरवळत असला तरी गुलाबाला काटे असतात आणि जपून हात न टाकल्यास ते बोंचतात हें कसें विसरता येईल ! आणि मराठींतील लेखनव्यवसायात आज होतकरू लेखकाला पदोपदीं ग्रासणाऱ्या अडचणी म्हणजे हे काटे नव्हत का ! एखाद्या लेखकाच्या परिश्रमाचें फळ नुकतेंच कोठें कीर्तीच्या क्षीण चंद्रकलेच्या रूपानें विलसत आहे इतक्यात तिला मत्सराचा ढग ग्रासून टाकीत नाहीं का ! एकूण मराटींत हौशी साहित्य-सेवक होऊं चाहणारांची आजची दैना व कुचंबणा कशी टळणार !

इंग्लंड-अमेरिकेंतल्याप्रमाणें मराठी लेखकाना मार्गदर्शक होण्या सारख्या प्रत्यक्ष लेखनव्यवसायाच्या शाळा आमच्या देशांत नाहींत ! पण 'दुधाची तहान ताका'वर भागवूं म्हणावें तरी थोर लोकाच्या वाङ्मयीन चरित्रक्रमावर प्रकाश पाडणाऱ्या व विविधस्वरूपी जिव्हाळ्याची माहिती नियमितपणें पुरविणाऱ्या लंडनच्या "John O' London's Weekly" सारख्या शुद्ध साहित्यविषयक साप्ताहिकाची मराठींत मोठीच उणीव भासते !

ग्रथापैकीं कै. वा. गो. आपटेकृत 'लेखनकला व लेखनव्यवसाय' हें तात्त्विक पुस्तक चांगलें झालें आहे खरें. पण 'घशास कोरड पडलेल्या इस-माची तृषा नुसत्या काव्यरसानें भागत नाहीं' या न्यायानें असे ग्रंथ लेख-काच्या शरीराचा नुसता सांगाडा दाखवितात ! पण दिव्य 'क्ष' किरणाच्या अंतर्मुख प्रभावानें सजीव देहांतील विविध अवयव व विशेषतः त्यांचे परस्पर व्यापार जसे अचूक हेरतां येतात तसें नुसत्या मानवी सांगाड्याच्या दर्शनानें तळपत्या 'प्रतिभे'चें लक्षण कसें समजणार ?

पूर्वोक्त साप्ताहिक वाचतांना वाचकाला आणि प्राधान्यानें नवख्या लेखकाला कसें समाधान वाटतें तें पहा. जगांतील थोर लेखकांना आपल्या पूर्ववयाच्या आरंभी लेखनकृतींत कोणकोणत्या अडचणी कसकशा आल्या हें स्वतः त्यांनींच आपल्य उत्तर आयुष्यांतील पक्व प्रज्ञेनें व स्निग्ध सहानुभूतीनें अशा पत्रात सोदाहरण विशद करून सांगितलेलें असतें. किंवा एकत्र प्रसिद्ध झालेल्या त्याच्या पत्रांच्या ग्रंथावरून बहुश्रुत चरित्रकार व मार्मिक टीकाकार या अंधारांतील वस्तूंवर व त्याच्या मागील घटनांवर प्रखर प्रकाशकिरण पाडूं शकतात ! ही अत्यावश्यक प्रथा मराठी नियतकालिकांत व चरित्रग्रंथांत रूढ होईल तो सुदिन !

मराठी साहित्यांत जसा चरित्राचा व आत्मचरित्रांचा विभाग मुळींच समृद्ध व मार्गदर्शक नाहीं, त्याचप्रमाणें थोर लोकांनीं कारणपरत्वें निर-निराळ्या व्यक्तींना लिहिलेलीं महत्त्वाचीं पत्रें नीट जपून ठेवून व विषयवार विणून त्यांच्या एकत्र गुंफणाची पद्धत तर नाहींच नाहीं ! कोठें रा. सा. गो. स. सरदेसाई यांनीं प्रकाशित केलेलें "श्यामकान्ताचीं पत्रें" यासारखें एखादेंच पुस्तक आढळतें ! बाकी सारा अंधार ! !

वास्तविक लेखन करून प्रसिद्धि मिळविलेल्या ज्ञानवृद्ध साहित्याचार्यांनीं व महाराष्ट्र-साहित्य-संमेलनाच्या विद्वान अध्यक्षांनीं हें अत्यंत महत्त्वाचें कार्य करण्यास किंवा करविण्यास उमेदीनें पुढें आलें पाहिजे. त्यांनीं आपले पूर्वाश्रमींचे लेखनविषयक अनुभव होतकरू लेखकांच्या मार्गदर्शना-करितां प्रामाणिक साक्षेपानें व जिव्हाळ्यानें सांगण्यास मुळींच कचरूं

नये ! मराठी साहित्यप्रांगणात नुकत्याच कुठें रागणाऱ्या बालकाला प्रथम तोल धरून उभा रहाण्यास शिकविण्याचें सोडून साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षीय भाषणात धावण्याचा पुढचा उपदेश करणें अस्थानीं नव्हे का ! पण या मूलभूत प्रश्नाकडे जोंपर्यंत आमच्या साहित्याचार्यांचें, परिश्रम-क्षमतेच्या म्हणा, चिकाटीच्या म्हणा, किंवा अशा दृष्टिकोनाच्याच अभावीं म्हणा, अजून अक्षम्य दुर्लक्ष्य झालेलें दिसत आहे, तोंपर्यंत महाराष्ट्रीय रांगत्या बालकानीं हातास मिळालेला विलायती पांगुळगाडाच घेतला तर त्यांत त्यांचा काय अपराध !

मागें 'अरुण' मासिकांत 'मी व माझें लेखन' या सदराखालीं कांहीं महाराष्ट्रीय प्रसिद्ध साहित्यसेवकांचे तरुणपणींचे लेखनविषयक अनुभव प्रसिद्ध झाल्याचें कळतें. पण त्या मासिकाबरोबरच त्या अमोल अनु-भवानाहि जलसमाधि मिळाली असेंच समजावयाचें काय ! कारण जे थोडे अनुभव त्यांत प्रसिद्ध झाले होते ते नव्या दमाच्या लेखकांच्या अवलोकनार्थ पुस्तकरूपानें कां प्रसिद्ध करण्यांत येऊं नयेत तें कळत नाहीं !

आतां मराठी चरित्रवाङ्मयाचा पोकळपणा पाहून निराश झालेला दृष्टि-कोन अंमळ पाश्चात्य वाङ्मयाकडे वळविल्यास त्यातील विविध साधनांची नुसती संपन्नताच पाहून वाचकाचें मन थक्क होतें ! कारण अशा अनेक प्रसिद्ध साहित्यसेवकाचे लेखनविषयक अनुभव स्वतः त्यांनींच किंवा त्यांच्या अभ्यासू चरित्रकारांनीं आवडीच्या जिव्हाळ्यानें व अधिकारी वाणीनें ग्रंथांतरीं रंग-वून ठेवले आहेत ! ते वाचतां प्रथमदर्शनीं समाधान वाटत असलें तरी, आणि 'मनुष्यस्वभाव येथून तेथून सर्वत्र सारखाच असतो' या उक्तींतील यथार्थता जमेस धरूनहि, आमची विभिन्न संस्कृति व विषम परिस्थिति यांच्या कैचींत सापडल्याच्या कटु जाणिवेनें मन एकदम सुखित व मोहित अशा दुहेरी प्रतियोगी अवस्थात डुंबून व भाजून निघतें, याची वाट काय !

आपण दोघां पाश्चात्य निबंधकारांचींच उदाहरणें घेऊं. गोल्डस्मिथ व गिबन या दोन समकालीन आयरिश व इंग्रज ग्रंथकारांचीं चरित्रें वाचलीं तरी काय आढळून येतें ! गोल्डस्मिथनें गरीबींतहि चैनीनें व निश्चिंतेनें दिवस कंठून व द्रव्याचा मुळींच हव्यास न बाळगतां उत्कृष्ट विदग्ध

वाङ्मय निर्माण केलें; तर गिबननें गर्भश्रीमंतीचा चांदीचा चमचा चोखता चोखता पुष्कळच अवांतर वाचन केलें, आणि परिश्रमपूर्वक अनेक साधनें गोळा करून व त्याच्यापासून आपल्या प्रखर तर्कशक्तीच्या योगानें सिद्धांत पाडून 'रोमच्या साम्राज्याच्या अस्ता'चा प्रचंड इतिहास खंडशः लिहिला. स्त्रीप्रेमासंबंधीं निराशा त्याच्या मनाला सारखी टोंचीत असतांहि त्याच्यामागें पोटाची विवंचना अशी फारशी नव्हती असें त्याच्या आत्मचरित्रावरून दिसून येतें. दिवसरात्र इतिहासप्रधान निरनिराळ्या विभागातील वेंचीव व मौलिक ग्रंथ वाचावे व आपली प्रवृत्ति त्यापैकी कोणत्या विशिष्ट विषयाकडे अधिक झुकते हें सूक्ष्म चिंतनानें पहावें आणि अशा आवडीच्या महत्त्वाच्या मजकुरांचीं टिपणें करावींत, असा आपला नित्यक्रम बनून गेल्याचें गिबन आत्मचरित्रात सांगतो. उलटपक्षीं, बिचाऱ्या गोल्डस्मिथ्ला आपल्या कांहीं उत्तम ललितकृति निर्मिताना चरितार्थ चालविण्याकरिता कित्येक भाषांतरित लेख व प्रकाशकाच्या सांगणीनें फुटकळ ग्रंथ लिहावे लागले व प्रकाशनकचेरींतील बिनआवडीचें, क्षणजीवी व नैमित्तिक अवांतर लेखन करावें लागलें ! आणि अशा कंटाळवाण्या गुलामगिरीपासून मिळणाऱ्या थोडक्या वेतनावर जीवन कंठून त्यात जे थोडेसे आनंदाचे क्षण लाभले त्यांत 'The Vicar of Wakefield'सारखी उत्कृष्ट कादंबरी आणि 'The Traveller' सारखें प्रतिभेच्या गगनात सलील संचार करणारें उज्ज्वल काव्य त्यानें लिहिलें !

इतिहासाच्या व तत्त्वज्ञानादि निबंधवाङ्मयाच्या निर्मितीला दांडगें वाचन हवें आणि त्याच्या बरोबरच तुलनात्मक सिद्धांत पाडणारा प्रखर सत्याधिष्ठित तर्क हवा; तर कादंबरीसारख्या विदग्ध वाङ्मयप्रकाराला जगातील अनेकानेक बऱ्यावाईट घटनांचें सखोल व सहृदय निरीक्षण व सूक्ष्म चिंतन हवींत. कादंबरीकाराला इतिहासकाराप्रमाणें हातार्शी मौलिक संदर्भग्रंथ बाळगण्याचें प्रयोजन नाहीं. म्हणून असा एक विचार सुचतो कीं चिकित्सक टीकाकार, बहुश्रुत निबंधकार किंवा सर्वस्पर्शी इतिहासकार होऊं असा हव्यास बाळगणाऱ्या महाभागाच्या 'योगक्षेमा'ची चिंता स्वतः परमेश्वरानें किंवा त्यानें तशी अनुकूल बुद्धि ज्यांना दिली आहे अशा

थोर जनांनीं ध्यावयास नको काय !

पाश्चात्य लेखकांच्या व संशोधकांच्या अवाढव्य कृति पाहून आमचे डोळे सहजच दिपतात ! परंतु हातीं घेतलेलें कार्य निरलस एकनिष्ठेनें पार पाडण्याइतकें भरपूर चित्तस्वास्थ्य त्यांना लाभतें याचा मात्र आम्हांस विसर पडतो ! 'नित्य अभियुक्त जनांचा योगक्षेम मी वाहतों' असें गीतेंत स्वतः श्रीकृष्णानें सांगितलें आहे. अशा पाश्चात्य लेखकांचा चरितार्थ ईश्वरानें तशी बुद्धि ज्याला दिली आहे तें राष्ट्रीय सरकार व रसिक संपन्न जनता संगनमतानें वाहतात. पण आमच्या मराठी लेखकांची स्थिति......!

वास्तविक उत्कृष्ट ललितलेखक व संशोधक आपल्या कृतींच्या द्वारें वाचकाची विशुद्ध भावना व ज्ञानपिपासा जागृत करतात. मग कृतज्ञता-बुद्धीनें त्यांचा चरितार्थ चालविण्याची हमी राजे लोकांनीं व सुखवस्तु श्रीमंतांनीं कां घेऊं नये ! कारण चरितार्थाची विवंचना पूर्णपणें सुटल्या-वांचून मन सदा प्रसन्न व ताजेंतवानें रहात नाहीं ! आणि अशा प्रसन्न मनाचा व विवेकी बुद्धीचा इष्ट संयोग झाल्यावांचून माणसाच्या सुप्त विचार विकारांना मूर्त स्वरूप येऊं शकत नाहीं ! आणि अशा निश्चित विचारांच्याच सांखळीच्या अभावीं लेखक झाला तरी लेख किंवा ग्रंथ कसे लिहिणार !

एखादा ग्रंथ संपूर्ण लिहून तो एकदांचा प्रसिद्ध झाल्यावर त्याची इष्टानिष्टता पाहून मगच तो विकत घ्यावयाचा हें व्यापारी तत्त्व कित्ये-कदा लेखकांच्या बाबतींत घातक ठरतें ! कारण त्यांच्या अंतरंगाच्या कारखान्यांतील यंत्रांना नित्य तेल घालून तीं साफसूफ केल्यवांचून तीं मुळीं चालतील तरी कशीं ! आणि पुढें त्याच्यापासून सुबक मालाची निपज व्हावी तरी कशी ! आणि हें तेल म्हणजे लेखकाच्या नित्याच्या चरितार्थाचें निश्चित साधन, नव्हे का !

गोल्डस्मिथ्‌च्या चरित्रावरून त्याच्या प्रापंचिक अडचणींचा पाढा वाच-तांना बहुतांशीं प्रतिभेच्या व परिस्थितीच्याहि साम्यामुळें के. गडकऱ्यांची आठवण जाणवल्यावांचून रहात नाहीं ! गडकऱ्यांना जें अल्पायुष्य लाभलें त्याचें व्यक्त कारण क्षयरोग असला तरी मनाजोगत्या लेखनाधीन चरितार्थाच्या

अभावीं उत्पन्न झालेल्या खंतींत ते अव्यक्त असेल काय ? खरोखर किर्लो-स्कर संगीत नाटक मंडळींत नटांचा मास्तर म्हणून वणवण हिंडणाऱ्या गडकऱ्यांसारख्या उज्ज्वल प्रतिभावानाची ही दुःखद स्थिति पाहिली कीं हृदय पोळतें आणि वाटतें कीं, प्रतिभावंत पण अकिंचन मराठी लेखकांचें हें नष्टचर्य कधीं संपणार ?

बरें, आमच्यांतील सुशिक्षित व सुखवस्तु लोक कधी गिबनसारखे भरीव निबंधकार किंवा चिकित्सक इतिहासकार होण्याच्या भरीस पडतील म्हणावें तर त्याहि बाजूनें पदरीं निराशाच येते ! महाराष्ट्रांत ठाण्याचे कै. भावे, साताऱ्याचे कै. पारसनीस, किंवा रा. सा. सरदेसाई यांच्या-सारख्या कांहीं तुरळक सुखवस्तु व्यक्ति वगळल्यास, इतर सुखसंपन्न व्यक्तींनीं नुसते वाचक होऊनहि इतिहासाच्या प्रांगणांत धैर्यानें उडी टाकल्याचें फारसें दिसत नाहीं ! मग त्या विषयात चिकित्सक संशोधक होण्याचें तर दूरच ! म्हणून कै. वि. का. राजवाड्यासारख्या इतिहाससंशोधनापायीं जाणून-बुजून फकीरी पतकरलेल्या महात्म्याला आपल्या प्रचंड कार्यापायीं किती यातायाती सोसाव्या लागल्या असतील याची कल्पनाच केलेली बरी ! !

म्हणून मराठींत 'गाजलेला' लेखक होण्याचा प्रत्येक तरुण व होत-करू लेखकाचा हव्यास कितीहि प्रबळ असला तरी वर सांगितलेल्या कित्येक अडचणी प्रारंभींच त्याचें मन खच्ची केल्याविना रहात नाहींत ! आणि त्यांतून तरणोपाय काढण्याकरितां तो केवळ दीर्घ विवंचनाच करीत बसला तर तेणेंकरून प्रत्यक्ष लेखन असें आपल्याकडून मुळींच होणार नाहीं हा विचार त्याला बाधतो ! कारण लेखन-सिद्धिरूपी यशाचा कलश उंच पर्वताच्या माथ्यावर आहे अशी कल्पना केल्यास धैर्यानें व नेटानें धीमेधीमे डोंगर चढण्याचें सोडून होतकरू लेखक नुसता साधकबाधक विचार करीत सुटला तर तो पायथ्याशींच रहाणार, नव्हे का ? या संदर्भात एक रूपक सुचवितां येईल. आजचें मराठींतील लेखन म्हणजे वेगानें वाहणाऱ्या नदीच्या प्रवाहाच्या उलट दिशेनें पोहण्याची क्रिया होय ! प्रवाहाचा वेग, उणें पोहणाऱ्याचा वेग ! पोहणारा इसम जितकें नदीचें पात्र धीमेपणानें काटतो तितक्या भागाला रूपकानें लेखन म्हणतां येईल !

अथवा लेखनकला म्हणजे डोक्यावर ओझें घेऊन तें न पाडता व न दमता पार पाडावयाची उंच डोंगराची बिकट चढणच म्हणाना !

शेवटीं महाराष्ट्रीय लेखकाच्या मार्गांतील कांहीं अडचणींचा त्रोटक पाढा वाचून आटोपतें घेतों.

(१) मराठींत लेखनव्यवसाय अजून चरितार्थाचें साधन होऊं शकत नाहीं ! उगवत्या वाङ्मयसेवकांनीं चरितार्थाकरिता दुसरा एखादा व्यवसाय पतकरून फावल्या वेळीं हौसेनें वाङ्मयसेवा करावी असें थोर साहित्य-सेवक कळकळीनें सांगतात !

(२) मराठींत कादंबरी-लघुकथादि चुरचुरीत व चटकदार वाङ्मयाला व नाटकाना मात्र थोडीशी मागणी आहे ! इतिहास, वाङ्मय, सृष्टिज्ञान, तत्त्वज्ञान अशांसारख्या शाश्वत महत्त्वाच्या शास्त्रीय विषयांना मुळींच मागणी नाहीं ! सबब अशा भारदस्त विषयांत लेखन करूं इच्छिणाऱ्या होतकरू लेखकानें त्यांत द्रव्य मिळण्याची आशा मुळींच करूं नये ! उलट पदरमोड करून अशा विषयांवरील वाङ्मय वाचून आपल्यास शक्य असल्यास किंवा संपन्न प्रकाशक लाभल्यास एखादा तात्त्विक ग्रंथ प्रसिद्ध करता येईल, असें प्रकाशकांचें सांगणें आहे.

(३) महाराष्ट्रांतील सुखवस्तु जनाना सढळ हातानें पैसे खर्चून उत्तम वाङ्मय विकत घेण्याची इच्छाच नाहीं ! बहुतेक फुकटया वाचकां-चाच सुकाळ दिसतो ! आणि सुशिक्षित मध्यमवर्गाला तर आपल्या आवडीचीं निवडक पुस्तकेंहि विकत घेण्याइतकी शक्ति नाहीं ! मिळून अशा दुहेरी विषम परिस्थितीच्या कात्रींत बिचाऱ्या लेखकांची अत्यंत कुचंबणा होते !

(४) महाराष्ट्रीय समाजांतील लहान मोठ्या सर्व थरांत अजून साक्षर-तेचा प्रसार फारच अल्प असल्याकारणानें पाश्चात्य राष्ट्रांतल्याप्रमाणें समाजांतील सर्व स्त्री-पुरुषांत सर्रास 'वाचनाचें व्यसन' रुजलेलें नाहीं ! म्हणून या विषयाच्या गोडीच्याच अभावीं वाङ्मयाला मागणी नाहीं तर पैदासीला कोण विचारणार ?

(५) मराठी साहित्यांत लेखनव्यवसायावर सांगोपांग उज्ज्वल प्रकाश

पाडणाऱ्या नियतकालिकांची, साद्यंत चरित्रग्रंथांची व थोर लोकांनीं विविध विषयांवर वेळोवेळीं लिहिलेल्या पत्राच्या संग्रहाची अक्षम्य वाण आहे! ती लौकर भरून काढण्याचे प्रयत्न वयोवृद्ध व ज्ञानवृद्ध साहित्याचार्य करतील तो सुदिन! उत्तमोत्तम इंग्रजी चरित्रग्रंथांच्या वाचनानें मनाचें समाधान होत असलें तरी स्वत: आपल्या देशांतील वाङ्मयसेवकांची परिस्थिति तुलनेनें जाणूं इच्छिणाऱ्या होतकरू साहित्यप्रेमी लेखकाची निराशाच होते हें सत्य लपविण्यांत अर्थ नाहीं!

---

# लेखिकेच्या जीविताचा प्रधान हेतु कोणता ?

(लेखिका :— सौ. बिएट्रिस कीन सीमोर)

माझ्या विद्यार्थिदशेंत वरील प्रश्न जर मला कोणी विचारला असता तर तेव्हां त्याचें उत्तर देण्याला मला कसलीहि अडचण भासली नसती ! मी तडक म्हटलें असतें—

"संसारासक्त जीवनातल्यापेक्षां मधुर ललितकलोपासक किंवा उज्ज्वल ज्ञानोपासक जीवनांतील आनंद अधिक व्यापक असल्यामुळें मी दुसऱ्या प्रकारचें जीवनच पसंत करीन !" महिलाजीवनाचें इतिकर्तव्य म्हणजे पत्नीत्व व मातृत्व उपभोगणें इतकेंच होय या व अशा भ्रामक समजुतींच्या विरुद्ध बंडखोर भावना माझ्या तरुणपणीं नेहमीं उचंबळून येत ! तेव्हा मला अशीहि भीति वाटायची कीं, दररोजचें तेंच तेंच नीरस काम कर कर करून इतरा-प्रमाणेंच जर मी प्रौढपणीं शुष्क जीवित कंठावयाचें असेल तर माझ्या साऱ्या अंतःप्रेरणांच्या तृतीची वाट काय ! आतां तुम्ही प्रणयभावनांविषयीं म्हणाल. प्रणय हा एकच प्रधान भाव काय ! त्याच्यावांचून इतर कोणत्याहि भावना मानवी अंतःकरणांत उचंबळून येत नाहींत काय ! याप्रमाणें माझ्या मनांत विचारचक्र सारखें सुरू होऊन मला नेहमीं कांहींच सुचू देत नसे !

आजकालची गोष्ट सांगत नाहीं. सन १८५० सालांतील ती गोष्ट ! मिस् फ्लॉरेन्स नायटिंगेलनें तेव्हां आपल्या एका पत्रांत असें लिहिलें होतें—

"माझ्या मनाचा उपजत कल पहातां असें दिसतें कीं, मी लेखिका किंवा विवाहित स्त्री किंवा दवाखान्यांतील परिचारिका सहज झालें असतें."

पण प्रत्यक्ष कसें काय घडलें तें पहा. वाङ्मयापासून उपजीविका साधण्याचा प्रयत्न तिनें सोडला आणि परिचारिकावृत्तीपासून लोकसेवा करण्याच्या तिच्या तळमळीची पूर्ति कितपत साधली हें आम्ही जाणतोंच. तिचा चरित्रकार म्हणतो, "आपल्या अंगींच्या नैसर्गिक प्रवृत्तींना संपूर्ण व अनिर्बंध वाव मिळावा म्हणून (एरवीं तो तसा मिळेलच अशी तिला मनोमन खात्री पटेना) तिनें लग्नाचा बेतच रहित केला आणि रुग्णशुश्रूषेचा मनाजोगता धंदा आजीव चालविला."

मला कित्येकदा तर असें वाटतें कीं, माझ्या कित्येक विदुषी मैत्रिणींचे लग्नसंबंधींचे विचार प्रारभीं तरी वरीलप्रमाणेंच होते. पण इतकें मात्र खरें कीं, शेवटीं कळत वा नकळत त्यांनीं लग्नाच्या सोनेरी बेड्यांनीं स्वतःला जखडून घेतलें, अन् तिला बिचकून पळून जाण्याचें त्यांनीं टाळलें! त्याचें अखेर असें झालें. कांहो जणींना गुलाबी प्रणयभावनेनें वेधलें! कांहींना सुंदर सुंदर, गोजिरवाण्या अपत्यांच्या मोहानें ग्रासलें! कारण सर्वच जणी मिस् फ्लॉरेन्स नायटिंगेलसारख्या आजीव सन्यासिनी थोड्याच होत्या! म्हणून हो ना म्हणतां म्हणता त्यानीं शेवटीं विवाह केला आणि कित्येकींना मनोवांछित अपत्येंहि झालीं. एकुण त्यांचीं बालपणींचीं गोड सुखस्वप्नें प्रत्यक्ष वस्तुसृष्टीशीं खडतर संबंध येताच कोठल्या कोठें विरून गेलीं आणि या नवीन नाजुक पण अभेद्य प्रेमशृंखलांनीं त्या अशा जखडल्या गेल्या म्हणता! आणि त्याबरोबरच गलबल्याच्या नवनवीन जबाबदाऱ्याहि त्यांच्यावर ओघानेंच चिकटल्या! मात्र एका बाबतींत बहुतेकींची निराशा झाली! त्या बिचारींना मोठी आशा वाटायची कीं आपल्या 'अर्ध्या भागीदारां'च्या विविध व आकर्षक व्यवसायात आपल्याला उमेदीनें सहभागी होतां येईल! पण विवाहित स्त्री-पुरुषांच्या आयुष्यांत संवादी साम्यस्थळें अशीं थोडींच असतात!

मात्र एका गोष्टीचा मला नीट उलगडा करतां येत नसल्यामुळें तिचें अजून मोठें गूढच वाटतें! अन् तें इतक्याच करता कीं, सुदैवानें दिव्य प्रतिभेची चुणूक किंवा अलौकिक बुद्धीची देणगी लाभलेल्या कित्येक तरुणी देखील एकदा का लग्नाच्या मोहजालांत अडकल्या कीं त्या

वरील विचारसरणीच्या आहारीं जातात किंवा अहेतुकपणें जाऊन पडतात. कांहीं जणी जात्याच मनाच्या हळव्या असतात. तर इतर कांहीं जणींना पुरुषांनीं रचलेल्या अडचणींचे डोंगर इतके दुर्लंघ्य वाटतात कीं त्यांची छातीच फाटते! आणि प्राप्त परिस्थितीला निमूटपणें मान तुकविल्यास काय वाईट अशी कांहींशी मनाची दुबळी समजूत पाडून त्या आयुष्य कंठीत असतात! मीं अशा कित्येक स्त्रिया पाहिल्या आहेत. लग्नाची सोनेरी बेडी त्यांच्या पायाभोंवतीं एकदा पडली कीं त्याच्या उच्च ध्येयाचे मनोरे हवेंत विलीन होतात! अशा स्त्रियांची मजकडे नेहमीं तक्रार असावयाची कीं, "काय सांगायचं बाई, आमचं कपाळ! कलोपासनेच्या किंवा दुसऱ्या कोणत्याहि मनाच्या आवडीच्या स्वतंत्र वृत्तीबरोबरच पत्नीत्व व मातृत्व यांचा गाडा सुरळीत चालणं शक्यच नाहीं मुळीं! म्हणून दोहोंपैकीं ज्याची आम्हाला अधिक निकड भासली तो मार्ग पतकरून दुसऱ्या मार्गाकडे नुसते निराशेचे क्षीण निःश्वास टाकण्यापलीकडे आम्ही तरी काय करावं बरं!" मला वाटतं आमच्या प्रस्तुत चर्चाविषयाच्या मूलहेतूवर विदारक सूर्यप्रकाश पाडण्यास समर्थ अशी ही विचारसरणी आहे खरी! अन् ती कशी म्हणाल तर माझ्या मतें कांहीं स्त्रियांच्या बाबतींत तरी—मग त्या विद्येंत कितीहि प्रगल्भ असोत, संसारात कितीहि लायख असोत, किंवा कलाकौशल्यांत कितीहि वाकबगार असोत—स्त्रीहृदयांतील मातृत्वाच्या भावना ध्येयगर्भ अमूर्त भावनाच्या केव्हाहि अतीतच असतात! वाटल्यास तुम्ही खुशाल म्हणा कीं, युगयुगांतरांनीं हे संस्कार स्त्रियांच्या रोमरोमीं पुरते भिनून गेले आहेत; म्हणून त्यांच्या बंडखोर बुद्धीची धार या संस्कारापुढें बोथट होते! अन् ही स्थिति तर अत्यंत उद्वेगजनक आहे! मात्र इतकें खरें कीं, प्रौढ तरुणी स्वतःच्या पूर्ण संमतीनेंच गृहिणीपद वरतात अन् कित्येकदा तर त्यांची मनोमन पुरती खात्रीच पटत असते कीं, लग्नाच्या बोहल्यावर स्वतःची मान एकदा लवविली कीं बहुधा स्वतःच्या आवडीनिवडींना किंवा हौसेच्या व्यवसायांना, संपूर्णपणें नसलें तरी, कांहीं अंशीं तिलांजलीच दिल्यासारखें होतें! तथापि त्यांच्यापुढें जेव्हां हे दोन प्रश्न दत्त म्हणून उभे राहिले कीं, तुम्हांला कलोपासनेचें आदर्श पण काल्पनिक ध्येय हवें का वैयक्तिक

सुखदुःखाचें गृहिणीपद हवें, तेव्हा त्यानीं जाणून बुजून हे 'सतीचें वाण' पतकरलें हे नाकारतां येणार नाहीं. ही वस्तुस्थिति मला नेहमीं चिंतन करावयास भाग पाडते. आणि माझ्या कित्येक कादंबऱ्यांमागील कथानकांना कथाबीज पुरविण्याचे मर्महि अशा घटनाआड दडलेलें आहे असें मला कित्येकदा वाटतें!

क्रिमियन् रणक्षेत्राच्या धामधुमींतून जेव्हा मिस् फ्लॉरेन्स नायटिंगेल इंग्लंडला परत आली तेव्हां तिनें आपल्या जीविताचें सकल्पित ध्येय आटोक्यांत आणण्याची पराकाष्ठा केल्याचें सागतात. याचें एक कारण असें कीं लढाईच्या आघाडीवर परिचारिकाच्या हालचालींवर पुष्कळच निर्बंध असत आणि तिला जखमी शिपायांच्या पथकांची शुश्रूषा करण्यास मनाजोगता अवसर सांपडत नव्हता. पण हे निर्बंध एकवार पुरवले पण नंतर तिनें स्वतः-वर बळेंच लादून घेतलेले इतर निर्बंध नकोत असें म्हणण्याची पाळी तिच्या आप्तस्वकीयांवर लौकरच आली! कशी ती पहा. कारण स्वतः मिस् फ्लॉरेन्सची बहीण शेजारच्याच बिन्हार्डी रहात असली तरी अतिमात्र एकान्त-प्रियत्वामुळें फ्लॉरेन्स पुढें पुढें इतकी माणूसवर्जी बनली कीं आप्तांशीं व मैत्रिणींशींदेखील प्रत्यक्ष बोलण्याचा प्रसंग आल्यास ती नुसत्या निरोपांवर किंवा चिठ्यांवर तो भागवी! कित्येक वर्षे ती बर्लिंग्टन् हॉटेलांत रहात असे. त्या वेळीं बुद्धया तिच्या भेटीस आलेल्या आईबापांना ती 'मे' नांवाच्या आपल्या चुलतीकरवीं असा निरोप पाठवीत असे कीं, "तुम्ही येथें आल्यावेळीं कृपा करून यापुढें तरी दुसऱ्या ठिकाणीं रहा!" आतां हें खरें कीं, या जगात मिस् फ्लॉरेन्स नायटिंगेलसारख्या निधड्या छातीच्या काटेकोर कार्यकर्त्या क्वचितच जन्मास येतात अन् आमच्या वैयक्तिक प्रेमविषयक संबंधांविषयीं इतक्या उच्च पण कांहींशा एककल्ली व दूरान्वित दृष्टिकोनाचें समर्थन करणाऱ्या स्त्रिया तर त्याहून विरळा आढळतात! तसेंच मानवजातीचीं म्हणून जीं सर्वसाधारण भूतदयेचीं कर्तव्यें आहेत त्यांना बुध्द्या बगल देणाऱ्या महिलाहि फारच थोड्या आढळतात!

मी दहा वर्षांची झाल्यापासून माझ्या आईबापांना असें सारखें सांगत सुटल्याचें स्मरतें कीं, "मी किनई लेखिका होणार!" अन् माझ्या या

जीवितध्येयाविषयीं मला आजपर्यंत मनात कधींहि कसलाहि किंतु आलेला नाहीं ! लग्नानंतर माझ्या संकल्पित लेखनव्यवसायाला खंड पडला हेंहि तितकेंसें खरें नव्हे. वास्तविक निर्वाहाचें एखादें स्वतंत्र साधन शोधण्याची मला प्रथम अपेक्षा भासली म्हणून बैठ्या लेखनव्यवसायाला मी प्रारंभींचा कांही काळ पारखी झालें. कारण माझ्या लहानपणीं लेखनव्यवसायापासून आजच्यासारखी सत्वर प्रसिद्धि व सुलभ प्राप्ति लाभत नव्हती. म्हणून माझें लग्न होऊन पुढें मासिकातील शिकाऊ लघुकथालेखिका म्हणून माझें अवांतर उत्पन्न काहींसें स्थिरस्थावर झाल्यानंतरच मीं माझी पहिली सविस्तर कादंबरी लिहिण्यास हातीं घेतली ! अन् माझ्या अंतःकरणांतील बोल ऐकाल तर अजूनहि मला कादंबरी लिहिणें अतिशयच आवडते ! अन् त्यांत मी तहानभूक विसरून तनुमनानें रमतें व रंगतें देखील ! कादबरीलेखनाऐवजी जगांतील भारी उत्पन्नाचा इतर कोणताहि व्यवसाय पतकर म्हणून मला कोणी गळ घातली तरी मी त्याचें साफ ऐकणार नाहीं ! तरी पण मी हें प्रांजलपणें पदरीं घेतें कीं, माझी विनोदबुद्धि इतकी खाष्ट नाही की मीं कादंबरीलेखन हेंच काही माझे जगातील महत्तम ध्येय म्हणून कल्पून तें सतत चोवीस तास उराशीं बाळगावें ! किंबहुना असल्या एकागी ध्येयापासून माझ्या अंगींच्या विनोदाच्या तुषारानीं मला शिंपडून कित्येकदा परतविलें आहे ! तात्पर्य, मी 'मोठी' लेखिका असण्यापूर्वींहि मुळांत मानवी प्राणी असून त्या दृष्टीनें प्राप्त कर्तव्यें निरसलपणे व कसोशीनें करता करतां, मध्येंच सवडींत सवड काढून तींत लेखनव्यवसायाची अंतरींची दुर्दम्य हौस शक्य तों भागविण्याचे प्रयत्न करावे, असेच मला पूर्ण विचाराअंतीं पटतें अन् त्याप्रमाणें मी वर्ततें.

आता लेखनव्यवसायासाठींच म्हणून बैठक घालून स्त्रिया बसल्या की त्यांना मनाजोगतें भरीव व भरपूर काम करताच येत नाहीं. प्रपचाच्या लहान मोठ्या कर्तव्यांनीं व मुलाबाळांच्या नेहमींच्या गोंगाटानीं किंवा इतर अकल्पित क्षुल्लक कारणानीं त्याना हरघडी हटकून अडथळा पोंचावयाचा. असे शांतताभंजक अन् म्हणून तापदायक प्रसंग मीं आजवर अनुभवलेले नाहींत किंवा ते आजहि अनुभवीत नाहीं असें मात्र मला मुळींच म्हणावयाचें

नाहीं ! उलटपक्षीं तोच एखादा पुरुष जर लेखन करण्यास कटाक्षानें बसला तर त्याला मात्र अडथळा आणण्याचें कोणाच्या स्वप्नींहि येत नाहीं ! पण म्हणून तुलनेनें ह्या वस्तुस्थितींतील विरोध दाखवून जर कोणी मला 'स्त्रियांनीं लेखनव्यवसाय करूं पहाणें हें त्यांचें खरें ध्येयच नव्हे' असें म्हणून हिणवूं पाहील तर मला त्याचा मोठा संताप येईल ! कारण घरचा पसारा आवरीत असता, स्वतः सैंपाक करीत असतां, अन् मुलांचे पाय-मोजे विणीत असता मध्यें जे व जितके फुरसतीचे क्षण मला दररोज आढळत त्यात मी माझ्या पहिल्या तीन कादंबऱ्या लिहिल्या हें वर्तमान सागितल्यास कुणाला खरेंहि वाटणार नाहीं ! मात्र वस्तुस्थिति तशी आहे खरी ! वर सांगितल्याप्रमाणें घरच्या शाततांभंजक वातावरणामुळें जर मी यापूर्वींच फुकाचा लेखनसन्यास घेतला असता तर माझ्या ध्येयामागील निश्चयाचा ढिसूळपणा ओघानेंच तात्काळ दिसून येता. म्हणून प्रपंचांतील नित्याच्या क्षुल्लक प्रसंगानीं उगाच मनाची शाति ढळूं देणें म्हणजे स्वतःचें अंतःकरण अत्यंत मृदु किंवा अकारण अवघड आहे अशी कांहींशी एकांगी व विक्षिप्त कल्पना उराशीं घट्ट बाळगणें होय असें माझें ठाम मत आहे. आणि म्हणूनच "कृपा करून एकान्ताचा भंग करूं नका" अशा मथळ्याच्या पाट्या बंद केलेल्या दाराबाहेर लावून ज्या माझ्या मैत्रिणी लेखनवाचनास बसतात अशांचा दृष्टिकोनच मला मुळीं पटत नाहीं ! अशी एखादी पाटी मी कधीं काळीं लावीन तर निदान माझा मनोधर्म ज्यांना पूर्ण परिचित आहे अशा व्यक्ति तरी तिच्याकडे लक्ष देतील असें मला कदापि वाटत नाहीं !

मात्र मला हें उघड निवेदिलें पाहिजे कीं, 'माझ्या दुसऱ्या घरची' परिस्थिति लेखनव्यवसायाला अधिक पोषक व अनुकूल असती तर माझ्या हातून याहून किती तरी श्रेष्ठतर कामगिरी निश्चित होती असें मी कधीं कधीं मनाच्या प्रक्षुब्ध अवस्थेंत बोलून जातें खरे. परंतु अंमळ विचार करतां मला पुढें असें वाटतें कीं, आमच्या अंगीं जे मूलभूत दोष आहेत त्यांच्यावर पांघरूण घालण्यासाठीं व आमच्या भोळ्या, कमकुवत पण किंचित् बंडखोर मनाच्या समाधानासाठीं आम्ही कित्येकदा उगाच अशा

गोड आत्मवंचना करीत सुटतों झालं ! मी लहानपणी जेव्हां अतिशय संस्कारक्षम होतें तेव्हा मला रॉबर्ट लुईस स्टीव्हन्सन्चे निबंध अतिशय आवडत; इतके कीं ते मी मिटक्या मारीत वारंवार वाचीत असें ! अन् मी जरी 'पुस्तकातील किडा' होऊन थोडीशी सवड सांपडताच नेहमीं वाच वाच वाचीत असतें तरी पण त्या निबंधसंग्रहांतील खालील वाक्यें मी तेव्हां तांबडया पेन्सिलीनें अधोरेखित केलेलीं मला अजूनहि पक्कें स्मरतें, नव्हे परवांच तें पुस्तक सहज चाळतां तीं दृष्टीस पडलीं ! तीं वाक्यें अशीं :– "एरवीं ग्रंथ हे त्यांच्यापरी चांगलेच. पण प्रत्यक्ष जीवित व ग्रथ यांतील सरसनिरसता ठरवूं पहाता, जीविताची महति ग्रंथांच्या ओझ्याखालीं पुरती दडपूं पहाणं म्हणजे सळसळत्या जीवनाऐवजीं शुष्क व रक्तहीन कलेवर कवटाळूं पहाणं होय !" (Books are good enough in their own way, but they are a mighty bloodless substitute for life !)

वरील वचनांत कोणाच्या मतें कदाचित् पुरेपूर गाभीर्य नसलें तरी त्यांत सत्याचा अंश पुष्कळच आहे असें माझें पूर्वीपासून ठाम मत आहे. अन् तें मला अजून देखील शिरोधार्यच आहे. नित्य जीवनांतील नवनवीन अनुभव चाखण्याकरितां मी नेहमीं कशी हपापलेली असतें ! अन् मानवी हृदयवीणेचे सूर सहानुभवानें ऐकण्याऐवजीं हट्टानें कानांत बोटें घालून एकान्तांत कलोपासनेच्या लहरी ध्येयाकडे सारें लक्ष्य वेंचणें हा मला तरी आत्मवंचनेचा विरंगुळाच वाटतो !

कारण वैयक्तिक संबंध स्त्रियानाच तेवढे बाधतात आणि पुरुषांना ते थोडेच मोकळे सोडतात ? कोणतीहि व्यक्ति घ्या–मग ती स्त्री असो किंवा पुरुष असो–तिला या जगांत गौरवानें जगायचं असेल, तर हे संबंध तिच्या नित्याच्या जीवनाशीं निगडितच असल्यामुळें ते तिला सुखासुखी कां लाथाडतां येणार ? संसाररूपी अनंत अंतराळांत उडतां उडतां स्त्रियांच्याप्रमाणेंच कित्येक अलौकिक पुरुषांच्याहि प्रतिभारूपी पंखांची भरारी खुंटली आहे ! माझ्या चिरपरिचयाचे असे कित्येक विवाहित गृहस्थ आहेत. अन् त्यांच्या जीविताकडे किंचित् सूक्ष्मपणें पहातां मला असें आढळून आलें

आहे कीं, आमची विशिष्ट संस्कृति व आर्थिक जीवन यांच्या परंपरेमुळें स्त्रियांइतकेच—थोडया निराळ्या तऱ्हेनें का होईना—पुरुषहि जखडले गेले आहेत ! पण त्याबरोबर हेंहि नाकारता येणार नाहीं कीं, संसार-सागरांत धैर्यानें उडी घेतलेल्या स्त्री-पुरुषानींच सामाजिक सुधारणा सांसारिक जीवन, वाङ्मयसेवा, ललितकला इत्यादि विभागांत मोठी स्पृहणीय कामगिरी केली आहे ! कारण एकदा का संसारांत उडी टाकली म्हणजे प्रत्येकाच्या वाट्याला नको नको म्हणत असतां भारी व अकल्पित जबाबदाऱ्या येऊन चिकटतात आणि त्या न टाळतां नीट पार पाडण्यांत तर लोकसंग्रहात्मक बुद्धीची अपरूप चुणूक दिसून येते ! कादंबरीकार थॅकरे व त्याची भ्रमिष्ट पत्नी, निबंधकार चार्लस लॅंब व त्याची करुणमूर्ति बहीण एलिझा, इत्यादि कित्येक वाङ्मयसेवकांचीं उदाहरणे नीट पारखून तर पहा ! तितकें दूर कशाला ? उभ्या आयुष्यात विषम गृहजीवनाशीं नित्य धैर्यानें तोंड देता देतां मेटाकुटीस आलेल्या चार्लट ब्रॉंट या लेखिकेचेंच उदाहरण घेऊं. त्या बिचारीला तर प्रिय भगिनींचा दीर्घ आजार व पुढें मृत्यु सहन करावा लागला ! अन् याच्या भरीला म्हणूनच कीं काय बंधूच्या विलक्षण लहरी वर्तनामुळें तिच्या हळव्या मनाला किती वेदना झाल्या असतील, सागता सोय नाहीं ! तात्पर्य, कटु जीवनातील विषम व दुःखद आघातामुळें ती बिचारी वयाच्या एकुणचाळिसाव्या वर्षी अकालमृत्यूच्या कराळ दाढेंत चिरडली गेली यांत नवल तें कसलें ? तिच्या अंगीं प्रतिभा जन्मसिद्ध होती. अन् तिच्या बंडखोर प्रवृत्तीची उसळी तिला एके बाजूनें जोरानें खेंची तर तिच्या मानवी जबाबदाऱ्या इतक्या दुर्लंघ्य होत्या कीं त्यांतून तिची सोडवणूक करण्यास ती प्रतिभा अखेर पंगून ठरावी ना ? आता कांहीं टीकाकारांचें असें मत आहे कीं, तिच्या पुढील पाऊलवाटेंत काटेरी झाडांझुडपांऐवजीं सुवासिक फुलांनीं सजलेला मऊ व सुंदर गालिचा पसरतां आला असता तर तिच्या हातून याहून सुंदर व भरदार लेखनकृती खचित उद्भवल्या असत्या ! पण हें अनुमान निश्चितपणें बांधण्याइतकीं प्रमाणें बहुधा कुणालाच कधींहि सापडणार नाहींत ! शिवाय ज्याच्या आयुष्यांत कसलेंहि बरेवाईट आणी-

वाणीचे समरप्रसंग न घडतां तें एखाद्या संथ तळ्यांतील पाण्याप्रमाणें निश्चल निरनुभवी व नीरस असतें अशांच्या हातून भरीव व उत्कृष्ट वाङ्मयनिर्मिति झाल्याचें निदान माझ्या तरी आढळांत नाहीं! प्रत्यक्ष अनुभवाच्या रसरसत्या भट्टींतून तावून सुलाखून बाहेर पडल्यावांचून व जोडीला सहनुभूतीची अमोघ देणगी असल्यावांचून कोणालाहि शाश्वत-स्वरूपी ललित वाङ्मय निर्मिता येणार नाहीं! निर्मळ कलोपासनेला किंवा अखंडित वाङ्मयसेवेला सर्वस्वीं वाहून घेतलेले कित्येक स्त्री-पुरुष मीं पाहिले आहेत. पण जीविताच्या रूक्ष व रखरखीत सहारा वाळवंटांतून जातां जाता तहान लागली म्हणून वाटेंत अद्भुत ध्येयसिद्धीच्या मृगजळापाशीं ते थांबत! तों तें उलट दूरदूरच पळत असलेलें पाहून बिचाऱ्याचा घसा कोरडा पडून ते मनाची शांतीच गमावून बसले! म्हणून जीवितांतील प्राप्त कर्तव्यें लाथाडून आत्यंतिक कलासक्तीच्या दीपा-वर पतंगाप्रमाणें बेधडक उड्या मारणाऱ्यांच्या हृदयांच्या स्निग्ध भावना आटून त्यांचा रखरखीत उन्हाळा होतो! हें करुणामय दृश्य पाहून मला नेहमीं असें म्हणावेंसें वाटतें कीं, "जीवित जीवित म्हणजे तरी आप्तस्वकी-यांशीं वैयक्तिक नित्य संबंध ठेवण्यापरतें दुसरें तिसरें तें काय!" मात्र हे संबंध जाचक रूढीच्या आवरणाखालीं व्यक्तीच्या मानेभोंवतीं घट्ट विळखा घालणारे मुळींच असूं नयेत हें मला पूर्ण मान्य आहे. आणि जेथें हे रूढीचे निष्ठुर पाश जीविताची शांतीच आवळून काढीत असतील अशा महिलाजीवनांतील प्रसंगांना धैर्यानें तोंड देणाऱ्या तेजस्वी स्त्री-रत्नांविषयीं मला निरतिशय आदरच आहे! रूढिराक्षसीनें स्त्रियांच्या आयुष्यक्रमालाच भलतें अनिष्ट वळण लावलें आहे हें तत्त्व मला शिरोधार्य आहे. परंतु या तत्त्वामागील तपशीलाकडे पहातां या परिस्थितीला सर्वस्वीं पुरुषवर्गच जबाबदार आहे असें मी म्हणणार नाहीं! माझ्या मतें विवाहित स्त्रियांच्या सर्वांगीण स्वातंत्र्याला कमालीचा विरोध करणारे पुरुष नसून स्वतः स्त्रियाच होत! बालमनांत विशिष्ट संस्काराचें बीजारोपण करण्याची जबाबदारी तरी प्रौढ स्त्रियांचीच आहे ना? कित्येकदा तर माताच मुलांना बिघड-वितात आणि त्यांच्या कोवळ्या मनोभूमींत कळत वा नकळत इतक्या

मोहाच्या गोष्टी कोंबतात कीं, आधुनिक विवाहसंस्थेचें पावित्र्यच तेणें-करून पार बिघडून गेलें आहे ! मला तरी असें वाटतें कीं, या रूढीच्या जाचापासून स्वतःला व स्वतःच्या अपत्यांना सोडविणें शक्य असूनहि कित्येक सुशिक्षित स्त्रिया त्यांच्या अशिक्षित भगिनींइतक्याच आपल्या मुलांमुलींच्या संगोपनाच्या व वळणाच्या बाबतींत जुन्या पारंपरिक बुद्धीच्या असतात. आतां याला काय म्हणावं ?

थोडा अधिक सूक्ष्म विचार करतां मला असेंहि वाटतें कीं, ज्या बुद्धिमती स्त्रिया असें सामुदायिक बंड उभारूं पहातात तें सामाजिक परं-परेविरुद्ध तितकेंसें नसून स्वतःच्या स्त्रीत्वभावनेविरुद्ध होय ! कारण त्या नेहमीं अशी तक्रार करतांना आढळतात कीं, "स्त्रियांऐवजीं त्या जर 'पुरुष' बनल्या असत्या तर त्यांना पदोपदीं विरोध करणाऱ्या विघ्नांच्या इतक्या रांगांच्या रांगा त्यांच्यापुढें दत्त म्हणून उभ्या राहत्या ना !" पण 'आजीबाईला मिशा आल्यास त्या आजोबा झाल्या असत्या' म्हणण्या-इतकीच वरील गोष्ट शक्य कोटींतील आहे ! जग हें जोंपर्यंत असें आहे आणि स्त्री व पुरुष हीं दोन लिंगें आहेत तोंपर्यंत निसर्गानेंच त्यांचीं वेगवेगळीं कर्तव्यें वांटून दिलीं आहेत. अलौकिक बुद्धिवैभव लाभलेल्या स्त्रियांनाहि स्त्रीत्वाच्या विशिष्ट उपजत भावना व प्रतिक्रिया सुटलेल्या नाहींत ! जोंपर्यंत मानवी भूतदया टिकून राहील तोंपर्यंत आजारी पति किंवा रडवें मूल स्त्रीच्या आवडीनिवडीच्या ध्येयांत व्यत्यय आणल्या-वांचून खचित रहाणार नाहीं ! आणि ही वस्तुस्थिति बदलण्याची प्राज्ञा कोणाच्यांतहि नाहीं हें निश्चित ! हा निसर्गाविरुद्ध अनादि झगडा आहे! सारा समुद्र जरी आटला तरी या झगडयाचा पुरता निकाल लागण्याचें भाग्य पहाण्याचा सुदिन स्त्रियांना कधीं काळीं लाभेल कीं नाहीं याचीच मोठी शंका आहे !

मात्र त्याबराबरचे हीहि गोष्ट मला मान्य आहे कीं, केवळ व्यक्तिगत नात्यावरच सर्वस्वीं आधारून ज्यांना जीवनांतील आनंद हुडकावयाचा असतो अशा स्त्रियांच्या कपाळीं निराशा ही ठेवलेली ! पण म्हणून अशा संबंधांनाच मुळीं टाळणें किंवा त्यांची महति कमी करूं पहाणें हेंहि तितकेंच आत्मघातकी

होय! मानवी हितसंबंधांनाच लाथाडून वाटल्यास एकांगी व एकाकी जीवित कंठणें पुरुषांना कदाचित् जितकें सुलभ जाईल तितकें कांही बुद्धिमती स्त्रियानाहि साधेल असें माझ्याच्यानें म्हणवत नाहीं!

आता मिस् फ्लॉरेन्स नायटिंगेलसारख्या थोड्याशा अपवादभूत व्यक्ति असतील कीं ज्यांच्या जीवितांचा ध्रुवतारा संसारसागराच्या पलीकडचा असतो आणि ज्यांचा उच्च सेवाधर्म वर्णविरहितहि असूं शकतो! अशा दुर्मिळ व्यक्ति मानवी हितसंबंधांना झिडकारण्यासाठीं वाटल्यास आपलें अंतःकरण खुशाल कोरडें ठेवोत! पण सामान्यांची कथा वगळी! अशा इसमांची बुद्धि एरवीं कितीहि प्रगल्भ व उच्च ध्येयान्वित असूनहि त्यांच्या सुखाचा कांही अंश तरी नित्याच्या गृहजीवनातच त्यास धुंडाळावा लागेल! सांसारिक संबंधावर अवास्तव रूढींचें कोठें कोठें दारुण दडपण पडलेलें असलें तरी तें पुरतेपणीं वगळणें निसर्गक्रमाविरुद्ध अन् म्हणूनच अशक्यप्राय आहे!

तात्पर्य, स्त्रियांच्या बाबतींत सांसारिक व्यवहारी जीवन व संन्यस्त ध्येयासक्त जीवन यांपैकीं त्यांनीं कोणतें पसंत करावें असा जेव्हां प्रश्न उद्भवतो तेव्हां माझ्या मतें या दोन्हींच्या मधोमध सत्यांश दडलेला असतो! बुद्धिमती व विदुषी स्त्रीला तितक्याच बुद्धिमान् पुरुषापेक्षाहि जीविताचे व्यापार केव्हाहि अधिक तापदायक व गुंतागुंतीचे वाटणार हें उघड आहे. पण म्हणूनच मानवी जीवित अत्यंत मननीय व आकर्षक अनुभवांची समृद्ध खाण असें कां म्हणूं नये!

---

# कार्लाईल व लेखनव्यवसाय

लेखनव्यवसायावर चरितार्थ साधेल का म्हणून विचारणाऱ्या मँचेस्टरच्या एका अनोळखी इसमाला टॉमस कार्लाईलचें उत्तर.

(१)

लंडन, जुलै १८४७

"सा. न. वि. वि.

आपल्या मूळ प्रश्नाला निश्चित उत्तर देता येण्यासारखें नाहीं याबद्दल वाईट वाटतें. लोकोत्तर साहित्यसेवकांचेंहि लेखन-व्यवसायापासून प्रत्यक्ष उत्पन्न पाहूं जाता असें दिसून येतें कीं, ते लोकानुरंजनासाठीं लिहीत असल्यास मात्र त्यांचें उत्पन्न साधारणपणें ठीक असतें. पण ते विशिष्ट ध्येयानें लिहीत असल्यास तें कमीच भरतें ! तें वर्षाला जास्तींत जास्त ४००० पौंडांपासून २०० पौंडां-पर्यंत किंवा त्याहून कमीदेखील आढळतें ! मात्र एक गोष्ट आपण नीट ध्यानात ठेवली पाहिजे. हें उत्पन्न अतिशय म्हणजे अतिशयच अनिश्चित आहे ! कारण तें केवळ नशिबावर सर्वस्वीं अवलंबून असल्यामुळें तें केव्हां व कसें हेलकावे खाईल याचा नेम कोणीहि आगाऊ सांगूं शकत नाहीं ! शेंकडा एखादा वाङ्मयसेवक देखील कधीं अत्यंत लोकप्रिय किंवा यशस्वी झाल्याचीं उदाहरणें मुळीं आढळतच नाहींत ! जुगार खेळून निर्वाह साधूं पहाणाऱ्या हौशी पण अन-भिज्ञ माणसानें विचारण्याच्या प्रश्नासारखाच कांहींसा आपला-

प्रश्न आहे म्हणाना ! त्याला मी उत्तर तें काय देणार ! वाङ्मयां-तला कनिष्ठ प्रकार म्हणजे वृत्तपत्रांच्या बातमीदारांचा. त्यांना आज-काल वर्षाकांठीं सुमारें २०० पौंड मिळत असल्याचें समजतें. ज्याला निर्वाहासाठीं लेखनव्यवसाय पतकरल्याशिवाय गत्यंतर नाहीं अशा सुबुद्ध इसमाला खचित वाटेल कीं, आर्थिक दृष्ट्या बातमीदारांची स्थिति कांहीं तितकीशी टाकाऊ नाहीं. या वस्तुस्थिती-कडे बुद्ध्या डोळेझाक करून वाङ्मयाच्या अपूर्व मोहिनींतील एखादी लोकप्रिय युक्ति अंगीं पंचवून, ती कौशल्यानें लोकांपुढें ठेवण्याचा मनापासून अत्यंत चिकाटीनें प्रयत्न करणारा बुद्धिमान् माणूस सतत तसेच प्रयत्न करीत राहिल्यास क्वचित् दोन पैसे मिळवूं शकेल हें खरें ! पण साऱ्यानाच डोंगराची ही कष्टप्रद चढण साधेल असे नाहीं ! पुष्कळांची तर छातीच फाटते आणि ते दारूचा आश्रय करितात किंवा उपाशी मरतात बिचारे ! माझ्या अवलोकनांत आलेल्या अशा अनेक उदाहरणावरून त्यांच्या आर्थिक स्थितीचें व अंतिम अवस्थेचें खरेंखुरें चित्र मी आपल्यापुढें ठेवलें आहे ! आतां वाङ्मयात सर्वांच्या डोळ्यात एकदम भरेल असें चांगलें भरदार कार्य करण्याची खरी तळमळ कोणास सारखी टोंचीत आहे असें क्षणभर कल्पूं या. पण त्याच्यांत अपूर्व बुद्धिवैभव असूनहि त्याची उपासमार बहुधा टळायची नाहीं ! त्याची बुद्धि कितीहि स्वतंत्र का असेना, ती जर सामान्य लौकिकाहून एकदम उंच नसेल तर त्याला प्राप्तीच्या नांवानें पूज्यच ! कारण सर्वच जण त्याला हिणवितील कीं, "आपण जी आपली कृति आम्हांस सादर केली आहे, तिच्यासारख्याच शेंकडो कृती 'मागणी व पुरवठा' या न्यायानें बाजारांत खच्चून भरल्या आहेतच की ! आणखीन् तसल्या वस्तूंचें आम्हांला मुळींच प्रयोजन नाहीं !" म्हणून अशा कृतीं-पासून निर्वाहाची तात्पुरती सोय जरी लेखक करूं शकला तरी मी त्याला भाग्यवान् समजेन !

म्हणून म्हणतों, आपण इतक्या आशेनें केलेल्या पृच्छेला नकार

कळविण्याचे दुर्दैव आज माझ्यावर आले आहे ! ही दारुण वस्तु-स्थिति इतकी निराशादायक असली तरी तशी ती तंतोतंत आहे खास ! म्हणून या बाबतींत मी आपल्याला इतकाच उपदेश करूं शकेन. व्यावहारिक रोजगारीचा एखादा भरीव प्रकार टाळून साहित्य-साबणाचे हे पोकळ फुगे रिकामपणीं उडविण्याचा अनावर मोह आपण दृढनिश्चयपूर्वक कसोशीनें टाळण्याचा अवश्य प्रयत्न करावा; कारण हे फुगे वरकरणी कितीहि भडक, सुंदर व चकचकीत दिसले तरी ते चंचल व क्षणभंगुरच होत हें सत्य आपण कधींहि दृष्टीआड करतां कामा नये ! खरेंच, स्वतःला ईश्वरानें जी विशिष्ट अंतःप्रेरणा दिली आहे तिची पुरती वाढ व जोपासना करणें यातच माणसाचें खरें कल्याण सांठविलेलें आहे. नहून नुसती लेखनद्वारा पोकळ बड-बड करणें व निष्फळ लोकरंजन साधूं पहाणें अशा भ्रमाचा आपण निरास करावा. कळावें ही विनंति."

आपला,
टी. कार्लाईल

(२)

कार्लाईलचा चरित्रकार प्रो. जेम्स अँथनी फ्रूड यानें कार्लाईलचे वाङ्मयव्यवसायासंबंधींचे त्याच्याशीं झालेले संवाद एकत्र गोंवले आहेत ते असे :—

"ज्या विषयांवर कार्लाईल मजपाशीं नेहमीं बोलत राही त्यांत हाहि एक असे. मानवी कर्तव्याची उच्चतम सीमा म्हणजे वाङ्मय होय असें तो म्हणत असे. पण निसर्गानें त्या उच्च कार्यासाठीं गटे किंवा शिलरसारख्यांची सहेतुक योजना केली तरच त्याच्या-कडून उत्कृष्ट वाङ्मयनिर्मितीची आशा. उगाच इतरांनीं त्यात लुड-बुडून तादृश फायदा तो काय, असें त्याचें मत होतें. पण सामान्य-पणें आधुनिक आंग्ल पिढीच्या लेखनव्यवसायाबद्दल त्याला परता

तिटकाराच असे. कार्लाईलच्या मतें उदरनिर्वाहासाठीं लेखक बनूं पहाणारा कोणी इसम दुसरा एखादा चांगला व्यवसाय करण्यास तो असमर्थ ठरल्यामुळें शेवटीं लेखनव्यवसायाकडे वळूं पहातो. तो मानधन किंवा अहंमन्य असल्यामुळे इतरांप्रमाणें रुळलेल्या मार्गानें जाण्याचें टाळीत असतो. पण तो तसलाच लाखांत अव्वल असल्याशिवाय त्याच्या लेखनाचा प्रारंभ व अंत सारखाच शून्यांत व्हावयाचा! अशाचें लेखन म्हणजे नुसती पोकळ बड-बड होय! कारण जीवित म्हणजे प्रत्यक्ष कृति होय; नुसतें पोकळ शब्दशौर्य नव्हे! अशा इसमांचें एखादें भाषण, पुस्तक, टीका किंवा वृत्तपत्रातील लिखाण म्हणजे तितक्या प्रमाणात चेतना-शक्तीचा निष्कारण व्ययच म्हणाना! त्याचा व्यवहारात उपयोग तो काय? जेव्हा माणूस आपले सारे विचार-विकार ओकून दाख-वितो आणि जेव्हा त्याला नेहमीं कसली तरी बडबड करण्याची संवयच अंगवळणीं पडते, तेव्हा त्याप्रमाणे आचरण करण्याच्या संवेदनेचा देखील त्याला मुळीं विसर पडतो. इंग्लंडचीच गोष्ट घ्या. इंग्रजी वाङ्मय निर्माण होण्यापूर्वीदेखील इंग्लडात मोठे मोठे योद्धे व महापुरुष होऊन गेलेच की नाही? शाईत लेखणी बुडविण्या-ऐवजीं आपल्या तळपत्या तरवारीच्या अणकुचिदार टोकें तींत बुडवून सही करणाऱ्या इंग्लंडांतील प्राचीन योद्ध्याच्या अंगी त्याच्या हल्लींच्या वारसदारापेक्षा कितीतरी अधिक पौरुष, सद्‌गुण, व्यावहारिक कौशल्य व मनाची थोरवी होती हें नाकारता येणार नाहीं. प्रस्तुतचें समाजाचें विघटन संपून जेव्हा त्याची प्रतिक्रिया होऊं लागेल आणि चहुंकडे विवेकवादाचें रोपटें जोमानें उगवूं लागेल तेव्हा आजकालची जिभेची वात्रट वटवट कोठल्या कोठें वाहून जाईल! खरोखरीच अंतरींच्या उमाळ्यानें ज्याच्या हृदयात संदेश उतूं पहात असेल तेच नेमके बोलतील! उगाच इतराची लुडबुड कशाला? क्रमेण चर्चातील रविवारच्या प्रार्थनादि निष्फळ ठरतील! केवळ बोलण्यानेंच बोलक्याची अगर श्रोत्याची स्थिति सुधारते किंवा तो

अधिक शहाणा होतो असें थोडेंच आहे ! पण सतत परिश्रम करण्याच्या संवईमुळें, सदैव चांगलें व उपयुक्त कार्य करण्याच्या अंतःप्रेरणेमुळें व प्रामाणिकपणें उदरनिर्वाह करण्याच्या शक्तीमुळें प्रत्येकाच्या अंगींच्या गुणाची निश्चित वाढ होत जाते.

आता स्वतः मी लेखक कसा झालों म्हणाल तर मला प्रारंभीं दुसरा एखादा चांगला व्यवसाय सांपडला नाहीं म्हणून."

कित्येकदा कार्लाईल म्हणे :— "माझ्या लिखाणाला विशिष्ट मोल आहे." पण दुसऱ्याच क्षणीं तो म्हणे :— "माझ्या लिखाणाला तितकीशी किंमत नाहीं, किंबहुना तशी ती मुळींच नाहीं म्हटल्यासहि चालेल ! तसें म्हणाल तर वाङ्मयाविषयीं मला तितकीशी उपजत अभिरुचि नाहीं. दुसरें एखादें सोपें पण उपयुक्त कार्य करण्याचें शिक्षण मला प्रथमपासून देण्यात आलें असतें तर मी कदाचित् अधिक सुखी व कार्यक्षम झालों असतो ! तथापि माझ्या जीविताकडे पहाता मी इतका निर्वाळा देऊ शकतों कीं, माझ्याज्यानें होईल तितके कमालीचे परिश्रम वाङ्मयापायीं मीं वेंचले आहेत !"



# वाङ्मय हें शास्त्र कीं कला?

## विषयप्रवेश

उत्कृष्ट वाङ्मयरचना ही एक उच्च प्रतीची कला आहे. प्राचीन ग्रीक लोक ललितकलांचे मोठे शोकी होते. आणि त्यांच्या कालात कलांच्या सर्व दालनांत जी मोठी चलती झाली तिची इतिहासच ग्वाही देत आहे.

ग्रीस देशाच्या इतिहासांत अशी एक गोष्ट आहे कीं, डेमेट्रिअस नामक राजा -होड्स शहरावर चाल करून गेल्यावेळीं प्रोटोजिनिस नांवाचा चित्रकार एक सुंदर चित्र रंगवीत होता. यासंबंधीं सुप्रसिद्ध इतिहासकार प्लिनी म्हणतो—"चित्राला आग लागेल या भीतीनें त्या राजानें शहराचा विध्वंस करून तें जिंकण्याचें लांबणीवर टाकलें. शहराच्या ज्या भागांत प्रोटोजिनिस आपली कलाकृति रंगवीत होता तो वगळून इतर दिशांनीं शहरावर आगीचा मारा करण्यास प्रशस्त जागा नसल्यामुळें त्या राजानें आपल्या गळ्यांत माळ घालूं टेपलेल्या विजयलक्ष्मीलाच थोपवून धरलें आणि त्या चित्राचें रक्षण केलें! प्रोटोजिनिस ज्या बगीच्यांत बसून चित्र रंगवीत होता तो गावाबाहेर पण शत्रूंच्या छावणीच्या अगदीं जवळ होता. पण त्याची चित्रकलेवरील निष्ठा इतकी एकाग्र व अव्यभिचारी असल्याचें सांगतात कीं, त्या भयंकर रणधुमाळीनेंहि ती विचलित झाली नाहीं! नंतर डेमेट्रिअसनें त्याला आपल्यापुढें आणवून असें विचारलें कीं, "शत्रूंच्या सानिध्यांतहि निर्वेधपणें कलोपासना चालविण्याइतकें मनोधैर्य व चित्तस्वास्थ्य तुला कोठून आलें!"

त्यास त्या चित्रकारानें दिलेलें उत्तर जितकें समर्पक तितकेंच चिंतनीय आहे. कारण अशा लहान गोष्टींनीं निर्भेळ कलोपासनेच्या महत्त्वावर सूत्र-रूपानें जितका व जसा झगझगीत प्रकाश पडूं शकतो, तितका एरवीं पृथ-क्करणशील अशा मीमांसेनेंहि पडणें कठीण !

प्रोटोजिनिसनें त्या राजाला दिलेलें सूचक व अर्थगर्भ उत्तर असें :—
**"आपण जो आज संग्राम मांडला आहे तो ऱ्होडसच्या कलां-विरुद्ध मुळींच नसून ऱ्होडसच्या जनतेविरुद्ध होय असेंच मी समजतों !"**

ग्रीसच्या वैभवशाली साम्राज्याच्या अस्तानंतर तेथील सुंदर कलांचा साहजिकच लोप झाला तरी, एके काळीं ग्रीक लोक ललितकलांचे किती कमालीचे भोक्ते होते या गोष्टीवर वरील कथानकानें अत्यंत उज्ज्वल प्रकाश पडूं शकतो यांत काय संशय ? आणि खरोखर ललितकला तशा थोर योग्यतेचीच आहे हें इतिहासांतील इतर अनेक उदाहरणांवरूनहि दाखवितां येईल.

प्रसिद्ध जगज्जेता चक्रवर्ती अलेक्झांडर उर्फ शिकंदर बादशहा याच्या नित्यक्रमांतील गोष्ट तर याहून अधिक बोधप्रद आहे. तो रात्रौ निजण्याचे समयीं आपल्या उशीखालीं एक नागवी तरवार आणि तिच्या शेजारींच एका रत्नजडित मंजूषेंत सुप्रसिद्ध होमर कवीचें 'ईलिअड' काव्य ठेवण्यास विसरत नसे असें सांगतात. नग्न तरवारीनें त्याचें अतुल शौर्य सूचित होत होतें असें कल्पिल्यास 'ईलिअड' काव्याच्या सांनिध्यानें त्याची उच्च प्रतीची काव्याभिरुचि ध्वनित होत होती असें म्हणावें लागतें. तात्पर्य, निष्ठुर व्यवहार आणि ललित काव्य यांचा दुर्मिळ समवाय साधूं पहाणाऱ्या शिकंदर बादशहास तेवढ्यापुरतें 'रसिकोत्तम' म्हणण्यांत अडचण कोणती ?

ज्यूलिअस सीझरसारख्या प्राचीन रोमन योद्धयांच्या भीमपराक्रमासवेंच त्यांनीं निर्माण केलेल्या अमोल ग्रंथसंपत्तीच्या थोरवीकडे पहातां त्या काळचे शूर सेनापतीसुद्धां कलोपासनेकडे डोळेझांक करीत नसत; किंबहुना शौर्याच्या कृत्यांनंतर थकून भागून हुश् हुश् करीत पडल्यावेळीं त्यांच्या मनाच्या करमणुकीचें किंवा भावनानंदाचें उच्च कार्य काव्य-वाङ्मयासारखीं

ललितकलेचीं उत्कृष्ट प्रतीकें करीत असत असे दाखले इतिहासांत सांपडतात.

तात्पर्य, वाङ्मय हें कलेचें एक प्रमुख उपांग होय. तें तसें कसें असा प्रश्न येथें साहजिकच उद्भवतो. तेव्हां प्रथम कलेच्या व्याख्या करून त्या वाङ्मयाच्या चौकटींत कशा काय बसतात तें पाहू.

सुप्रसिद्ध आयरिश कवि व मदनपिल्ले येथील कॉलेजचे विद्वान् प्रिन्सिपल डॉ. जेम्स एच्. कझिन्स् एका व्याख्यानांत म्हणतात—"मानवी जीवितात (१) धर्म, (२) ललितकला, (३) शास्त्रें व (४) तत्त्वज्ञान यांचा सुंदर सगम हवा. यांच्यापैकीं कुठल्याहि एकाच विषयाचा अतिरेक झाल्यास पदरीं हटकून एकागीपणा येतो.

"विश्वव्यापी चित्तत्त्वांत आम्ही अंतर्भूत आहोंत. त्या आद्य तत्त्वाशीं समरस होण्याकरितां भावना जेव्हा बहिर्मुख होऊन कार्य करूं लागतात तेव्हां ललितकलांची निर्मिति होते. तो दयाघन ईश्वर या सृष्टींत अनंत रूपांनीं विनटला आहे. त्या वस्तूंशीं बहिर्मुख होऊन एकरूप होणें हें कलेचें कार्य होय. आणि जातिवंत कलावंत तेच कीं जे चराचर सृष्टीतील अखिल तत्त्वांशीं समरस होऊन आपल्या अनुभवास आलेल्या ईश्वरी सौंदर्याचें यथाशक्ति आविष्करण करण्यास निःस्वार्थी प्रयत्न करीत असतात."

ललितकलेच्या व्याख्या रूचिभेदाप्रमाणें बदलतात. बीजगणितांत जसें एका संख्येच्या निरनिराळ्या अवयवांच्या जोड्या (factors) काढितां येतात, उदा. १२ या संख्येचे अवयव २×६ किंवा ३×४ संभवतात किंवा एकाच देवालयाला जशा निरनिराळ्या वाटा असतात, तशीच ही गोष्ट समजावी.

एका लेखकानें लहानशाच पण अत्यंत मार्मिक व समर्पक रूपकाच्या योजनेनें असे म्हटलेलें आहे कीं, "कला म्हणजे सूर्याचे किरण आणि संसारातील राग, अनुराग व सुखदुःखाचे विकार हे काळे ढग होत !"

मॅथ्यू आर्नोल्ड नामक प्रसिद्ध आंग्ल टीकाकार म्हणतो, "कलेंत जर हिडीस वस्तुसत्यापेक्षां अधिक सौंदर्य प्रतीत होत नसेल, तर तिचें खूळ समजून उच्चाटन केलेलेंच बरें !"

इंग्लंडांतील सुप्रसिद्ध तत्त्वज्ञ व प्राणिशास्त्रज्ञ खि. सर जॉन लबॉक

यांच्या "Pleasures of Life" ( 'जीवितातील सुखें' ) या ग्रंथाच्या आधारें कलेसंबधीं खालील व्याख्या संकलित केल्या आहेत. त्या मननीय आहेत :—

"शास्त्र व कला हीं सत्य, सौजन्य व सौंदर्य यांचीच व्यक्त रूपें होत. नेत्रांच्या द्वारा मनाचें परिष्करण व शुद्धि घडवून आणते ती कला. उलट पक्षीं, मनाच्या व्यापारांमुळें डोळ्याची तहान भागते, असा हा अन्योन्य-संबंध आहे."

सुप्रसिद्ध तत्त्ववेत्ता जॉन रस्किन् म्हणतो, "तीच कला नित्य कीं जींत हात, बुद्धि व हृदय यांचा सुंदर मिलाफ झालेला असतो. पण कला म्हणजे निव्वळ हेतुशून्य करमणूक नव्हे ! ती फावल्या वेळीं सवडीनें शिकायची नसते; किंवा महत्त्वाचें दुसरें कांही काम नाहीं म्हणून वेळ मारून नेण्यासाठीं कलेचा आश्रय करणाऱ्यांना तिचें निजस्वरूपच कळलेलें नाहीं असें म्हणावें लागतें ! निसर्गांत उच्चतर सुधारणा करणें किंवा त्यात स्थित्यतरें घडवून आणूं पहाणे हें कांही उच्च कलेचें कार्य नव्हे ! पण निसर्गांतरीं दडून असलेल्या सुंदर व निर्मळ वस्तू चातुर्यानें हुडकून काढून त्या रसिकापुढें जी मांडते ती कला ! कला अशा वस्तूं-विषयीं 'अंतरींचें प्रेम' व्यक्त करते आणि त्यात दडलेलें उच्च प्रतीचें सौंदर्य विनम्र सूचकतेनें पण पराकाष्ठेच्या योजनाकौशल्यानें इतराना दाखविण्याचें गोड कार्य करते. आतां चित्रकार ज्या प्रमाणात अशा गूढ सौंदर्याविषयीं विशुद्ध प्रेम दाखवील त्या प्रमाणात त्या कलेची थोरवीहि खुलून दिसेल. मात्र खऱ्या कलोपासकानें इतकेंच लक्ष्यांत ठेवावयाचें कीं, सौंदर्याविषयीं आसक्ति बाळगणाऱ्या त्याच्या मनोधर्मांत सत्याचा लवलेशहि वगळलेला नसावा !"

"या जगातील असंख्य घडामोडींपैकीं कांहीं मात्र पहाणें व प्रत्यक्ष अनुभवणें मानवाच्या हातीं असतें; पण त्यांच्याखेरीज हरवडि ज्या इतर अनेक गूढ गोष्टी संभवतात, त्या सुगम व सुबोध लालित्यानें मानवांस सांगून त्यांजवर जी एक प्रकारची दिव्य मोहिनी पाडूं शकते, ती चतुर विद्या म्हणजे कला."

'नीतिबाह्य कला कलाच नव्हे' असें प्रसिद्ध रशियन तत्त्ववेत्ता काऊंट टॉलस्टॉय याचें स्पष्ट म्हणणें आहे !

पण स्वतः कलादृष्टि ही नीति-अनीतींच्या अतीत असूं शकते हें उघड आहे.

सुप्रसिद्ध जर्मन कवि व तत्त्ववेत्ता गटे म्हणतो, "निसर्गाची हुबेहूब प्रतिमा म्हणजे कला नव्हे ! किंबहुना तशी ती नाहीं म्हणूनच तिला 'कला' म्हणतात !"

गायडो नांवाच्या एका प्राचीन चित्रकाराची अशी गोष्ट सांगतात कीं तो जो आदर्श आपल्यासमोर ठेवून सुंदर स्त्रियांचे पुतळे तयार करी तो एकवार पहावा म्हणून एका श्रीमान् नागरिकानें धोसच धरला. गायडोनें स्वतः आपल्या मळक्या रंगाऱ्यालाच एका विशिष्ट ठेवणींत समोर उभें केलें आणि एक दोन सफाईचे हात मारून निर्गुणांतून सुंदर अंगनेच्या पुतळ्याची सगुण आकृति त्या प्रेक्षकापुढें हा हा म्हणतां उभी केली !

हें पाहून विस्मयानें थक्क झालेल्या त्या धनिकाला गायडो म्हणतो, "महाराज, मनांत उच्च सौंदर्याचें अखंड चिंतन व मनन चालू राहून त्यांचा शिजून पाक झालेला असला पाहिजे ! नुसता पार्थिव आदर्श डोळ्यांसमोर ठेवून कार्यभाग साधणें शक्य नाहीं !"

वर्डस्वर्थ कवीसंबंधीं एक चटकदार आख्यायिका असल्याचें रॉबिन्सन् नामक लेखक सांगतो. तो कवि फार प्रसिद्धि पावलेला असल्यामुळें त्याच्या लेखनवाचनाच्या बैठकीची जागा कशी ती एकवार डोळे भरून पहावी असा ध्यास धरून एक वाङ्मयाचा नादी तरुण त्याच्या घरीं गेला असता त्याला कवि भेटला नाहीं ! तेथील मोलकरणीनें मात्र खालीलप्रमाणें सूचक उत्तर दिलें :—

"हें माझ्या धन्याचं ग्रंथालय. पण महाराज, खरं सांगूं का ? त्यांचा प्रत्यक्ष अभ्यास व चिंतन मैदानांत उघड्यावरच चालावयाचीं !"

आतां शास्त्र व कला यांचें नातें, परस्पर संबंध व त्यांतील भेद यांजविषयीं विचार करूं. शास्त्र म्हणजे विज्ञान आणि वाङ्मय म्हणजे ललितकला. त्यांचे फाटे भिन्न असले तरी त्यांचें पवित्र उगमस्थान एकच. आणि

तें म्हणजे शुद्धस्वरूपी निर्मल मानवी अंतःकरण हें होय. मानसरूपी या स्वच्छ व विस्तीर्ण सरोवरापासून कलारूपी गंगा आणि शास्त्ररूपी ब्रह्मपुत्रा नद्या उगम पावतात. आणि त्या भिन्न मार्गांनीं वहात जाऊन शेवटीं अनंतत्वरूपी सागरांत विलीन होतात असें एक रूपक काल्पिणें बहारीचें होईल.

शास्त्र व कला यांजमधील स्थूल भेद असा कीं, शास्त्र अंतर्मुख होऊन सिद्धांत मांडतें आणि कला बहिर्मुख होऊन कार्य करते. मानवी मेंदूत दोन कप्पे संभवतातः—(१) विवेकी तर्क किंवा बुद्धि व (२) हळुवार मन किंवा भावना. पहिल्यापासून शास्त्रें व विज्ञान निर्माण होतात. दुसऱ्यापासून ललितकलांचा उगम होतो. सृष्टींतील वस्तुमात्रांचें निरीक्षण व पृथक्करण करून गोळा केलेल्या सामुग्रीची ज्या वेळीं मनुष्य आपल्या तीक्ष्ण तर्कशक्तीनें छाननी करूं लागतो व परिशीलनानें त्यांच्यापासून सिद्धांत पाडूं लागतो त्या वेळीं त्याचें मन व बुद्धि यांचा सहविचार होतो. तो केवळ शुद्ध भावनेवरच न भाळतां साधक बाधक विचार करून तर्काची कांस धरतो आणि त्याची तर्कबुद्धि अंतर्मुख होऊन सूक्ष्म विचार करते व सिद्धांत पाडते. त्यापासून शास्त्रें, विज्ञान व तत्त्वज्ञान यांची निर्मिति झाली आहे. येथें तर्काची भूमिका निष्ठुर पण कांटेकोर पित्याप्रमाणें आहे असें हवें तर मानूं.

उलटपक्षीं सृष्टींतील गूढ सत्यें उकलण्याकरितां जेव्हां भावना बहिर्मुख होऊन कामक्रोधादि विकारांच्या आहारीं न जातां प्रेमळ मातेप्रमाणें प्रेक्षकांना प्रीतीनें गोंजारून आकर्षक रीतीनें सिद्धांत सांगतात तेव्हां ललितकलांचा जन्म होतो.

शास्त्र व कला यांचें नातें कांहीं अंशीं भाऊबहिणींसारखें. शास्त्र भाऊ, कला बहीण. कलेचें कार्य कांही अंशीं ललनेसारखें. जीवनविषयक घडपड करणें तिचें कार्यक्षेत्र नव्हे ! पण त्या कष्टमय कार्यावर सौंदर्याचें एक झगझगीत व प्रभावी आवरण घालून श्रमाचें आनंदांत रूपांतर करणें हें कार्य कलेचें आहे. शास्त्रें व कला यांचें कार्य, पृथक्करण-संकलनात्मक आहे. शास्त्राचें कार्य एखाद्या वस्तुसत्याचें सूक्ष्म पृथक्करण करण्याचें असलें, तर कलेचें

कार्य वस्तुजातांत जें पृथक्त्व व अनेकत्व आढळतें, त्यांतील एकत्व व सत्य हुडकून काढून तें ललितरूपानें वर्णन करण्याचें आहे. अनेकांत एकत्व पहाण्याचें हें कार्य तत्त्वज्ञानहि करितें. फिरून तत्त्वज्ञान व ललित-कला यांजमधील अंतर हें कीं, प्रमाणशीर तर्कनिष्ठेला सोडून तत्त्वज्ञान आसपास कोठें फारसें फिरकत नाहीं. पण कला भावनांना आंदोलनें देऊन वळणांवळणांनीं वहाणाऱ्या उद्दाम निर्झराप्रमाणें विषमतारूपी खडकांतून मार्ग काढीत जाते.

किंबहुना थोडक्यांत असेंहि म्हणतां येईल कीं, पृथक्करणाच्या द्वारा एकांत अनेकत्व पहातें तें शास्त्र; अनेकात एकत्व भावनाच्या चष्म्यांतून पहाते ती कला; आणि या दोहोंचाहि सुंदर समन्वय साधून व सूक्ष्म तर्कनिष्ठेला क्वचित् कोमल भावनाची जोड देऊन प्रसंगोपात्त एकात अनेकत्व आणि अनेकांत एकत्व लीलेनें पाहू शकतें तें तत्त्वज्ञान.

वस्तु प्रत्यक्ष जशी आहे तशी ती व्यक्त करण्याचा प्रयत्न करितें तें शास्त्र. त्यांत स्थल व काल यांचा विचार करण्यास सवड नसते. उलट पक्षीं कला प्रत्यक्ष वस्तूंतील उघड सत्य जशाच्या तसें व्यक्त न करता एखाद्या सुंदर आवरणाखालीं किंवा उचित कोंदणात तें बसवून अशा सौंदर्यात तें खुलवून व सजवून दाखविते. वस्तुनिरीक्षण केल्यामुळें प्रतीत होणाऱ्या सत्तत्त्वाचें निज स्वरूप जाणण्यास तर्कशक्तीच्या द्वारें प्रयत्न करितें तें तत्त्वज्ञान. म्हणून शास्त्र=ज्ञान आणि कला=कृति हे दोनहि गुण एकमेकांना पूरक होत.

मानवी अंतःकरणांत दोन कप्पे संभवतात. ते बुद्धि व भावना हे होत. फिरून त्यांचे प्रमुख मनोधर्म दोन. सामान्यतः बुद्धीच्या कप्प्यांतील धर्म जगांत जें जें म्हणून ज्ञान आढळतें तें तें उगाच गाजावाजा न करता क्षणशः व कणशः शिलकीं टाकतो आणि त्याच्यापासून तत्त्वज्ञान व शास्त्रें निर्माण होतात. वाटल्यास त्याला 'संग्राहक धर्म' असें म्हणूं.

भावनांच्या कप्प्यांतील धर्म, ज्ञान शिलकीं टाकण्यावर विशेष मदार न ठेवतां किंवा त्यांतच सारें समाधान न मानतां त्यास नावीन्यपूर्ण कल्पक-तेची जोड देऊन नित्य नवनवीन सृष्टि तयार करण्यास आस्थेनें झटत

असतो. त्यास 'कल्पक धर्म' असें संबोधूं. ज्ञानाचा संग्रह अपार असल्यास त्याच्यापासून शास्त्रांच्या व तत्त्वज्ञानाच्या निर्मितीला अनुकूलता व अव-काश लाभेल. मात्र, त्या संग्रहाची पुढें छाननी व पृथक्करण करावयाला सूक्ष्म तर्कनिष्ठ बुद्धीची जोड हवी. पण काव्य, कादंबरी, नाटक यांच्या-सारख्या वाङ्मयांतील ललितकलांचा मुख्य धर्म हा कीं, त्यांत ज्ञानाच्या गाढ खोलीऐवजीं भावनांची उंची व कल्पकतेची भरारी यांचीच अधिक आवश्यकता असते. आणि म्हणूनच कल्पकतेचें एकच प्रधान अंग लुलें असलेला इसम, एरवीं इतर अंगोपांगांचें भरपूर ज्ञान असूनहि, त्या त्या क्षेत्रांत विद्वान् निबंधकार म्हणून कदाचित् नांव काढील; यशस्वी ललित-कलालेखक म्हणून चमकणार नाहीं! तात्पर्य सत्य, सौजन्य व सौंदर्य या त्रयीनें आकृष्ट होऊन त्यांच्या दिव्य तेजोवलयाभोंवतीं शास्त्र काय, तत्त्वज्ञान काय, कला काय,—आपापल्या नादांत गर्क होऊन वर्तुळाकार कक्षेत भ्रमण करीत असतात. मात्र त्यांचे प्रकृतिधर्म आणि मार्ग भिन्न होत, इतकेंच काय तें.

एखाद्या कलाकृतीच्या हेतूंतील सौंदर्याची छाननी करण्यापूर्वी त्या कला-कृतींत सौंदर्याचे घटकावयव रचिले गेले पाहिजेत. तरच ती 'कला' या संज्ञेला पात्र होईल. चित्रांत सगुण रंग भरणारी ती कला; चित्रांचा सांपळा किंवा नुसता आराखडा रचणारी ती कला नव्हे! संगीतकले-सारख्या आद्य कलेचेंच उदाहरण घेतलें तर असें म्हणतां येईल कीं, एखाद्या गीतांत कितीहि गूढ अर्थ भरलेला कां असेना, पण तें गायकानें गातांना त्यांतील स्वरांच्या आंदोलनांतच जर एक प्रकारची हृदयाची पकड घेण्यास समर्थ अशी नादमाधुरी नसेल, तर कलादृष्ट्या तें संगीत हिण-कसच म्हणावयाचें! याचें एक कारण म्हणून संगीतकलेचा मुख्य उद्देश असा सांगतात कीं, तिनें गूढोत्कृष्ट विचारांच्या मांडणीवर तितका भर देऊं नये, जितका स्वरांच्या कंपांनीं आणि आंदोलनांनीं श्रोत्यांच्या मुग्धमधुर भावना उचंबळून आणून त्यांच्या हृदयांत सूक्ष्मोत्तम भावांचा संग्राम उत्पन्न करण्यावर वास्तविक तो द्यावा. आतां गेय कवनांत उत्कृष्ट विचारांची मांखळी असल्यास दुधांत साखर पडल्यासारखी आनंदाची गोष्ट होईल

खरीं; पण शुद्ध भावनेच्या तहानेनें व्याकुळ झालेला इसम दूध पितांना साखरेकरिता अडून रहाणार नाहीं, हेंहि तितकेंच खरें!

एखाद्या कलाकृतीच्या हेतूचें यथार्थत्व कसें पारखावें याविषयीं सुप्रसिद्ध जर्मन कवि गटे याचा विद्वान् आंग्ल चरित्रकार जॉर्ज हेनरी लुईस यानें त्याच्या चरित्रांत एके ठिकाणीं फार मार्मिक व सुंदर विवेचन केलें आहे. तो म्हणतो:—

"समजा कीं, एखाद्या चित्रकारानें सिंहाचें चित्र काढून घेतलें आहे. आता त्या कलावंताच्या मनोधर्माप्रमाणें व आवडीप्रमाणें त्या चित्रांतील सिंह कृशतनूचें, शक्तिमत्तेचें, राजप्रतिनिधिकत्वाचें, एकान्तप्रियत्वाचें किंवा इतर कोणत्याहि गुणवत्तेचें प्रतीक होऊं शकेल. कलावंताच्या मूळ हेतुविषयीं आम्ही यथार्थ किंवा चुकीचें अनुमान काढलें तरी कलादृष्ट्या निष्फळ अशा या वृथा चिकित्सेपासून तादृश फायदा नाहीं! किंबहुना अशा मृगजळामागें न लागण्यातच खरा शहाणपणा आहे म्हणाना! मात्र, त्या चित्रांतील सिंह कलेच्या खऱ्या कसोटीला पूर्णपणें उतरावयाचा असेल तर तो उत्कृष्ट रीतीनें रंगविला गेला पाहिजे; आणि लक्ष्यांत ठेवण्याची सर्वांत महत्त्वाची गोष्ट हीच कीं, प्रथम तो खऱ्याखुऱ्या (जिवंत) सिंहाप्रमाणें रसिक प्रेक्षकांच्या कौतुकास सर्वथैव पात्र झालेला असला पाहिजे!"

मास्ती वेंकटेश अय्यंगार नामक विद्वान् निबंधकार 'साहित्य' या आपल्या (कानडी) टीकाग्रंथांत म्हणतो:—

"शास्त्र व कला याजमधील स्थूल भेद असा:—

"मानवी स्वभावांतील निर्धार्य व चित्तवृत्तींना पटणारे विषय वर्णन करतें तें शास्त्र; अनिर्धार्य व अनिश्चित प्रमेयांसंबंधीं चर्चा करते ती कला. एखादा विद्वान् शास्त्रज्ञ तारांगणांचें चोखंदळ वर्णन करील. पण त्यांत कोमल रसज्ञतेला तितकासा अवकाश नसतो, जितका सूक्ष्म तर्कनिष्ठेला असतो. पण कवि झाला तरी काय करतो! नक्षत्रें पाहून आपल्या मनोधर्मांत भावांचीं जीं विविध आंदोलनें उमटलीं त्यांचेंच तो वर्णन करीत असतो. म्हणूनच वर्ड्स्वर्थ कवि सार्थ म्हणतो:—

'To me the meanest flower that blows can give
Thoughts that do often lie too deep for tears'

(भावार्थ :— 'उमललेलें कनिष्ठ जातीचेंहि फूल पाहून अश्रूंना देखील पुरून उरणारे खोल व गहन विचार मला कित्येकदा स्फुरतात !')

"कवींकवींच्या मनोधर्मांत फरक हे असावयाचेच. म्हणून तर साहित्य व कला यांना 'अनिश्चित' म्हटलें. कोणीहि गणित, ज्योतिष यांसारख्या शास्त्रीय विषयांत एकच प्रमेय प्रतिपादून तें सिद्ध करूं शकेल. पण काव्या-काव्यांच्या जनकांच्या चष्म्याप्रमाणें (म्हणजे त्याचा उपजत कल शास्त्रा-कडे किंवा कलांकडे जसा अधिक झुकलेला असेल त्याप्रमाणें) त्यांतील रस व स्थायीभाव बदलतात. व्यंजनाकाव्य (Lyric) आणि वर्णनाकाव्य (Poetry) या दोहोंतून हे फरक विशेष ठळकपणें आढळतात. वर्डस्वर्थ कवीनें चंडोल पक्ष्यावर (Skylark) कवन रचिलें. शेलेनेंहि याच विषया वर कविता केली. परंतु या दोघां श्रेष्ठ कविवर्यांच्या जगाकडे पहाण्याच्या मूलभूत भिन्न दृष्टिकोनांमुळें त्या कवितांत किती अंतर पडलेलें आहे हें रसज्ञांना तरी निराळें सांगण्याचें कारण नाहीं."

कलेचा काय किंवा वाङ्मयाचा काय सत्य, सौजन्य व सौंदर्य कुशलतेनें सूचित करण्याकडे कल असतो असें वर सांगितलें. पण तोच मुद्दा एक दोन दृष्टांत दिल्यास अधिक स्पष्ट होईल असें वाटतें.

### दृष्टांत पहिला :—

काळोख्या रात्रीं काजवा चमकतांना पाहून कोणास क्षणभर विस्मय व आनंद वाटणार नाहीं ! काजवा क्षणांत उज्ज्वल प्रभेनें चमकतो तर क्षणांत दृष्टीआड होतो ! अशा रीतीनें 'व्यक्त' व 'अव्यक्त' यांजमधील दुवा मानवांना लीलेनें वारंवार दाखविणारा आणि अनंत अंतराळांत निर्भयपणें उडणारा व रमणारा हा प्राणी नुसता उच्च प्रतीचा कलावंतच काय, पण थोर प्रतीचा तत्त्वज्ञानीहि वाटत नाहीं काय !

### दृष्टांत दुसरा :—

रात्रीच्या समयीं जहाजांना मार्गदर्शक होण्याकरितां आणि तीं काळो-खांत भलत्याच दिशेनें वाहत जाऊन एखाद्या खडकावर आपटून फुटूं नयेत

म्हणून समुद्रांतील बेटांत दीपगृहें बांधलेलीं असतात आणि त्यांत वर्तुळाकार फिरत्या दिव्यांची योजना केलेली असते. हा दिवा क्षणांत अंधुक दिसतो, पण दुसऱ्याच क्षणांत दिव्य प्रभेचें इतकें उज्ज्वल वर्तुळाकार फिरतें आवरण सभोंवार फेंकतो कीं तेणेंकरून कित्येक मैलांच्या टापूंतील जलप्रदेश एकदम सुप्रकाशित होतो. आतां तो दिवा फिरताच कां करतात ? त्यास उत्तर असें कीं, तो तसा न करतां इतर दिव्यांप्रमाणें निश्चल ठेविला तर फार लांबून जाणाऱ्या जहाजाना तो दिवा कीं तारा याचीच भ्रांत पडूं शकते असें म्हणतात ! परंतु उघडझांक होणाऱ्या फिरत्या दिव्यामुळें त्याच्या या संशयाला जागाच रहात नाहीं, नव्हे का ? ललितकलेची काय, वाङ्मयाची काय बहुतांशीं गोष्ट तशीच आहे म्हणाना ! दीपगृहांतील फिरता दिवा उघडझाक न करता निश्चल जळेल तर तें लाक्षणिक अर्थानें फार तर एक शास्त्रीय सत्य असें मानतां येईल. पण त्याचा प्रत्यक्ष व्यवहारांत वावरणाऱ्या मानवांना फारसा उपयोग होत नाहीं. उलटपक्षीं दीपाच्या उघडझाकींत कुशल कलेचें कार्य कसें युक्तीनें सूचित होतें तें पहा. स्वतः दीपाचें अस्तित्व दर्शविणारा अंधुक प्रकाश शाश्वत असतो. त्यास आपण सनातन 'शास्त्रीय सत्य' असें कल्पूं; दिव्याच्या वर्तुळाकार फिरतीच्या वेळीं जो झगझगीत प्रकाशप्रवाह सभोंवार फांकतो आणि एकदम डोळे दिपवितो त्यास कलेची रम्योज्ज्वल 'प्रतिभा' असें म्हणूं; आणि वर्तुळाचा फेरा पुरा करून ठराविक क्षणानंतर जी प्रभेची अंधुक रजतरेषा उमटते व क्रमेण विकसित होत जाते तिला कलाव्यक्तीकरणाची अनिवार्य, उचंबळणारी पण 'सूचक तळमळ' असें संबोधूं. म्हणजे कलादृष्ट्या या रूपकाची नीट संगति लावल्यासारखें होईल.

आणि म्हणूनच "Art lies in concealing art !" कला दडविण्यांतच कला सांठविलेली असते, असें विरोधाभासानें म्हणतात.

पंडितांचीं कांहीं वचनें उद्‌धृत करून वर शास्त्र व कला यांची व्याख्या व फोड थोड्या फार विस्तारानें केली. पण स्वतः वाङ्मय हें शास्त्र कीं कला हा मूलभूत प्रश्न रहातोच. तेव्हा कलेंत व वाङ्मयांत कोणते समान धर्म आहेत हें पहाणें बरेंच उद्‌बोधक होईल.

ललितकलांचें अधिष्ठान भावनांशीं आहे, तर वाङ्मयाचा उगमहि भावनांपासून होतो. एखादें सत्य दाखवितांना चित्र-शिल्प-संगीतादि कला त्याजभोंवतीं सौंदर्याच्या आवरणानें एक प्रकारची रम्योज्ज्वल प्रभा फांकून त्या प्रभेंत सत्याची किमया खुलवून दाखविते. वाङ्मयाच्या प्रांतांतहि निर्भेळ सत्य जशाचें तसें मांडणें दुष्ट मानतात. उदाहरणार्थ, हिंगण्याचे प्रसिद्ध तत्त्वज्ञ प्रो. वामन मल्हार जोशी यांनीं "केळकर" ग्रंथांत लिहिलेल्या अग्रलेखांत आपला एक अनुभव सांगितला आहे. तो चिंतनीय असून या विषयास साधक वाटल्यामुळें खालीं दिला आहे :—

"हिंगणे येथील शाळेंतील एका आठ दहा वर्षांच्या मुलीला कुंकू न लावतां फिरल्याबद्दल मी रागावूं लागलों असता, 'तात्या, मला कुंकू लावायचं नसतं !' असें ती अजाण बालिका जणूं कांही आपण म्हणतें त्यांत कांहीच नाहीं अशाच भासणाऱ्या स्वरात म्हणाली ! या वाक्यात तालबद्धता आहे का नाहीं कुणास ठाऊक; पण यमक, उपमा, उत्प्रेक्षा इत्यादि अलंकार नाहींत ! तरी माझ्या हृदयांत त्या वेळीं काय झालें तें माझें मला ठाऊक ! हा प्रसंग खरा घडलेला ! पण असला प्रसंग काव्यात कादंबऱ्यांत इत्यादि कवीनें वर्णिलेला वाचला तर भावनात्मक उच्चतम शोकरस उत्पन्न होईल ! या काव्यांत अंगभूत असा कोणताहि अलंकार नसला तरी चालेल; किंबहुना अलंकारांनीं कदाचित् रसहानि होईल !" ("केळकर" ग्रंथ पृ. ११ पहा.)

त्या मुलीचा पति निवर्तल्यामुळें ती बालविधवा झालेली होती असें दिसतें. पण हें अप्रिय सत्य प्रत्यक्ष उच्चारानें व्यक्त करण्याचें टाळण्यांतच तिच्या भोळ्या पण उपजत वाङ्मयनिष्ठ कलादृष्टीचें सूक्ष्म बीज वसत नाहीं काय ? 'माझा नवरा मेला' असें कोणतीहि कुलीन आर्य स्त्री उघड उघड म्हणण्यास धजणार नाहीं यांतील इंगित तरी पौर्वात्यांच्या या सनातन कलादृष्टींतच हुडकावें लागेल.

आतां समजा कीं, त्याच वेळेला दुसरा एक विद्यार्थी ही गोष्ट आपल्या सोबत्यापाशीं "गरीब बिचारी ! बालविधवा वाटतं !" अशा

प्रश्नार्थक उद्गारांनीं हळूच काढील तर ही वाणी शुद्ध वाङ्मयांत न मोडता 'कला' व 'शास्त्र' यांच्या मधोमध पडेल. कारण 'बालविधवा' या शब्दानें 'सत्या'चें शास्त्रीय स्वरूप व्यक्त होतें, तर 'गरीब बिचारी' या आरंभींच्या उद्गारांनीं त्यास किंचित् मुरड पडून करुणरस सूचित होतो आणि तो भावनांना हेलकावे देऊं शकतो. म्हणून अशा प्रकारांत 'शास्त्र' व 'कला' यांचा संगम होतो असें मानता येईल. पण "......चा नवरा मेला म्हणून ती कुंकू लावीत नाहीं!" असें जर कोणी म्हणेल तर तें उघड व कटु सत्य असलें तरी इतक्या हिडीस स्वरूपांत फिरून द्विरुक्ति करून मांडल्याचा भास होतो कीं तें रसिकाना तरी ऐकवणार नाहीं ! आणि म्हणून तें कळत वा नकळत कलेच्या चितेवर रचलेलें व कलादृष्ट्या अश्लीलतेच्या जवळपास फिरकणारें 'शास्त्रीय सत्य' आहे असें वाटतें ! पण शास्त्राचे प्रांत वेगळे असल्यामुळें त्यांचा कलाच्या प्रांतांत एकदा का अशा रीतीनें चंचुप्रवेश झाला म्हणजे कसा धुडगूस होईल आणि समागमामुळें एकमेकांचा विजय होण्याऐवजीं संघर्षणामुळें विरस मात्र कसा होईल याची अंधुकशी कल्पना वरील संभाषणाच्या कल्पनेवरूनहि कोणासहि करता येईल.

संगीत-चित्र-शिल्पादि ललितकलांप्रमाणेंच वाङ्मयाचें कार्यहि सूचकतेनें विपुल किंवा गूढ अर्थ सूचित करण्याचें आहे. म्हणून समान साध्य असलेल्या या दोहोंत तत्त्वतः अंतर नाहीं असें मानता येईल. किंबहुना कला हा शब्द संग्राहक व्याख्येच्या रूपानें रूढ असल्यामुळें तींत संगीत, चित्र, शिल्प इत्यादि ललित प्रकारांबरोबरच 'ललिता वाणी' अथवा वाङ्मय (वाक्+मय) याचा अर्थात् समावेश होतो. आणि म्हणूनच असें म्हणतात कीं, वाङ्मय म्हणजे जसें रांगत्या मुलाचे बोबडे बोल नव्हे, तसेंच तें वाणीच्या रूपानें व्यवहारांत प्रसार पावलेल्या एकूण एक बोलीचा भला मोठा संग्रहहि नव्हे ! जी सुंदर वाणी व्यंजनेनें विपुल अर्थ सूचित करिते आणि जिच्यांत उच्च सत्य, सौजन्य व सौंदर्य दडलेलीं आहेत, ती ग्रंथांत प्रवेश करून जनतेच्या रेखीव व चोखंदळ सदभिरुचीस पुरून टिकली म्हणजे तिला 'वाङ्मय' ही संज्ञा देतां येईल. संगीतादि ललितकलांप्रमाणेंच लालित्यपूर्ण

रंजनाच्या द्वारें (शिक्षणाच्या नव्हे !) लोकाभिरुचीस इष्ट वळण लावण्याचें कार्य ललितवाङ्मयाचें आहे.

एका साधूची अशी गोष्ट सांगतात कीं, त्याच्यापाशीं उपदेश घेण्या-करिता आलेल्या होतकरू शिष्याना तो विचारी "उपदेश करणें म्हणजे काय ? उपदेश झाला पाहिजे म्हणा !" यांतच वाङ्मयाच्या व्याख्येचें बीज कुशलतेनें ध्वनित होतें.

वाङ्मयांत ईश्वरी चित्तत्त्वाचा अंश गोंवणें अवश्य आहे काय किंवा त्यात चित्तत्त्वाचा अभाव असल्यास तें 'वाङ्मय' या व्यापक संज्ञेस अपात्र ठरेल काय या प्रश्नाचा आतां विचार करूं.

ईश्वराच्या अस्तित्वाविषयीं ब्र. रामकृष्ण परमहंसाच्या बोधवचनामृतांत एक अत्यंत विनोदी पण मार्मिक गोष्ट नमूद केली आहे ती अशी :—

एका भाबडया इसमानें आपली अशी समजूत करून घेतली कीं, अणु-रेणूंत ईश्वर नटलेला असल्यामुळें त्याच्या प्रत्यक्ष आज्ञेवांचून आपण कोणतेंहि कार्य मुळींच करूं नये ! एके दिवशीं राजमार्गावरून गजराज डुलत येत असतां वाटेवरील लोकांना बाजूला जाण्याविषयीं माहुताने सूचना दिली. पण ही स्वारी ईश्वरी आदेशाची वाट पहात तेथून हलेना ! अखेर त्याला तेथून बळानें हुसकून काढावें लागलें. नंतर तो एका म्हाताऱ्या इसमापाशीं आपली तक्रार सांगूं लागला असतां म्हाताऱ्यानें शांतपणें उत्तर दिलें :— "प्रत्यक्ष ईश्वरानें तुला इषारा दिला नाहीं म्हण-तोस; हत्ती काही तुझ्याकडे बोलला नाहीं हेंहि खरें. पण बाबा, तुझा तो ईश्वर हत्तीच्या माहुताच्या रूपानें तुला वारंवार अंकुश दाखवून कायसें सांगत होता त्याची वाट काय ?"

आणि ईश्वर जसा वस्तुजातांत नटून पण स्वतः आपण मागें राहून दुसऱ्याच्या मनोबीजांत घर्मांतील विभूतिमत्वाचें व ऊर्जितत्वाचें स्फुरण देतो, त्याप्रमाणेंच कला प्रत्यक्ष वस्तुसत्याला मोहक मुरड घालून चित्र, शिल्प, संगीत, वाङ्मय आदि प्रकारांनीं तें सत्य हळूच सूचित करते. ईश्वर जसा कीर्तीला हपापलेला नाहीं, किंबहुना तो रागद्वेषादि द्वंद्वांपासून अलिप्त व अतीत आहे असें मानतात, त्याचप्रमाणें कला जनजीवनांत

हंसत खेळत मनोरंजन व नकळत मनोविकास घडवून आणण्यासाठीं उगाच गाजावाजा व कीर्तिलोभाची अपेक्षा न करतां निःस्वार्थीपणानें झटत असते.

आतां मनुष्य वाङ्मयाकडे कां वळतो व केव्हा वळतो यासंबंधीं विचार करणें बरेंच उद्‍बोधक होईल आणि तेणेंकरून वाङ्मयाच्या मूलधर्मांवर इष्ट तो प्रकाश पडेल. म्हणून आपण गोल्डस्मिथ कवीचेंच उदाहरण घेऊं.

सतराव्या शतकातील सुप्रसिद्ध आंग्ल पंडित डॉ. जॉनसन् याच्या कालीं आयरिश कविवर्य गोल्डस्मिथ होऊन गेला. पुढें मागें पोंच नसतां तोंडास येईल तें बहकण्याबद्दल आणि चारचौघांतील संभाषणांत स्वतःस अविवेकानें हास्यास्पद करून घेण्याबद्दल गोल्डस्मिथची ख्याति होती ! पण पुढें त्यानें लेखनाचा आश्रय करून 'व्हिकार ऑफ वेकफील्ड' (वेकफील्डचा पाद्री), 'ट्रॅव्हलर' (प्रवासी), 'दि व्हिलेज स्कूलमास्टर' (खेड्यांतील पंतोजी) इत्यादि सरस कादंबऱ्यांनीं व एकाहून एक कल्पक महाकाव्यांनीं वाङ्मयदृष्ट्या इतकी थोर कामगिरी केली कीं, स्वतः डॉ. जॉनसन्सारख्या निष्ठुर व चोखंदळ टीकाकारासहि त्याच्या गुणोत्कर्षाचे मुक्तकंठानें गोडवे गावे लागले. डॉ. जॉनसन् नेहमीं म्हणे, "हा बेटा (गोल्डस्मिथ) संभाषणांत कोठल्या कोठें बहकून आपले गुण उधळीत सुटो, पण त्याच्या वाङ्मयांत मात्र विवेक व कल्पकता यांचा तोल न सुटल्यामुळें तें अत्यंत सरस, संयमित व हृदयंगम झालें आहे !"

हें असें कां व्हावें ! 'वाङ्मय' व 'काव्य' या सदरांत सहज पडण्यासारखें उच्च प्रतीचें लेखन करण्यास समर्थ असा हा धुरंधर कवि बोलतांना मात्र एकदम फिका पडत असल्याचें कारण काय बरें असावें ! 'लेखनांतील बोली'त त्याची वाणी सरस वठली आणि भावनांचे मधुर निनाद उठवून 'वाङ्मया'च्या योग्यतेस चढली; पण प्रत्यक्ष भाषणांतील बोलींत ती फिकी पडली यांतील इंगित काय असावें असा येथें प्रश्न उद्भवतो. या प्रश्नाचें उत्तर देण्यापूर्वीं प्रथम अशा जनांचें पूर्वचरित्र न्याहाळावें लागतें आणि त्यांच्या भूमिकांशीं समरस होणें प्राप्त होतें. माणूस मुळीं ललितकलांकडे

कां वळतो येथपासून या प्रश्नाची छाननी करावी लागेल.

संसारसागरांतील दुःखांनीं, निराशांनीं व संकटांनीं कामक्रोधादि विकारांच्या आहारीं जाऊन माणूस कंटाळतो आणि तो तेव्हां एक प्रकारच्या क्षुब्ध मनःस्थितींत नकळत प्रवेश करतो. अशा समयीं त्याच्या दुःखांशीं किंवा निराशेच्या कारणांशीं समरस होऊन सहानुभूतीच्या शीतळ वायूनें फुंकर घालणारा कोणी प्रेमळ सोबती लाभेल तर तो त्याला हवा असतो. पण अशांच्या दुःखाचें निदान अचूक हेरणारे उदारधी व प्रेमळ आप्त किंवा मित्र लाभण्याचें भाग्य सर्वांनाच कोठें लाधतें ! वास्तविक हें कार्य सहानुभवी बंधु, बहीण, पत्नी, माता किंवा सोबती ठीक करूं शकतील. पण दुर्दैवानें जेव्हां यापैकीं कोणीहि या कसोटीस उतरत नाहींत किंवा मुळीं त्यांचाच अभाव असतो तेव्हां दुःखार्त इसमांची मनःस्थिति किती केविलवाणी होत असेल याची कल्पना कोणीहि करावी. गीतेंत सांगितल्याप्रमाणें प्रकृतीची प्रेरणा सामान्यतः बहिर्मुख व्यापारांकडे असली तरी तेथें जाऊन कारणांतरानें विन्मुख झाल्यावेळीं तिनें अंतर्मुख होऊन एकांतीं उच्च प्रतीचें आत्मनिरीक्षण करूं नये असें नाहीं. किंबहुना माणूस अशा वेळीं दुसऱ्यांच्या शिकवणुकीपासून जितका शिकतो त्यापेक्षां अनंत पटींनीं आत्मनिरीक्षणांतीं सूक्ष्म चिन्तनानें शिकतो असा अनुभव आहे.

गोल्डस्मिथ कवीची सांसारिक व सांपत्तिक स्थिति अत्यंत बिकट होती असें सांगतात. त्यामुळें वारंवार कर्जें काढून आणि तीं थकविण्यासाठीं घनकोंना वेळ येईल तशा थापा मारून त्यास झुलवावें लागलें. त्याच्या सुप्रसिद्ध 'व्हिकार ऑफ वेकफील्ड' या कादंबरीचें हस्तलिखित तर घरभाड्याच्या वसुलीकरितां मालकानें बेलीफाकरवीं काढलेल्या जप्तीची रक्कम चुकविण्यासाठीं त्याला पन्नास पौंडांना प्रकाशकाला विकण्याची पाळी आली ! गृहसौख्याच्या संपूर्ण अभावामुळें त्याला वेळेवर जेवण देखील मिळणें कठीण होऊं लागलें ! अशा अत्यंत बिकट परिस्थितींत त्याला इंग्लंडांतच काय, पण फ्रान्स, इटलीसारख्या दूरच्या देशांतहि मुरली वाजवीत याचकाप्रमाणें दीनवाणीनें रानोमाळ भटकावें लागलें ! आणि आपली ही आर्त स्थिति कशी तरी विसरून टाकण्याकरितां सुचतील त्या

युक्त्या व उपाय योजावे लागले. दुर्दैवानें त्याच्या दुःस्थितीविषयीं व वाङ्मयीन मनोधर्माविषयीं योग्य पारख करून सहानुभूति बाळगूं शकणारे आप्त किंवा मित्र त्याला प्रारंभीं फारसे लाभले नाहींत. उलट त्याच्या तोंडावर देवीच्या आजारामुळें उमटलेल्या वणांची हेटाळणी करणारे 'रसिक'च फार निघाले !

एकुण जगांतील कष्टप्रद अनुभवांच्या आगीनें होरपळून निघालेला हा कवि जेथें तेथें दृष्टीस पडणाऱ्या अरसिक, हृदयहीन व निश्चित मानवी स्वभावांचे विविध आदर्श पाहून जगास विटला आणि त्यामुळें आपल्या ध्येयाच्या आड येणाऱ्या क्रूर भवितव्यतेविषयीं हताश होऊन त्याच्या मानी व कुढ्या स्वभावधर्माप्रमाणें त्याच्या विवेकाचा तोल सुटून सर्वच क्रूर मानवांशीं उलट उद्दामपणें बोलत सुटला यात मानवी प्रकृतिधर्माविरुद्ध असें काही नाहीं.

गोल्डस्मिथनें प्रारंभीं संगीतरूपी ललितकलेचा आश्रय केला आणि पायीं चालण्याचे श्रम, स्वतः मुरलीरवानें मुग्ध होऊन आणि इतरांना मुग्ध झालेले पाहून घालविले. पण ही कलानंदाची बहिर्मुख दृष्टि झाली. बहिर्मुख दृष्टीपेक्षां अंतर्मुख दृष्टि उच्चतर असते आणि तिच्या सृष्टीला तर आत्मनिरीक्षणाची फार आवश्यकता असते. म्हणून एकान्तांत निवांत जागीं आत्मचिंतन करीत असतां दुःखाला विरंगुळा देण्याकरितां वाङ्मय-लेखनाची स्फूर्ति त्याला झाली आणि त्यानें स्वतः अनुभाविलेल्या व जगाच्या बाजारांत भटकून व त्यांतील सुखदुःखाशीं निगडित होऊन पचनीं पाडलेल्या अनेक ललित व मधुर कल्पना लिहून काढून अत्यंत सुंदर व सरस वाङ्मय निर्माण केलें.

ललितकलानिर्मितीच्या हेतूवर प्रकाश पाडणारी दुसरी एक गोष्ट अशी कीं, विषम वास्तवापेक्षां ध्येयसाध्य सुंदर कल्पना केव्हांहि रम्य वाटतात. जीवितध्येयाचीं गोड सुखस्वप्नें जीवनांत उपभोगणें शक्य नसलें तरी, त्यांचें प्रतिबिंब ललितकलारूपी सुंदर आरशांत पहाण्याचा जातिवंत कलोपासकाचा मोह अनावर होत असल्यामुळें तो आपल्या कृतींत तशा प्रयत्नांची पराकाष्ठा करीत असतो.

वरील उदाहरणावरून उच्च प्रतीच्या कलापूर्ण वाङ्मयनिर्मितीला आत्मनिष्ठ सौंदर्यचिंतन तर हवेंच, पण अशा वाङ्मयांतून सौंदर्यासवेंच सत्याचे मधुर बोल उमटावयाचे असतील तर त्याला जगाच्या विस्तृत अनुभवनिरीक्षणाच्या समृद्ध जोडीची किती आवश्यकता आहे याची थोडीशी कल्पना येईल.

मनुष्य वाङ्मयाकडे कां वळतो हें वरील उदाहरणांवरून सिद्ध झालें. पण तो वाङ्मयाकडे केव्हां वळतो ? याला खालील तीन प्रमुख कारणें संभवतात.

(१) मानवी जीवितांतील सुखदुःखांना विरंगुळा पाडून त्यांना संयपणें बाहण्यास पाट काढून देण्याची मनाची उपजत प्रवृत्ति व जोराची धडपड. याला 'पवित्र अंतःस्फूर्तीची प्रेरणा' म्हणूं.

(२) कीर्तिलोभाचा अंकुश, आणि

(३) सर्वांत प्रभावी कारण म्हणजे ज्येष्ठ व श्रेष्ठ कलाकोविदांचा लोभ संपादण्याकरितां कार्यास प्रवृत्त करणारें त्यांच्या संबंधींचें पवित्र व निःस्वार्थी प्रेम.

अशा प्रेमांत वैषयिक अंशाचा लवलेशहि नसतो. म्हणूनच तें सादर, निःस्वार्थी, गुणैकनिष्ठ व कलोपजीवि असतें.

"निराश्रया न शोभन्ते पंडिता वनिता लताः ।"

(अर्थ :— पंडित, स्त्रिया व वेली आश्रयाविना शोभत नाहींत !) असें एक सुभाषित आहे. तथापि 'उगवते कलोपासक, थोर कलावंतांविषयीं आपल्या हृदयांत सदैव तेवत असलेल्या प्रेमादराशिवाय नुसते 'शोभूं'च काय, पण सुखशांतीनें जगूंच शकत नाहींत !' अशा आशयाचा अर्थगर्भ श्लोक जर कोणी रचील तर तो अत्यंत मार्मिक होईल यांत शंका नाहीं.

आतां कला कशी ओळखावी याविषयीं एक स्थूल गमक सांगितल्यानें तिची व्याख्या दुसऱ्या एका प्रकारें समर्पक रीतीनें केल्यासारखें होईल. कलाकृति कशी ती ओळखण्यापूर्वीं ती कोणत्या साधनांच्या समुच्चयामुळें उत्पन्न झाली आहे याचा प्रथम विचार झाला पाहिजे खरा. परंतु त्या साधनांच्या मागें कलोपासकाची कोणती कल्पना उभी होती तिचा तर्कानें

अंदाज बांधूं पहाणें उचित नाहीं. उलट तें कार्यभागास बाधकच ठरतें. उदा:—असें समजूं कीं, सारंगीचे सुस्वर स्वरालाप कानांना उच्च प्रतीचा आनंद देत आहेत. संगीत ही साहित्याच्या मालिकेंतील एक अत्यंत उज्ज्वल कला होय. तंतकार सारंगींतून नखांच्या फिरतीनें कसे सफाईनें स्वर काढतो हें पाहून आनंदाला कांही अंशीं विस्मयाचा आणि या दोहोंपासून तंतकारा-विषयीं वाटूं लागणाऱ्या आदरमिश्रित कौतुकाचा लाभ होऊन कलेची ओळख सुकर होईल. पण या चिकित्सेची तार भलतीच ताणून सारंगीची उत्पत्ति कोठून झाली येथपासून आरंभ करून लांकूड, तार इत्यादि त्याच्या मूल घटक द्रव्यांचा भौतिक व रासायनिक संबंध अजमावूं गेल्यास ललित-कलेंत रसिकतेची तर हानि होईलच, पण तिजबरोबरच चिकित्सक शास्त्राच्या शुष्क प्रांतांत प्रवेश केल्याचें औचित्यभंगाचें पापहि माथीं बसेल.

भावनेवर आरूढ झालेला खरा कलोपासक एकदा आपला अनुभव सांगितल्यानंतर पुनः त्याच्याकडे सहसा वळणार नाहीं. कात अंगाबाहेर फेकणाऱ्या सर्पाप्रमाणें खरा कलासेवक अंतःस्फूर्तीच्या उसळीसरशी बाहेर फेंकलेली विशुद्ध भावनाची ज्योत फिरून आवरूं शकत नाहीं. आणि म्हणून याच अर्थानें अशी एक म्हण रूढ आहे कीं, 'कलासेवक हा धनि होय, चाकर नव्हे !' तो आपल्या विचार-विकाराचें योग्य संयमन करून त्यांचा भावनांच्या आरशातून प्रकाश पाडतो; स्वतः तो आरसा नव्हे ! तो स्वतः अशा विकारांच्या आधीन होत नाहीं! पण त्यांच्यापासून निराळ्या अशा उच्च भूमिकेवर आरूढ होऊन ह्या क्रिया लीलेनें आंखीत असतो, झालें !

"Religion is the manifestation of Divinity already in man."

(अर्थ :— माणसाच्या अंगांत सुप्त स्थितींत वसत असलेल्या देवतां-शाचें व्यक्तीकरण म्हणजेच धर्म होय.-ब्र० स्वामी विवेकानंद).

डॉ. कझिन्स म्हणतो—"सत्य, सौजन्य व सौंदर्य हीं तीनहि त्या अनाद्यनंत चित्तत्त्वाचींच व्यक्त रूपें होत."

पण चित्तत्त्वाचा उगम देवांशापासून होतो. म्हणून धर्मांच्या व पूर्वोक्त त्रयीच्या तत्त्वांत कांहीं समान धर्म असले पाहिजेत हें उघड आहे. म्हणून

धर्मांच्या व्याख्येंत थोडा फार फेरफार करून वाङ्मयाची एक व्याख्या स्थूलपणें खालीलप्रमाणें करितां येईल :—

"मानवी भावनांच्या कप्प्यांत दडून राहिलेल्या सत्य, सौजन्य व सौंदर्य या त्रयींत विशेषतः आनंदानुभवशक्ति किंवा रागांचे भाव यांना उद्देशून राहिलेला काव्याचा भाग म्हणजे वाङ्मय."

शेवटीं वाङ्मयाच्या पौर्वात्य व पाश्चात्य पंडितांनीं केलेल्या कांहीं व्याख्या एकीकडे संकलित करून हा लेख संपवूं. आतां 'वाङ्मयाचें व्यसन' म्हणजे काय याचें विवेचन पुढें करूं.

### वाङ्मयाच्या कांहीं व्याख्या

(१) "रमणीयार्थप्रतिपादकशब्दः काव्यम् ।" (जगन्नाथपंडित)

(२) "लोकोत्तरवर्णनानिपुण कविकर्म ।" (मम्मट)

(३) "रसात्मकं वाक्यं काव्यम् ।" (विश्वनाथ)

(४) "वाणी जनजीवनाचा निर्मळ आरसा." (अनामिक)

(५) "भाषा जर दूध तर वाङ्मय त्याच्यापासून काढलेला आटीव खवा." (अनामिक)

(६) "आनंदरूपी भुकेच्या शमनाबरोबरच रसनालौल्यहि ज्याच्या योगानें पुरविलें जातें तें वाङ्मय." (अनामिक)

(७) "मनुष्य ज्या विचारांच्या, विकारांच्या, दुःखांच्या व आशा-निराशांच्या नित्य आहारीं जातो ते विचार, विकार किंवा जें जें कार्य मानवाच्या आत्म्याच्या किंवा शरीराच्या संबंधीं असतें तें तें कार्य मागें स्मृति राहील अशा अभिजात वचनांनीं रेखाटणारे जिवंत शब्द म्हणजे वाङ्मय." (सर आर्थर क्विलरकूच)

(८) "जीवनांत हरघडी अत्यंत अद्भुत प्रसंग घडत असतां त्यांच्यापासून उत्पन्न झालेली जी मधुर स्मृतींची मालिका अत्यंत अद्भुत कल्पनाशक्तीच्या युवयुवतींच्या मनाला मोहित करते, तिचें व्यक्त स्वरूप म्हणजे वाङ्मय."

(रॉबर्ट लिंड)

(९) "चित्रशिल्प जसें मूक काव्य तसें काव्यवाङ्मय म्हणजे बोलतें चित्र." (सायमनिडेस)

(१०) "ललितकलांपैकीं ज्याच्यापासून अनंतत्वाची अत्यंत उन्नत कल्पना येऊं शकते असें त्यांतील प्रधान अंग म्हणजे वाङ्मय."

(डॉ. जेम्स कझिन्स)

(११) "चित्रकार आपल्या दृष्टीपुढें विविध वस्तू अत्यंत व्यक्त रीतीनें सफाईनें आणूं शकतो. याच्या उलट वस्तूंच्या ऐवजीं ललितकृति जें पुढें आणतें ते वाङ्मय." (लेसिंग)

(१२) (सर जॉन लबॉककृत काव्यवाङ्मयाच्या व्याख्याः— "Pleasures of Life" पहा.)

(अ) "आनंदांत गढून गेलेल्या उत्कृष्ट भावनांच्या जनांना आनंदतम क्षणांच्या समयीं जे सुविचार सुचतात त्यांची प्रमाणबद्ध मालिका म्हणजे काव्य.

(आ) काव्य म्हणजे जनजीवनाची जागती ज्योत. जीवनाच्या स्वच्छ जलाशयात जें नित्य व सनातन सत्याचें अत्यंत निर्मळ प्रतिबिंब पडलेलें असतें तें काव्य.

(इ) काव्य हें ज्ञानाचा मध्यबिंदु व परीघ दोनहि होय. आणि

(ई) कवि कोण ? भविष्यकाल वर्तमानकालावर ज्या लांब लांब सांवली फेंकतो त्यांचीं चालतीं बोलतीं प्रतिबिंबें म्हणचे कवि."

(१३) "कूटस्थ आत्म्याचे विवेकी बोल म्हणजे वाङ्मय. आपलें जीवित सुंदर, रेखीव व प्रमाणबद्ध व्हावें म्हणून माणूस जी नित्यशः धडपड करतो ती काव्याच्या रूपानें स्फुरते. ज्या पुष्पांत जीविताचा क्रमेण विकास होत जातो तें पुष्प म्हणजे काव्य होय. पण काव्य म्हणजे स्वतः तें जीवित नव्हे ! तोच कवि प्रतिभाशाली कीं जो विधिघटनेनें आपल्यास प्राप्त झालेली परिस्थिति धैर्यानें सोसतो आणि तींतूनच आपलें जीवित आनंदमय व सूत्रबद्ध करण्याकरितां आस्थेनें झटतो. परंतु 'आपणास नाचतां येत नाहीं तर अंगण वांकडें" म्हणणाऱ्या कलाहीन नर्तकाप्रमाणें, कवीचें कातडें अंगावर पांघरणारा कविब्रुव आपली परिस्थिति निराळी असती तर आपण काय काय केलें असतें याविषयीं फुशारकीनें बाता मारीत सुटतो !"

(टॉमस कार्लाईल)

(१४) "वाङ्मयाची कांटेकोर व्याख्या करण्याच्या भरीस फारसें

कोणी पडूं नये. विचार व्यक्त करण्याच्या वाटेनें जात असता मध्येंच अशी एक सुंदर यक्षभूमि लागते कीं जेथें एकदम शब्दार्थांचें विशुद्ध वाङ्मयरूपी सुवर्ण बनतें." (डॉ. डन्स)

(१५) "संग्राह्य शब्द ( Memorable word ) म्हणजे वाङ्मय."
(एक आंग्ल ग्रंथकार)

(१६) "वाङ्मय म्हणजे मानवी अनुभवसर्वस्वाचें सार होय."
(इमर्सन्)

(१७) "नैतिक सत्य ज्याचा आत्मा असतो तें वाङ्मय."(जॉन मोर्ले)

(१८) "मनोविकास, भावनाविकास व संस्कृतीचें परिष्करण घडवून आणून तिच्या पुरोगमनाला जें सोपानमार्ग होतें तें वाङ्मय."
(मास्ती वेंकटेश अय्यंगार)

(१९) "बुद्धि, मन इत्यादि इंद्रियांचा परस्परसंघर्षणामुळें उत्पन्न होणारा प्रतिबिंबात्मक व्यापार म्हणजे वाङ्मय." (डी. व्ही. गुंडप्पा)

(२०) "छापलेला म्हणून कोणताहि मजकूर जसा खरा असतोच असें नाहीं तसाच तो संग्राह्य किंवा संस्मरणीय असतोच असें नाहीं! प्रत्येक पिढीची अभिरुचि व स्मरणशक्ति या दोन चाळणीच होत. या जोडचाळणींतून प्रत्येक पिढींत कांही कांही लेख सरस्वतीच्या गंगाजळींत पडतात व हे गाळीव लेख मिळून जो संग्रह होतो त्याचेंच नांव वाङ्मय."

(न. चिं. केळकर–सन १९२१ सालीं बडोदा येथें झालेल्या म. सा. संमेलनांतील अध्यक्षीय भाषणांतील उतारा.)

(२१) "वाङ्मय म्हणजे मुखांतून बाहेर पडलेली संग्राह्य वाचा, तिचा संग्रह. अर्थात् त्यात सत्यम्, शिवम्, सुंदरम् यांचा त्रिवेणीसंगम असावा."
('ज्ञानकोश'कार डॉ. केतकर)

(२२) "वाणीनें बद्ध झालेला कोणताहि विचार यौगिक अर्थानें वाङ्मय. पण सर्वच बोल म्हणजे वाङ्मय नव्हे! जी विचारसंपदा ग्रंथात अविनाशी स्वरूपात ग्रथित करण्याइतकी महत्त्वाची गणली जाते त्या सर्वांची गुंफलेली माला म्हणजे वाङ्मय.........................

"मानव प्रत्येक नव्या पिढींत जुन्या अनुभवाला नव्याची जोड देत आला आहे. आणि हें ज्या साधनानें साध्य झालें आहे तें साधन म्हणजे वाणी व तिला दृढबद्ध करणारें तें वाङ्मय."

(द. के. केळकर–"काव्यालोचन")

(२३) "पूर्ण विकसित वाङ्मय तेंच कीं जें वाचीत असतांना त्या त्या विषयासंबंधानें आपणास पूर्ण व सर्वांगीण सत्य कळत आहे असें वाटेल व सर्व शंकांचें समाधान होऊन "भिद्यते हृदयग्रंथिः छिद्यन्ते सर्वसंशयाः" (अर्थः—हृदयाची गाठ सुटून सर्व संशय फिटतील) अशी आपली स्थिति होईल. तें अंतिम अवस्थेंतील उच्चतम वाङ्मय वाचतांना आपल्या सात्त्विक मनोवृत्ति जागृत होतील व मनोद्वैध आणि अंतःकलह पूर्णपणें मिटून 'ब्रह्मानंदसहोदर' अशा अलौकिक आनंदाचा लाभ होईल. अशा प्रकारच्या वाङ्मयांत ज्ञानाची प्रसन्नता, तपाचें तेज, कर्तृत्वाचा आत्मप्रत्यय, पावित्र्याची कांति, प्रेमाचें स्मित व कलेचा विकास या सर्वांचा उत्कर्ष दिसून येईल."

(प्रो. वा. म. जोशी–सन १९३० सालीं मडगांवच्या म. सा. संमेलनात केलेल्या अध्यक्षीय भाषणांतील उतारा.)

———

# वाङ्मयाचें व्यसन व उदासीनता

"साहित्यसेवकाच्या श्रद्धाळू अंतःकरणामध्यें आशारूपी स्वार्थत्यागी ज्योत सदैव तेवत असते आणि त्यास टोंचीत असते कीं, 'हे साहित्यसेवका, तुझा दुर्बल ध्वनिसुद्धा एके दिवशीं नादब्रह्म होऊन त्याच्या नादानें व घोषानें जागृत झालेलें उभें विश्व आत्मनिरीक्षण करूं लागेल!' स्वतःच्या देशांतील सर्व व्यवहार मातृभाषेंतच होणें; स्वतःची मायभाषा, साहित्य, संस्कार व संस्कृति याची श्रेष्ठता उभ्या जगात वृद्धिंगत होणें; स्वतःच्या संस्कृतीचा आत्मा शब्दरूपानें बाहेर पडणें—हीं सगळीं भावी सुखस्वप्नें निरंतर पहाण्यांत मला जो अलौकिक आनंद वाटतो, तो आनंद परदेशी भाषा आणि संस्कृति याच्या भाडोत्री सिंहासनावर विराजमान होण्यांत किंवा भावविहीन व शुष्क अशा पोकळ मोठेपणाच्या शिखरावर आरूढ होऊन उगाच दृष्टिक्षेप करण्यांत वाटत नाहीं! फलाविषयीं शून्यचित्त राहून निर्भेळ साहित्यसंवर्धनासारखा स्तुत्य व उज्ज्वल प्रयत्न सतत करीत रहाणें हें गीतेंतील सुंदर तत्त्व सर्व वाङ्मयभक्तांनीं व वाङ्मयसेवकांनीं लक्षांत ठेवावें." (गुर्जर साहित्यसेवक श्री. कन्हैयालाल मुनशी, वकील, मुंबई, यांनीं गुजराथी साहित्यसंस्थेच्या सन १९२५ सालीं भरलेल्या पहिल्या अधिवेशनात केलेल्या अध्यक्षीय भाषणांतील एक उतारा.)

"यापुढें जाऊन मला असेंहि म्हणावेंसें वाटतें कीं, वाङ्मयक्षेत्रांत ते खरे भक्तियोगी आहेत; ईश्वरविषयक भक्तीच्या बाबतींत त्यांना मागें टाकणारे महाराष्ट्रांत आज पुष्कळ लोक सांपडतील; पण वाङ्मयविषयक

भक्तीच्या बाबतींत त्याची बरोबरी करणारा रा. श्री. कृ. कोल्हटकरा-शिवाय मला कोणी दिसत नाहीं ! कोणीहि पुढें होणार नाहीं असें कोण कशाला म्हणेल !

"कै. लो. टिळक, भारताचार्य चिंतामणराव वैद्य, इत्यादि अधिक विद्वान् किंवा बहुश्रुत असतील;..............पण सुंदर आणि अनेकविध वाङ्मयकलाकृति करून त्याच्या स्वरूपाविषयीं, लक्षणाविषयीं इत्यादि रसपूर्ण व मार्मिक मीमांसा करणारे,—सर्वांत अधिक महत्त्वाची गोष्ट म्हणजे वाङ्मयात्मक रसाची, त्याच्यासारखी 'खरी भक्ति' करणारे महाराष्ट्रांत किती आहेत !" (श्री. न. चिं. केळकराविषयीं प्रो. वा. म. जोशी यांनीं 'केळकर' ग्रंथांत लिहिलेल्या अग्रलेखांतील उतारा.)

वाङ्मयाचें व्यसन कसें ओळखावें याचें एक प्रत्यंतर लंडनच्या सुप्रसिद्ध 'John O' London's Weekly' नावाच्या वाङ्मयीन साप्ताहिकाच्या ता. ७-१०-१९३३ च्या अंकांत मला आयतेंच सांपडलें. इंग्लंडांतील निरनिराळ्या पेशांच्या अठरा सुप्रसिद्ध स्त्री-पुरुषांना त्यांचीं अत्यंत आवडतीं पंचवीस पुस्तकें निवडून काढून त्यांची यादी पाठविण्या-विषयीं "Every Man's Library' या प्रमुख प्रकाशनसंस्थेच्या संपादकांकडून गौरवपूर्वक सुचविण्यांत आलें होतें. अर्थात् या निवडणुकींत रुचिभेदाप्रमाणें वैचित्र्य आढळून येत असलेलें असेना का, पण आम्हांस वाङ्मयाच्या व्यसनाची फोड करावयाची असल्यामुळें या निवडणुकींतील रसबोध घ्यावयाचा तो हाच कीं, त्यांच्यापैकीं प्रत्येक व्यक्तीनें बॉस्वेलकृत सुप्रसिद्ध जॉन्सन्‌साहेबाचें वाङ्मयीन चरित्र आपुलकीच्या भावनेनें निवडलें होतें !

या निवडणुकींत भाग घेतलेल्या अठरा महनीय स्त्री-पुरुषांपैकीं विशेष सुपरिचित असलेल्या अकरा व्यक्तींचीं नांवें व त्यांचा वाङ्मयीन पेशा खालीं दिला आहे :—

पुरुष—(१) सर ऑस्टिन् चेंबरलेन (इंग्लंडचे माजी परराष्ट्रमंत्री), (२) स्टीफन् किंग हॉल (नाटककार), (३) रिचर्ड चर्च (कवि व कादंबरीकार), (४) डीन इंज (प्रसिद्ध धर्मोपदेशक व निबंधकार)

(५) ह्यूग वाल्पोल (कादंबरीकार व टीकाकार), (६) जी. के. चेस्टरटन् (विनोदी लेखक व संकीर्ण निबंधकार), (७) सर आर्थर कीथ (तत्त्वज्ञानाचे प्रोफेसर), (८) डॉ. अर्नेस्ट बार्कर (राजनीतिशास्त्राचे प्रोफेसर) व (९) सर बॅरी जॅकसन् (नाटककार).

स्त्रिया—(१) क्लिमेन्स डेन (नाटक-कादंबरीलेखिका), (२) मार्गारेट केनेडी (लेखिका) इत्यादि.

वरील उदाहरणावरून आपापल्या मनोधर्माप्रमाणें भिन्न व्यवसाय व भिन्न भिन्न वाङ्मयभागांतील आवड असूनहि वरील व्यक्तींचें वाङ्मयाच्या व्यसनाच्या बाबतींत—म्हणजेच जॉन्सन् चरित्र आपल्या कपाटातील अत्यंत आवडत्या ग्रंथात ठेवण्यात दिसून येणारें एकमत पाहून प्रथम थोडें आश्चर्य वाटतें खरें. पण हें प्रचंड चरित्र ज्याने एकवार वाचलेलें आहे त्याला ठाऊकच आहे की, ते जॉन्सन्साहेबाचें व्यक्तिशः चरित्र म्हणण्यापेक्षा लंडनांत सतराव्या शतकात जॉन्सन्रूपी सूर्याभोंवतीं भ्रमण करणाऱ्या अनेक लहान मोठ्या तेजोगोलाचें सविस्तर व अत्यंत यथार्थ शब्दचित्र असून, तेणेंकरून त्या काली इंग्रजी वाङ्मयात जी प्रचंड क्रांति झाली तिची जणूं पूर्वपीठिकाच हे चरित्र गुणदोषासहित विलक्षण बारकाईनें व अत्यंत प्रामाणिक साक्षेपाने कंठरवाने सांगत आहे अशी भावना दृढावते.

अशा धर्तीच्या शाश्वत वाङ्मयाच्या इतिहासरूपी सागरांत सटरफटर चरित्राच्या नद्या आपोआप जाऊन मिळत असल्यामुळें बॉस्वेलचें जॉन्सन्चरित्र जगांतील सर्व आबालवृद्धास तेव्हापासून आजतागायत अत्यंत वाचनीय झाले आहे; किंबहुना श्रीमद्भगवद्गीता जसे सर्व उपनिषदांचें सार म्हणतात तसे हें चरित्र शुद्ध वाङ्मयीन चरित्रवाङ्मयाच्या उंचवट्यावर बांधलेल्या निर्मल हौदाप्रमाणें (Water-reservoir) असल्यामुळे तेथून पाण्याचे अनेक प्रवाह सखल जागी आणता येतात व ते होतकरू वाङ्मयसेवकांचा मनोरूपी भूप्रदेश सुपीक करतात.

अशा योग्यतेचा एकहि जगन्मान्य चरित्रग्रंथ मराठीत असल्याचें माझ्या तरी पहाण्यात नाहीं म्हणून त्याचा हवाला दिल्यास 'परकीय वाङ्मयाचा

गौरव करण्याची परप्रकाशित हौस' असा कृपा करून कोणीहि अपसमज करून घेऊं नये.

आणि खरोखर उच्च व सात्त्विक वाङ्मयाची मोहिनीच तशी आहे ! त्या सरोवरांतील अमृत ज्यानें एकवार चाखलें तो त्याची अवीट गोडी पुढे उभ्या जन्मांत विसरणें अशक्यच !

वाङ्मयाचें अतिवाचन हें 'व्यसन'च आहे. गीतेच्या परिभाषेंत बोलावयाचें झाल्यास त्यास निव्वळ सात्त्विक न म्हणता राजस वृत्तीचें व्यसन म्हणता येईल. वाचकाला आरंभींच गीतेच्या तत्त्वज्ञानाशीं नेऊन भिडविल्यास तो कदाचित् बुचकळ्यात पडेल. तथापि अशा व्यसनांच्या बुडाशीं असणाऱ्या सात्त्विक, राजस व तामस या मूलभूत त्रिविध वृत्तींचे येथे त्रोटक विवरण करणें अस्थानी होणार नाहींसें वाटतें.

[गीता अध्याय १४ वा कै. टिळककृत "गीतारहस्य" पहा.]

भगवान् अर्जुनाला सागतात :—

"प्रकृतीपासून उत्पन्न झालेले सत्त्व, रज व तम हे तीन गुण देहात रहाणाऱ्या आत्म्यास देहात बाधून टाकतात. सात्त्विक गुण, सुख आणि ज्ञान याच्या संगानें मानवास बांधून टाकतो आणि सुखाचे ठायीं आसक्ति उत्पन्न करितो; राजस गुण, तृष्णा व आसक्ति उत्पन्न करून मानवाला कर्मे करण्याच्या प्रवृत्तिरूप संगानें बाधून टाकतो आणि तो त्याची कर्माचे ठायीं आसक्ति उत्पन्न करितो; तामस गुण, ज्ञानावर पाघरूण घालून प्रमाद व कर्तव्याचा विसर यांचे ठायीं मनुष्याची आसक्ति उत्पन्न करितो.

"या देहांत इंद्रियांत प्रकाश म्हणजे निर्मल ज्ञान जेव्हां उत्पन्न होतें तेव्हां सत्त्वगुण वाढला असें समजावें.

"रजोगुण वाढला असता कर्माकडे प्रवृत्ति व त्याचा आरंभ, अतृप्ति व आकांक्षा हीं उत्पन्न होतात.

"तमोगुण वाढला म्हणजे अंधार, कांही करूं नये असें वाटणें व प्रमाद म्हणजे कर्तव्याचा विसर व मोह उत्पन्न होतात."

वरील तीन प्रवृत्तींपैकीं माणसाची प्रवृत्ति तरुणपणीं बहुधा राजस

वृत्तीकडेच अधिक झुकते. क्वचित् ती तामस असल्यास मुळीं कोणतें कर्तव्यच न करिता रिकामा वेळ दवडील ! सात्त्विक प्रवृत्तीचा माणूस अनुभवान्तीं इच्छा-आकांक्षाच्या अतृप्तीचें सुखदुःख भोगून त्यांच्यापेक्षां उन्नतर भूमिकेवर आरूढ झालेला असल्यामुळें तो आत्मसंतुष्टच राहील आणि वाङ्मयाच्या काय, इतर कोणत्याहि काय, चागल्याहि व्यसनाच्या आहारीं बहुधा जाणार नाही. म्हणून अनुभवानें परिपक्व झालेले जन किंवा मुक्तसग महात्मे यानाच ही गोष्ट शक्य आहे असें समजावें.

रहाता राहिला मध्यम वर्ग. त्याची कर्माकडे सतत प्रेरणा आणि लौकिक आशा-आकांक्षाच्या पूर्तीविषयीं त्याच्या मनाची अनिवार तळमळ व धडपड पहाता या प्राण्याची जात राजस प्रकृतीच्या प्राण्याशीं जुळते असे दिसून येईल. आणि इतर कोणत्याहि व्यसनानें ग्रासलेल्या जनापेक्षां या बाबतींत वाङ्मयाचे व्यसनी जन परिणामाच्या दृष्टीनें फारशा भिन्न भूमिकेवर आधारलेले आहेत असे नाहीं. कारण व्यसन म्हटलें म्हणजे कोणत्याहि एखाद्या विषयाच्या चिंतनांत किंवा क्रियेंत दिसून येणारी बेसुमार आसक्ति. एखाद्या माणसास कोणतें व्यसन आहे हें फुरसतीच्या वेळच्या त्याच्या क्रिया लक्ष्यपूर्वक पाहिल्यास चट्कन दिसून येईल. म्हणूनच माणसास 'संवईचें गांठोडें' (A bundle of habits) असें काईशा विनोदानें म्हणतात ! आणि विचार करूं जातां हें खरेंच नाहीं का ? एखाद्या माणसाचा–मग तो मोठा असो वा क्षुद्र असो–खरा स्वभाव अजमावयाचा असेल तर तो स्वतःच्या किंवा दुसऱ्यांच्या आपत्तींच्या वेळीं कसा काय वागतो याचा निकष त्याच्या शीलाला लावतात. हा एक प्रकार झाला. दुसरा प्रकार त्याच्यासंबंधीं घडलेल्या गोष्टी ऐकण्याच्या मिशानें इतराशीं व विशेषतः त्याच्या नोकरांशीं किंवा शेजाऱ्याशीं संभाषणप्रसंग साधण्याचा. किंबहुना जॉन्सनूचें या संदर्भाचें खालील वचन सुप्रसिद्धच आहे. त्याचा सारांश असा :— "एखाद्या थोर पुरुषाचें वास्तविक शील व स्वभावचित्र त्याच्या पुष्पित चरित्रावरून जितक्या प्रमाणांत कळेल, त्याच्यापेक्षा त्याच्या नोकरांशीं नुसता थोडा वेळ संभाषणप्रसंग साधल्यानेंच तें किती तरी प्रमाणांत अधिक कळून येईल !"

समजा, एखादा मनुष्य फुरसतीच्या वेळीं विडी किंवा सिगारेट तोंडांत धरून धूम्रपान करीत आहे. त्याच्या तोंडातून नुसता धूर तर डोक्यांतून विचारांचा धूर क्वचित् निघो, सदा सर्वदा तंबाखूच्या व्यसनांत गुंतलेला असा माणुस त्याचा व्यसनीच म्हणावयाचा. जी गोष्ट विडीची, तीच चहाची अगर पत्त्यांसारख्या खेळाची, चकाट्या पिटीत निष्फळ कालहरण करणाऱ्यांची, प्रत्यक्ष काही काम न करतां मनांत नुसते विवंचनेचे दीर्घ-सूत्री मनोरे रचणारांची व त्यांच्या व्यसनाची समजावी. कोणत्याहि व्यसनाचे आद्य लक्षण असें कीं, थोड्याशाहि फुरसतीच्या वेळात त्या त्या व्यसनाचा शोकी माणुस तें तें व्यसन हाताळल्यावांचून खचित रहाणार नाहीं ! उदा:– पोटाचा निष्ठुर व्यवसाय करतां करतां वैचित्र्याचा थारेपालट म्हणून किंवा थकलेल्या क्षणीं अंगांत तरतरी येण्याकरितां विडीचा व्यसनी तिचे झुरके आकाशांत सोडील, चहाचा व्यसनी गरम चहा ढोसील, तर संभाषणाचा व्यसनी, मिळेल त्या माणसाशीं बळेंच लगट करून पृच्छा करील. याप्रमाणें त्या त्या विषयाचे व्यसनी आपापल्या व्यसनांत रमतील तर वाङ्म-याचा व्यसनी आपल्या आवडत्या विषयावरील हातीं घेतलेल्या ग्रंथातील थोड्याफार मजकुराचें तितक्याच वेळात आवडीनें पारायण करील व हळूच पुढचें पान उलटील ! इतर व्यसनांचीं साधनें किंवा आयुधें ते ते जन आपल्या खिशांत सदैव बाळगतात. त्याचप्रमाणें वाङ्मयाचा नादी एखादें नवें जुनें आवडतें पुस्तक आपल्या काखोटीस मारल्यावांचून कधींहि रहाणार नाहीं !

मात्र, इतर व्यसनांच्या आधीन असलेल्या व वाचनाच्या व्यसनाच्या शोकी असलेल्या मनुष्यांत मोठा फरक हा कीं, त्या त्या व्यसनाच्या सेवन-पूर्तीनें मानवी ज्ञानाच्या संग्रहांत इटकून भर पडतेच असें नाहीं. पण जातिवंत वाङ्मयव्यसनी जन जर मनांत आणील तर वाचनाबरोबरच क्रमेण चागलें वाङ्मयलेखनहि करून गत लेखकांच्या उत्तमोत्तम कृति वाचून शिरावर झालेलें ऋण चालू व पुढील पिढीला स्वतः आपलें वाङ्मय अर्पून अंशतः फेडूं शकेल. आणि तितक्या अर्थानें त्यांच्या वाङ्मयवाच-नाच्या स्वार्थी व राजस वृत्तीला परोपकारासाठीं निःस्वार्थी लेखन करण्यांत

प्रतीत होणाऱ्या उच्चतम सात्त्विक वृत्तीचा मुलामा चढूं शकतो असें म्हणता येईल. तथापि हें खरें कीं, कोणतेंहि व्यसन घ्या—मग तें चांगलें असो वा वाईट असो—त्याचा अतिरेक हा केव्हांहि झाला तरी वाईटच. दिवसांत सात सात खेपा चहा ढोसणारा माणुस जसा अग्निमांद्याच्या विकारानें आजारी पडावयाचा, किंवा सदासर्वदा अग्निमुखी असणारा व्यसनी छातीच्या विकारानें पस्तावयाचा, किंवा पानतंबाखूचें तोबरें सदा चघळीत असणाऱ्या माणसाचे दांत सडलेले दिसावयाचे, त्याचप्रमाणें सदोदित वर डोकें न उचलता ग्रंथातच दृष्टि खिळवून निसर्गांतील व संसारातील निरीक्षणजन्य व अनुभवजन्य आनंदाला हट्टाच्या अज्ञानानें मुकणारा जन सदा दुर्मुखी, खंगलेला व दुःखीकष्टीच असावयाचा.

पण प्रथम वाङ्मयाच्या हेतूविषयीं थोडा विचार करणें ठीक होईल. समजा कीं, एखाद्या कुटुंबांत भिन्न भिन्न मनोधर्मांच्या भाऊ बहिणी आहेत. पण अशा कुटुंबात वाङ्मयाची खरी गोडी किंवा भक्ति असणारा रसज्ञ हजारांत एखादाच निघतो! चुकून जरी कोणी जन वाङ्मयप्रेमी निपजला तरी त्याचे इतर भाऊ व वाङ्मय यांच्यामध्यें कित्येकदा छत्तीसाचा आंकडा असावयाचा! आतां एकाच कुटुंबांतील हीं भावंडें असून त्यांच्या मनोधर्मांत विपुल साम्य आढळण्याऐवजीं असें वैषम्य का आढळावें? लहानपणीं हीं सारीं मुलें एकाच विशिष्ट वातावरणांत वाढत नव्हतीं काय? आईबाप व वडील मंडळी याच्या समान देखरेखीखालीं एकाच घरात तीं एकत्र हंसत खेळत नव्हतीं काय? मग त्याच्या तरुणपणींच्या मनोधर्मांत हा विरोध का? याला योग्य उत्तर गीतेचा अध्याय तिसरा, श्लोक ५, २७, २८ व ३३ यात दिलेलें आहे. सत्त्व, रज व तम या त्रिविध मूळ प्रकृतींच्या प्रभावानें माणूस जन्मतांच आपल्या पूर्वजन्मींच्या कर्मांपासून उद्भवणारें आसक्तींचें भलें मोठें गाठोडें आपल्याबरोबर घेऊन येतो. समजा, पूर्वजन्मीं एखादा माणुस मोठा लेखक होण्याच्या अनिवार राजस आकांक्षेनें प्रेरित होऊन तशी आपल्यापरी शक्य ती खटपट करीत होता. पण अनेक अवांतर अडचणींमुळें त्याच्या इच्छा विफल झाल्या आणि उदासीनतेच्या किंवा अशाततेच्या मनःस्थितीं-

तच तो वारला. तर यावर गीतेचा सिद्धांत असा कीं, त्याचा हा आशा-बंध जोंपर्यंत सुटणार नाही तोंपर्यंत त्यास निरनिराळ्या योनींत पुनः पुनः जन्म घ्यावा लागणारच! आणि स्वतः देहधारी आत्मा या साऱ्या व्यापारांपासून अलिप्त असला तरी माया म्हणजे सत्त्व-रज-तमादि प्रकृतींचे त्रिविध गुणधर्म कोणाला थोडेच चुकविता येतात! मनांत इच्छा नसूनहि पूर्वजन्मींचे हे जुने संस्कार जीवाला त्या त्या कर्मांचे ठायीं जोराची प्रवृत्ति करीतच असतात. अनुकूल वाऱ्यापुढें धावणाऱ्या तारवाप्रमाणें माणसाच्या जन्मजन्मांतरींच्या आकांक्षा चालू जन्मांतहि त्या त्या गुणाच्या कर्मास प्रवृत्त करीतच असतात! उदाः—पूर्वजन्मींच्या राजस बुद्धीच्या होऊं घातलेल्या अतृप्त लेखकाचें उदाहरणच घेतलें तर असा सामान्यपणें कयास बाधतां येईल कीं, तो चालू जन्मात मनुष्ययोनींतच उत्पन्न होईल. फिरून अशा आईबापाच्या पोटीं व वातावरणात कीं, जेणेंकरून त्याच्या लेखनविषयक आकांक्षाना अधिकाधिक गतिच मिळत जाईल! कल्पना करा, पूर्वजन्मीं सात्त्विक बुद्धीनें प्रेरित होऊन ब्रह्मज्ञानात मग्न असणारा एक योगी होता. कोणत्याहि विषयाची संपूर्ण सिद्धि शैकडों किंवा हजारों वर्षांनीं होत असते असें ज्ञाते सागतात. म्हणजे प्राण्याला सिद्धीच्या प्राप्तीकरता एका जन्माहून अधिक जन्म सहजच लागतात हें निराळें सागण्याचें कारण नाहीं. तेव्हां असा जन एका जन्माच्या अंतीं दुसऱ्या जन्मीं सुद्धा सात्विक, सच्छील व धर्मपरायण अशा कुटुंबातच जन्म घेत असतो. उलट-पक्षीं खून, दंगे, मारामारी यातच दंग असून अज्ञानानें मोहित झालेला एखादा निढावलेला क्रूर बदमाष, मृत्यूपूर्वी त्याला कृतकर्माबद्दल पश्चात्ताप झालेला नसेल, तर सामान्यतः अट्टल बेरडाच्या पोटींच जन्म घ्यावयाचा! सामान्यतः म्हणण्याचें कारण असें कीं, सज्जन आईबापांच्या पोटींहि क्रूर व दुष्ट संतति निपजल्याचीं उदाहरणें हवीं तेवढीं दाखवितां येतील! पण एक, हा अपवाद मानला जातो; आणि दुसरी गोष्ट म्हणजे, या विषयाची संगति लावूं गेल्यास बहुधा विषयांतर होईल.

तात्पर्य, या विषयावरील गीतेची शिकवण स्पष्टच आहे :—

"संपूर्ण ज्ञानी पुरुषदेखील सत्त्व-रज-तम यांपैकीं एखाद्या आपल्या प्रभावी गुणधर्माप्रमाणें वागतच असतो. मग इतर जनांची कथा काय! सर्व भूतेंहि आपापल्या विशिष्ट प्रकृतीच्या वळणावर हटकून जातात. तेथें ते गुणधर्मच बळेंच बदलण्याविषयीं केलेली सक्ति काय करणार?"

आतां आरंभींच्या उदाहरणांत सांगितलेल्या एकाच कुटुंबांतील जनाच्या भिन्न भिन्न मनोधर्मांची अशी संगति लावतां येईल कीं, ते ज्या कोणा आईबापांच्या पोटीं जन्माला आले व ज्या वातावरणांत वाढले ती बहुधा राजस वृत्तीस पोषक म्हणून. राजसवृत्तिरूपी नदीच्या पात्रापासून अनेक फाटे काढिता येतात. ते आपाततः भिन्न असले तरी त्यांचें मूल उगमस्थान एकच. आणि तें म्हणजे त्या नदीचें चंचल पात्र होय. त्यातील पाण्याचा एक पाट वाङ्मयरूपी भूभागावर सिंचन करून तो समृद्ध करतो; दुसरा पाट व्यापारोद्योगरूपी दुसऱ्या एखाद्या तुकड्याला पाणी पुरवितो; आणि तिसरा संसारातील कर्तव्यरूपी आणखी एक भाग भिजवितो. वस्तुतः हे भूभाग एकमेकापासून जवळपासच असतात. ते सलग नसले तरी आणि त्यांच्यावर उगवणारें पीक कसाच्या दृष्टीनें कमी अधिक निघालें तरी त्याचें पोषण व संवर्धन करणारें पाणी एकच. आणि तें राजस गुणधर्माचेंच होय.

याच न्यायानें एखाद्या प्रतिष्ठित घराण्यात एक भाऊ निर्भेळ वाङ्मयोपासक, दुसरा व्यापारोद्योगात आसक्त, तिसरा ऐहिक संसाराचा भार कुशलतेनें वहाणारा, याप्रमाणे भिन्न भिन्न व्यवसायात ते रत असले तरी त्यांचीं मातापितरें व मागच्या पिढ्या प्रकर्षाने राजस गुणधर्मांच्याच असावयाच्या. आता वरकरणीं बंधूबंधूंच्या मनोरचनेंत फरक दिसला तरी तो वैराग्यस्वरूप खचित नसतो; तर तो एकाच राजस धर्माच्या भिन्न भिन्न दृष्टिकोनांवर आधारलेला असतो.

आतां यावर कोणी असें विचारील कीं, माणसाला मुळीं जन्माबरोबरच सत्त्व, रज व तम यांपैकीं एखादाच गुणधर्म अधिक कां बाधतो आणि पुढें तो आयुष्यांतील त्या त्या ध्येयरूपी व्यसनांनीं कां व कसा ग्रासतो? याला थोडक्यांत उत्तर असें कीं, तशी त्या परमेश्वराची अतर्क्य लीला म्हणून! आरंभीं जेव्हां ईश्वरानें आपल्या अंगभूत प्रकृतीच्या मायेनें

चराचर सृष्टीची उत्पत्ति केली तेव्हां त्यानें आपल्या इच्छायोगाप्रमाणें सत्त्व रज व तम या तीन मौलिक गुणधर्मांची पेरणी निरनिराळ्या जंतुमात्रांच्या ठायीं निरनिराळ्या प्रमाणांत केली. आणि ईश्वरानें त्रिविध रसाय-नांच्या या अद्‌भुत कुपींतून ज्या रसायनाचा बिंदुमात्र घुटका आपल्या इच्छेप्रमाणें त्या त्या प्राण्यास प्रथम पाजला, त्या प्रमाणात त्या थेंबाच्या प्राशनानें धुंद होऊन तो प्राणी आपल्या वांट्यास आलेल्या गुणधर्मानुरूप अगतिक होऊन वर्तत असतो इतकेंच कल्पिणें मानवांच्या आटोक्यांत आहे.

आतां वाङ्मयाचें काय किंवा इतर कोणतेंहि काय, व्यसन प्रारंभीं कसें ओळखावें अशी कोणास जिज्ञासा उत्पन्न होईल. त्याचें समाधान असें कीं, आपली आवड कोणत्या वस्तूंवर व कोणत्या गुणांवर आहे याचें ज्ञान मनुष्यास उत्तरोत्तर आपोआप होत जातें. इतिहासांत अशी एक आख्यायिका आहे कीं, एखाद्या राजपुत्राच्या बालमनाची उपजत प्रवृत्ति पारखण्याकरितां सर्व वस्तूंचा भला मोठा संग्रह रचीत आणि त्यांतून त्याला पाहिजे ती वस्तु निवडायला सांगत. ही जुनी पद्धत संपूर्ण दोष-रहित होती असें म्हणणें कठिण असलें तरी, राजपुत्रानें जर तरवारीसारखें आयुध उचललें तर तो पुढें मागें आपल्या शौर्यानें नाव काढील असें स्थूल भाकीत करीत. आणि अशा अतर्क्य विषयांत मानवी बुद्धीची परि-मितता किंबहुना अप्रवेश पहातां पूर्वीच्या शहाण्यांनीं योजिलेला वरील प्रकार बराच कल्पक तरी म्हणतां येईल.

तरीहि इतकें खरें कीं, बालमन संसर्गानें व अनुकूल वातावरणानें विशिष्ट आवडीनिवडींकडे नकळत आकर्षिलें जातें. सुप्रसिद्ध जॉन्सनूचा बाप पुस्तकविक्या असल्यामुळें त्याचें बालमन वडिलांच्या दुकानांतील विक्रीचीं पुस्तकें नेहमीं लीलेनें चाळता चाळतां सहजच ग्रंथकर्तृत्वाच्या अंधुक कीर्तिलोभानें आळविलें गेल्यास त्यांत नवल कसलें ! कविवर्य टागोरांच्या वडिलांचा अमोल खाजगी ग्रंथसंग्रह नसता आणि आर्य संस्कृतीच्या धारणेस पोषक असें घरचें उच्च वातावरण नसतें तर कदाचित् त्यांच्या गीतांजलीसारख्या अमोल गद्यकाव्यास जग मुकलेंहि असतें ! कोणी सांगावें ! वर घरच्या वातावरणाच्या संसर्गाविषयीं जें सांगितलें तेंच

शेजारच्या वातावरणाविषयीं समजावें. शेजारच्या मुलांच्या स्वभावाशीं वारंवार संबंध येऊन बालमनाचा ओढा नकळत एका विशिष्ट दिशेनें तयार होत असतो. कित्येकदा तर वाङ्मयसेवकाच्या बाबतींत त्याच्या हातीं पडलेला पहिला ग्रंथच त्याच्या आयुष्क्रमाला बरें किंवा वाईट वळण लावूं शकतो. म्हणून ज्ञाते व वडील जन आरंभीं आपल्या मुलांबाळांच्या हातीं पडणाऱ्या ग्रंथांविषयीं फार कसोशीनें जपत असल्याचें आढळून येईल. कोणास त्याच्या या दृष्टींत निष्ठुरता वाटो, पण त्यांच्या अंतिम हितबुद्धीकडे पहातां तशी ती नाहीं असें थोड्याशा विचाराअतीं दिसून येईल.

वाचन हा दृश्य म्हणजे डोळ्यांनीं पहाण्याचा, आणि मित्रमंडळीचा व आप्तस्वकीयांचा सहवास हा अनुमेय म्हणजे तर्कानें अनुमान करण्याच्या क्रियेसंबंधींचा भाग झाला. पण याच्याहूनहि श्राव्य म्हणजे वाचलेलें किंवा बोललेलें स्मरणपूर्वक ऐकून मनन करण्याचा ज्ञानाचा भाग कित्येकदा अधिक प्रभावी होऊं शकतो. सोप्या बालबोध भाषेंतील पुराणग्रंथांचें किंवा गोष्टीरूप धार्मिक, नैतिक, जीवनविषयक किंवा ऐतिहासिक वाङ्मयाचें वडील मंडळीकडून घरीं दररोज वाचन-पठण होत असल्यास त्याचा प्रभाव बालमनावर होतोच कीं !

इतके दूर कशाला ! माझेच नम्र अनुभव आत्मीयतेनें कथन करावयाचे असतील तर माझ्या विद्यार्थिदशेंत माझी आई रामविजय, हरिविजय, भक्तिविजय, जैमिनी अश्वमेध, पाडवप्रताप इत्यादि ओवीबद्ध प्राकृत पुराणग्रंथ चातुर्मासांत नेमानें संध्याकाळीं वाचीत असे. ते ऐकत असताना माझ्या बालमनावर वाङ्मयीन संस्कार प्रथम रुजला असला पाहिजे यांत मुळींच शंका नाहीं. श्रीधरकृत पांडवप्रतापातील कर्णवध, अभिमन्युवध इत्यादि साराच सरस व अद्भुत भाग, वीररसाइतक्याच त्यांतील वाङ्मयगुणांच्या लौल्यानेंहि मी दुसऱ्या दिवशीं वारंवार मनांत वाचून तृप्त होत होतों ही गोष्ट मला अजून कशी चांगली स्मरते !

मीं प्रथम वाचलेलें मराठी मासिक म्हणजे जानेवारी १९१४ सालचा पुण्याच्या सुप्रसिद्ध 'चित्रमयजगत्' मासिकाचा खास अंक होय. त्यातील कै. शि. म. परांजपे, श्री. न. चिं. केळकर आदि कित्येक लेखन-

पद्रूंविषयीं माझ्या आदराचें बीजारोपण त्यांच्या विविध व भारदस्त लेखांच्या मेजवानीपासून झालें असावें असें मी खचित समजतों.

आतां मला पहिल्या प्रथम वाचण्यास लाभलेले मराठी ग्रंथ म्हणजे (१) श्री. चिं. वि. वैद्य यांनीं संपादलेला गोडसे घराण्याचा वृत्तांत उर्फ १८५७ सालच्या बंडाची हकीकत व (२) कै. नाथमाधवकृत 'वीरधवल' ही अद्‌भुतरसात्मक कादंबरी, हे होय. वर्णनात्मक वाङ्मया-विषयीं आवड व अद्‌भुत कथानकाविषयी उत्सुकता या मनाच्या प्रवृत्ति या दोन पुस्तकांपासून मीं उचलल्या व तेथून माझ्या वाङ्मयीन मनोधर्माला प्रारंभ झाला असावा. हे आत्मानुभव आत्मस्तुतीच्या बुद्धीनें मुळींच नसून नम्र प्रांजलबुद्धीनें सांगितले आहेत इतकेंच समजावें.

प्रत्येक वाङ्मयसेवकाचे व वाङ्मयाभ्यासूचे याहूनहि सरस वाङ्मयीन बीजाचे आरंभींचे अनुभव असतील तर ते त्यानीं आपल्या तीक्ष्ण स्मृतीस स्मरून इतरास मोकळेपणाने सांगण्याचे मनात आणल्यास आणि अशा मधुर स्मृतींचा एकत्र संग्रह केल्यास तो या प्रश्नावर निरनिराळ्या बाजूंनीं उज्ज्वल प्रभा पाडल्यावांचून रहाणार नाहीं हें निश्चित.

आता मानवी मनाचा आणि वाङ्मयीन व्यसनाचा परस्पर संबंध कोणता ? याचें समाधान असें कीं, मनोव्यापार वाऱ्याप्रमाणें चंचल आहे. ज्या विषयावर मन विचार करतें त्यांत तें तात्काळ रमतें व गढून जातें. म्हणूनच म्हणतात, 'मन एव मनुष्याणा कारणं बंधमोक्षयोः' (मन हेंच माणसाच्या गुलामगिरीचें किंवा मोक्षसाधनाचे कारण ठरते !) चहाचें व्यसन केल्यास तें चहापानात रमते; वाचनाचें व्यसन जोडल्यास त्यात तें आसक्त होतें. म्हणून मनोव्यापाराना वायूची उपमा देतात. कोणत्याहि निर्वात जागी संधि सापडताच वायूचा हटकून प्रवेश व्हावयाचा ! Nature abhors vacuum (निसर्गाला निर्वात स्थानाचे वावडें आहे) हा विज्ञानशास्त्राचा सिद्धांतच आहे. याच न्यायानें मानवी मनोव्यापारांना कोणताहि अविषय नाही ! म्हणून त्याच्या सर्वस्वीं आहारी न जाता बुद्धीनें त्यांचा संयम करून त्याला वाङ्मयाच्यासारख्या चांगल्या व्यसनांत योग्य

प्रमाणात गुंतविलें पाहिजे. म्हणजे मनाचें व त्या त्या व्यवसायांचें नातें अनुकूल व संथ वहाणाऱ्या वाऱ्यापुढें वेगानें धावणाऱ्या तारवाप्रमाणें होतें. दुर्दैवानें याची उलट स्थिति झाल्यास त्याचा परस्परसंबंध व नातें काय होतील याची कल्पना कोणीहि करावी! म्हणून मनोव्यापारांना कोणत्याहि वाईट व्यसनाचा संग लागूं नये किंवा मुळीं विचारच न करतां ते असंगाच्या किंवा अकर्माच्या चिखलात रुतूं नयेत अथवा अज्ञानजन्य मोहानें वाङ्मयासारख्या एखाद्या चागल्या व्यसनाचाहि मनस्वी अतिरेक करून त्याचा तोल व समता बिघडवूं नयेत असें गीताशास्त्र कंठरवानें सारीत आहे.

आता वाचनलेखनांत परम आनंद मानणाऱ्या काहीं थोर लोकांचीं उदाहरणें देतों. तीं वाचकाना मनोरंजक व उद्बोधक वाटतील अशी उमेद आहे.

कॉनफ्यूशसचें असें उदाहरण सागतात की, तो ज्ञानार्जनलालसेमुळें तहान-भूक व सुखदुःखें विसरला आणि ययाती राजाला पछाडणारी भीषण जरा आपल्याशीं वाट चालत आहे हेंहि तो विसरला!

सिसिरो म्हणतो—"ग्रंथाविहीन खोली म्हणजे आत्मा नसलेला देह!" फ्रेडरिक हॅरिसन म्हणतो—"वाङ्मयाचा काव्यप्रधान व भावनाप्रधान असा द्विविध ललित भाग दैनिक वाचनाला व मनोरंजनाला अत्यंत आवश्यक होय."

विद्वत्ता, धन व कीर्ति याचा आयुष्यात पुरेपूर उपभोग घेतलेल्या मेकॉलेचा वाचनाचा शोक इतका दाडगा होता म्हणतात कीं, त्याच्यापासून चाखतां येणाऱ्या उच्चतम आनंदापुढें द्रव्येषणा व मानमरातब तो तुच्छच लेखी!

'रोमन साम्राज्याचा अस्त' हा जगन्मान्य ग्रंथ लिहिणारा सुप्रसिद्ध इतिहासकार गिबन म्हणतो—"हिंदुस्थानांतील सारी संपत्ति मजपुढें एकदम ओतली अशी जरी क्षणभर कल्पना केली तरी तिच्यापासून होणारा आनंद वाचनाच्या आनंदापुढें मला खरोखर तुच्छ आहे!"

शेक्सपिअरनें 'ज्यूलिअस् सीझर' नामक नाटकांत अजरामर केलेल्या रोमन सरदार ब्रूटसचेंच उदाहरण घ्याना. फर्सेलियाच्या घोर युद्धा-

पूर्वी तो आपल्या डेऱ्यांत ग्रंथवाचनात मग्न असून त्यांतील महत्त्वाचीं टिपणें कागदावर उतरीत होता अशी गोष्ट सागतात !

थोरला प्लिनी जेवणाच्या वेळीं सुद्धा वाचकाकडून आपले आवडते ग्रंथ नेमानें वाचून घेत असे आणि बरोबर ग्रंथ घेतल्यावाचून तो सहसा प्रवास करीत नसे !

पण याच्याहून आपल्या 'Student's Manual' या ग्रंथात टॉड-साहेबानी पेट्रार्क नावाच्या कवीची सागितलेली हकीकत अधिक बोदप्रद आहे.

या कवीचा लेखन-वाचनाचा नित्य क्रम असे. पण त्याच्या अतिरेका-मुळें कदाचित् त्याची प्रकृति बिघडावयाची म्हणून त्याच्या एका हितेच्छु मित्रानें त्याच्या ग्रंथालयाच्या किल्ल्या घेऊन ते दहा दिवसपर्यंत बंद केलें ! त्या कवीचा वाचनाखेरीज पहिला दिवस संपून सपेना; दुसऱ्या दिवशीं त्याचें डोकें जोरानें ठणकूं लागलें; आणि तिसऱ्या दिवशीं तर त्याला ताप आला ! आता अधिक अंत पहाणें ठीक नव्हे म्हणून दयाबुद्धीनें प्रेरित होऊन त्या मित्रानें ग्रंथालयाच्या किल्ल्या मालकाला परत केल्या; आणि मौज ही कीं, दुसऱ्याच क्षणापासून कवीची बिघडलेली प्रकृति सुधरूं लागून त्याला पूर्ववत् मानसिक समाधानाची जोड लाभली !

बॉस्वेलकृत जॉन्सन्चें प्रचंड चरित्र नुसतें वरवर चाळलें तरीहि वाङ्म-याच्या नादाचें चालतें बोलतें मूर्तिमंत उदाहरण म्हणजे स्वतः जॉन्सन्च होय हें तात्काळ पटल्याशिवाय रहात नाहीं. जॉन्सन्चा बाप पुस्तकविक्या असल्यामुळे मुलाला बापाच्या दुकानांतील मिळेल ते पुस्तक उत्कंठेनें चाळण्याचा जणूं नादच लागला होता. लहानपणी मनोभूमीवर रुजलेले बरेवाईट संस्कार पुढें चिरस्थायी होऊन आयुष्यास साक्षेपानें विशिष्ट वळण लावूं शकतात या सिद्धाताचा प्रत्यय थोर लोकाच्या चरित्रग्रंथांत त्यांच्या बालपणांतील व तरुणपणांतील गतगोष्टी किंवा प्रसंग वाचतांना वारंवार येतो.

जॉन्सनसाहेब तर नेहमीं म्हणत—"ग्रंथवाचनाचे फारसे श्रम न घेतां ते वरवर नुसते चाळल्यानेंहि चिकित्सक इसमाला त्यांच्यासंबंधी पुष्कळच ज्ञान मिळूं शकतें असा स्वतः माझाच तरुणपणाचा अनुभव आहे !"

वाचनाच्या व्यसनाचीं चार प्रधान कारणें संभवतातः—

(१) एखाद्या ग्रंथकाराची सुंदर किंवा गंभीर लेखनशैली वाचून व तिचें वारंवार मनन करून अनुकरणप्रियत्वामुळें ती आपल्या अंगीं बाणविण्याचा होतकरू लेखकाचा हव्यास. एतद्विषयीं युरोपीय वाङ्मयाच्या इतिहासांत खालील उदाहरणें प्रसिद्ध आहेत :—

प्रसिद्ध वक्ता डिमोस्थेनिस याची अशी गोष्ट सांगतात कीं, प्रसिद्ध इतिहासकार थुसिडायडिसच्या इतिहासांतील ओजस्वी लेखनशैली उचलण्याकरिता एकदा नव्हे, दोनदा नव्हे, तर आठ खेपा त्याने त्या समग्र इतिहासग्रंथाची आपल्या हाताने नक्कल केली ! छापखान्याच्या अभावी पूर्वीचे लोक दुर्मिळ हस्तलिखित ग्रंथांच्या किंवा काव्यांच्या आपल्या खास संग्रहाकरिता परिश्रमपूर्वक नकला करीत. प्राचीन युरोपीय लेखक व आमच्या आर्यावर्तांतील महाकवि यानी हाच क्रम अनुसरल्याचा पुरावा आढळतो. याचा महत्त्वाचा फायदा असा कीं, नकळत त्या त्या थोर ग्रंथकाराच्या लेखनशैलीचे 'वजन' त्याच्या अंगांत खेळण्यास भरपूर वाव मिळत असे. मुद्रणयुगानंतर या श्रमसिद्ध फायद्याला आधुनिक पिढी पुरती मुकली असें कष्टानें म्हणावें लागते. प्राचीन काळीं वाङ्मय अति दुर्मिळ असल्यामुळें दूरदूरच्या ठिकाणांहून महत्प्रयासानें हस्तलिखित ग्रंथ मालकाकडून मिळवावे लागत ! आता छापखान्यांमुळे ग्रंथनिर्मितीचा इतका सुकाळ झालेला आहे कीं, बऱ्या वाईट छापील वाङ्मयाच्या प्रचंड भारातून आपणास इष्टानिष्ट कोणतें व तें कसें निवडून काढावें, हीच विवंचना प्रत्येक वाचकाला ग्रासीत सुटते !

सुप्रसिद्ध इतिहासकार गिबन 'रोमच्या साम्राज्याचा अस्त' नांवाचा इतिहास लिहितांना आपल्या लेखनशैलीच्या समर्पकतेसंबंधीं इतका चोखदळ झाला होता कीं, मजकुराच्या फिरवाफिरवीच्या नव्हे, तर केवळ भाषेच्या ठाकठिकीच्या दृष्टीनें त्यानें प्रारंभीची काहीं पानें वारंवार फाडून पुनः पुनः लिहिली; इतकेंच काय, त्या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या वेळींहि त्यांतील प्रारंभीच्या प्रकरणांतील कित्येक वाक्यखंडांची नुसत्या व्याकरणाच्या निर्दोषतेच्या दृष्टीनें त्यानें किंचित् फिरवाफिरव केल्याचें दिसून येतें. यावरून त्याच्या चोखंदळपणावर तर

प्रकाश पडतोच, पण होतकरू लेखकानें उत्कृष्ट व प्रमाणबद्ध लेखनशैली पचविण्याकरितां किती बारीक व किचकट परिश्रम करावे लागतात याचें प्रत्यंतर दिसून येईल. आणि पुष्कळदा त्याच्या ठायीं उद्भवलेला 'श्रेष्ठ' लेखनाचा उन्माद जळून तो उत्तरोत्तर विनम्र व विशुद्ध होत जाईल.

सेनेका म्हणतो—"ज्या दिवशीं मी थोडें फार लिहिलें नाहीं अगर एखाद्या उत्कृष्ट ग्रंथाचें परिशीलन केलें नाहीं असा एकहि दिवस सुना गेलेला माझ्या सबंध आयुष्यांत मला स्मरत नाहीं!"

सुप्रसिद्ध आंग्लभाषाकोशकार डॉ. जॉन्सन् याची खालील सूक्ति तर सर्व आंग्लवाङ्मयाभ्यासूंच्या तोंडीं आहे:—

"ज्याला आंग्लभाषाप्रभु व्हावयाचें असेल त्यानें ॲडिसन्च्या सुंदर निबंधावर दिवस नी रात्री सारख्या घालविल्या पाहिजेत!"

(२) दुसरा प्रकार ज्ञानार्जनाच्या अंतरींच्या लालसेने वाचन करणाऱ्यांचा. निरनिराळीं शास्त्रें व कला, राष्ट्रांचे प्राचीन इतिहास आणि पूर्वकालाचें एकत्र उपलब्ध असलेलें जगाचें विविधरूपी ज्ञान व तत्त्वज्ञान यांचें आपल्या क्षणिक आयुष्यांतील साधेल त्या फुरसतीच्या वेळांत शक्य तें ज्ञान करून घेण्याच्या पवित्र उद्देशानें जिज्ञासू जन आपल्या आवडीचे व इतर नवीन विषयांवरील ग्रंथ चाळीत असतो आणि त्यातून आपल्यास हवा असणारा एखादा उत्कृष्ट ग्रंथ निवडून तो निष्ठेनें वाचीत असतो.

(३) नवनवीन ज्ञानविषयांचें समृद्ध खाद्य नसेल तर मनातील विचारप्रवाह डबक्यांतील पाण्याप्रमाणे एकीकडे सांचून निरुपयोगी व्हावयाचे! म्हणून जेणेकरून विचारचक्राला ज्ञानविज्ञानाच्या वाफेने गति मिळेल आणि तें प्रगतीच्या मार्गावर नित्य पुढे पाऊल टाकील असेच विषय जिज्ञासू जन वाचनासाठीं निवडीत असतो. प्रसिद्ध आंग्ल कवि पोप आपल्या आठवणींत आपल्या वाचनहेतूवर प्रकाश पाडणारे खालील मननीय अनुभव सांगतो:—

"माझ्या वयाच्या चौदा ते वीस वर्षांपर्यंत मी करमणुकीकरतां, तर वीस ते सत्तावीस वर्षांपर्यंत ज्ञानार्जनाकरिता व मनाच्या पोषणाकरितां वाचीत असें. पूर्वार्धांत ज्ञानाच्या जिज्ञासेनें तर उत्तरार्धांत आपली कार्याकार्य-

निर्णयाची व स्वतंत्र मतप्रतिपादनाची शक्ति अजमावून पहाण्याकरितां व ती वाढविण्याकरितां मी वाचीत असें."

(४) वाचनाचें चौथें कारण म्हणजे रोजच्या कलाहीन पोटाच्या व्यवहारांत अतोनात शारीरिक व मानसिक श्रम झाल्यामुळें मनाला विरंगुळा देण्याकरिता विशेषतः विदग्ध किंवा ललितवाङ्मयाची निकड भासते हें होय. हा जगांतील करमणुकीचा एक प्रकार झाला. पण वाङ्मयविभागाच्या निरनिराळ्या शाखांच्या परिशीलनांतहि हा क्रम यशस्वी रीतीनें आचरून वैचित्र्य प्राप्त करता येतें असा मनोरंजक अनुभव पूर्वोक्त टॉड्साहेबांनीं नमूद केला आहे. टॉड्चें म्हणणें असें कीं, एकच ग्रंथ किंवा विषय बसल्या बैठकींतच पुरा करण्याचा अट्टाहास करणें अतिशय कंटाळवाणें किंबहुना अशक्यच. म्हणून इतिहास-तत्त्वज्ञानासारखे गहन विषय थोडा वेळ वाचल्यानंतर मनाचा शीण घालविण्याकरितां एखादी कादंबरी उचलावी. तेणेंकरून मनाची करमणूक झाल्यावर त्याला प्रखरपणा, हिशेबीपणा व बांधेसूदपणा येण्याकरितां गणिताच्या किंवा भूमितीच्या सिद्धांतांचे घुटके पाजावे. येणेंप्रमाणें दिवसरात्रींच्या निरनिराळ्या समयीं निरनिराळे गंभीर व ललित विषय थोडथोडे हाताळावे म्हणजे श्रमांचें भलें मोठें गांठोडें बांधण्याचें पाप आपल्या हातून होणार नाहीं. आणि वैदग्ध्याबरोबरच वैविध्य व वैचित्र्य यांच्या योगें मन सदा ताजेंतवानें व आनंदी राहील. कोणी येथें अशी पृच्छा करील कीं ज्ञान-विज्ञानाच्या अनुभवाकरितां किंवा मनाच्या करमणुकीकरितां 'ग्रंथ मात्र धुंडाळावा' हें कां! सृष्टिनिरीक्षण व नित्यक्रमांतील अनेक घडामोडी यांच्यापासून काही शिकण्यासारखें नाहीं काय! शिकण्यासारखें नाहीं असें कोण म्हणतो! पुष्कळच शिकण्यासारखें आहे. परंतु या घडामोडी व क्रिया माणसाच्या हुकमतीच्या आधीन नसतात इतकेंच! माणसाच्या फुरसतीच्या अगर इच्छेच्या वेळीं अगर दिवसरात्रींच्या कोणत्याहि समयीं त्याला नित्यक्रमांतील अनुभव हटकून लाभूं शकतील अशी कोण ग्वाही देईल! पण इमर्सन्नें ज्या वाङ्मयाला "मानवी अनुभवसर्वस्वाचें सार" म्हटलें आहे तें वाङ्मय ग्रंथांत संग्रहिलें असतां मात्र पाहिजे तेव्हां व पाहिजे त्या वेळीं मनमुराद चाखून त्याची गोडी सेवितां येते हा त्याचा मोठा

विशेष होय. एखाद्या पंडिताकडे शंका विचारण्यास त्याची लहर व समय राखावीं लागतात. पण ग्रंथांची महत्त्वाची सोय अशी कीं, वाचनाच्या खऱ्या भुकेनें त्याचें परिशीलन करणाऱ्या जनास वाटेल त्या वेळीं तेथें मुक्तद्वार असतें! लहरी पंडित कित्येकदा प्रश्न करणारावर कोपेल; पण ग्रंथ आपल्या अज्ञानाची निमूटपणें व प्रामाणिकपणें शक्य तों निरास करून ज्ञानाची भूक शमवितात, नव्हे एका अर्थानें ती उत्तरोत्तर वाढवितातहि !

साहित्याचार्य श्री. न. चिं. केळकर यांची तर्कनिष्ठ, चिकित्साप्रधान, अत्यंत मार्मिक व थोडक्या शब्दांत विपुल अर्थ प्रसवणारी लेखनशैली व तींतील उद्बोधक लेखनगुण पाहून आधाशी होतकरू लेखकाला एकदम ती अलग उचलावी असें वाटत असावें ! पण केळकरांच्या अष्टपैलू बुद्धीच्या मागें वाचनलेखनाच्या दीर्घ परिश्रमानें सतत संपादन केलेली बहुश्रुतता भक्कम पायावर उभी आहे याचा मात्र त्यांना मोहानें विसर पडतो! केळकराविषयीं दुसरे एक थोर साहित्यसेवक व तत्त्वज्ञ प्रो. वा. म. जोशी आपल्या 'केळकर' ग्रंथांतील अग्रलेखांत मनमोकळेपणानें काय म्हणतात तें वाचाः—('केळकर' ग्रंथ, पृ. ६ पहा.)

"दुसरी गोष्ट अशी कीं, ते (केळकर) बहुश्रुत आहेत. त्यांनीं मराठी, इंग्रजी व सस्कृत मिळून जितके ग्रंथ वाचले असतील तितके वाचलेले लोक फारच विरळा—महाराष्ट्रांत तरी फारच थोडे ! (माझ्या डोळ्यांपुढें रा. चिंतामणराव वैद्यच तेवढे सध्यां उभे रहात आहेत.)............ शेक्सपिअर, गोल्डस्मिथ, जॉन्सन्, ॲडिसन्, बर्क, रस्किन्, कार्लाईल, गटे, लेसींग इत्यादि जुने, तसेच अलिकडचे विरेल, शॉ, गॅल्सवर्दी, गार्विन्, ब्रॅडले, इत्यादि पाश्चात्य लेखक त्यांनीं इतके वाचले आहेत कीं त्यांची यादी सहज छापील पांच दहा पानें होतील इतकी लांबेल. मराठींतील बरेच जुने कवि, आधुनिक मराठींतील बहुतेक सर्व गद्य लेखक व बरेचसे कवि यांचा त्यांना चांगला परिचय आहे. संस्कृतमधील बहुतेक प्रसिद्ध नाटकें व साहित्यशास्त्रावरील बरेचसे ग्रंथहि त्यांनीं अभ्यासिले आहेत. आणि तीनहि भाषांतील हे ग्रंथ मार्मिकपणें आणि रसास्वादाच्या दृष्टीनें वाचलेले आहेत; केवळ परीक्षेकरितां किंवा विद्वत्वप्रदर्शनाकरिता नव्हे !"

सुप्रसिद्ध कादंबरीकार कै. ह. ना. आपटे यांचें "चरित्र व वाङ्मय-विवेचन" कु. वेणूबाई पानसे या विदुषीनें लिहिलें आहे. या ग्रंथांत हरि-भाऊंच्या वाचनाच्या व्यवसायाबद्दल खालील माहिती आढळते :—
(पृ. ३४-३५ पहा.)

"हरिभाऊंच्या संस्कृत वाङ्मयाच्या 'पेपर'वर वामन शिवराम आपटे हे खूष असत. कालिदासाचीं नाटकें, बाणाची कादंबरी, दशकुमारचरित स्वतः कोणाच्याहि मदतीशिवाय वाचून त्यांनीं त्यांचीं अनेक पारायणें केलीं होती ! तेव्हा संस्कृत वाङ्मयविभागांत त्यांची बरोबरी कोणीहि विद्यार्थी करूं शकत नसे! कोणताहि कठिण नवीन संस्कृत श्लोक असो, इतर मुलांच्या मानानें तो त्यास लवकर समजे व त्याबद्दल शिक्षक त्यांचें कौतुकहि करीत. संस्कृता-प्रमाणेंच इंग्रजी वाङ्मयाचेंहि अवांतर वाचन त्यांनीं पुष्कळच केलें होतें ! अवांतर इंग्रजी वाचनाची गोडी त्यांना विष्णुशास्त्री चिपळूणकरांमुळेच लागली. शास्त्रीबुवाना रेनॉल्डस्च्या कादंबऱ्या वाचतांना त्यांनीं अनेकदा पाहिलें होतें. त्यामुळें हरिभाऊहि रेनॉल्ड्स वाचूं लागले. रेनॉल्ड्सशिवाय शाळेत असतानाच मिल्टन, शेक्सपियर, स्कॉट, शेली, कीट्स्, मोलिएरचीं सुखान्त नाटकें, थॅकरे, डिकन्स, जेन ऑस्टिन्, इत्यादि नामांकित इंग्रजी कवींचे व कादंबरीकाराचे ग्रंथ त्यांनीं समग्र वाचून काढले होते. ते स्वतः तर वाचन करीतच, परंतु आपल्या मित्रमंडळींतहि आपण वाचलेल्या ग्रंथांची स्तुति करीत. हरिभाऊंच्या संगतीमुळें त्यांच्या मित्रांनीं अवांतर इंग्रजी पुस्तकांचें वाचन करावें. हरिभाऊंनीं एक पुस्तक वाचलें कीं तेंच त्यांच्या मित्रमंडळींत आठ पंधरा दिवस फिरत राही !"

जगांतील अनेक थोर ग्रंथकारांच्या चरित्रावरून आणखी किती तरी वाचनाच्या शोकी लोकांचीं मनोरंजक उदाहरणें देतां येतील. परंतु लेखाचा अति विस्तार होऊं नये म्हणून ती संकलित करण्याचा मोह येथें आंखडावा लागत आहे.

केवळ ग्रंथांत डोकें खुपसून जगाच्या व्यवहारास पारखा झालेल्या उदासीन वाचनशोकी इसमाचा वर उल्लेख केला आहे. या विषयाचा धागा आता हातीं घेऊन वाङ्मयीन उदासीनतेच्या लक्षणांची मीमांसा करूं.

कोणत्याहि विषयाचा अतिसंग करून अतिरेक झाला म्हणजे उदासीनता उत्पन्न होते. भगवंतांनीं गीतेंत म्हटलेंच आहे कीं,

> ध्यायतो विषयान्पुंसः संगस्तेषूपजायते ।
> संगात्संजायते कामः कामात्क्रोधोऽभिजायते ॥
> क्रोधाद्भवति संमोहः संमोहात्स्मृतिविभ्रमः ।
> स्मृतिभ्रंशाद् बुद्धिनाशो बुद्धिनाशात्प्रणश्यति ॥
> रागद्वेषवियुक्तैस्तु विषयानिन्द्रियैश्चरन् ।
> आत्मवश्यैर्विधेयात्मा प्रसादमधिगच्छति ॥
> (गीता अध्याय दुसरा, श्लोक ६२ ते ६४ पहा.)

(अर्थः—विषयांचें चिंतन करणाऱ्या पुरुषाचा सदर विषयांचे ठिकाणीं संग म्हणजे सलगी वाढत जाते. या संगापासून काम म्हणजे वासना उत्पन्न होते आणि तिची तृप्ति होण्याला अडथळा झाला म्हणजे त्या कामापासून क्रोध उत्पन्न होतो. क्रोधापासून संमोह म्हणजे अविवेक होतो. संमोहापासून शुद्धि चुकते. शुद्धि चुकल्यानें बुद्धीचा नाश होतो आणि बुद्धिनाशापासून पुरुषाचा सर्वस्वीं घात होतो. पण आपला आत्मा म्हणजे अंतःकरण ज्याच्या ताब्यांत आहे तो माणुस प्रीति व द्वेष यांपासून सुटलेल्या व आपल्या स्वाधीन असलेल्या इंद्रियांनीं विषयांमध्यें वागूनहि चित्तानें प्रसन्नच असतो !)

जर माणूस तर्काऐवजीं मनोमय कल्पकतेच्याच सर्वस्वीं आहारीं जाऊं लागेल तर तो क्षणांत असंतुष्ट व किरकिरा बनेल. आणि या अवस्थेपासून वेडाची लहर कांही फारशी दूर नाहीं! अतिवाचनापासून संभवणारी उदासीनता वेळींच टाळण्यासाठीं आसक्ति न ठेवता ईश्वरार्पणबुद्धीनें आपलें कर्तव्यकर्म आपल्या शक्तिबुद्धीप्रमाणें नियमित वेळांत करीत रहाणें हेंच गीतेंतील कर्मयोगाचें थोडक्यांत सार आहे.

जगाचें धारणपोषण व सुस्थिति हीं प्रेमावर अवलंबून आहेत. अशी विश्वाधार भूतप्रेमाची ही चीज तरी कोणती! या जगांत सत्यावर आधारलेल्या ज्या ज्या सुंदर वस्तू आहेत त्यांचा निःस्वार्थ उपभोग घेण्याची प्रकृतीची जी उपजत प्रेरणा असते तिला 'प्रेम' असें म्हणतां येईल.

म्हणून पंडितांनीं प्रेमाची अशी एक व्याख्या केली आहे कीं, "इच्छा करते ती आसक्ति; उपभोग घेतें तें प्रेम. आसक्तिरूपी रात्रीच्या अंतीं प्रेमरूपी प्रभातकालाचा प्रारंभ व्हावयाचा. प्रेमविषय बनलेल्या वस्तू जवळपास असतात; आकांक्षेच्या वस्तू आवांक्याबाहेर असतात."

इतर विकारांपेक्षा अधिक उग्र व उद्दीपक असणाऱ्या प्रेमविकाराला प्लेटो त्याच्यावर बळेंच आधिपत्य चालवूं पहाणारा 'राक्षस' असें म्हणतो!

सत्याचा व प्रेमाचा पाया नसता तर चराचर सृष्टींत उत्पत्तीची अजस्र इमारत न उठतां जिकडे तिकडे शुकशुकाटच झाला असता! म्हणून उदासीन माणूस प्रेमाला पारखा झालेला किंवा अज्ञानानें प्रेमाकडे पाठ फिरविलेला असतो असें ज्ञाते मंडळी कयास बांधूं शकते.

'The Meaning of Life' (जीविताचा उद्देश) हा ग्रंथ लिहिणारा सुप्रसिद्ध अमेरिकन तत्त्वज्ञ विल ड्यूरंट यानें त्या ग्रंथांत प्रेमाभावीं उत्पन्न होणाऱ्या उदासीनतेची संगति थोडक्यात चतुराईनें लावली आहे :—

"कोणी वैतागून (आत्महत्या करण्याचा) निराशावाद प्रतिपादायला लागला कीं मी मनाशीं म्हणतों, 'स्वारीचं लग्न झालेलं नसावं!' कारण विवाहित माणसाला रडगाणें गायला सवडच नसते! बहुतेक निराशावाद्यांच्या वैतागाचें कारण एवढेंच कीं (प्रेमशून्य) आयुष्यातल्या खस्ता खाता खातां व अपेष्टा भोगता भोगता ते चिडून जातात व स्वतःच्या दौर्बल्यावरून सिद्धात काढतात कीं, या मानवी जीवितांतच कांही अर्थ नाहीं!"

प्रेम द्विविध असतें. वासनायुक्त व वासनारहित.

## वासनारहित प्रेम

(यांतील कांहीं प्रकार)

(१) निसर्गविषयक प्रेम, (२) ईश्वराविषयक प्रेम, (३) परस्त्रीविषयीं वासनारहित निर्मळ प्रेम (Platonic love), इत्यादि.

## वासनायुक्त प्रेम

(यांतील कांहीं प्रकार)

कामिनी व कांचन यांचें प्रेम, विद्याप्रेम, इत्यादि. विद्येंत परा व अपरा असे दोन भेद वेदान्तांत कल्पितात. (बाबा गर्देकृत 'ब्रह्मसिद्धांतमाला' पहा.)

अपरा विद्यांमध्यें सर्व व्यावहारिक विद्यांचा व भौतिक कलाकौशल्यांचा समावेश होतो. परा विद्या म्हणजे ब्रह्मज्ञान किंवा ब्रह्मविद्या. अपरा विद्या तितक्या अपूर्ण होत. म्हणून त्या वासनेचीं बीजें होत. त्यांची नुसती नामओळखहि होणें उभ्या जन्मांत कठिण! या संदर्भात सुप्रसिद्ध आंग्ल गणिती सर आयझॅक न्यूटन यानें विनयानें काढलेले खालील उद्गार महमहत्त्वाचे आहेत:— "विज्ञानाच्या समुद्राच्या अत्यंत विस्तीर्ण तीरावर अनेकानेक शंखशिंपले इतस्ततः विखुरले आहेत ! माझ्यासारख्याची सर तेथें एका लहानशा जागीं खेळणाऱ्या बालकाला यावयाची ! ज्याप्रमाणें त्या बालकाला सबंध तीर आकलणें कठिण तीच माझ्या 'ज्ञाना'ची स्थिति !"

उलटपक्षीं पराविद्येंत म्हणजे ब्रह्मज्ञानांत आत्मज्ञानापासून संपूर्ण मानसिक शांति प्राप्त होते व मनास डंवचणारे सर्व आशाबंध आपोआप गळून पडतात म्हणून त्यांच्याविषयीं प्रेम वासनारहित असतें.

म्हणून दीर्घ विवेचनेनें मनास बाधणारी उदासीनता घालविण्याकरितां प्रेमाच्या वरील सर्व प्रकारांत मनुष्यानें आलटून पालटून आनंदानें डुंबून त्यांची गोडी चाखली पाहिजे. मात्र असें तो करण्यास बुद्ध्या टाळील तर त्याच्या पदरीं हटकून संकुचितपणा व एकांगित्व येऊन तीं त्याच्या मनाच्या शांतींत विष कालविल्याखेरीज रहाणार नाहींत.

दक्षिण हिंदुस्थानांत स्थाईक झालेला सुप्रसिद्ध आयरिश कवि डॉ. जेम्स एच. काझिन्स यानें मागें पुण्यांत दिलेल्या व्याख्यानांत असें सांगितलें होतें कीं, ध्येयाचा सुवर्णमध्य गांठण्याचा प्रत्येकानें झटून प्रयत्न करावा. भाषणाच्या ओघांत त्यांनीं दिलेलें खालील मननीय उदाहरण पहा:—

सर सी. व्ही. रामन् मजजवळ एकदां म्हणाले, "माझ्या संशोधनांत मी इतका गुरफटून गेलेला असतों कीं, माझ्या घरीं लावण्याकरितां एखादें सुंदर चित्रहि पसंत करण्यास मला अजून सवड सांपडलेली नाहीं !"

डॉ. कझिन्सचें यावर असें मत आहे कीं, ध्येयसिद्धीचा असा अतिरेक करून आपण पदरीं पंगूपणा किंवा एकांगीपणा आणून एककली बनूं नये ! कोणत्याहि सिद्धीच्या साधनांचाच अतिरेक केल्यास आपण मानवी

जीविताच्या निजध्येयाची वाटच चुकलों म्हणावयाचें !

खरेंच, वाचनाचा अतिरेक करून माणूस नुसतें डोकेंहि न उचलतां दिवसरात्र घालवील तर तो पुढें पुढें एकांतप्रिय व माणुसघाणा होईल ! आणि याचा अनिष्ट परिणाम चिडखोरपणांत, स्नायूंच्या दुर्बलतेंत किंवा प्रसंगीं वेडाच्या लहरींतहि उतरल्याचीं उदाहरणें जगाच्या इतिहासात कांहीं थोडथोडकी नाहींत ! आतां सद्गुरूचीच कृपा लाधलेल्या आणि त्याच्या शिकवणुकीनें सज्ञान होऊन एकांतीं ध्यानमग्न होऊन योगसिद्धि जोडूं पहाणाऱ्या पवित्र महाभागांची गोष्ट वेगळी ! पण या गोष्टी सामान्य जनांच्या आवाक्याबाहेरच्या आणि म्हणूनच अपवादभूत समजतात.

वाचनाच्या अतिरेकापासून व जनजीवनाशीं झालेल्या ताटातुटीपासून उद्भवणारी मनाची उदासीनता घालवण्याकरिता अशा इसमांना ओघानेच लेखनाची कास धरल्याशिवाय मुळीं तरणोपाय नसतो. प्रत्यक्ष लोकांशीं बोलून मिसळून जरी आनंद चाखता आला नाहीं, तरी त्याच्याशीं आपण निर्माण केलेल्या वाङ्मयाच्या द्वारा अप्रत्यक्ष बोल बोलून तो चाखावा म्हणून ते बिचारे उतावीळ असतात ! प्रथम आपल्या आणि अनुषंगानें इतरांच्या आनंदाकरिता लिहिणाराची उदासीनता त्या लिखाणांतील सौंदर्या-मुळें व प्रसादामुळे कांही प्रमाणात लोपून जाते. परंतु लेखनक्रम संपून नित्यक्रमाच्या अबोल्या वस्तुसृष्टींत ते येतांच ती उदासीनता पुनः वर डोकें काढून बाधक होते. म्हणून व्यावहारिक दृष्ट्या माणसाचे तीन स्थूल प्रकार करिता येतील :—

(१) संसाराच्या व्यवहाराविषयीं उदासीन असून वाङ्मयानंदांत मन-सोक्त रमणारे भक्तियोगी जन. कारण अशा इसमांच्या हातून संसारांतील सारे व्यवहार व उद्योग आस्थेनें होत नसतात.

(२) केवळ अध्यात्मज्ञानामागें म्हणजे ब्रह्मज्ञानामागें जे लागतात ते ज्ञानयोगी. ते संसारांत बहुधा चिकटत नाहींत ! आणि

(३) संसाराचा गाडा जे साक्षेपानें नीट चालवितात ते कर्मयोगी.

रॉबर्ट बर्टनकृत 'The Anatomy of Melancholy' (मानसिक उदासीनतेचें विच्छेदन) या जुन्या ग्रंथांतून उदासीनतेसंबंधीं खालील

माहिती त्रोटकपणें घेतली आहे :—

ग्रीसच्या इतिहासांत अशा एका एकांतमग्न वेड्या तत्त्वज्ञाची एक चिन्तनीय गोष्ट नमूद केली आहे.

हिप्पोक्रेटस नामक शूर सरदार कांहीं प्रमुख मंडळीसहित जेव्हां डिमोक्रिटस नांवाच्या प्रसिद्ध तत्त्वज्ञाला भेटण्यास गेला तेव्हां स्वारी एका झाडाखालीं वाचनमग्न स्थितींत पहुडलेली दिसली ! काही वेळ वाचावयाचें, काही वेळ इकडे तिकडे फिरावयाचें आणि मधून मधून लेखन करावयाचें असा डिमोक्रिटसचा क्रम दिसला ! सांगण्याचा आशय हा कीं, वरकरणीं लोकांनीं 'वेडा' म्हणून संबोधिलेला हा इसम 'प्रतिमे'पासून जाणवणारी उदासीनता आणि वेडाची लहर यांच्या निदानांची गुंफण आपल्या हस्तलिखितांत करीत असलेला आढळला ! पण आश्चर्याची गोष्ट तर यापुढेंच आहे. ती ही कीं, त्याच्या जवळपास नुकतेच अवयववार पृथक् विच्छेदन केलेल्या कित्येक जनावरांचे कापलेले अवयवांचे भाग पडलेले होते ! हें असें का म्हणून हिप्पोक्रेटसनें विचारता डिमोक्रिटसनें उत्तर दिलें तें असें :—

"माणसाच्या मनोभूमींत प्रतिभा, उदासीनता व वेड यांचा उगम कसा व कोठून होतो हें निश्चितपणें अजमावण्याकरितां मी निरनिराळ्या प्राण्यांचे हे मुडदे कापून त्यांच्या अवयवांचें विच्छेदन करीत आहें ! आणि त्यांच्यापैकीं एकमेकांना जोडणाऱ्या दुव्यांचें व ग्रंथींचें मी कसोशीनें सूक्ष्म अवलोकन चालविलें आहे."

डिमोक्रिटसचें पूर्वाश्रमींचें प्रखर पाडित्य ज्यांना ठाऊक होतें अशी कांहीं त्याची लोभी मंडळी त्यावर त्याला वेड लागलें असें समजून करुणेनें स्फुंदून रडूं लागली अशी आख्यायिका आहे. पण पुढें या मानलेल्या वेड्याची मानवी जीवनाच्या अंतिम हेतूच्या इत्यर्थाविषयीं हिप्पोक्रिटसशीं झालेली उद्बोधक मुलाखत ऐकून आणि तींतील निरुत्तर करणारे वैदग्ध्यपूर्ण कोटिक्रम पाहून या कनवाळू मित्रमंडळीला उपरति झाली. आणि डिमोक्रिटस वेडा कीं त्याला तसें नांव देणारे स्वतः आपण वेडे, याविषयींच त्यांना भ्रांत पडून ते अधिक शहाणे होत्साते परतल्याची गोष्ट बर्टनच्या ग्रंथांत सविस्तर संभाषणाच्या मिषानें सांगितली आहे. ती फार मननीय

असल्यामुळें साधल्यास जिज्ञासूंनीं मुळांतच वाचून पहावी. विस्तारभयास्तव तिचा वर सारांश सांगितला आहे.

वाङ्मयाच्या दालनांत अत्यंत उत्सुकतेनें रमणाऱ्या माणसाचें 'वाचन' हें जर इतर व्यसनांप्रमाणेंच एक अंगभूत व्यसन मानलें तर या व्यसनाचीं व विशेषतः त्याच्या अतिरेकापासून उद्भवणाऱ्या उदासीनतेचीं मूळ कारणें कोणतीं याविषयीं येथें थोडक्यांत ऊहापोह करूं.

काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर हे सहा प्रधान विकारच या उदासीनतेच्या बुडाशीं आहेत ही गीतेची शिकवण सर्वमान्य आहे. तिचीच व्यावहारिक दृष्ट्या थोडीशी अधिक फोड करूं.

वाङ्मयव्यसनी माणसाच्या औदासीन्याचीं कांहीं कारणें :—

(१) इच्छा, आकांक्षा, महत्त्वाकांक्षा, स्तुतिप्रियता, इत्यादि अनिर्बंध विकार.

(२) वाङ्मयाच्या अभ्यासांत अतिरेकानें गढून जाण्याची संवय. जगाच्या व्यवहारांना पूर्णपणें पारखा होऊन किंबहुना त्यांच्याकडे जाणून-बुजून डोळेझांक करून वाचनाच्या व्यसनांत आसक्त झालेला जन अर्थात् जगाच्या व्यवहारांत निकामी ठरतो. पूर्वोक्त बर्टन म्हणतो :—

"असे जन अट्टाहासानें दुसऱ्यांना लीलेनें शहाणपणा शिकविण्याचा आव आणतील; पण ते एकदा बाजाराचें तोंड तर पाहूं द्यात म्हणजे एखादा कसबी (!) व्यापारी त्यांच्या भोळेपणाचा व व्यावहारिक अज्ञानाचा फायदा घेऊन त्यांस खास फसवायचा ! ते भाषणांत रसिक व लेखनांत पंडित तर खरेच; पण बहुधा ते नित्यक्रमांत इतके अविवेकी, फिरून असंयमी व मनाचा तोल सुटलेले आढळावयाचे कीं, सर्वसाधारण लोकांशीं औपचारिक सौजन्यानें कसें वागावें याचा नुसता विचारहि त्यांच्या मनाला शिवत नसतो ! म्हणून ते आपली संसारयात्राच नीट चालवूं शकत नसल्यास त्यांत नवल कसलें ? मग त्यांच्यापासून जनजीवनाशीं हरघडी संबंध येणाऱ्या सार्वजनिक कार्यक्रमाची अपेक्षा कोणी करण्याची गोष्ट देखील दूरच !"

(३) एकांतप्रियत्वाची कमालीची आवड.

उदासीनतेपासून एकातप्रियता प्रसवते, किंवा एकांतप्रियतेच्या पोटीं उदासीनतेचा जन्म होतो या कोड्याचा उलगडा करणें अमळ नाजूकच. वास्तविक हे दोनहि मनोधर्म एकमेकाना पूरक किंवा प्रतियोगी आहेत. तथापि एकातप्रियत्वामुळेंच माणूस उदासीन होतो असें सामान्यपणें म्हणतां येईल. एकांतप्रिय जन उत्तरोत्तर माणसाच्या सहवासाला कंटाळतो आणि अशा रीतीनें जिभेनें बोलण्याचे प्रसंग तो आरंभीं अहेतुकपणें आणि पुढें निर्धावून टाळीत असल्यामुळें वापर न केल्यामुळें जसें हत्यार गंजतें, तसेंच संभाषणप्रसंगाच्या अभावामुळें किंवा अनास्थेमुळें चारचौघांतील संभाषणांत त्यांची जीभ लुली पडते; पण तिचा भरपूर वचपा तो लेखणीचा आश्रय करून काढूं शकतो. बर्टन म्हणतो— "आपल्या मनातील बोल बोलींत उमटविण्यापेक्षा लेखनांत प्रतिबिंबित करणें अशा लोकांना अधिक आवडतें व मानवतें. विचारतंद्रींत गढून जाऊन उद्यानराजींत उगाच एकाकी फिरणें, नदीच्या किंवा समुद्राच्या कांठीं चिंतामूढ होऊन अहेतुकपणे सारखें फिरत रहाणें किंवा झाडाच्या सावलींत बसणें अशा व्यापारात ते सदा मग्न असावयाचे ! कारण त्यांचा अजून जगाशीं संबंध न आल्यामुळें हलुवार बनलेल्या त्याच्या मनानें असें घेतलेलें असतें कीं, आपल्या अंगच्या सद्गुणांचें कौतुक करण्याऐवजीं अरसिक जनता आपली निष्कारण कुटाळकी करून सदभिरुचींत बिघाड मात्र आणील ! म्हणून कल्पित जनलज्जेनें ते होतां होईल तों इतरांचा सहवासच टाळीत असतात !"

रे. जॉन टॉड् ह्या नावाचा अमेरिकन मिशनरी "Student's Manual" नामक आपल्या ग्रंथात म्हणतो :—

"स्वतःच्या मनाचा संयम राखण्याचा प्रत्येकानें कसोशीनें प्रयत्न करावा. पूर्णपणें आत्मसंतुष्ट रहाण्याचा सतत प्रयत्न करून मनांत मोठमोठ्या काल्पनिक मनोरथांचे मनोरे न उठतील याविषयीं त्यानें जागरूकपणें जपावें...

"इतर कोणत्याहि गोष्टीप्रमाणें वाचनाभ्यासाचा अगर परिशीलनाचा हिशेबाबाहेर अतिरेक झाला आणि शरीरांतील इंद्रियांच्या श्रमक्षमतेचा बंध एकदांचा सुटला म्हणजे स्नायूंत हटकून बिघाड होतो. आणि त्यांच्या

दौर्बल्यामुळें माणूस क्रमेण अशक्त, चिडखोर व आळ्यताखोर बनूं लागतो.

"एरवीं रसिक व बहुश्रुत असलेला गोल्ड्स्मिथ कवि त्याच्या फुरसतीच्या समयीं कुढा व चिडखोर असल्याचें सांगतात! याचें कारण, आपलें सारें लालित्य, ममत्व व प्रेम त्यानें आपल्या लिखाणांत ओतल्यामुळें तो सदा पराकाष्ठेचा दमलेला असे. एकूण कल्पित सृष्टींत म्हणजे काव्य-कादंबरीसारख्या ललित कृतींत आपल्या साऱ्या सद्‌गुणाचा संपूर्ण व्यय करून मोकळा झालेला हा अग्रगण्य कवि जेव्हां प्रत्यक्ष वस्तुसृष्टींत अवतरला, तेव्हां स्वतः तुष्ट होण्याकरिता आणि दुसऱ्यांना आनंदी करण्याकरितां त्याच्यापाशीं कसल्याहि साधनांची सामुग्री शिल्लक राहिली नाहीं! म्हणून जो लेखक आपल्या लिखाणांत विलक्षण माधुरी प्रसवतो आणि घराबाहेर पडल्यावेळीं परक्यांशीं गोडीगुलाबीनें वागूं शकतो, तो आपल्या मनाशींच आंतल्या आंत एकसारखा कुढत असतो; आणि अभ्यासाच्या ओझ्याखालीं दडपला जाऊन विद्यांपासून होणाऱ्या वासनानंदाच्या मृगजलामागें लागता लागता शेवटीं मेटाकुटीस येऊन इहलोकींच्याच जीवनानंदास मुकून घरींदारीं व संभाषणप्रसंगीं चिडखोर बनत जातो!"

(४) विशिष्ट संवयीच्या प्रभावामुळें उद्भवणारे विचारतरंग.
राझी नावाचा अरब ग्रंथकार त्यांचे खालील तीन प्रकार करतो :—

(अ) अहंकाराच्या अनित्य कल्पना व उडते मनोरथ;

(ब) माणसानें गुंगींत स्वतःशींच बोलण्याची संवय; व

(क) आपण ज्या विषयाचा विचार करतों किंवा बोलतों त्याप्रमाणें आचरण करण्याचा मनाचा निर्धार.

(५) दुःख. (६) आसक्ति. (७) स्पर्धा, द्वेष, सूडबुद्धि. (८) क्रोध. (९) असंतुष्टता, विवंचना व दुःखें. (१०) आत्मस्तुतीचा दुर्दम्य हव्यास, वृथा बडेजाव, गर्व, आनंदाचा अतिरेक, इत्यादि मानसिक विकार. (११) परतंत्रता. (१२) गरीबीचा संसार. (१३) सन्मित्रांचा अगर आप्तस्वकीयाचा मृत्यु, वियोग. (१४) सौंदर्याविषयीं वासनायुक्त लालसा. (१५) भावना प्रधान प्रेमाचा अभाव किंवा तें बळेंच मारलें असल्यास त्यामुळें होणारी विवेकबुद्धीच्या अणकुचिदार अंकुशाची तीक्ष्ण टोंचणी. इतकें मात्र खरें कीं,

कौटुंबिक व ईश्वरविषयक पवित्र प्रेमाचा जाणूनबुजून खून करणारा किंवा अज्ञानानें विश्वप्रेमाला पारखा झालेला इसम—मग तो निव्वळ शुद्ध वाङ्मयप्रेमी असो, किंवा लेखनप्रेमी असो—कटाक्षानें उदासीन व दुःखी-कष्टीच असावयाचा !

प्रकृतीचे सत्त्व-रज-तम असे त्रिविध भेद आहेत. पण वाङ्मयाच्या व्यसनाचे दोन प्रमुख भेद करतां येतील.

(१) सात्विक व (२) राजस. वाङ्मयप्रेमी माणसाच्या उदासीनतेच्या तोंडीं बहुधा राजस प्रवृत्तीच असते. कर्माविषयीं प्रेरणा व विलक्षण तळमळ व आकांक्षेविषयीं आसक्ति हे राजस प्रकृतीचे गुणधर्म असल्याचा गीतेचा सिद्धांत वर सांगितला. आणि वाङ्मयव्यसनी माणसांचे मनोधर्म राजस गुणधर्मांशीं कसे जुळतात याचें वर बऱ्याच विस्तारानें वर्णन केलें.

पण 'खाईन तर तुपाशीं नाहीं तर उपाशी' या म्हणीप्रमाणें पूर्वजन्मींचें पुण्यसंचित व सद्गुरूची कृपा यांच्या जोडीशिवाय जिवाचा उगाच त्रागा करून एकदम ब्रह्मज्ञानासारख्या गहन विषयाला हात घालणें मात्र माणसाच्या परिमित बुद्धीच्या क्षेत्राबाहेरचें आहे. कारण माणूस एकदम शिकत नसतो; तर तो अनुभवानें, ज्ञानानें व सखोल आत्मनिरीक्षणाने उत्तरोत्तर शिकत असतो.

राजस प्रकृतीचा वासनानंद ही पहिली पायरी मानली तर सात्त्विक प्रकृतीचा ब्रह्मानंद व उच्चतम ज्ञानानंद ही वरची श्रेष्ठ पायरी म्हणता येईल. तेव्हां ही वरची पायरी गांठण्यासाठीं एकदम उड्डाण न करितां थोड्या दमानें घेऊन क्रमेण पहिल्या पायरीवरून दुसऱ्या पायरीकडे जाण्यांत पदरीं हीनत्व येतें असें म्हणणें ठीक होणार नाही. आणि म्हणून प्रारंभी वाङ्मयवाचनानें शुद्ध वासनानंदाकरिता झटणारे इसम ज्ञानानंदाच्या पायरीला पुरते पारखे झाले असें विधान करणें चुकीचें होईल.

सर सी. व्ही. रामन् यांनीं मागें ता. २०-८-१९३४ रोजीं पुणें येथें वाडिया कॉलेजांत व्याख्यानांत सांगितलेलें खालील उदाहरण पहा :—

"कोणत्याहि ज्ञानाची आवड आपण करमणूक म्हणून केली तर त्यांत विशेष आयास न पडतां इष्ट तें प्रावीण्य व मोठेपणा मिळवितां येतील.

एकोणिसाव्या शतकांत हॅलॅम होल्ट नांवाच्या चिकित्सक प्रवृत्तीच्या गृहस्थानें प्रथम वैद्यकीचा अभ्यास केला. त्यांत त्याला तथ्य न वाटल्यानें त्यानें शरीरशास्त्राचा अभ्यास केला. त्या शास्त्रांत तो पहिला होता. पण पुढें त्यास असें वाटलें कीं, पदार्थविज्ञान शास्त्राच्या अभ्यासाशिवाय नुसता शरीरशास्त्राचा उपयोग तितकासा होत नाहीं; म्हणून त्यानें त्या शास्त्राचा अभ्यास केला व त्यात सुद्धां मोठी कीर्ति संपादन केली. पण पुढें गणिताच्या व भूमितीच्या ज्ञानाशिवाय पदार्थविज्ञानाचें संपूर्ण ज्ञान होत नाहीं म्हणून त्यानें गणित विषयाचा अभ्यास करून त्यांतहि प्रावीण्य मिळविलें. पण सर्व विद्यांत आध्यात्मिक तत्त्वज्ञानाशिवाय मनाला शांति व समाधान वाटणें शक्य नाहीं असें त्यास त्या विषयाच्या तज्ज्ञांनीं सांगितल्यामुळें म्हातारपणीं तत्त्वज्ञानाचा अभ्यास पूर्ण करून तत्त्ववेत्ता म्हणून तो मेला! वरील सर्व शास्त्रांत तो इतका पारंगत होता कीं त्याच्याइतका अष्टपैलू व चतुरस्त्र विद्वान् तेव्हां कोणीहि नव्हता असें म्हणतात! त्याच्या यशाचें रहस्य हेंच कीं, ज्ञान हें त्राग्याकरितां किंवा कष्टाकरितां नसून करमणुकीसाठीं आणि जीवनानंदासाठीं होय असें तो समजून प्रत्येक विद्या हस्तगत करतांना तसा वागल्यामुळें त्यास विविध शास्त्रांतील एवढा मोठेपणा प्राप्त झाला!"

होल्टनें आरंभींच एकदम तत्त्वज्ञानाचा पिच्छा पुरविला असता तर आयुष्यांतील दीर्घ व पक्क अनुभवांच्या अभावीं तो मुळीं परिणतप्रज्ञ तत्त्वज्ञ झाला असता किंवा नाहीं याचीच शंका वाटते! कारण पूर्वाश्रमींच्या वैद्यकी, शरीरशास्त्र, पदार्थविज्ञानशास्त्र, गणितशास्त्र व शेवटीं तत्त्वज्ञान अशा चढत्या क्रमानें त्यानें राजस व सात्त्विक प्रवृत्तीच्या पायऱ्या धीमे धीमे चढून जाण्यांत आपलें आयुष्य घालविलें. एकदम वरची पायरी गांठण्याची प्रबळ महत्त्वाकांक्षा मनांत न बाळगल्यामुळें तो प्रत्येक विद्येंत यशस्वी झाला आणि शेवटीं उच्चतम अध्यात्मविद्येची गोडी चाखून आत्मज्ञानानें समाधान पावलेल्या स्थितींत निश्चिंतपणें मरण्याचें भाग्य त्याला लाभलें. अध्यात्मविद्या चाखण्यापूर्वी इतर विद्या शिकतांना त्याच्या प्रकृतीचा कांटा राजस गुणधर्माकडे झुकत होता. पण त्याचें अंतिम झुकणे तत्त्वज्ञानरूपी सात्विक विद्येच्या दिशेनेंच चाललें होतें हें उघड होय.

म्हणून राजस विद्यासंबंधीं त्यानें पूर्वाश्रमांत दाखविलेली वासनेची तळमळ तितकीशी सदोष म्हणतां येणार नाहीं.

पण कोणत्याहि विषयाच्या अतिरेकी मोहानें धुंद होऊन संयम तुटल्या-मुळें मनाचीच एकसारखी जोपासना करतांना इंद्रियांची व देहधर्मांची जर आम्ही आबाळ करूं तर इंद्रियें मनावर व देहावर तुटून पडून त्यांचा पुरेपूर सूड घेतल्यावांचून रहाणार नाहींत. म्हणून लार्ड डर्बी कांहीशा विनोदानें म्हणतो :—

"ज्याला पुरेसा व्यायाम घेण्यास सवड काढता येत नाहीं त्याला पुढेंमागें आजारी पडण्यास भरपूर सवड सापडणार म्हणून खास समजावें !"

---

# मानवी मनाचे दोन प्रधान दृष्टिकोन

शुद्ध वाङ्मयचर्चेत मानवी मनाच्या व्याख्येसारखे सोंवळे विषय आलेले पाहून कोणी विचारतील कीं वाङ्मयाचें हें तट्टू मानसशास्त्राच्या व तत्त्वशास्त्राच्या संगमांत बुडविण्यांत हेतु काय ! म्हणून प्रारंभींच असें एक रूपक कल्पितां येण्यासारखें आहे कीं, तान्ह्या मुलाच्या चिमुकल्या रूपानें माणसाला जन्माला घालताना तर्क व भावना या द्विविध कुंभांपैकीं कोणत्या तरी एका कुंभांतील मादक पेयाच्या इवल्याशा घुटकानें परमेश्वर त्याला पाजतो. या क्रियेलाच ईश्वरी चिच्छक्तीच्या प्रेरणेनें अनेक पूर्वजन्मांच्या संस्कारांनीं उत्पन्न होणारी बालमनाची उपजत अंतःप्रेरणा म्हणू.

प्रत्येक माणूस आपल्या जन्मप्रसंगीं तर्काधीन अगर भावनाधीन विशिष्ट मनोधर्म अंतरंगात बाळगूनच बाहेर पडतो. आतां याचा अर्थ असा नव्हे कीं, कित्येक इसम शंभर टक्के तर्कप्रधान होऊन तर इतर कित्येक तितकेच भावनाप्रधान होऊन जन्म घेतात; पण यांतील सूक्ष्मार्थ घेण्याचा तो इतकाच कीं, या दोन प्रधान गुणधर्मांपैकीं शेंकडा निदान पाउणशे टक्के तरी ज्यांच्या गुणधर्मांची सरशी आहे त्याच गुणधर्मांच्या मालकाला त्या त्या गुणधर्मांचा मक्ता व विशेषणें लागू पडतात. भावना व तर्क यांच्यावर आधारलेल्या या द्विविध मनोधर्मांना भावनाप्रधान व तर्कप्रधान किंवा कर्तृनिष्ठ व वस्तुनिष्ठ असे पर्याय सुचवितां येतील. आंग्ल तत्त्वशास्त्रांत यांना अनुक्रमें Subjective व Objective किंवा Platonist व Aristotelian अशींहि नांवें देण्याचा परिपाठ आहे. म्हणून प्लेटो

व ॲरिस्टॉटल या विभिन्न मनोधर्मांच्या तत्त्वज्ञांच्या विचारसरणीचा येथें ओझरता उल्लेख करूं.

**प्लेटोची विचारसरणी.** प्लेटोची विचारसरणी म्हणजे सॉक्रेटीसच्या विचारसरणीचीच पुढची पायरी होय. सॉक्रेटीसच्या मतें विश्वबंधुत्वाचीं मूलतत्त्वें ज्ञानांत परिसमाप्त होतात. केवळ व्यवहारकुशलतेच्या सुरुंगानें वाटेल त्या कठिण तत्त्वाचा खडक फोडता येतो या कल्पनेला प्रथम कोणी जोराचा शह दिला असेल तर तो सॉक्रेटीसनेंच. त्याच्या अभिप्रायाप्रमाणें काहीं विशिष्ट मनोभूमिकाच्या आंदोलनाना अनुसरून माणसाची जीवित-नौका आपोआप पुढें पुढें रेटली जाते. या आंदोलनाना वेळींच नीट ओळखून त्यांची सुसंगति लावणें म्हणजे जीवितांतील सत्य, सौजन्य व सौंदर्य याचा पडताळा पहाणें होय. या तत्त्वांवर ज्या प्रमाणात माणसाची भक्ति व आवरण्याची युक्ति असतील त्या प्रमाणांत त्याला आपल्या इच्छाशक्तीला बाधेसूदपणा, सुंदर मिलाफ व यथार्थता यांची प्रमाणबद्ध जोड देता येईल. परंतु सॉक्रेटीसची ही विचारसरणी अमूर्त स्थितींत होती; त्यानें तिचा सत्यसृष्टीत फारसा उपयोग केला नाहीं. पण प्लेटोनें सॉक्रेटीसच्या या विचारसरणीची चढती कमान रचून तिच्या कल्पित विचारतंद्रींतून प्रत्यक्ष सत्यसृष्टींत सरसहा उपयोग करण्याची प्रथा रूढ केली. मानवी मनाच्या या विशिष्ट आंदोलनावर मदार ठेवून आपले विशिष्ट पूर्वग्रह, मनाच्या अढी व अंगभूत दृष्टिकोन याच्या संयुक्त प्रेरणेप्रमाणें एक मनोमय अत्यंत उज्ज्वल आवरण निर्माण करून, त्याच्या झगझगीत प्रकाशांत जगातील साऱ्या घडामोडी पहाणाऱ्या व त्याचें स्वरूप—जसें तें वास्तविक असतें तसें नव्हे, तर आपल्या विशिष्ट मनोधर्मा-प्रमाणें—मानणें या ध्येयनिष्ठ किंबहुना ध्येयचिंतनांत मनसोक्त डुंबून रमणाऱ्या मनाच्या अंतर्मुख प्रवृत्तीला कर्तृनिष्ठ किंवा भावनाप्रधान दृष्टि म्हणतां येईल. प्रस्तुत प्रकरणीं प्लेटोची विचारसरणी ती हीच.

**ॲरिस्टॉटलची विचारसरणी.** ही विचारसरणी प्लेटोच्या विचार-सरणीच्या उलट व प्रतियोगी आहे. विश्वांत जी चराचर सृष्टि नांदत आहे आणि त्यांत हरघडी ज्या अनेक घटना घडत आहेत त्यांच्याविषयीं, त्या

जशा वास्तविक आहेत तशा रीतीनें, आपल्या अंगींचे पूर्वग्रह व मनाच्या विशिष्ट संवेदना शक्य तितक्या आवरून धरून व बाजूस सारून, आपल्या भूमिकेंत त्याना आत्मसात् न करता, उलट त्यांच्याच भूमिकेंत आपण तत्सम होऊन, जी मनाची प्रवृत्ति जगातील साऱ्या घडामोडींचें संथपणानें चिंतन करून पृथक्करणानें सिद्धांत पाडते, तिला ॲरिस्टॉटलची वस्तुनिष्ठ किंवा तर्कप्रधान दृष्टि असें संबोधतात.

भावनाप्रधान दृष्टि आपल्या मनाच्या विशिष्ट आवडीनिवडीप्रमाणें जगांतील व्यक्तींकडे व त्याच्या कृतींकडे पहाते. ती 'अ'नें एखादें कृत्य कोणत्या परिस्थितींत व मन:स्थितींत कसें केलें याचा मूलग्राही विचार करण्याच्या भरीस फारशी न पडता, तें कृत्य आपण कसें काय केलें असतें व आपणास तें कसें काय मानवलें व आवडलें असतें या चिंतनातच सदा गुंग असते व अशा इष्ट आणि सुंदर मनोरथावर सारखे मनोरथ् रचीत सुटते.

तर्कप्रधान दृष्टि नेमकी याच्या उलट असते. तर्काला भावनाप्राधान्या-ऐवजीं बुद्धिविलास अत्यंत प्रिय असल्याकारणानें 'अ'नें तें कृत्य कोणत्या विशिष्ट मन:स्थितींत केलें याविषयीं 'अ'च्या मनाच्या पातळीवर उतरून त्याप्रमाणें सूक्ष्म तर्कबुद्धीला प्राधान्य देऊन आणि आपल्या आवडत्या भावनाना व प्रिय कल्पनाना पूर्णपणें बाजूस सारून ती वाट काढते आणि एकामागें एक अशा रीतीनें गूढ कुव्याचा उलगडा करूं लागते.

पाश्चात्य तत्त्वशास्त्रात भावनाप्रधान मनोवृत्तीची व्याख्या खालीलप्रमाणें करण्यांत आली आहे :—

अनुभवाच्या नुसत्या मनोमय कल्पनावर भाळून व त्याच्यावर मदार ठेवून त्याचें जाळें विणणारी मुग्ध मनोवृत्ति भावनाप्रधान दृष्टींत मोडते. या विचारसरणीचा उगम असा कीं, कोणताहि आध्यात्मिक चमत्कार घ्या, त्याचें संपूर्ण आकलन व्हावयाचें असेल तर पंचेंद्रियाच्या व्यापारांसवेंच मनाचे संमिश्र भाव-विभावहि तेथें उमटलेच पाहिजेत.

या विचारसरणीशीं प्रतियोगी असणारी मनोवृत्ति तर्कप्रधान होय. बाह्य जगात हरघडी संभवणाऱ्या घडामोडींना वास्तविकता किंवा यथार्थता याचान्न मुख्यतः मूलाधार आहे हें तत्त्व या विचारसरणींत अडकलेलें आहे.

या द्विविध मनोवृत्तींना अनुक्रमें

| | |
|---|---|
| (१) कल्पित | प्रत्यक्ष |
| (२) अंतर्मुख | बहिर्मुख |
| (३) तात्त्विक | व्यवहार्य |
| (४) आध्यात्मिक | आधिभौतिक |
| (५) सापेक्ष | निरपेक्ष |

इत्यादि व्याख्या योजतात. पण त्या त्या विषयांनुरूप त्यांचा संदर्भ निराळ्या अर्थानें घ्यावा लागतो. प्रस्तुत प्रकरणीं आम्हांला वाङ्मयदृष्ट्या या विचार-सरणीचें विवेचन कर्तव्य आहे हें वाचकाच्या लक्षांत येईलच.

समजा 'अ'नें एक भूत कीं कायशी अद्भुत आकृति पाहिली. येथें विचार करण्याचा प्रश्न हा कीं, ही आकृति खरोखर सावयव होती कीं ती 'अ'च्या मनाचीच अद्भुत विकृति होती? पहिली गोष्ट खरी असल्यास त्याची बुद्धि तर्कनिष्ठ म्हणतां येईल. पण तेथें खरोखर कसलीहि आकृति मुळीं नसून त्याच्या अद्भुत कल्पनेनेंच तिची बळेंच प्रतिष्ठापना केलेली असल्यास तत्त्वशास्त्राच्या भूमिकेप्रमाणें त्याच्या मनोरथाची अनिवार धांव भावनेच्या प्रातात शिरली असें निश्चितपणें सागतां येईल.

आतां भावनाप्राधान्याचाच अतिरेक झाल्यास मनाच्या व्यापारांवर आधिपत्य गाजविण्यास समर्थ असणारी तर्कबुद्धि नावाची प्रवृत्ति आहे याचाच मुळीं माणसाला विसर पडतो! असा इसम एखादे वेळीं अशीहि कल्पना करावयाचा कीं, बाह्य जगांतील साऱ्या वस्तू यापुढेंहि असतील व टिकतील किंवा नसतील व न टिकतील; आपल्याला कांहीं या उठाठेवीशीं कर्तव्य नाहीं. आपल्या मनाच्या विशिष्ट संवेदना व सुंदर सुंदर मनोरथ यांचाच मुख्यतः विचार करून व त्यांतच यथेच्छ डुंबून लीलेनें विहार करूं, म्हणजे झालें!

पण इतक्या थरास न जातां विशुद्ध भावना जेव्हां सर्वसाधारण मध्यम पातळींत असते तेव्हां तिची इतकीच व्याख्या अभिप्रेत असते कीं, एकंदर जीवितातील अनुभवाच्या मधुसंचयांत मनाचा जो व जितका वांटा असतो त्यालाच विशेष प्राधान्य देऊन व त्यावरच सारी भिस्त ठेवून जी अंतः-

करणाची मूलभूत प्रवृत्ति गूढ आत्मचिंतनांतच सदा रमत असते, ती भावना.

म्हणून तर्क व भावना यांपैकीं भावनेवर तर्काची सहजच सरशी होते हें वरील विवेचनावरून लक्षांत येईल. तथापि तर्काच्या शुभ्र परीटघडी उपरण्याला भावनेची बारीक रंगीत किनार खुलूनच दिसते ! प्रसिद्ध जर्मन तत्त्वज्ञ कॅंट म्हणतो :—"Perception without conception is blind; conception without perception is empty." (अर्थः—भावनेविना केवळ ग्रहणशक्ति जशी आंधळी त्याचप्रमाणें ग्रहणशक्तीविना नुसती भावनेची संवेदना पोकळच होय !)

प्रतिभा (प्रखर बुद्धिवैभव) व भावना यांच्यामध्येंहि वरील दोन मनोवृत्तींत असलेल्या वैषम्याप्रमाणें विरोधच मानतात. कारण कांहीं पंडितांच्या मताप्रमाणें प्रतिभेची दृष्टि व सृष्टि भावनाप्रधान मनोधर्मांत न होतां तर्कप्रधान मनोधर्मांतच होते. दिव्य कल्पनाशक्तीचें लेणें असणाऱ्या महिलात बहुधा प्रतिभाशक्तीचा अभाव मानतात. आता याला क्वचित् अपवाद असतील ही गोष्ट वेगळी; पण तेणेंकरून मूळ नियमाला तितकासा बाध येत नाहीं. या घटनेला एक प्रमुख कारण म्हणून असें सांगण्यांत येतें कीं, बहुतेक महिलांच्या मनोधर्मांत तर्काच्या ऐवजीं भावनेचेंच माहेरघर आढळावयाचें ! हरएक व्यक्तीकडे व त्याच्यामागील घटनेकडे त्या स्वत्वप्रधान विशिष्ट दृष्टिकोनाच्या रंगीत चष्म्यांतून पहात असतात आणि वैयक्तिक आवडीनिवडींचें साधन म्हणून त्या घटनांना समजतात. पण याच्या उलट वस्तू व घटना, त्या जशा आहेत तशा, भावनेच्या रंगीत चष्म्यांतून पहाण्याचें कटाक्षानें टाळून तर्काच्या सूक्ष्मदर्शक यंत्रांतून जी बारकाईनें न्याहाळते व सिद्धांत रचिते, तिचें नांव 'प्रतिभा' असें जर्मन तत्त्वज्ञ शॉपेनहार व गटे यांचा खंडित अभिप्राय आहे. शॉपेनहार तर प्रतिभेची सुटसुटीत व्याख्या अशी करतोः—"तिलाच 'प्रतिभा' म्हणतां येईल कीं जी आपले पूर्वग्रह, आशा-आकांक्षा व जीवितध्येयें पूर्णपणें दृष्टीआड करून आणि कांही कालपावेतों स्वत्वविस्मृतीहि पतकरून बाहेरील पदार्थ जसे दिसतात तसे अत्यंत सूक्ष्मपणें पहाते व नीट पडताळते."

थोडक्यांत प्रतिभेचा प्रभाव ओळखण्याचें प्रमुख गमक हें कीं, प्रतिभा-

वंतांच्या कल्पनांवर व बुद्धिविलासावर तर्कशक्तीचें प्राबल्य स्पष्टपणें दृष्टीस पडतें. प्रतिभाहीनांच्या ठायीं रम्य आशा-आकांक्षांवर आरूढ झालेल्या सुखस्वप्नांचें व दीर्घ मनोरथांचेंच प्राबल्य असल्यामुळें त्यांच्या खास आवडीनिवडीच्या मनोमय शांति-पुष्टि-तुष्टीवरच त्याची सारी मदार असते. परंतु कल्पनांचें हें मोहक वातावरण मन दृढ करून बाजूस सारल्यास तर्काच्या प्रभावमात्रेंकरून बुद्धि आपलें प्रखर तेज दाखवूं शकते आणि घनदाट मेघसमूहांतून जसे तळपते सूर्यकिरण उज्ज्वल प्रकाश पाडतात, त्याप्रमाणें भावनांच्या मोहमय विकारांतून प्रखर तर्क आपला मार्ग ओजस्वितेनें काटीत जातो आणि अनुषंगानें खोल विचारहि सुचवितो.

भावनाप्रधान व तर्कप्रधान अशा प्रतियोगी दृष्टिकोनांतील पृथगात्मतेचा हा फरक तत्त्वज्ञान व कला यांत व्यक्त झाल्याविना रहात नाहीं.

वास्तववादी भौतिकशास्त्रज्ञ निसर्गांतील अणुरेणूपासून आपल्या चिकित्सेला प्रारंभ करितो आणि अंतिम सत्तत्वाकडे कधींहि काणाडोळा न करितां आपल्या सिद्धांताच्या विशदीकरणाच्या अत्यंत उज्ज्वल प्रसंगीं देखील आपण ज्या तत्त्वाचा प्रथम पुरस्कार केला, त्याच्यापासून आपण सांगावयाचें प्रयोजन रतिमात्रहि ढळणार नाहीं याविषयीं नेहमीं जागरूक असतो.

उलटपक्षीं एखादा कल्पनावादी कवि किंवा कादंबरीकार एखादी रमणीय कल्पना उराशीं बाळगून विश्वांत ज्या असंख्य घडामोडी नित्यशः आढळतात त्याच्यापासून मानवी जीविताविषयक गूढ व अतर्क्य प्रेमाचे पडसाद ऐकण्याची कसोशीनें तयारी करतो. शास्त्र व विज्ञान यांच्या अमूप वाढीकडे किंचित् लक्ष पुरविलें किंवा जगांतील अत्यंत श्रेष्ठ दर्जाच्या विविध कलाकृति पाहिल्या तर असें सिद्ध करतां येईल कीं, अशा कृतींची परिणति त्यांच्या उपासकांच्या अगर निर्मात्याच्या वस्तुनिष्ठ मनोधर्मांतच झालेली आहे. कारण भावनाप्रधान मनाचा दिखाऊ भपका खूपच असला तरी, तें आपल्या अद्‌भुत ध्येयवर्तुलाच्या चिंतनातच सदा गुंगलेलें असावयाचें ! तर चिकित्साप्रधान मन काल्पनिक उच्च ध्येयाच्या मृगजलामागें न लागतां, आपणास हाताळतां येणाऱ्या वस्तुसृष्टींत किंबहुना सत्यसृष्टींत वावरून भावनाप्रधान मनाच्या कृतींपेक्षां अधिक भरदार व चिरस्थायी कलाकृति निर्माण करूं शकतें.

पाश्चात्य तत्त्वज्ञाच्या मते भावनाप्रधान (Subjective) व तर्कप्रधान (Objective) हे विरुद्ध व प्रतियोगी विचारप्रणालींचे सापेक्ष व निरपेक्ष असे शेवटचे बिंदूच होत. म्हणून या दोन विभिन्न मनोधर्मांच्या परस्परसंघातात तत्त्वज्ञान, नीति व कला यांच्यामध्यें तुमुल रणें माजलेलीं आढळतात!

यांच्यापैकीं नीतीचीच गोष्ट घ्या ना. भावनाप्रधान वृत्तीचे लोक मानवी स्वभावधर्मांच्या सहानुभवी तारेत मधुर अनुरणन घडवून आणण्याऐवजीं मानवी गुणधर्मांच्या कक्षेबाहेर असणाऱ्या वातावरणांत उच्चतम नीतितत्त्वांचा शोध करीत वणवण हिंडतात. मानवी आदिप्रेरणा व आशा-आकांक्षा निर्दयपणें दडपून टाकून अतिमानुष व ध्येयनिष्ठ असे अत्युच्च आदर्श गाठण्याकडे त्यांची सारी धडपड चाललेली आढळते.

तात्पर्य, बाहेरून म्हणजे बहिर्मुख आकांक्षापासून ते घेत रचूं पहातात; दृष्टि अन्तर्मुख करून आपल्या अंतःकरणापासून कल्पनांची समृद्धि करूं पहात नाहींत! आपल्या मनाच्या प्रेरणेप्रमाणें, किंबहुना वरच्या विशिष्ट वातावरणांत वावरणाऱ्या अमूर्त आदेशाला निमूटपणें मान तुकवून ते असा एक मनोमय सुंदर ध्येयाचा साठा करितात कीं, त्यात ते साऱ्या विश्वाची आदिप्रेरणा व धडपड बळेंच कोंबून विलीन करूं पहातात!

आता ध्येयभूत प्रगतिविषयक अंतःप्रेरणा या भावनाप्रधान प्रवृत्तीच्या पोटीं नसती तर ती केव्हाच कोलमडून पडती! परंतु अशा उच्च व अद्‌भुत प्रेरणेच्या अविरत चिन्तनाने लाभणाऱ्या राजस वासनानंदाची अवीट हुरहूर चाखता येत असल्यामुळें, कित्येक भोळे व भावनाप्रधान जीव नकळत मोहमायेनें अंध होऊन या दृष्टीच्या मोहक जाळ्यात जाऊन शिरतात! त्याचप्रमाणे काव्यप्रधान व राजस आतर तळमळ असलेले तरुणहि याच अद्‌भुत प्रांताकडे कौतुकानें कूच करतात. अशा तरुण कवींची दृष्टि माणसाला कवि कसा बनवितां येईल याच्या गोड चिंतनांतच रमते व दमते; पण खरा वरकवि कसा असावा या मौलिक प्रश्नाकडे ते दुर्लक्षच करतात!

जॉर्ज हेन्री लुईस नावाचा आंग्ल निबंधकार आपल्या गटेच्या चरित्रांत एतद्विषयीं खालील उद्गार काढतो:— "भावनाप्राधान्याच्या आहारीं जाणाऱ्या अशा वृत्तीच्या उतावीळ जनाना आत्यंतिक गुणवत्ता किंवा

कमालीची अवनति अशा दोन परस्परविरुद्ध टोंकांशीं असणाऱ्या प्रतियोगी द्वद्वांच्या रम्याद्भुत कल्पनाविलासाशिवाय मधल्या स्थितीची किंवा सुवर्ण-मध्याची नुसती अंधुक जाणीवहि असेल तर शपथ ! हे उद्दाम कवि आपले आदर्श नायक असे रंगवितील कीं, त्यांत मानवी स्खलनशीलतेचा एक तिळांशहि नांवाला सुद्धा आढणार नाहीं; त्यांचा खलपुरुष इतका अधो-गतीच्या गर्तेत लोटून दिलेला दुर्जन असावयाचा कीं, त्यांत सहानुभूतीनें म्हणून शोधूं जातां एखाद्या सद्‌गुणाचा अल्पांशहि दिसून येणार नाहीं !" प्रसिद्ध जर्मन कवि गटे हा तर्कप्रधान बुद्धीचा होता; कित्येक कवींप्रमाणें अत्यंत हळव्या व भावनाप्रधान वृत्तीचा नव्हता ! तो नेहमीं म्हणत असे कीं, "निसर्गाला पचनीं पाडून (म्हणजे भावनेनें आपण स्वतःच त्यांत विलीन होऊन नव्हे !) त्यातील कलाकृति रंगविण्याबरोबरच त्याचें अचूक विशदीकरण करण्यास जो असमर्थ ठरतो, तो कवि किंवा तत्त्वज्ञ या संज्ञेला पात्रच नव्हे !"

कलाकोविदाची ही गटेकृत व्याख्या लबॉकनें आपल्या 'Pleasures of Life' नामक ग्रंथात केलेल्या "The duty of Art should be to copy *as well as* interpret" (कलेचा हेतु अनुकरणप्रयत्वा-बरोबरच (कुशलतेनें) गूढार्थ-विशदीकरणाचाहि आहे) व्याख्येशीं बरीच जुळते. भावनेच्या मोहांत सदा गुंग असून उदासीनतेंत काळ कंठ-णाऱ्या मंदबुद्धीच्या जनाविषयीं गटेला तिटकारा वाटत असल्याचें सांग-तात. अशा प्रसंगीं तो नेहमीं म्हणे, "विषयचिंतनाकरिताच चिंतन असें मीं कधीं केलेंच नाहीं !" निसर्गाच्या अनेक अव्यक्त घटकात स्वतः आपलें व्यक्तिमत्व दडवणें व विलीन करणें हें अनिष्ट कार्य करण्याचें त्यानें कसोशीनें टाळलें होतें. त्याच त्याच तुटपुंज्या कल्पनांच्या विविध स्वरूपांच्या सांखळ्या करण्यांत कल्पनाशक्तीचा हेतु काय अशीहि तो पृच्छा करी. प्रत्यक्ष वस्तुसृष्टीचा भरभक्कम पाया नसेल तर सत्याची तितक्या प्रमाणांत आबाळच होईल असें तो प्रतिपादीत असे.

कांहीं नामधारी शास्त्रज्ञ कल्पनाशक्तीच्या जोरावर कित्येक कयास बांधूं पाहतात ! पण ते सत्याच्या प्रखर निकषापुढें हिणकसच ठरतात ! बीजगणि

तांत जसें त्याच त्या विशिष्ट संख्यांच्या (Identities) निरनिराळ्या अवय-वांच्या जोड्या (Different series of factors) काढितां येतात त्याचप्रमाणें एकाच कल्पनेने निरनिराळे साधे ते जोडतात. पण मौज ही कीं, ते अज्ञानानें या मनोव्यापारांतच आपल्या बुद्धीचा विलास व जीविताची इतिकर्तव्यता मानतात ! एखादा सिद्धांत आपल्या कल्पने-प्रमाणें मनांत गृहीत धरल्यानंतर आणि या कल्पनेपासून पुढें प्रसवणारे सिद्धात तर्कशुद्ध होत अशी आपली अटकळ बांधल्यानंतर, ज्या कल्पनेच्या पायावर ही इमारत रचली तो पाया वस्तुसत्याच्या मजबूत शिलांनीं बांधलेला आहे कीं केवळ कल्पनांच्या ढिसूळ मातीवर उभार-लेला आहे, या मूलभूत तत्त्वाचीच त्याना भ्रांत पडते ! म्हणून अशा मनो-वृत्तीचे इसम कवि असल्यास भावनेच्या जाळयांत सांपडतात आणि ते सत्यास पारखे झाल्यामुळें विवेकबुद्धीचा अंकुश त्याना नित्य टोंचीत असतो ! तरीहि ते त्याच्यापासून आळसामुळें योग्य तो बोध घेण्याचें टाळीत असल्यास नेहमीं निराशावादाचें भेसूर रडगाणें गात असलेले आढळतात. असले निराशावादी कवि जगाचें कोणतें हित साधणार बरें !

तात्पर्य, खऱ्या जिवंत प्रतिभेचें एक आद्य लक्षण म्हणून असे मागतात कीं, प्रतिभोपासकाची बुद्धि जशी कधींहि अत्यंत भावनाप्रधान नसावी पण तर्काच्या निकषावर तिजवर विविध पैलू तर पाडतां यावेत, त्याचप्रमाणें ती सनातन सत्याच्या उज्ज्वल प्रभेनें सदैव झगझगीत प्रकाश पाडणारी असावीच असावी. प्रतिभेच्या या व्याख्येंत रस्किन् व गटे या दोघां भिन्नदेशीय थोर तत्त्वज्ञांचें मतैक्यच आढळतें इतकें सांगितल्यावर तिच्या यथार्थतेविषयीं निराळें विवेचन करण्याचें कारण नाहीं.

मनाच्या दोन मूलभूत प्रवृत्तींचें त्रोटक पण तात्त्विक विवेचन वर केलें. परंतु त्या प्रवृत्तींच्या मागें असणाऱ्या भावना व तर्क किंवा मन व बुद्धि व त्यांचे व्यापार यांचें, अवश्य तेथें उदाहरणें देऊन विवेचन करून, तात्त्विक चर्चेच्या पायावर व्यवहार्य विवेचनाची इमारत कशी काय उभारतां येते याचा थोडक्यांत विचार करू. म्हणजे या विषयाचा रूक्षपणा बऱ्याच प्रमाणात कमी होईल.

भावना व तर्क हे दोन विरुद्ध दिशानीं वहाणाऱ्या विचारप्रवाहाच्या अंतिम टोकांवर असणारे जलबिंदु होत असें वर सागितलें. त्यांपैकीं कोणत्या विचारसरणीचा कसा उपयोग केल्यास वाङ्मयसेवकांना आणि तेथून त्यांनीं निर्माण केलेल्या वाङ्मयाला तो फलदायी होतो याची थोडीशी छाननी करणें युक्त होईल.

माणूस बालपणांत बहुधा भावनाप्रधानच असतो. पूर्वोक्त विवेचनांत सागितल्याप्रमाणें तो उपजतांच भावना किंवा तर्क या दोहोंपैकीं कोणत्या तरी एका गुणधर्माचाच अधिक प्रमाणांत अंतर्भाव अंगीं बाणवून घेत असला, तरी त्याच्या बालपणांत व तरुणपणात गृहस्थाश्रमाच्या विविध जबाबदाऱ्याच्या किंवा सुखदु:खाच्या प्रसंगाच्या अभावीं तर्कावर अधिक भिस्त ठेवून करण्यासारखीं कार्यें त्याच्यावर बहुधा मात करीत नसावीं. म्हणून 'रम्य बालपणा'त तर्काला तितपत वाव नसतो. बाल्यात व तारुण्यात शुद्ध भावनाचा पाट पाडून देणारे सुखदु:खाचे बरेवाईट प्रसंग थोडेसे येतच असतात. म्हणून त्याची संवेदना घेतां घेतां नकळत भावनेच्या प्रातांत तो शिरत असल्यास नवल नाहीं.

जगातील कटु व पोळणाऱ्या अनुभवाच्या आधाराविना उद्भवणारे हे भावनात्मक प्रसंग मोठे गोड व मनोरंजक असतात यात शंका नाहीं. पाश्चात्य वाङ्मय आत्मचरित्रानीं अत्यंत समृद्ध असल्यामुळें कित्येक थोर साहित्यसेवकानीं उतार वयात लिहिलेले आपल्या तरुणपणींचे असले भावनात्मक प्रसंग अत्यंत उद्‌बोधक झाले आहेत. गोल्डस्मिथ कविवर्यांनें रचिलेलें "The Deserted Village" (परित्यक्त ग्राम) नामक अंतर्मुख अजरामर काव्य म्हणजे त्याच्या बाल्यांतील भावनात्मक संवेदनाची पुनरुक्ति करणारे अंतरींचे निर्मळ पडसादच नव्हेत तर दुसरें काय ? पण तोच कवि इतर देशात प्रवास करून जेव्हा मन:संवेदनाच्या आदोलनाऐवजीं जगातील कटु व भीषण अनुभवांचे धक्के खाऊं लागला तेव्हां त्याच्या ओजस्वी लेखणींतून Traveller (प्रवासी) सारखें बहिर्मुख काव्य व The Vicar of Wakefield (वेकफील्डचा पाद्री) सारखी उत्कृष्ट कादंबरी व इतर विविध निबंधप्रकार मिळून भावनांवर तर्काची सरशी दर्शविणारें बहु-

मोल वाङ्मय प्रसवलें.

भावनाप्रधान वृत्तीचे लेखक बहुधा कवि, कादंबरीकार व नाटककार होतात कारण अशा वृत्तीच्या लेखकांना भावनांचेच विविध खेळ जनतेपुढें मांडावयाचे असतात. केवळ शुद्ध व भोळ्या भावनांच्याच मार्गे लागल्यानें या गूढ संसारांत कशी संकटपरंपरा कोसळते व वारंवार पश्चात्ताप पावण्याची पाळी येते याविषयीं मननीय उदाहरणें हे लेखक आपल्या ललितकृतींच्या द्वारा रंगवितात. अशा ललितकृति वाचताना वाचक त्या त्या भूमिकाशीं क्षणभर तादात्म्य पावत असतो हें तर खरेंच, परंतु पुस्तक पूर्ण वाचून झाल्यानंतर भावनांच्या पायीं ललितकृतींतील पात्रांना कसकशा खस्ता खाव्या लागल्या याचा तो सूक्ष्म तर्कांच्या आधारें आपल्या मनाशींच विचार करतो आणि तेव्हा मात्र आपलें भूमिकातादात्म्य झुगारून देतो हेंहि तितकेंच खरें ! उदाहरणार्थ, गडकरीकृत 'एकच प्याला' नाटकांतील पतिव्रता सिधूविषयीं करुणरसाने वाहवून गेलेला वाचक-प्रेक्षक तादात्म्य पावतो; परंतु नाटकाचा शोकान्त शेवट पाहून दारूबाज सुशिक्षित सुधाकराविषयीं व त्याला दारूच्या व्यसनात आरंभीं सुरूम प्रवेश करून देणाऱ्या अधम तळीरामाविषयीं त्याला अत्यंत तिटकाराच वाटतो आणि पुढें तर तो जाज्वल्य त्वेषास प्रसवतो. तात्पर्य, भावनाप्रधान वृत्तीच्या लेखकांनीं मधुर ललितकृति निर्माण केल्या तरी सामान्य चिकित्सक वाचकाची भूमिका अशा कृतींचें परिशीलन करताना क्षणभर तादात्म्याची अशी भासत असली तरी तशी ती पुरेपूर खचित नसते. कारण (ललितकृतींत कटु प्रसंगांची निर्मिति करणाऱ्या लेखकाच्या भावनाचें अर्धवर्तुळ)+(शुद्ध भावनेचा मोह व अज्ञान यथार्थतेनें जाणणाऱ्या वाचकाच्या पदरच्या चिकित्साबुद्धीचें अर्धवर्तुळ) मिळून या संपूर्ण वर्तुळाचा फेरा पूर्ण होतो.

तथापि चिकित्साप्रधान दृष्टीनेंहि ललितकृतींचे कांहीं प्रकार रचितां येतात हें अलीकडे पाश्चात्य लेखकांनीं रचलेल्या विज्ञानशास्त्रावरील कादंबऱ्या, गुप्त पोलीसांच्या चातुर्याचीं जणूं सत्यकथेसारखींच भासणारीं अत्यंत अद्भुत कथानकें, इत्यादि विविध लेखनप्रकारांवरून दिसून येतें.

मात्र टीकाकार, इतिहासकार व संकीर्ण निबंधकार चिकित्साप्रधानच हवे; किंबहुना अतिशय चिकित्सक असणारा लेखक जसा उत्कृष्ट ललित-लेखक म्हणून चमकणार नाहीं त्याचप्रमाणें केवळ शुद्ध भावनाप्रधान लेखक अभिजात टीकाकार, सखोल इतिहासकार किंवा उत्कृष्ट निबंधकार म्हणून गाजणार नाहीं. याचें कारणहि उघडच आहे.

कारण ललितलेखक तरी काय करतो? वर सांगितल्याप्रमाणें जगांत ज्या मननीय बऱ्या वाईट घटना नित्यशः घडत असतात त्यांचें सहानुभूतीनें निरीक्षण करून आणि पदरच्या सूक्ष्म सौंदर्यदृष्टीनें त्याना किंचित् अति-शयोक्तीच्या भडक रंगाचीं पुटें देऊन हें आकर्षक शब्दचित्र तो वाचकांपुढें ठेवतो. मात्र त्याच्यावर आपल्या आपणच अभिप्राय देण्याचें किंवा तो दुरून सुचविण्याचें काम त्याचें नव्हेच नव्हे! किंवा असेंहि कल्पिता येईल कीं, ललित-लेखक हा उच्च प्रतीचा परोपकारी स्वयंपाकी आहे. विविध रसांची उत्कृष्ट मेजवानी सिद्ध करण्याचें काम त्याचें, इतकेंच. पण त्या मेजवानीच्या रुची-विषयीं व सरसनिरसतेविषयीं मार्मिक अभिप्राय देण्याचें काम त्याचें नसून भोजनास पाचारलेल्या अतिथिरूपी रसज्ञ व सहृदय टीकाकाराचेंच होय. ज्याप्रमाणें स्वयंपाक्यानें मेजवानी प्रथम सिद्ध केल्यानंतरच त्याची रुचि चाखणाऱ्या अतिथींचें आगमन होतें त्याप्रमाणें प्रथम नाटकें, कादंबऱ्या यांच्यासारख्या ललितकृति तयार झाल्यानंतर त्यांचें परिशीलन करून मार्मिक अभिप्राय देणारे रसिक टीकाकार निपजतात. पहिल्याचेंच अस्तित्व नसेल तर अर्थात् दुसऱ्याची आवश्यकताच रहाणार नाहीं.

तथापि इतकें खरें कीं, केवळ भावनाप्रधान वृत्तीचाच अतिरेक झाल्यास अशा लेखकांच्या अंतःकरणाच्या कारखान्यात निराशावादाचा भेसूर आवाज निघूं लागतो. आणि त्याचाच कर्कश प्रतिध्वनि त्यानीं निर्माण केलेल्या वाङ्मयांत उमटतो. अशीं निराशाग्रस्त काव्यें व कादंबऱ्या जगाच्या वाङ्मयांत सर्व काळांत निपजलीं आहेत. परंतु त्यांच्यांत तसाच प्रभावी रस-बोध नसेल (आणि तो बहुतेक अशा कृतींत नसतोच!) तर अशा ललितकृति नेभळट रडगाणेंच ठरून त्यांचें आयुष्य क्षणजीवी ठरतें. अशा वृत्तीवर तोडगा म्हणून श्रीमद्भगवद्गीता प्रसिद्धच आहे. परंतु फुटकळ लहान लहान

कवनांपैकीं सुप्रसिद्ध अमेरिकन कवि लाँगफेलो यानें रचिलेलें 'The Psalm of Life' (जीविताचें गीत) सारखें उत्तेजनपर कवन दाखविता येईल. त्यांत कवि "असार जीवित केवळ माया रडगाणें हें गाउं नका" हा उज्ज्वल संदेश सांगून अशा निराशेच्या अग्नीच्या दाहानें होरपळून निघणाऱ्या हतभागी भावनानिष्ठ जनांना पुनरुज्जीवित करण्याचा थोडक्यांत यशस्वी प्रयत्न करतो.

श्रीमद्भगवद्गीतेंत प्रभु श्रीकृष्णानें अर्जुनास दिलेली उज्ज्वल शिकवण तर चिकित्साप्रधान दृष्टीचा अत्यंत ओजस्वी आदर्श म्हणून अभिमानानें दाखविता येईल. मोहानें भावनेच्या आहारीं गेलेल्या शूर अर्जुनाचा मोह चिकित्साप्रधान दृष्टीच्या मात्रेकरून योगिराज श्रीकृष्ण भगवान् संपूर्णपणें निस्तरतात. गीतेंतील अकरावा अध्याय 'विश्वरूपदर्शनयोग' म्हणजे चिकित्साप्रधान दृष्टि व भावनाप्रधान दृष्टि याचा विरोधाभासाच्या भीषण रूपकाच्या द्वारें भगवंतांनीं दाखविलेला अद्‌भुत संगमच होय.

आतां मानवी अंतःकरणात संपूर्ण भावनाप्रधान (Subjective) वृत्ति असणें चागलें कीं संपूर्ण तर्कप्रधान (Objective) वृत्ति असणे चागलें ? याला उत्तर असें कीं, त्यापैकीं एकीचाच मनस्वी अतिरेक न होता दोन्ही-चेंहि यथाप्रमाण मधुर मीलन असणें चागलें. तर्कप्रधान वृत्तीचा कृष्ण सारथी तर भावनाप्रधान वृत्तीचा अर्जुन रथस्थ असें रूपक कल्पिल्यास या प्रश्नावर उज्ज्वल प्रकाश पडेल. कारण रथस्थ व सारथी यांचें नातें परस्परपूरकच नव्हे तर काय ! केवळ तर्कप्रधान वृत्तीच अंतःकरणात बाळगल्यास त्यापासून बुद्धिविलासाचें समाधान होईल. पण भावनांच्या आल्हादकारक कारंज्यापासून उत्पन्न होणारी शीतळाई व आनंद हीं लाभणार नाहींत. मेंदू-चीच तेवढी जोपासना केली तर हृदयाकडे डोळेझाक होणार नाहीं का ? म्हणून बुद्धीपासून तेवढें समाधान होऊन चालणार नाहीं, तर त्याला हृदया-पासून स्रवणाऱ्या अखंड आनंदाची जोडहि अवश्य लाभली पाहिजे. म्हणजे मात्र समाधान+आनंद मिळून अंतःकरणास पूर्ण शांतीचा लाभ झाल्याविना रहाणार नाहीं.

तत्त्वज्ञान व ललितकला यांच्यांत अनुक्रमें तर्क व भावना यांजमध्यें

असलेला विरोधच दिसून येतो असें वर सांगितलें. शाश्वत परिणामाच्या कसोटीनें तत्त्वज्ञान श्रेष्ठ असलें तरी निर्हेतुक आनंदाचें वातावरण प्रसवण्यास समर्थ असणाऱ्या ललितकलांसारख्या वस्तू दुसऱ्या नाहींत! जगांतील प्राणिमात्रांची सारी धडपड तरी कशासाठीं आहे! सुखासाठीं तर खरीच, पण या सुखाच्या मागें म्हणून जातां जातां जीवितांत इतकीं दुःखें मात्र अचानक घेरनात कीं, त्याचा कांही काळ विसर पडण्यास भावनांचीं निरनिराळीं गोड व विरोधी दृश्यें संसारात नाहीं तर नाहीं, पण वाङ्मयांत तरी शब्दचित्रित झालेलीं पाहून त्याच्यापासून आनंद चाखण्यास शिकण्यावाचून गत्यंतरच नसतें. असें न केल्यास आत्यंतिक निराशेनें मन कुढून, एककली दीर्घ चिंतनानें माणसाला कदाचित् वेड लागण्याचीहि पाळी यावयाची! या दृष्टीनें विचार केल्यास भावनाप्रधान वाङ्मय विशिष्ट भावनांचीं सुंदर सुंदर दालनें निर्माण करून व मनाला आल्हाद देऊन तें आनंदी व पुनः ताजेतवानें करण्याचें महत्त्वाच कार्य करतें यात शंका नाहीं.

आतां ही भावनाप्रधान वृत्ति ललित वाङ्मयप्रकारांत शोभून दिसत असली तरी प्रत्यक्ष व्यवहारांत मात्र ती नुकसानीस व पश्चात्तापास कारणीभूत होते. उदाहरणार्थ, भोळ्या भाबड्या इसमाला कावेबाज, लाघवी व मायावी लोक नेमके फसवितात. आणि त्यांच्यावर भोळा विश्वास ठेवून असे दुधखुळे हटकून फसतात आणि पुढें जन्मभर पश्चात्ताप पावतात. पण अशीच एखादी गोष्ट एखाद्या सुंदर रूपकाच्या किंवा अद्भुत नवलिकेच्या द्वारें परिणामकारक रीतीनें वाचकासमोर मांडली तर त्यांची करमणूक व मनोरंजन होते ही गोष्ट खरी; पण विरोधाच्या भूमिकेनें शेवटीं भावनेवर तर्काची सरशीच हवी, न पेक्षा या काटेरी जगांत सुखानें जीवित कंठणें शक्यच नाहीं. हाच कटु सिद्धात अशा कथांतून तात्पर्यानें सूचित झाल्याविना रहात नाहीं, नव्हे का?

सुप्रसिद्ध आंग्ल कवि शेले, बायरन् यांच्यासारख्याच्या काव्यांतून प्रेमनिराशेचा करुणरसात्मक सूर प्रभावी असल्यामुळें वाचक त्या कवींच्या निराशायुक्त मनःस्थितीच्या भूमिकेशीं कांही काळ तरी तादात्म्य पावतो व करुणरसांत डुंबून निघतो. पण थोडासा सूक्ष्म विचार करतां दुसऱ्याच क्षणीं

आपली व कवीची व्यक्तिगत भूमिका भिन्न होय याची तीव्र जाणीव त्याला होत असल्यामुळें या एक प्रकारच्या आपल्या मानीव 'उच्चतर' भूमिकेपासून मिळणारें समाधान तो चाखीत असतो आणि चिकित्सक बुद्धीचा कौल घेऊन आपल्या विमल मनाशींच विचार करतो कीं, "बिचारे शेले व बायरन्! स्त्रीविषयक आणि तेथून स्वतःच्या जीवितविषयक प्रेमनिराशेनें असे भाजले गेले बिचारे!! आपण त्यांच्या उदाहरणांपासून योग्य तो बोध घेतला पाहिजे आणि कलाविषयक अतिमात्र ध्येयसिद्धीच्या मृगजलामागें वर्तुळाकार धांवता धांवता ऐहिक जीवनांतील प्रत्यक्ष संसारसुखाच्या घटनांकडे व विकारांकडे पाठ फिरवून त्यांना पारखे होऊं नये, हेंच खरें!"

वरील उदाहरणावरून प्रत्यक्ष वस्तुसृष्टीला पारखे झालेले आणि काल्पित कलासिद्धीच्याच एकसारखे मार्गे लागलेले कलोपासक भावना-प्रधान कवि कसे असतात हें दिसून येईल. भावनाप्रधान वृत्तीची सापेक्षता व परिमितता नीट जाणून तिची अतःकरणांत जोपासना केल्यास ठीकच. पण ज्या संसाराचें वाङ्मय हे यथार्थ परीक्षणात्मक शब्दचित्र मानण्यांत येतें त्या संसाराकडे बुद्ध्या पाठ फिरवून केवळ अद्भुत कल्पनाविलासानें त्यांतील सुखदुःखांच्या घटना चित्रित करणारांची मनःस्थिति—मग ती कल्पनांच्या उंच फवाऱ्यांनीं किती का सजविलेली असेना—दुःखीकष्टी व कोती तर असावयाचीच, पण प्रत्यक्ष भरीव अनुभवांच्या आधाराविना निर्माण झालेलें, निराशावादाचे विसंवादी सूर उमटविणारें, नेभळट वाङ्मय कालाच्या तीरावर अल्पजीवी ठरल्यास त्यात काय नवल !

पण केवळ निराशावादाचे पिचलेले सूर काढण्याऐवजीं असें वाङ्मय जेव्हां शुद्ध भावनाचे विकार-विचार निःस्वार्थी भूमिकेनें दर्शवितें तेव्हा तें चिरकालीन ठरतें. उदाहरणार्थ, बाणभट्टकृत 'कादंबरीकथा' गद्यात असली तरी तींत बुद्धिविलासाच्या सुंदर प्रसंगांसवेंच शुद्ध भावनाविलासाचे इतके सरस, हृदयस्पर्शी व काव्यमय प्रसंग रंगविले आहेत कीं तिला गद्यकाव्यच म्हणतात.

दुसरें उदाहरण कालिदासकृत मेघदूत काव्याचें घेऊं. पत्नीविरहानें तप्त झालेल्या अज्ञातवासी यक्षाच्या मनःसंवेदनेशीं समरस होऊन कवीनें काढलेलें

हें अंतर्मुख वृत्तीचें अत्यंत यथार्थ व पारदर्शक शब्दचित्रच नव्हे तर काय ?

पण या काव्याचा अंत शोकगर्भ करण्याऐवजीं आनंदात्मक साधण्यांत कवीनें अंतर्मुख वृत्तीवर बहिर्मुख वृत्तीची म्हणजेच भावनेवर तर्काची उघड सरशी दाखविली आहे. कारण यक्ष पत्नीविरहानें व प्रेमनिराशेनें पिचून दुबळें मरण पतकरतो, असलें हीन दृश्य चितारण्याऐवजीं तो धीरगंभीर वृत्तीनें काळ कंठून आणि आपली वृत्ति विवेकप्रधान राखून तिकडे अलकावतींत आपली प्रियतमा कसे दिवस कंठीत असेल याचें कल्पनाचित्र तो अचेतन मेघास सांगतो, आणि त्या चित्राच्या वर्णनांतच स्वतः आपण रंगून (व मेघासहित वाचकांस मनसोक्त रंगवून) अशा रीतीनें आपल्या विरहव्यथेचें समाधान साधून घेतो. यक्ष अज्ञातवासांतच अनुभवीत असलेली ही उच्च प्रतीची मानसिक सुखशांति कुशलतेनें सूचित करण्यांत कवीनें तर्क व भावना या दोन प्रधान मनोधर्मांतील ठळक विरोध उत्कृष्टपणें दाखवून दिला आहे यांत शंका नाहीं.

---

## अंतःकरणाच्या दोन मूलभूत प्रवृत्ति

### (विरोधाभासात्मक दोन दृश्यें)

"भावनाप्रधान व चिकित्साप्रधान या मानवी मनाच्या दोन स्थूल मूलभूत प्रवृत्ति होत. प्रत्येक मनुष्य आपल्या भावनांच्या चष्म्यांतून दिसणारें तेवढें खरें आणि बाकी सर्व खोटें असें मानीत सुटतो. भावना व बुद्धि यांजमधील मूलभूत वैषम्यामुळें जगात आजपर्यंत इतके वादविवाद उमटले आहेत, कीं त्यांचा परिणाम निरीश्वरवादी पंथाच्या निर्मितींत झाला आहे. मानवी देहधर्मांत कित्येक बाबतींत साम्य आढळत असलें तरी वैषम्य असलेल्या गोष्टीच अधिक आढळावयाच्या. जें एकस्याला अमृत वाटतें तेंच दुसऱ्या एखाद्याला हटकून विष होत असतें; जेथें एखाद्याला सुसंगति आढळते तेथेंच दुसऱ्याला घोंटाळा दिसतो; जें एखाद्याला सुंदर दिसतें तेंच दुसऱ्याला कुरूप दिसतें. येणेप्रमाणें मानवी अंतरंगाच्या मूलभूत प्रधान दृष्टिकोनांतील विरोधामुळें जग हें असें चालायचेंच." —प्रसिद्ध डच तत्त्ववेत्ता स्पिनोजा.

अंतरंगांतील भावनाप्रधान व चिकित्साप्रधान या अनुक्रमें मनाच्या व बुद्धीच्या प्रवृत्तींचें विवेचन करण्यापूर्वी प्रथम मन व बुद्धि यांच्या व्याख्या व त्रोटक विवरण करूं.

काळोखांत एखादा मनुष्य उभा असल्यास त्याची आकृति अस्पष्ट दिसते. म्हणून याविषयींचें ज्ञान तितकेंसें स्पष्ट नसतें. तें इंद्रियांपासून उद्भवतें. म्हणून तत्त्वशास्त्राच्या परिभाषेंत या ज्ञानाला आलोचना म्हणतात.

नंतर ती वस्तु न्याहाळण्याकरितां तो तिच्या जवळपास जातो आणि त्यास ती एक आयुधपाणी चोर होय असें आढळून येतें. या दुसऱ्या अवस्थेंत त्या वस्तूचें स्वरूप सुस्पष्ट होतें. या निर्धाराला 'संकल्प' ही संज्ञा आहे.

पण पुढें तो चोर आपल्याचकडे चाल करून येत आहे अशी त्याची खात्री होऊन चुकते. या स्वतःसंबंधीं तिसऱ्या अवस्थेला अभिमान हें नांव देतात.

आणि शेवटीं आपण त्या जागेपासून स्वसंरक्षणार्थ दूर पळून गेलें पाहिजे असा तो आपल्या मनाचा निर्धार करतो. या चौथ्या अवस्थेला निश्चय म्हणतात.

तात्पर्य, ज्ञानोत्पत्तीचा क्रम चढत्या भांजणीनें खालील चार विभागांत समाविष्ट झाला आहे :— (१) आलोचना, (२) संकल्प, (३) अभिमान व (४) निश्चय. या चतुष्टयांतील प्रत्येक भाग आपआपल्या विशिष्ट कारण-परंपरेपासून उद्भवतो. केवळ मनासंबंधींच्या इंद्रियांमुळेंच संपूर्ण अनुभव उत्पन्न होत असतो हा समज चुकीचा म्हणावा लागेल. तेव्हा वरील विवेचनाचें सार असें कीं,

आलोचना किंवा संवेदना इंद्रियांपासून उत्पन्न होते.

संकल्पाला कारण झालेल्या वस्तूला मन म्हणतात.

अभिमानाला कारण झालेल्या वस्तूला बुद्धि असें म्हणतात.

यापैकीं इंद्रियें बाह्यवर्ती असून उरलेलीं तीन (संवेदना, संकल्प व अभिमान) शरीरात असतात व तीं अनुभवाला कारणीभूत होतात. म्हणून या त्रयीला मिळून अंतःकरण अशी संज्ञा आहे. अंतःकरण बाह्येंद्रियांच्या मूलक विषयाचेच ग्रहण करीत असल्यामुळें तीं ज्ञानाचीं द्वारेंच होत असें मानतात. हीं इंद्रियें विषयाचें आलोचन करून मनापाशीं येतात. पुढें मन संकल्प करून म्हणजे त्या विषयाचें स्वरूप निश्चित करून तें अहंकाराला अर्पण करितें. अहंकार पोटीं अभिमान बाळगून म्हणजे विषयांशीं आपला संबंध जोडून तो बुद्धीला अर्पण करतो आणि शेवटीं बुद्धीपासून त्या विषयांचा भोग उत्पन्न होतो. भोग म्हणजे सुखदुःखांची संवेदना व अनुभूति. म्हणून बुद्धीला साक्षात् भोगांचें अंतिम साधन म्हणतां येईल.

वरील विवेचनावरून संवेदना, संकल्प व बुद्धि यांच्यामध्यें किती टप्पे आहेत तें स्पष्टपणें दिसून येईल. आणि तर्कशास्त्रदृष्ट्या मनावर बुद्धीची कशी सरशी आहे हेंहि सप्रमाण कळून येईल.

मन व बुद्धि याच्या सुटसुटीत त्रोटक व्याख्या अशा :—

मन=प्रेरणा करणारी वासना.

बुद्धि=कार्य कोणतें, अकार्य कोणतें याचा अचूक निश्चय करणारें इंद्रिय.

श्रीकृष्णानें गीतेंत इंद्रियांच्या मागोमाग चरणाऱ्या चंचल व भावनाप्रधान मनाचा समाचार खालील श्लोकांत घेतला आहे :—

> इंद्रियाणां हि चरतां यन्मनोऽनुविधीयते ।
> तदस्य हरति प्रज्ञां वायुर्नावमिवाम्भसि ॥ (गीता २.६७)

(अर्थ :— विषयात लीलेनें संचरणाऱ्या इंद्रियांच्या मागोमाग मन जें धांवूं लागतें तेंच पाण्यात नौकेस जसा वारा त्याप्रमाणें पुरुषाची बुद्धि हरण करितें.) पुढें श्रीकृष्ण मन व बुद्धि याजमधील अंतर दाखवितांना म्हणतात :—

> इंद्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः ।
> मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ (गीता. ३.४२)

(अर्थ :— असें म्हणतात कीं, स्थूल बाह्य पदार्थांच्या मानानें ते पदार्थ जाणणारीं इंद्रियें पलीकडचीं, इंद्रियाच्या पलीकडचें मन, मनाच्याहि पलीकडची व्यवसायात्मक म्हणजे चिकित्साप्रधान बुद्धि आणि जो या बुद्धीच्याहि पलीकडे आहे तो आत्मा होय.)

आतां कांहीं पाश्चात्य तत्त्वज्ञान्याच्या मतें मन व बुद्धि याचे प्रतियोगी गुणधर्म असे :— बालपणांतील संस्कारांप्रमाणें व भावनेची अढी व विशिष्ट दृष्टिकोन यांच्या प्रेरणेप्रमाणें स्वत्वप्रधान दृष्टीनें जगरहाटीकडे जें पाहतें तें मन.

तर, आपले संस्कारजन्य पूर्वग्रह व विशिष्ट कल्पना व वासना शक्य तितक्या बाजूस सारून (कासव जसा आपले अवयव सर्व बाजूंनीं आंखडून घेतो) त्याप्रमाणें संवेदी भावनांची आवर व संयम करून जगातील चराचर वस्तू कशा आहेत तशा जी पहाते आणि त्या तर्काच्या निकषाला लावून त्यांच्या

इष्टानिष्टतेबद्दल सूक्ष्म पृथक्करण व विवेक करते ती बुद्धि.

एखादी वस्तु उपमालंकारांच्या द्वारें वर्णन करिते ती मनाची भावना.

ती वस्तु जशी आहे तशी—दिसते तशी नव्हे !—काटेकोरपणें सांगते ती बुद्धीची चिकित्सा.

निर्मळ सत्याला आपल्या मोहक भावनेची मुरड घालून सत्याची अविकृत उज्ज्वल प्रभा हतप्रभ करतें तें हळुवार मन.

सत्य जसें आहे तसें, आडवळणे न घेतां, थोडक्यांत अचूक ओळखूं व सांगूं शकते ती तीव्र बुद्धि.

निमूटपणें जी श्रद्धा बाळगते ती मनाची भावना.

अंधश्रद्धेला जी थारा देत नाहीं ती बुद्धीची चिकित्सा.

एखादी गूढ व अतर्क्य चिच्छक्ति आहे असें कल्पून तिच्यासंबंधीं सूक्ष्म विचार करण्याच्या भरीस फारसें न पडतां तिच्या विभूतिमत्त्वाच्या चिंतनांतच दंग व आत्मसंतुष्ट असतें तें मन.

त्या अद्भुत शक्तीच्या यथार्थतेविषयीं अनुमानांची सांखळी बांधून त्यांची नीट सगति लावण्यासाठीं प्रयत्न करते ती बुद्धि.

वस्तूच्या अस्तित्वाची नुसती संवेदना जाणवतें तें मन; पण प्रत्यभिज्ञेच्या द्वारें म्हणजे त्या अनुभव-संवेदनेची वारंवार पुनरुक्ति करून व भावनेला ज्ञानाची जोड देऊन वस्तूविषयीं यथार्थ ज्ञान संपादन करणें, त्याचा पल्ला किती गांठला याचा वेळोवेळीं कयास बांधणें, आणि आपलें ज्ञान किती प्रमाणात अपुरें पडतें याची शहानिशा करणें, हीं कामें जी साधकबाधक विचार करून सामोपचारानें पार पाडते ती बुद्धि.

भावनाप्रधान मनात साऱ्या मानवी आशा-आकांक्षा, कल्पना व प्रेरणा यांचा होम होऊन त्या अग्निकुंडाची एक प्रकारची उज्ज्वल पण क्षणिक प्रभा भासमान होते.

भावनाप्रधान मनोधर्माचा माणूस भावनेच्या आहारीं जातां जातां आपल्या मनोराज्याप्रमाणें जगाचे सारे व्यवहार चालत आहेत किंबहुना चालावेत असा मनांत अट्टाहास धरतो.

उदा:— मांजर डोळे मिटून दूध पितें. आपला पाठलाग करणाऱ्या

शिकाऱ्यांचा जाच चुकविण्याकरितां शहामृग आपलें डोकें (व त्याबरोबरच डोळे) वाळूंत खुपसतें. अशा वृत्तीचे जन सारासारविवेक न करतां केवळ मनोमय भावनेनें मोहित होऊन तिच्या पचनीं पडत असल्यामुळें पुढेंमागें त्यांस जन्मभर पश्चात्ताप करण्याचे कटु प्रसंग येतात.

माणूस बालपणांत व तारुण्यांत बहुधा अंतर्मुख व भावनाविवश असतो. पण शुद्ध भावनेच्या आहारीं गेल्यानें पुढें जसजसा तो संकटपरंपरेनें पोळतो आणि पश्चात्तापानें भाजला जातो तसतशी त्याची दृष्टि निवळते आणि ती परिस्थितीच्या प्रभावामुळें बहिर्मुख व चिकित्साप्रधान बनते.

जीवत्सु तातपादेषु नवे दारपरिग्रहे ।
मातृभिः पाल्यमानानां ते हि नो दिवसा गताः ॥

(अर्थः– पित्यानें सुरक्षित छत्र धरलेलें आहे, आई प्रेमानें लालन-पालन करते आहे, नुकतीच नवपरिणीत वधू घरात नांदते आहे, असे ते मागील सुखाचे दिवस आता कोठून येणार ?)

असें म्हणून तो आपल्या तरुणपणींच्या मृदुमधुर स्मृति आठआठवून सारखा हळहळत असतो. पण अशी शुद्ध भावनाच तेवढी बाळगून या निष्ठुर जगांत सुखाचें जीवित कंठणें कठिण असें त्यास पुढें आयुष्यांतील कटु अनुभवांतीं कळून येत असल्यामुळें तो प्रेमळ भावनेला सूक्ष्म तर्क बुद्धीची जोड देतो.

उदाः–समजा एखादा फोटोग्राफर 'अ'च्या बालपणापासून त्याच्या परिचयाचा आहे. पण तो बोलभाऊ मित्र आहे बरं ! त्याच्या स्वभावाची किंवा शीलाची खरी पारख करण्याचे कसोटीचे प्रसंग कांही त्यांच्यामध्यें उद्भवलेले नाहींत ! समजा तो फोटोग्राफर 'अ'चा फोटो काढण्याकरितां आगाऊ पैसे मागतो. 'अ'चें भावनाप्रधान अंतर्मन त्या वेळीं म्हणेल, "त्यांत इतकं काय मोठंसं ? तुझा तो मित्र ना ? देईनास त्याला पैसे ! तुला तो काय फसवील ?"

पण लगेच तर्कनिष्ठ बुद्धि मनाला टोंचून सुचवील, "या फोटोग्राफरचें खाजगी वर्तन व दिनचर्या कशी काय ? तो व्यसनी तर नाहीं ना ? प्रथम इतरांकडे एकवार अवश्य चौकशी केली पाहिजे. खरोखरीच जर का

तो माझा मित्र म्हणवितो तर मग मजकडून तो आगाऊ पैसे का मागतो ? माझा विश्वास तो चाहीत असल्याप्रमाणे उलट माझ्यावरच तो विश्वासत कां नाहीं ?''

'अ'नें मन व बुद्धि यांच्या या द्वंद्वांत त्या फोटोग्राफरच्या शीलासंबंधीं इतरांकडे चौकशी करण्याचें टाळून त्याचा स्वभाव कसाहि असेना कां, 'तो निदान आपल्याला तरी फसवणार नाहीं' अशा शहामृगोचित मनाच्या प्रेरणेला मोकाट मैदान सोडून, जर त्यानें फोटोग्राफरला आगाऊ पैसे दिले आणि त्यानें ते बुडविले, किंवा 'निगेटिव्ह' कांचांवर कसले तरी फिक्के फोटो काढून ते चागले म्हणून आपल्या मित्राच्या गळयांत बांधले, तर त्या मित्राच्या हळुवार मनोभावनेला हा खासा प्रसाद मिळाला म्हणावयाचा !

स्वतः प्रस्तुत लेखक नम्र प्रांजलबुद्धीनें सांगूं इच्छितो कीं, त्याला अशाच एका फोटोग्राफर मित्रानें नुकतेंच चांगलें फसविलें ! पण भावना-प्राधान्यामुळें तो या फोटोग्राफीच्या क्रियेत पदरचे वीस रुपये गमावून बसला तरी तितक्याच किंमतींत सारासारविवेकबुद्धीची पुढे सतत आठवण व आवश्यकता वाटेल असें उच्च तत्त्वच तो शिकला नाहीं काय ! आणि यापुढें कोणावरहि, प्रथम त्याची नीट पारख न करतां भोळ्या भावनेनें त्याच्या वरकरणी गोड वचनाना भुलून विश्वासतांना, या मागील कटु अनुभव-संवेदनेची पुनरुक्ति त्याच्या अंतःकरणावर जोमदार आघात केल्यावांचून कशी राहील ?

आता भावनेपासून प्रसवणारी श्रद्धा योग्य ठिकाणीं बरी खरी; पण ती इंद्रियदमन केलेल्या किंवा करण्यासाठीं झटणाऱ्या विवेक्यांची—येरा गबाळांची नव्हे !

श्रद्धेसंबंधीं श्रीकृष्ण गीतेंत सांगतात :—

श्रद्धावाँल्लभते ज्ञानं तत्परः संयतेन्द्रियः ।
ज्ञानं लब्ध्वा परां शान्तिमचिरेणाधिगच्छति ॥ (गीता ४.३९)

(अर्थः— हें ज्ञान जो श्रद्धावान् पुरुष इंद्रियदमन करून ज्ञानाच्या पाठीस लागला त्याला तें मिळतें. आणि असें संपूर्ण ज्ञान प्राप्त झालें म्हणजे लागलीच त्याला परम शांति प्राप्त होते.)

तथापि हें खरें कीं, तर्कनिष्ठ बुद्धीचें प्रखर तेज असह्य झाल्यावेळीं आल्हादकारक शीतलाई उत्पन्न करण्याकरितां व जिवाचा शीण घालवून करमणूक करण्याकरितां स्निग्ध भावनांचा गारवाच हवा. म्हणून माणूस आपल्या फुरसतीच्या वेळीं, मनाचा थकवा घालविण्याकरितां दिवसभर काबाडकष्ट करतांना उघडलेला बुद्धीचा कप्पा क्षणभर झांकतो आणि स्निग्ध भावनेचा दुसरा कप्पा उघडतो. भावनापूर्तीची परिणति प्रेमी माणसांशीं व विशेषतः मोहक बालकांशीं प्रेमळ हितगुज करण्यांत किंवा असले गोड प्रसग ललितलेखकांकरवीं वाङ्मयांत रंगविलेले पहाण्यांत होते. बालक आपल्या बोबडया बोलांनीं जिव्हाळ्याच्या प्रेमाचें उबदार वातावरण उत्पन्न करतें हें खरें. तथापि हा रस बहुरंगी व बहुविध होऊन पुष्कळ काळपावेतों टिकायचा असेल, तर वाटेल त्या वेळीं रसिकांच्या सेवेस उभ्या टाकूं शकणाऱ्या उत्तमोत्तम ललितकृतींकडे वळल्याविना उद्योगी माणसांना तरी गत्यंतर नाहीं. हो, नाहीं तर केवळ प्रखर बुद्धीच्याच दाहामुळें अंतःकरणांतील प्रेमभावनांचा निर्मल जलाशयच आटून घशाला कोरड पडावयाची !

कै. हरिभाऊ आपटयांची 'पण लक्षांत कोण घेतो !' सारखी अत्युत्कृष्ट कादंबरी अशा स्वत्वनिष्ठ मनोभूमिकेनें लिहिलेल्या एका शोकान्त आत्मचरित्रपर कहाणीचा आदर्श नमुना म्हणून सांगतां येईल. तथापि अशा कादंबऱ्यांतून देखील या निष्ठुर व्यवहारांत केवळ शुद्ध भावनेवर सर्वस्वीं आधारून भाबडेपणानें वागल्यास तसे वागणारांचे कसकसे हाल होतात, याचें अत्यंत हृदयस्पर्शी शब्दचित्रच पहाण्यास सापडतें; व तें वाचकांना सामाजिक विषम अन्याय दूर करण्याची जोराची प्रेरणा करून त्यांस सर्वांगीण प्रगतीस प्रवृत्त करतें. आणि अशी सर्वांगीण प्रगति व्हावयाची असेल .तर तेथें भावनेच्या जोडीला किंबहुना तिला वरचढ म्हणून सूक्ष्म सारासारविचार करणारी सूचिकाग्र तर्कबुद्धि हवी. म्हणून अशा बुद्धीची आवश्यकता हें सुंदर आत्मचरित्र विरोधाभासानें उत्कृष्टपणें सूचित करतें असें म्हणावें लागतें.

वरील विवेचनावरून भावनाप्रधान व चिकित्साप्रधान हे अनुक्रमें मनाचे व बुद्धीचे गुणधर्म एकमेकांना प्रतियोगी असूनहि एकंदर मानवी

ज्ञाननिर्धीच्या सिद्धीला पूरकच होत असें दिसून येईल.

म्हणून अंतरंगांत भावनेची सामग्री कच्ची व अपुरी असणारे लेखक यशस्वी कवि किंवा उत्कृष्ट कादंबरीकार बनणार नाहींत; बहुधा उत्तम निबंधकार निपजतील !

अंतर्मुख दृष्टि करून भावनाप्राधान्यानें लिहिलेलीं चरित्रें व आत्मचरित्रें कित्येकदां कादंबरीइतकींच सरस व हृदयंगम वठतात याचें कारण झालें तरी आत्मीय भावनेंत व सत्यपूर्ण सौंदर्यचिंतनांत रमणाऱ्या लेखकाच्या अंतरंगाच्या गूढ कारखान्याच्या सामग्रींत हुडकावें लागेल. बॉस्वेल्नें लिहिलेलें जॉन्सन्साहेबांचें प्रचंड चरित्र अशा अंतर्मुख दृष्टीनेंच लिहिलेलें आहे. तें जॉन्सन्बरोबरच त्याच्या समकालीन व सभोंवार वावरणाऱ्या भिन्न भिन्न पेशांच्या इतर थोर लोकाचें आत्मीय भावनेनें काढलेलें, व त्यांचे गुणदोष लीलेनें पण प्रामाणिकपणें दाखविणारें आदर्श शब्दचित्रच असल्यामुळें तें रसिकांना तरी कादंबरीइतकेंच जवळ जवळ हृदयंगम झालें आहे.

तात्पर्य, निष्ठुर व्यवहारांत चिकित्साप्रधान बुद्धिनिष्ठ वृत्ति ठीक असली तरी संभाषणप्रधान पात्रमुखी कादंबऱ्या, आत्मचरित्रें, नाटकें इत्यादि कित्येक भावनाप्रधान लेखनप्रकारांत घेतलेल्या किंवा घ्यावयाच्या अनुमानांचें मोल व शहाणपणा विरोधाच्या भूमिकेनें व व्यंजनेनें दाखविण्याच्या कामीं उत्कृष्ट उपयोग होतो. म्हणजे त्यांत जे भावनागर्भ तापले पोळलेले कटु अनुभव सांगितलेले असतात त्यांची नीट सुसंगति व पूर्ति आपल्या पदरच्या विवेकबुद्धीची जोड देऊन वाचकाला किंवा प्रेक्षकाला करावयाची असते.

भावनाप्रधान मनाच्या कल्पना किती अद्‌भुत व गोड असतात ! बोलूनचालून मनोराज्यच तें ! त्यांत मनोमय उच्च कल्पनांचें कारंजें सोडून त्याची उडती शोभा मनसोक्त लुटण्याचें भाग्य लाभतें ! म्हणूनच प्रौढपणीं व विशेषतः म्हातारपणीं कटु व दुःखद अनुभवांच्या ओसाड वाळवंटांत पोळून निघालेल्या मनःस्थितींत निर्मळ भावनांची म्हणजेच बाल्यांतील दिनचर्येची वारंवार सुखद व गोड आठवण होत असावी.

पण हा नुसता थारेपालट झाला. निव्वळ बुद्धि म्हणजे जणूं धगधगीत अग्नि ! तो नुसता दाह करीत सुटतो, दुसरे काय !

भावना म्हणजे मादक पेय ! तें हटकून उन्माद उत्पन्न करितें !

आणि म्हणून बुद्धि व भावना या दोनहि कप्प्याकडे परिस्थितीप्रमाणें आळीपाळीनें वळून अंतःकरणांत संपूर्ण शांति बाणविण्याचा कसोशीनें प्रयत्न करणें मानवांचें इहलोकींचें कर्तव्यच ठरतें.

माणूस भावनाप्रधान व चिकित्साप्रधान या दोन प्रधान अंगभूत दृष्टिकोनांपैकीं कोणता तरी एक आपल्या अंतरंगांत घेऊनच जन्मास येतो. या गुणधर्मांची व्याख्या करणारे कित्येक पर्याय निवडून खालीं दिले आहेत. हे पर्याय एकमेकांना पूरक असले तरी प्रतियोगीच आहेत.

(इंग्रजी)

| | | | |
|---|---|---|---|
| (1) | Subjective | ... .... | Objective |
| (2) | Platonist | ... .... | Aristotelian |
| (3) | Personal | ... ... | Impersonal |
| (4) | Ideal | ... ... | Real |
| (5) | Psychic | ... ... | Physical |
| (6) | Theoretical | ... ... | Practical |

(Plato व Aristotle हे विभिन्न विचारसरणीचे प्रसिद्ध ग्रीक तत्त्वज्ञानी होत)

(मराठी)

| | | | |
|---|---|---|---|
| (१) | भावनाप्रधान (मनाच्या आधीनः सापेक्ष) | | चिकित्साप्रधान (तर्काधीन बुद्धीच्या आधीन : निरपेक्ष) |
| (२) | स्वत्वप्रधान | ... ... | परत्वप्रधान |
| (३) | मोहनिष्ठ | ... ... | तर्कनिष्ठ |
| (४) | मायात्मक | ... ... | विवेकात्मक |
| (५) | आत्मप्रत्ययनिष्ठ, आत्मलक्षी आत्मसापेक्ष | ... ... | परप्रत्ययनिष्ठ, वस्तुलक्षी परसापेक्ष |
| (६) | वासनायुक्त | ... ... | बुद्धियुक्त |

| | | | |
|---|---|---|---|
| (७) | अंतःसृष्टिसंबंधी | ... ... | बहिःसृष्टिसंबंधी |
| (८) | अधिष्ठानसंबंधीं | ... ... | विषयसंबंधीं |
| (९) | कर्तृतंत्र, कर्तृनिष्ठ | ... ... | वस्तुतंत्र, वस्तुनिष्ठ |
| (१०) | आंतर | ... ... | बाह्य |
| (११) | व्यक्तिगत | ... ... | व्यक्त्यतीत |
| (१२) | अंतर्मनसंबंधीं | ... ... | बहिर्मनसबंधीं |
| (१३) | मनोमय, काल्पनिक ... अनुमानमूलक, तात्त्विक ... | ... | सत्यपूर्ण, व्यवहार्य, यथार्थ, अनुभवसिद्ध |
| (१४) | मानसगोचर | ... ... | सृष्टिगोचर |
| (१५) | जिज्ञासुविषयक | ... ... | ज्ञेयविषयक |
| (१६) | विषयीनिष्ठ | ... ... | विषयनिष्ठ |

भावनाप्रधान मनोधर्म आत्मचिंतनांत सभोंवार दृष्टि फेंकून आपल्या विशिष्ट आवडीनिवडींत व पूर्वग्रहात चराचर सृष्टींतील व्यापाराचें स्वरूप विलीन करीत असतो. उलटपक्षीं चिकित्साप्रधान मनोधर्म ज्ञेय वस्तूंच्या किंवा विषयाच्या गुणधर्मांचा, ते जसे आहेत तसे, विचार करतो. मात्र तो त्यांत जिज्ञासूच्या पूर्वग्रहांची कदापि भेसळ करीत नाहीं. म्हणून तो निव्वळ कल्पनेच्या अमूर्त ध्येयाऐवजी विश्वांतील साऱ्या वस्तूंतील अंतिम सत्य आस्थेनें हुडकूं पाहतो.

भावनाप्रधान माणूस भावनेच्याच आहारीं जातो, तर चिकित्साप्रधान माणूस सूक्ष्म सारासारविवेक करून भावना व बुद्धि यांचा केवळ मनांत विचार करीतच न बसतां प्रत्यक्ष कृतीच्या द्वारा त्यांचा उत्कृष्ट मेळ घालतो. चिकित्साप्रधान गुणधर्म आपले पूर्वग्रह व संस्कारजन्य कल्पना, कांसव जसा आपले अवयव आंखडून घेतो, त्याप्रमाणें शक्य तों आवरून धरून, बाह्य वस्तु वरकरणी जशा दिसतात तशा नव्हत, तर त्या अंतर्यामीं जशा आहेत तशा, त्या पहाण्याचा आस्थेनें प्रयत्न करतो, आणि त्यांची आपल्याशींच तर्काच्या कसोटीनें संपूर्ण साधकबाधक चिकित्सा व पृथकरण करून त्यांतील खरें व खोटें यांची प्रथम अचूक निवड व पुढें विशदीकरण करतो. आतां मानवी अंतःकरणाचा मूलभूत गुणधर्म सर्वस्वीं

शंभर टक्के भावनाप्रधान किंवा शंभर टक्के चिकित्साप्रधान असा आढळणें कठीणच. परंतु त्यांपैकीं एखाद्या गुणधर्माकडेच प्रत्येक जनाचा उपजत विशेष कल असल्याचें सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्यास आढळून येईल.

स्पिनोजा नावाचा डच तत्त्वज्ञानी या दोन विभिन्न भूमिकांची थोडक्यांत खालीलप्रमाणें व्याख्या करतो :—

**कर्तृनिष्ठ किंवा विषयीनिष्ठ** (Subjective)

ज्ञेय वस्तूचा विचार करण्याऐवजीं जिज्ञासु बुद्धीच ज्ञेयविषय करूं पहाणारी मनोभूमिका.

**वस्तुनिष्ठ किंवा विषयनिष्ठ** (Objective)

जिज्ञासूच्या मानससृष्टीहून भिन्न व अतीत असून ज्ञेय वस्तुविचारांच्या मालिकेंत लीलेनें व निर्भयपणें संचार करणारी मनोभूमिका.

सामान्यतः कवि व कादंबरीकार आरंभीं तरी भावनाप्रधान असतात. किंबहुना निर्मळ भावनांचा भरपूर सांठा नसणाऱ्यानीं कवि किंवा कादंबरी-कार होऊं पहाणें म्हणजे लहान तोंडीं मोठा घास घेणें होय ! पण केवळ भावनेवरच विसंबून न रहातां ते जगांतील विविध अनुभवांनीं चिकित्सा-प्रधान बनल्यास त्यांच्याकडून उत्तम कलाकृति निर्माण होऊं नयेत असें नाहीं.

उदाहरणार्थः—एच्. जी. वेल्ससारखे प्रसिद्ध लेखक व विज्ञानशास्त्रज्ञ विज्ञानपर कादंबऱ्या किंवा ख्रि. सर ऑर्थर कॉनन डॉईलसारखे डॉक्टर 'Memoirs of Sherlock Holmes' (शेरलॉक होम्सच्या आठवणी) सारख्या गुप्त पोलीसांच्या चातुर्याच्या अत्यंत रहस्यमय व सत्यकथाप्रमाणें भासणाऱ्या कादंबऱ्या जेव्हां लिहितात, तेव्हां शुद्ध भावनेवर तीक्ष्ण बुद्धीची किवा कल्पनेवर तर्काची सरशी होऊन त्या एकापरी हृदयंगमच वठतात आणि त्यांच्यावर विशिष्ट वृत्तीच्या वाचकांच्या उड्याच पडतात.

वर सांगितलें कीं, मानवी अंतरंगाच्या कारखान्यांतील दोन कप्पे अनुक्रमें बुद्धि व भावना यांनीं सामावलेले आहेत. त्यांपैकीं कोणती अधिक श्रेष्ठ किंवा इष्ट याची, त्या मुळीं समान भूमिकेवर आधारलेल्या नसल्या-

कारणानें, तुलनेनें इयत्ता ठरविणें कठीणच. कारण बुद्धीचे प्रांत निराळे व भावनेचे प्रदेश निराळे ! तथापि निव्वळ भावनेपेक्षां अनुभवाच्या खोलीच्या व शाश्वतीच्या दृष्टीनें बुद्धि अधिक प्रभावी असून ती वरच्या पायरीवर विलसत असते हें थोड्याशा विचाराअंतीं कोणाच्याहि लक्षात येईल.

जॉर्ज हेन्री लुईस म्हणतो कीं, प्रसिद्ध जर्मन कवि नाटककार व तत्त्वज्ञ गटे याची मनोरचना चिकित्साप्रधान होती. खऱ्या, शाश्वत व जिवंत वस्तुसत्याविषयीं त्याच्या मनांत आणि म्हणून लिखाणांत प्रेरणा असे. कल्पित, भाववाचक, अमूर्त व इंद्रियगोचर ध्येयांचा तो तिटकारा करी ! निसर्गाचीं दृश्यें किंवा प्रतीकें अभ्यासावयाचीं तर जशीं तीं दिसतात तशींच तीं पहावीं, म्हणून तर त्याचा कटाक्ष असे ! अशीं दृश्यें आपल्या विशिष्ट कल्पनेच्या छिद्रांच्या जाळ्यांतून किंवा पूर्वग्रहांच्या रंगीत चष्म्यांतून पहाण्याचें तो कटाक्षानें टाळी ! विश्वबंधुत्वाच्या कल्पनेंत हा ईश्वर, हें विश्व अशी फारकत त्यानें सहसा केली नाहीं ! मात्र, तत्त्वज्ञानी परमेश्वर आपल्या करांगुलीच्या टोंकावर साऱ्या विश्वाचें गोल लीलेनें खेळवितो असें मानीत !

गटेनें विश्वाच्या बहुरंगी रचनेंत सगुण ईश्वरी अंश पाहिला आणि सत्याचें आविष्करण करतांना त्यात त्यानें दैवी अंशांची चातुर्यानें योजना केली. प्रत्यक्ष वस्तुसृष्टींत व पदोपदीं आढळणाऱ्या सत्यांत त्यानें कल्पित ध्येय-सृष्टीची सुंदर मुहूर्तमेढ रोंविली, साऱ्या मानवी प्रेरणा व आशा-आकांक्षा यांचा मधुर संगम त्यानें नीतींत पाहिला आणि ललितकलासृष्टींत ऐहिक जीवितध्येयाचेंच श्रेष्ठतम प्रतीक पाहिलें. 'निसर्ग' हेंच गटेच्या अखंड प्रेरणेचें अंतिम प्रयोजन व सिद्धि होय.

शेक्स्पिअर व गटे यांच्या मनोधर्मातील हा मूलभूत विरोध ठळकपणें दाखवितांना पूर्वोक्त लुईससाहेबांनीं त्या चरित्रांत एके ठिकाणीं खालील-प्रमाणें फार मार्मिक उद्गार काढले आहेत :—

"गटेची लेखनशक्ति शब्दचित्रांनीं रसरसून नटलेली आहे ! पण तींत बाह्य कल्पनासृष्टि कधींहि आढळावयाची नाहीं ! बहुतेक कवि तुलनेनें उपमेनें किंवा रूपकालंकारानें वस्तूंचें वर्णन करतात; परंतु गटे एखादी वस्तु दुसऱ्या कोणत्या वस्तूप्रमाणें कशी आहे हें तुम्हांस न सांगतां, ती

वस्तूच कशी काय तें एकदम सांगून नीट मुळासच हात घालतो ! उलट-पक्षीं शेक्स्पिअरच्या नाटकांतील पात्रांचे गुणधर्म पहा ! शेक्सपिअर खरी वस्तु पाहूं शकतो आणि ती इतरांसहि अचूक दाखवूं शकतो हें खरें असलें तरी, त्या वस्तूचें वर्णन करतांना उपमा व रूपक या दुहेरी अलंकारांच्या प्रभेचीं जणूं फिरतीं आवर्तनेंच तो सभोंवार फेंकतो व त्याच्या उज्ज्वल प्रभेनें वाचक प्रेक्षकांची दृष्टीच दिपवून टाकतो ! गटे बाह्य कल्पना-सृष्टीची योजना अत्यंत बेताबातानेंच करतो, तर शेक्स्पिअर कल्पनासृष्टींत आपल्या प्रिय पात्राचा मनसोक्त विहार करवितो ! गटे वर्ण्य वस्तूंपासून प्रतिमा निर्माण करतो, तर शेक्स्पिअर वर्ण्य वस्तूंशीं साधर्म्य असलेल्या इतर प्रतिमाच रंगवीत सुटतो !"

असो. या दोन प्रधान दृष्टिकोनांतील वैषम्य समोरासमोर मांडणारे कित्येक मननीय दृष्टांत योजून खालीं संकलित केले आहेत. अर्थात् त्यांची निराळी चिकित्सा करण्याचें कारण नाहीं.

### प्रतियोगी दृश्यें

(भावनाप्रधान)

(१) भारतीय युद्धाच्या समयीं अर्जुन :— "मी साफ युद्ध करणार नाहीं ! माझेच बांधव मी युद्धांत कसे मारूं !"

(२) महात्मा गांधी :—"आमची आध्यात्मिक शक्ति (Soul force) आम्हीं प्रथम आमच्या देशांतच वाढविली पाहिजे. म्हणून कॉंग्रेसच्या तर्फे परदेशांत प्रचार करणारें लंडनचें "इंडिया" साप्ताहिक बंद करा !"

(चिकित्साप्रधान)

(१) भगवान् श्रीकृष्ण :— "आधीं 'मारणें' म्हणजे काय ? वास्त-विक युद्धांत तूं मारणारा नसून परमेश्व-राची अतर्क्य इच्छाशक्ति तुला केवळ निमित्तमात्र करीत आहे, इतकेंच !"

(२) लोकमान्य टिळक कविवर्य रवींद्रनाथ टागोरांस :— "आज आपल्या नांवें पन्नास हजार रुपयांचा निधि तारेनें पाठवीत आहें. त्याचा विनियोग आमच्या राष्ट्रीय आकांक्षांविषयीं अमेरिकेंत अनुकूल जागृति व शंकानिरसन करण्याकडे तुम्हांला वाटेल त्या रीतीनें करा !"

(३) श्री. न. चिं. केळकरकृत "मौजेचे चार प्रहरांतील" दुधाची धार अथवा गुप्त दान, ही गोष्ट मात्र स्वतः लेखकाच्या बालपणींच्या भावनाप्रधान आत्मानुभवावरच आधारलेली आहे.

(४) सौ. शांताबाई :–"म्हटलं, विठोबाच्या देवळांत मोठा साधु आला आहे. त्याचं दर्शन घेण्याकरितां बाळाला घेऊन संध्याकाळीं तिथं जायचं ना !"

(५) चिंतनशील ध्येयवादी लेखक (खंतीनें स्वतःशींच):-"मी कुठून या संसाराच्या जंजाळात सापडलों कुणास ठाऊक ! घरच्या किंवा शेजारच्या स्त्री-पुरुषांवर प्रेम करण्याची मला प्रेरणाच होत नाहीं; किंबहुना तशी फुरसत काढूं म्हटलं तरी साधत नाहीं ! कीर्तिध्येयाच्या प्रधान व शोषक हव्यासापुढं मला दुसरं तिसरं कांही सुचतच नाहीं !"

(३) तर त्याच लेखकाच्या "तोतयाचें बंड" नाटकांतील नाना व पार्वतीबाई यांजमधील सविस्तर हृदयस्पर्शी संवाद, हा अनुक्रमें चिकित्सात्मक तर्क व भोळी भावना, यांत भावनेवर चिकित्सा-बुद्धीची सरशी प्रतिपादणारा विरोधा-भासपूर्ण समरप्रसंगच होय !

(४) तिचा पति :–"कसला साधु नी काय घेऊन बसली आहेस ? त्याची योग्यता व अधिकार प्रथम नीट पारखल्यावांचून एकदम का त्याच्या भजनीं लागायचं !"

(५) संसारांतील आनंद लुटणारा गृहस्थ (आनंदानें स्वगत):—

"अहाहा ! संसारांत काय, निसर्गांत काय, जिकडे तिकडे प्रेम व आनंदीआनंद तुडुंब भरलेला आहे ! मात्र तो हुडकून काढण्याला तशी दृष्टि पाहिजे ! बालकाचे बोबडे बोल, बालिकेचें गोड गाणें, निर्झराचें मंजुळ गान, सागराचें गंभीर संगीत, तारकांची तेजोमालिका, निळसर नभोवितान, शीतल व सुखस्पर्शी वायु, हिरवीगार झाडी! एकुण ईश्वरानें संसारांत व निसर्गांत मोठ्या हातानें खैरात केली आहे म्हणावयाची! निष्प्रेम जिणं म्हणजे आत्महत्याच, दुसरं काय !"

(६) आसन्नमरण पित्याची घरघर पाहूनहि त्याचा मुलगा क्षणोक्षणीं मनोमय भावना बाळगतो :—"बाबा खास आणखी कांहीं दिवस काढतील !"

(६) डॉक्टर (हळूच शेजाऱ्याच्या कानांत):— "रोगी आतां कांहीं घटकांचाच सोबती आहे बरं!"

(७) नेपोलियन आपली दुःशील पत्नी जोसेफाईन इच्यासंबंधीं(स्वगत) "कसं काय कुणास ठाऊक, मला प्रतिक्षणीं अशी जणू अंतःप्रेरणाच होते कीं, मी लढाईत जिंकून आणलेल्या साऱ्या उत्तमोत्तम वस्तू जोसेफाईनला सप्रेम अर्पण कराव्या आणि तिच्या नेत्रांतील आनंदाभिमानाच्या दिव्य ऊर्मी नीट न्याहाळाव्या !"

(तिच्याशीं घटस्फोट झाल्यानंतर एल्बा मुक्कामीं असतांना)

"खरोखरीच जोसेफाईनचं माझ्यावर तसं प्रेमच आहे मुळीं ! खास ती मजसाठीं अजूनहि प्रेमानं झुरत असेल देखील !!"

(७) नेपोलियन (चिंतनशील वृत्तींत):— "हाय रे दैवा ! शेवटीं जोसेफाईन देखील माझ्याशीं विश्वासघातकी ठरावी ना ! मी येथें छावणींत शेकोटीपाशीं अंग शेकीत आहें खरा, पण याच वेळीं कदाचित् तिला भूलथापा देणाऱ्या एखाद्या बड्या कुटिल सरदाराच्या विशाल बाहुपाशांत ती हळूच छद्मी स्मित करीत असेल !"

(८) मराठींत लेखनव्यवसायावर चरितार्थ साधूं पहाणारा तरुण, अननुभवी होतकरू लेखक:—(एका क्षणीं मोहाच्या आधीन झाल्या वेळीं) (स्वगत)"माझ्या आवडीच्या विषयांवरील वाचण्यासाठीं काढून ठेवलेलीं सारीं पुस्तकें मारे बैठक मारून वाचून टाकावीं आणि मधून मधून लेखन करावं असं मला किती वाटतं

(८) दुसऱ्याच क्षणीं अंमळ विवेक केल्यानंतर:—"माझी घरची स्थिति गादीवर सुखानं लोळणाऱ्या गर्भश्रीमंतीची नसल्यामुळं कुटुंबाच्या योगक्षेमार्थ आणि गृहस्थाश्रमांचीं नियत कर्तव्यें पार पाडण्यासाठीं माझ्या मनाच्या कलाला अनुकूल व देहधर्माला झेपेल असा कसला तरी प्रामाणिक धंदा मला अवश्य केला पाहिजे.

म्हणून सांगूं ! पण हा निष्ठुर कला-हीन पोटाचा धंदा मागं लागला आहे ना ! या धंद्यावर एकदम 'अश्शी' लाथ मारूं का !"

इंग्रजी-हिंदीसारख्या इतर भाषांतील संपन्न व बहुसंख्य वाचकाच्या मानानें मराठींतील सुशिक्षित व रसज्ञ वाचकांची संख्या फारच अल्प असल्यामुळें मराठींत केवळ वाङ्मय विषयावर भारदस्त लेखन करून चरितार्थ साधणें अशक्य असा थोर व अनुभवी साहित्यसेवकांचा अभिप्राय कंठरवानें इषारा देत आहेच ना ! मग मागेंपुढें साधकबाधक विचार न करतां वाचन-लेखनाच्या मनस्वी हौसेच्या पायीं मी माझा चालत असलेला धंदा एकदम कसा सोडूं ! तसें मी करीन तर पुढें माझी कशी काय स्थिति होईल बरें !"

(९) घरचा माणूस मृत्यूच्या शरपंजरीं पडला असतां अनंत यातना सोसीत असल्यामुळें व त्याच्या भावी वियोगामुळें घरांतील त शेजारील आप्त मंडळी आपल्यापुरती अंतर्मुख दृष्टि करून रडते व दुःखीकष्टी होते.

(९) उलटपक्षीं ज्ञात्याची बहिर्मुख दृष्टि त्याच्या मृत्यूच्या निकट समयीं देखील 'आपण या जगांत अजून करायचें प्राप्त कर्तव्य असें फारसें राहिलेलें नाहीं', अशा कांहीशा समाधानाच्या तेजानें सभोंवारच्या विषण्ण वातावरणांतहि त्याच्या मुखावर स्मितयुक्त शांतीची क्षीण छटा उमटविते.

(१०) आत्यंतिक कीर्तिलालसेमुळें स्वतः आपल्या कुटुंबांतील मंडळीवर व इष्टमित्रांवर प्रेम करण्याचे प्रसंग ध्येयासक्त कलाभ्यासी हेतुपूर्वक

(१०) पण अशा जनाकडे 'लक्ष्य' (object) म्हणून पाहणारी त्याची माता, पत्नी व भाऊबहिणी त्याच्यावर प्रेम करतां करतां शेवटीं विन्मुख

टाळीत असतात. पण अतिमात्र कीर्तिलालसा झाली तरी आत्मैषणेचाच (self-love) तो एक प्रकार होय. म्हणून असे जन मोहनिष्ठच होत.

(११) अतिमात्र संसारासक्त गणपतराव (स्वगत)— "केवळ माझ्या बायकामुलांत माझी इतकी आसक्ति झालेली आहे कीं, प्रेमाच्या रूपानें तिचा अल्पांशहि इतर वस्तूंकडे झिरपण्यास शिल्लक नाहीं ! !"

(१२) शंभर टक्के 'कलेकरितां कला'या तत्त्वाचा निर्धास्त पुरस्कर्ता— "बस्स तें कांही नाहीं ! 'कलेसाठीं कला' हेंच खरें ! नीति-अनीतीच्या भेसूर बुजगावण्याची मला चिंताच नाहीं मुळीं !"

(१३) भुंकणारें कुत्रें बहुधा चावत नाहीं !

(१४) अंतर्मुख होऊन आपल्या आकांक्षा पूर्वीच सांगत सुटणाऱ्या

होतात. आणि त्याचा आत्मप्रत्यय आपल्या प्रेमाच्या प्रत्ययाविरुद्ध यावा ना, म्हणून निराशेचे उसासे टाकीत असतात ! मिळून असल्या प्रसंगीं आत्मप्रत्यय व परप्रत्यय या दोन आत्यंतिक टोंकांस चाटलेल्या या प्रतियोगी मनोधर्मांची एकमेकांशीं टक्कर होऊन प्रेमनिराशेचा विसंवादी सूर निघतो.

(११) योगिराज स्वामी ॐकारनाथ "ॐ सच्चिदानंदः शिवोऽहम् । प्रेम ! प्रेम ! या विश्वांतील अणुरेणूंत प्रेम व आनंद जणूं निथळत आहेत ! माझ्या प्रेमाचा परिघ उत्तरोत्तर वाढत असून प्रत्येक चराचर वस्तूवर मी नकळत वाढतें प्रेम करीत आहें!"

(१२) कला व नीति यांचें परस्पर नातें व पूरकत्व नीट जाणणारा चोखंदळ रसिक :—

"तें खरें...पण...कलेच्या सौंदर्याला नीतीचें सत्य व हेतूचें सौजन्य यांची उत्कृष्ट जोड लाभल्यासच या त्रिवर्गांच्या किमयेची उज्ज्वल प्रभा खुलून दिसेल, नाहीं का ?"

(१३) चावरें कुत्रें बहुधा भुंकत नाहीं !

(१४) आपल्या साऱ्या योजना मनांतल्या मनांत रचणाऱ्या धूर्त

विकाराधीन माणसाच्या मनांत एकदा बोलल्यानंतर मग काही फारसें रहात नाहीं !

कावेबाजाचें तोंड बंद असलें तरी त्याच वेळीं त्याचें मन बहिर्मुख होऊन आपल्याशींच गुप्त कारस्थानें रचीत सुटतें!

(१५) प्रसिद्धीसाठीं छापलेला उतावीळ लेखक ('विश्वोद्धार'मासिकाच्या संपादकास लिहिलेल्या पत्रांत)

"संपादक "विश्वोद्धार" यांसी सा. न. वि. वि. 'माझा विजापूरचा प्रवास'नामक प्रवासवर्णनात्मक सुंदर लेख मीं आपल्या लोकप्रिय मासिकांत प्रसिद्धीसाठीं गेल्या ता. १५।११।३४ रोजीं पाठविला होता. तो नापसंत ठरल्यास लगेच मला परत करण्याकरितां किंवा तो पसंत पडल्यास तसें मला तांतडीनें कळविण्याकरितां नऊ पैंचीं पोस्टाचीं तिकिटें मीं सोबत डकविलीं होतीं ! पुरते आठ दिवस आपल्या उत्तराची नित्य वाट पाहून थकून गेल्या ता. २३।११।३४ रोजीं आपणाला खास आठवणीसाठीं आणखी एक कार्ड लिहिलें तें वेळीं पोंचलें असेलच. आज दहा दिवस झाले ! त्याचेंहि आपणाकडून अजून उत्तर कसें तें नाहीं !! आम्हीं निर्हेतुक लेखनहौशीनें रात्रीचा दिवस करून लेख लिहून ते आपल्याकडे आपुलकीनें पाठवून दिल्याबद्दल हें खासें उत्तेजन म्हणावयाचें ! ! !'

(१५) नित्यशः येणारे अनेक लेखकाचे बरेवाईट शुद्धाशुद्ध लेख वाचतां वाचतां व निवडलेल्या लेखांचीं छापखान्यातून आलेलीं कच्चीं मुद्रितें तपासतां तपासतां मेटाकुटीस आलेला "विश्वोद्धार" मासिकाचा संपादक :-(स्वगत) "या लेखकांचे नुसते लेख वर वर वाचण्यालाहि मला सवड कशी ती मिळत नाहीं, मग त्यांचीं अगत्याचीं सूचनापत्रें पहाण्याचें दूरच राहिलें ! त्या "आर्याश्रित मुद्रणमंदिरा"च्या मालकाचा लकडा गेल्या आठवड्यापासून माझ्यामागें कसा एकसारखा लागलेला आहे ! त्याचा आंकडा तीनशें रुपयांवर भरतो ! ! एवढी मोठी रकम हुकमी कशी उभारणार ? 'विश्वोद्धारा'चे नियमित वर्गणीदार फारच थोडे ! फुकटे वाचक होण्याची हौस मिरवून व शेवटीं मासिकाची व्ही. पी. खुलासाहि न करतां बुडवून विनाकारण भूर्दंडाला मारणाऱ्या वाचकांचाच सुकाळ फार ! ! खरोखर, कोठून मला ही मराठींत मासिक संपादन करण्याची

परिणामीं अत्यंत किचकट व मनःशांतिक्षोभक प्रेरणा झाली, हरि जाणे! वाढत्या कामाचा उरक आवरण्यासाठीं चांगले हौशी सहाय्यक घ्यावे म्हटलें तर ते शोधूं जातां लाभत नाहींत; आणि पगारी कारकून बाळगावा तर तेंहि बिकट आर्थिक परिस्थितीपायीं परवडत नाहीं! पण हा माझ्या घरच्या अडचणींचा पाढा मी अनोळखी प्रसिद्धिलोलुप लेखकापुढें कोणत्या तोंडानें वाचणार!''

(१६) त्याची पत्नी— ''नाथ, आपण लेखनाचं हें विलक्षण खूळ केव्हां सोडणार!''

(१६) हातांत लेखनसाहित्य घेतलेला चिन्तनशील मनोवृत्तीचा लॉर्ड बायरन् (खोलींत सभोंवार टांगलेल्या थोर कवींच्या भावाचित्रांकडे पाहून)— ''मी कधीं एकदाचा 'प्रसिद्ध कवि' होणार!''

(प्रश्न)

(१७) पत्नी (तापानें फणफणणाऱ्या बाळास पाहून, पतीस)— ''किनई, बाळाला किती ताप आला पाह्यलं का! त्याच्याकरतां लौकर औषध आणायला हवं.''

(उत्तर)

(१७) वाचनलेखनांत गढून गेलेला 'लेखक' पति (पत्नीस)—''मला आतां एका क्षणाचीहि कशी ती उसंत नाहीं, समजलीस! दुपारीं माझ्या सवडीप्रमाणं बाळाला औषध आणल्यास चालणार नाहीं का! आतांच हवं असल्यास जवळचाच गडी शोधून आणीनास, म्हणजे त्याजबरोबर हवी तर मी डॉक्टराला चिठी देतों!''

(१८) भोळी आजीबाई (दूरच्या यात्रेला गेल्यावर कसली तरी एखादी खाण्याची वस्तु वर्ज करावी या पारंपरिक कल्पनेनें नातवास) – "मी काशीला जाऊन महाळुंग सोडलं बरं का, बाबू !"

(१९) शिष्य (मित्रास) – "मला पोहे फार आवडतात म्हणून मी ते माझ्या गुरुमाउलीला सादर अर्पण करतों."

(२०) शिष्य गुरूचे पाय चेपण्याची तळमळ मनांत येतांच ते बळेंच ओढून रगडूं लागतो.

(२१) कवि आपल्या कल्पनेचें जाळें आणि कोळी नामक किडा आपल्याच अंगांतील रसाचें जाळें कुशलतेनें विणतात !

(२२) को-ऑपरेटिव्ह क्रेडिट सोसायटींतील नादार ऋणकोचा एक सुखवस्तु जामीनदार सोसायटीच्या चेअरमनास अर्ज करतो :—

"आम्हां तिघां जामीनदारांपैकीं माझ्या हिस्शाची एक-तृतीयांश रकम आज घेऊन माझ्यामागचा जामीनकीचा भुंगा एकदांचा कायमचा चुकवा कसा !"

(१८) चिकित्सक नातू–"पण नित्याचा चहाच कां सोडला नाहीं?"

(१९) मित्र–"पण स्वतः गुरूची खाण्याची आवड नावड काय आहे याची आधीं कांही विचारपूस करशीलच कीं नाहीं?"

(२०) इच्छेविरुद्ध पाय चेपले गेल्यामुळें मनांतून विव्हळणारा पण बाहेर तशी छटा न दर्शविणारा गुरु (स्वगत)– "ईश्वरा, अशा शिष्यांपासून माझें रक्षण कर !"

(२१) इतिहासकार आपल्या कल्पनेला थारा न देतां घडलेल्या सर्व गोष्टींची सूक्ष्म तर्कानें चिकित्सा करून अचूक सिद्धान्त पाडतात.

(२२) चेअरमनचें उत्तर :—

"आपण भरलेल्या इतक्याच रकमेची पावती मिळेल. मात्र ती अंशतः फेडीची म्हणून; पूर्ण फेडीची म्हणून नव्हे ! कारण संपूर्ण कर्ज फिटेपर्यंत (तुम्ही) तिघेहि जामीनदार 'एकत्रित व प्रत्येकीं' (Jointly and severally) जबाबदार रहाणारच ! तसा तुम्हीं मूळ कर्जाचा करारच लिहून दिला आहे मुळीं !"

# मानवी मनाचे दोन कप्पे

## भावनाप्रधान कवींचा पंथ

माणसाच्या अंगांत तर्क व भावना यांचें कमजास्त प्रमाणांत उपजतच प्राबल्य असतें. कोणाचा तर्काकडे तर कोणाचा भावनांकडे ओढा अधिक झुकलेला असतो. भावनाप्रधान कवींचीच गोष्ट घेतली तर असें आढळतें कीं, ते भावनांच्या विशुद्ध प्रवाहासवें वहात असतांना त्याना मध्यें मात्र अकल्पितपणें इतके खांचखळगे भोंवतात कीं, त्यांमुळें त्यांच्या गतीला अडथळा होतो. परंतु अशा अडथळ्याना तरून व पुरून जाता येत नसलें तरी त्यांना वळसे घालून तो प्रवाह मिळेल त्या वाटेनें गति घेतच असतो. पण ज्या ठिकाणीं खडक त्याच्या आड येतात त्यांच्यावरून उडी घेताना किंवा त्यांना वळसा घेऊन नागमोडी वळणानें वहातांना त्या प्रवाहाची खळबळ होतेच ीं नाहीं ! भावनांची वरचढ असलेल्या प्रतिभावान् कवीची स्थिति बहुतांशीं अशीच असते म्हणाना. बालपणीं त्यांनीं अत्यंत उज्ज्वल ध्येयें आपल्या मनात रचलीं असतील ! परंतु ऐन तारुण्यांत अनुकूल परिस्थितीच्या किंवा स्वतः त्यांच्या मनाच्याच सबळ निश्चयाच्या अभावीं तीं गोड ध्येयें सत्यसृष्टींत उतरल्याचें पहाण्याचें भाग्य त्यांना बहुधा लाभत नाहीं. मग त्यांच्या निराशेला अगर आर्तत्वाला वाचा फुटून भावनांच्या तृप्तीचें समाधान प्रत्यक्ष वस्तुसृष्टींत नाहीं तर नाहीं, पण आत्मानुभूतीनें रंगलेल्या काव्यसृष्टींत तरी साधण्याची धडपड त्यांनीं केल्यास त्यांत वावगें तें काय ! कित्येकांना आयुष्याच्या प्रारंभीं बायरन् किंवा गिबन् यांच्याप्रमाणें तीव्र

प्रणयभंगानें पोळलें असेल. मग त्यांच्या हृदयस्थ प्रेमाचें जीवन त्यांनीं प्रत्यक्ष स्त्रीत नसलें तरी तिच्यासंबंधींच्या काव्यांत पहाण्याचें व उष्ण निःश्वास काढण्याचें केल्यास त्यात त्यांची चूक कोणती ? पण निव्वळ निःश्वासांनीं व्यापिलेल्या काव्यांनीं तितकासा अनुकूल परिणाम होत नाहींसें पाहून असे कवि पवित्र प्रेमभावानें झुरणारे नायक व नायिका काव्यांत निर्मितात व पुढें अनेक विघ्नांअंतीं त्यांचें परस्पर संमीलन घडल्याचें आनंदपर्यवसायी दृश्य किंवा त्यांची ताटातूट होऊन वियोगानें मृत्यु आल्याचें शोकान्त दृश्य ते रंगवितात; आणि अशा रीतीनें आपल्या पोळलेल्या मनाचें कसें तरी समाधान करून घेतात. तात्पर्य, भावनाप्रधान पंथाचे कवि आपल्या आर्त मनोधर्मांच्या कुंडात जगांतील साऱ्या घडामोडींचें स्वरूप जिरवून त्यांपासून असें एक अद्‌भुत रसायन काढूं पहातात कीं जेणेंकरून जगाचे डोळेच दिपतील !

## तर्कनिष्ठ विवेकवाद्यांचा पंथ

भावनेवर तर्काची सरशी उघड असते. तर्काधीन माणूस आत्मानुभूतीच्या व आत्मानुरंजनाच्या भावनेनें जगरहाटीकडे पहाण्याचें टाळून त्यांतील विविध घटना कसकशा घडत असतात, हें त्या घटनाच्याच भूमिकेवरून पहाण्यासाठीं धडपडत असतो व त्या घटनांमागील घटकांचें पृथक्करण करून कसोशीनें साधकबाधक सिद्धांत पाडतो. असा माणूस पूर्वायुष्यांत बहुधा भावनांच्या अडथळ्यानें तितकासा पोळलेला नसतो, किंवा तसा तो थोडाबहुत पोळलेला असला तरी त्याच्यावर साहजिकच विवेकी तर्कबुद्धीची मदार कायम असते. अशांची मूलभूत प्रवृत्ति काव्यासारख्या ललित कलांऐवजीं शास्त्रीय विभागांतील इतिहास, तत्त्वज्ञान व विमर्श इत्यादि रेखीव व काटेकोर प्रांताकडे वळते. आपल्याच हृदयवीणेच्या बेसुर तारा छेडून छेडून त्या सुरेल करण्याचे प्रयत्न करण्याऐवजीं दुसऱ्यांच्या वीणांच्याच काय, पण इतर विविध तंतुवाद्यांच्याहि तारा कशा असतात व त्या कशा अनुरणन करतात याची प्रक्रिया तज्ज्ञांकडून नीट समजून घेऊन व त्याच्यावर आपणहि सूक्ष्म बुद्धीनें विचार करून या विषयांचें साधेल तें व तितकें ज्ञान अहर्निश वै निरसलपणें मिळविण्याची तर्कबुद्धीची धडपड असे जन करीत असतात.

## गटेची विचारसरणी

प्रसिद्ध जर्मन कवि व नाटककार गटे हा अशा विवेकी व बहिर्मुख वृत्तीचा (objective) होता. कारण केवळ काव्यें व नाटकें रचूनच न थांबतां त्यानें विज्ञानशास्त्रासारख्या तर्काधीन अथांग महासागरांत निर्भयपणें दडी मारून त्यांतून कित्येक सिद्धांतमौक्तिकें बाहेर काढलीं. त्यानें आपल्या काव्यांतून व नाटकांतून जगांतील घटनांकडे आत्मानुभवी व आत्मलक्षी भावनांच्या रंगीत चष्म्यानें पहाण्याचें कटाक्षानें टाळलें असून, त्या घटना जशा दिसतात तशाच त्या कलादृष्टया रंगविलेल्या आहेत. एखादी वर्ण्य वस्तु दुसऱ्या कशासारखी आहे हें उपमेच्या योजनेनें भावनापूर्ण उद्गारांनीं भावनाप्रधान सम्प्रदायाचा कवि सांगतो, तर तर्कप्रधान संप्रदायाचा गटे ती कशी आहे हेंच थोडक्यात सागतो आणि पुढें कल्पना योजण्याचें काम आपण न करतां तें परभारें वाचकांवरच सोंपवितो.

## गिबन्‌चा प्रणयभंग

दुसरें उदाहरण प्रसिद्ध आंग्ल इतिहासकार गिबन्‌चें घेऊं. ऐन तारुण्यांत त्याचा बौद्धिक प्रणय कुमारी Curchod या फ्रेंच विदुषीशीं जुळून येऊन त्याचें रूपांतर वैवाहिक संबंधांत होण्याचेंहि घाटत होतें. परंतु गिबन्‌च्या मनोधर्मांत भावनेवर तर्काची सरशी व्यक्त असल्यामुळें त्यानें आपल्या विकारी भावनाना निर्दयपणें बाजूला सारून विवेकबुद्धीची कांस धरिली आणि इंग्लंडात आपल्या बापाला पत्र लिहून त्याची संमति विचारली. त्यानें ती झिडकारतांच गिबन्‌नेंहि हा जुळूं पहाणारा उत्कृष्ट संयोग निष्ठुर मनानें दूर केला. या प्रसंगाचें वर्णन करणारे उद्गार त्यानें आपल्या आत्मचरित्रांत गोंवले आहेत. ते भावना व बुद्धि यांतील उभ्या विरोधावर थोडक्यांत इतका प्रभावी विद्युत्प्रवाह पाडतात कीं ते खालीं उद्धृत करण्याचा मोह अनावर होतो.

एडवर्ड गिबन् आपल्या आत्मचरित्रांत म्हणतो :—

"………I soon discovered that my father would not hear of this strange (Anglo-French) alliance and that without his consent, I was myself destitute and helpless. After a painful struggle, I yielded to my fate. *I sighed as a lover, I obeyed as a son!*"

(भावार्थ :— "परंतु मला लगेच आढळून आलें कीं, माझ्या वडलांना या विचित्र (अँग्लो-फ्रेंच) संयोगाचा नुसता नामनिर्देशहि नको होता! आणि त्यांच्या संमतीविना तर मी अगतिक होतों! कांही काळ मला अतोनात मानसिक यातना सोसाव्या लागल्या; तरी मीं शेवटीं माझ्या नशिबाच्या कौलाला निमूटपणें मान तुकविली! मीं प्रणयी या नात्यानें निःश्वास सोडले पण पुत्र या नात्यानें पित्याच्या आज्ञेचें पालनच केलें!"

पुढें गिबन् आपल्या हृदयांतील नाजुक प्रणयभावनाना निष्ठुर मनानें दडपून स्विझरलंडमधील Lausanne या निवान्त व सुंदर गांवीं एकान्तांत राहूं लागला. आणि त्यानें कित्येक वर्षांच्या किचकट परिश्रमानें रोमच्या इतिहासाचीं साधनें गोळा करून व त्यांजवर तर्कानें आणि परिशीलनानें सिद्धांत पाडून "रोमन साम्राज्याची अवनति व अस्त" नांवाच्या प्रचंड इतिहासाचे खंड रचिले.

## या दृष्टिकोनांपैकीं अधिक सरस कोणता?

मानवी मनाच्या या द्विविध कप्प्यांतील मनोधर्मांपैकीं अधिक प्रभावी मनोधर्म तर्काधीनच होय, असें गटेचा आंग्ल चरित्रकार जॉर्ज हेन्री लुईस म्हणतो. पण सूक्ष्म विचार करतां असें दिसून येईल कीं, हे दोन दृष्टिकोनच मुळीं समान भूमिकेवर आधारलेले नसल्यामुळें पृथक्त्वानें त्यांच्या गुणधर्मांची चिकित्सा हवी तर करावी, पण त्याच्यापुढें जाऊन तुलनेनें एकमेकांची सरसनिरसता ठरवून त्यांच्यापैकीं अधिक सरस व प्रभावी कोणता यासंबंधीं निर्वाळा देणें, आंब्याची गोडी श्रेष्ठ कीं नारिंगाची चव श्रेष्ठ हें सांगण्यासारखेंच कांहींसें कठिण आहे! कारण आंब्यांत जशी संपूर्ण गोडी असते त्याचप्रमाणें नारिंगांतहि आम्ल व गोडी यांचा मधुर संयोग आढळतो. मग ह्या दोन्ही गुणांची एकल तुलना व पारख कशी काय करावी! पण इतक्या दूर जाण्याच्या भरीस न पडतां निरनिराळ्या पदार्थांमधील गोडींतहि कसें अनिर्वचनीय पण स्वसंवेद्य असें अंतर आहे, याचें प्रत्यंतर गुळाची चव व साखरेची चव यांत दिसून येतें. म्हणून अशा प्रश्नांची विचिकित्सा करणें व त्यांचें समाधान करूं पहाणें अप्रामाणिकपणाचें नसेल, पण त्यानें बुद्धिभेद होण्याचें टळत नाहीं इतकें खरें.

या निष्ठुर जगांत भावनेवर तर्कांची सरशी होते खरी, पण जगाच्या व्यवहारांतून ललित कलांच्या दालनांत उतरतांच त्यांतहि तोच न्याय तंतोतंत लागू पडतो असें म्हणतां येणार नाहीं. समजा एखाद्यानें भावनेवर भाळून दुसऱ्यावर विश्वास ठेवला आणि तो माणूस त्या व्यवहारांत सपशेल फसला तर तो लौकिक दृष्ट्या उपहासाला पात्र होईल. परंतु सहानुभवानें पोळलेलें असें दृश्य जेव्हां एखादा प्रतिभावान् कवि करुणरसात्मक गीतांत गोंवील तेव्हां तें एक 'दृश्य' म्हणून उपहासाला पात्र होईल काय ? उलटपक्षीं कवनांतील वंचित व भोळ्याभाबड्या नायकाविषयीं रसिक वाचकांच्या हृदयांत करुणरसात्मक भावविभावच तें उमटवील यांत शंका नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें माणसाच्या अंगच्या उपजत कलाप्रमाणें त्याची प्रतिभा या दोन दृष्टिकोनांपैकीं एखाद्याच्या आविर्भावांत रंगेल आणि पुढें त्यांत व्यासंग वाढविल्यास अधिक चिरस्थायी व भरदार कृति निर्माण करूं शकेल यांत शंका नाहीं.

## तुम्हांला आनंद हवा कीं समाधान हवें ?

आतां प्रत्यक्ष जीवनसुखाच्या कसोटीच्या दृष्टीनें या द्विविध दृष्टिकोनांमधील सरसनिरसता ठरविणें हा प्रश्न मात्र तितकासा वादग्रस्त दिसत नाहीं. इतिहास, गणित, तत्त्वज्ञान यांच्यासारख्या सूक्ष्म प्रज्ञेच्या व्यापक प्रांतांत विहार करणारांना होणारें बुद्धिनिष्ठ समाधान आणि भावनोद्रेकानें काव्यें रचणाऱ्या कवीस होणारा भावनापूर्तीचा आनंद यांत असा एक भेद दाखवितां येण्यासारखा आहे कीं, पहिल्या प्रकारांत सिद्धांतसिद्धीपासून मिळणाऱ्या प्रज्ञेच्या समाधानाचें स्मित असतें, तर दुसऱ्या प्रकारांत भावनांना मोकळी वाट पाडून दिल्याची हृदयाच्या शांतीची प्रसन्नता असते. यापैकीं अधिक सरसनिरस कोणतें तें ठरविण्याच्या खोल पाण्यांत मी न शिरतां येथें इलूच सुचवितों कीं, प्रज्ञेच्या तेजाळ दीप्तीनें दिपलेला रसिक बहुधा गारव्यासाठीं भावनेच्या शीतळाईच्या जवळपास फिरकेल, पण भावनांच्या कारंजाच्या तुषारांनीं न्हाऊन निघणाऱ्याला प्रखर बुद्धीच्या धगीकडे जाण्याची प्रवृत्ति सदैव होईलच असें म्हणणें कठिण.

## प्रतिभा प्रकारभेदानें बदलते

कारण पहिल्या प्रकारांत प्रतिभा बुद्धीच्या गगनांत विहरते तर दुसऱ्या प्रकारांत भावनेच्या जलाशयांत डुंबते. वास्तविक मानवी प्रतिभा तीच आणि तिचा आवेगहि तितकाच असूनहि तिला मिळालेला प्रवाह, साधनें व आनुवंशिक संस्कार निरनिराळे असल्यामुळें तिच्या परिमाणांत नसलें तरी परिणामांत म्हणजे प्रकारांत फरक पडतो. उदाहरणार्थ मनाच्या दोन कप्प्यांची महती तुलनेनें सुचविणारी खालील लोककथाच ऐका.

एकदा फ्रान्स, इंग्लंड व जर्मनी या देशांतील एकेका प्रतिनिधीला परीक्षेसाठीं एके ठिकाणीं बोलावण्यांत आलें आणि त्यांना त्या वेळीं अज्ञात असलेल्या उंटाच्या स्वभावधर्माविषयीं सांगोपांग निरीक्षण करून निबंध लिहिण्यास सांगितलें. फ्रेंच माणूस उठला तो एका तासाच्या आंत त्यानें कशी तरी घाईनें चौकशी करून माहिती मिळविली. आणि इतक्या बऱ्या वाईट विशेषणांची खैरात करून आपला निबंध भारविला कीं, त्यांच्या धुक्यांत त्यानें नवीन असें कांही तरी काय सांगितलें याचीच परीक्षकांना भ्रांत पडली ! इंग्रज पूर्वेकडे प्रवासास निघाला आणि तेथें त्यानें दोन वर्षेंपर्यंत छावणी ठोकून उंटाच्या प्रकृतिधर्माचें व संवयींचें बारकाईनें सांगोपांग निरीक्षण केलें आणि आपल्या प्रतिपाद्य विवेचनाचें एक भलें मोठें बाड बरोबर घेऊन तो परतला. पण त्यांतील रचनेंत व्यवस्थित संगति कशी ती नव्हती ! आणि फ्रेंच माणसाचा भावनाप्रधान छचोरपणा व इंग्रजाचा सरळ पण निष्ठुर व बेडौल सत्यकथनाचा आव यांच्याविषयीं जर्मन माणसाला मनांत सारखाच तिटकारा वसत असल्यामुळें, त्यानें आपल्या खोलींत स्वतःस कोंडून घेतलें आणि आपल्या मानीव कल्पनांच्या अहंकारपूर्ण जाणिवेनें तो उंटाची प्रतिमा स्वतःच्या कल्पनासृष्टींतून विणण्याचा अट्टाहास करिता झाला ! आणि अशी आख्यायिका आहे कीं, बिचाऱ्याचें चिंतन अजून संपून संपल्यासारखें वाटत नाहीं !

वरील उदाहरणांत देशपरत्वें प्रतिभेच्या संस्काराच्या प्रकारांत मानववंशशास्त्राच्या दृष्टीनें कसा फरक पडतो हें थोडक्यांत उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे. मानवी मनाच्या द्विविध कप्प्यांपैकीं भावनेच्या कप्प्यांतून

प्रतिभेचे तिरपे किरण सोडणारा फ्रेंच माणूस, वास्तवतेच्या व निष्ठुर तर्काच्या सुदृढ पायावर उभा असलेला पण सौंदर्यदृष्टीला कांहीसा पारखा असलेला काटक इंग्रज, आणि या दोनहि प्रकारांहून सर्वस्वीं भिन्न अशा तिसऱ्याच प्रकाराची, कल्पकतेच्या पोटातील जर्मनाची सदोष, अंतर्मुख प्रतिभा यांची एकमेकांशीं तुलना करतां आली तरी त्यांची कारणमीमांसा करूं पहाणें कठिणच किंबहुना वेडेपणाचेंच ठरत नाहीं काय !

## प्रतिभा व उपजत मनोधर्म

प्रतिभेच्या मूलतत्त्वांत जगांतील वस्तुमात्रातील साम्य-वैधर्म्यांचा विरोध हुडकणें हा गुण अत्यंत प्रभावी आणि म्हणून आवश्यक असला तरी तिच्या प्रकारांत एखाद्या व्यक्तीच्या भावनाप्रधान किंवा तर्कप्रधान मनोधर्माप्रमाणे अवश्य तो फरक पडतो. उदाहरणार्थ:— शेक्सूपियर आपल्या कल्पना-सृष्टीच्या खाणींतून जिवंत प्रतिमांचे सुवर्णकण काढतो आणि त्याना वास्तवतेच्या अग्नींतून तावून सुलाखून बाहेर काढून तें विशुद्ध सुवर्ण आपल्या उज्ज्वल प्रतिभाविलासाच्या लीलेनें वाचकापुढें ठेवतो. हा मनाच्या कप्प्याचा बहिर्मुख धर्म झाला.

कवि बायरन्‌ची प्रतिभा याच्या उलट असे. कल्पनासृष्टींतून सत्य सृष्टीचा आभास खुलविणाऱ्या प्रतिमा रंगविण्याऐवजीं तो स्वतःच्याच भग्न स्मृतींच्या व भावी आकांक्षांच्या यज्ञकुंडांतून कल्पित ध्येयाचीं तेजोवलयें निर्माण करतो आणि त्याच्या निर्मितींत आपल्या प्रतिभेचा संचार उघड दाखवितो. म्हणजे हा मनाच्या कप्प्याचा अंतर्मुख धर्म झाला.

समजा गोल्डस्मिथ्, बायरन्, शेले, लॉंगफेलो, गडकरी यांच्यासारखे अंतर्मुख वृत्तीचे व कमजास्त प्रमाणांत भावनेच्या सौंदर्याला किंवा आर्तत्वाला वाचा फोडणारे कवि जर कवनें रचूं लागले तर त्याची प्रतिभा भावनाच्या आविष्कारांत दंगणार नाहीं काय ! स्वतःचीं कोणतीं तरी व्यंगें टाळता आलीं नाहींत व ध्येयसिद्धीच्या आड काटे पसरले म्हणून त्या दुःखद स्थितीच्या जाणिवेनें त्यांचीं हृदयें विव्हल होणार नाहींत काय ! कदाचित् एखाद्याची बायरन् किंवा फिट्‌झिरॉल्ड कवीप्रमाणें आयुष्याच्या आरंभीं म्हणजे ऐन तारुण्यांत तीव्र स्त्रीप्रेमनिराशा झाली असेल किंवा

अन्य कारणानें तो हृदयाची शांतीच गमावून बसला असेल, तर अशा जनांचा प्रतिभेचा ओघ बाध आड आलेल्या पाण्याच्या लोंढ्याप्रमाणें निराळा मार्ग धरून त्यांतच लीलेनें उडत जाणार नाहीं काय ! तात्पर्य भावनेच्या प्रांतांत त्यांचीं निष्पाप व सौंदर्यरत मनें आनंदानें हांसत बागडत असतां आरंभींच त्यांस अचानक कठोर धक्का बसला तर अशा जनांत, त्यांच्या अंगीं जळजळीत प्रतिभेचें ओज असल्यास, तें भावनांच्या द्वारें अंतर्मुख होऊन व्यक्त होईल यांत मुळींच शंका नाहीं.

उलटपक्षीं शेक्स्पियर, गटे, स्कॉट, कालिदास, व्यास, वाल्मीकि इत्यादि प्रतिभावंतांची प्रज्ञा बहिर्मुख प्रवृत्तीची असल्यामुळें, ती आपल्या स्वतःच्या अनुभवांत व मनोमय कल्पनांतच रंगण्याऐवजीं जगांतील सृष्ट पदार्थांच्या व व्यक्तिमात्रांच्या मागील घटनांचा अभ्यास करण्यांत ती दंगली. म्हणून ती अंधारातील सभोंवारचा प्रदेश आपल्या प्रखर दीप्तीनें दिपवूं शकली.

वास्तविक प्रतिभा तीच, परंतु अंतर्मुख वृत्तीच्या (Subjective) पोळलेल्या जनांकडे जातांना ती अंतर्लक्षी 'क्ष'-किरणांचें स्वरूप कशी पावते आणि बहिर्मुख वृत्तीच्या (Objective) जनांकडे जातांना बहिर्व्यास विद्युत्प्रकाश कशी बनते हें तिचें उपजत मूळ स्वरूप जितकें चिंतनीय तितकेंच अद्‌भुत व अतर्क्य वाटल्याविना रहात नाहीं. रसिकांना तर मनाचे हे द्विविध कप्पे जसे हवे त्याचप्रमाणें तदंगभूत प्रतिभेचे हे दोनहि प्रकार हवेच आहेत. कारण तेणेंकरून भावना व तर्क या दोनहि महत्त्वपूर्ण दालनांत आलटून पालटून त्यांना यथेच्छ विहरतां येईल. आणि अशा विविध-घटनापूर्ण विरोधांपासून व चमत्कृतींपासून मनाचा शीण घालवून ताजा हुरूप मिळवितां येईल. तसेंच या दोनहि मूलगामी प्रवृत्तींची महति नीट पुरतेपणीं पारखता येऊन त्यांच्या जिज्ञासेला शांतितृप्तीचें एक मुख जोडता येईल. आणि हा फायदा थोडाथोडका का आहे !

---

# इतिहासकार गिबन्चें आत्मचरित्र

माणसांचे स्थूल मानानें दोन प्रकार पाडतां येतील. कांहीं माणसांचें जीवित बाल्यापासून बहुविध असतें. त्यांचें घर समाईक कुटुंबांतील मंडळींनीं सदा गजबजलेलें असावयाचें. त्यांच्याशीं दररोज संघटन घडत गेल्यानें अशा जनांच्या कोवळया मनोभूमीवर लहानपणापासून विशिष्ट संस्कार पुरते रुजतात. अर्थात् एकलकोंडें कुढें जीवन त्यांना नकोसें होतें आणि साऱ्या जीवमात्रांपासून आनंद चाखण्याप्रमाणें जगांतील विविध व अद्भुत घटनापासून बहुरूपी आनंद सेवण्यासाठीं त्यांची प्रकृति सदैव हपापलेली असते. 'आपण किनई मोठा कर्ता आहें, कृतविद्य आहें, आपल्याइतका थोर दुसरा कोणी नाहीं, म्हणून इतरांच्या सहवासाचें आपल्याला विशेष महत्त्व तें काय' असा अभिनिवेश त्याच्या ठायीं क्वचित्च आढळतो. जीवनांतील आनंदाबरोबरच त्यातील दुःखेंहि भोगण्याचे प्रसंग त्यांना आयुष्यांत वारंवार येतात आणि म्हणून ते अखेरपर्यंत 'कच्चे' न राहतां अनुभवाचें जडजूड लाटणें खाल्लेले पक्के 'नामदेव' बनतात. अशांचा जीवनपट अर्थात्च त्यांच्या आयुष्यातील बऱ्यावाईट रोमहर्षक प्रसंगांनीं गजबजलेला असल्यामुळें त्यांच्या नुसत्या विस्कळित आठवणीहि अत्यंत उद्बोधक व स्फूर्तिदायक ठरतात. मग स्वतः त्यानींच अपरूप कौशल्यानें आत्मचरित्रपटच रंगविण्यास हातीं घेतला तर तो अत्यंत वाचनीय ठरतो इतकेंच काय, तर त्याच्यावर आबालवृद्धांच्या उड्यांवर उड्या पडतात हें काय सांगितलें पाहिजे !.

दुसऱ्या प्रकारचेहि कांहीं हातभागी जन जन्माला येतात. आणि खरो-

खर त्याना हतभागी म्हणावयाचें नाहीं तर काय ! अशा जनांचा बहुधा गर्भश्रीमंतांच्या पोटीं जन्म, घरात पुष्कळशी मंडळी नसायची, म्हणून भावनांची भट्टी रसरसून भाजण्याचे प्रसंगच न यावयाचे. याचा परिणाम मनाच्या तुसड्या, एकलकोंड्या व अहंभावपूर्ण वृत्तींत होऊन तो विद्यार्थिदशेंत व पुढें उत्तर आयुष्यातहि जनसमर्दांचा अनुभवानंदच टाळावयाचा व म्हणून त्याला मुकावयाचा, आणि आपल्या निष्प्रेम व रखरखीत जीविताच्या सहारा वाळवंटात एखादे आसऱ्याचें हिरवेंगार सुखस्थान लाभायला हवें म्हणून प्रत्यक्ष जगातील घटनाचा संपर्क होतां होईल तों टाळून, एखादें वैयक्तिक अलौकिक ध्येय गाठून त्याच्यावर आपल्या बुद्धिवैभवाचें (तें असल्यास) सारसर्वस्व वेंचायचा, आणि तेणेंकरून उघड धकाधकीच्या मामल्यात धैर्यानें उडी घेऊन जनसेवा केली नाहीं तर नाहीं, पण आपल्या ध्येयविषयांत तरी आपलें कौशल्य दाखवून त्याचा वचपा असा भरून काढून जनाचा आदर व कदाचित् कीर्तिशिखरहि गांठावयाचें, हा दुसऱ्या प्रकारच्या जनाचा संकल्प असतो.

इंग्लंडचे डॉ. जॉन्सन् व गोल्डस्मिथ, इटलीचा मॅझिनी, फ्रान्सचा नेपोलियन्, स्पेनचा सर्व्हांटेस, आमच्या आर्यावर्तांतील लो. टिळक, म. गांधी व जवाहरलाल नेहरू यांचीं चरित्रें किंवा आत्मचरित्रें इतकीं वाचनीय, उद्बोधक, स्फूर्तिदायक व अजरामर ठरतात याचें मर्म झाले तरी घडामोडीच्या व धडाडीच्या अद्भुत प्रसंगांनीं खचून भरलेल्या त्यांच्या ओजस्वी जीवनप्रसंगांतच हुडकावें लागेल.

कारण वर सांगितल्याप्रमाणें त्यांचें जीवन केवळ वैयक्तिक अनुभवांच्या, कोळ्याच्या सुकुमार जाळ्यानीं विणलेलें नसतें. मला वाटतें, खळबळणाऱ्या तुफान दर्यात इतस्ततः हेलकावे खाल्ल्यानंतर शेवटीं विश्रांतीसाठीं एखाद्या सुरक्षित आसऱ्याच्या ठिकाणीं संथपणें नांगर टाकलेल्या गलबताचीच उपमा अशांच्या जीविताला शोभण्यासारखी आहे. कारण हें गलबत वरकरणीं संथपणें उभें टाकलेलें दिसतें खरें, पण एके काळीं खवळलेल्या सागराच्या तुफान लाटा तोडून तें आपला मार्ग कांटीत असतां त्याची गति संथ होती असें म्हणतां येईल काय !

उलटपक्षीं कित्येक चरित्रें व आत्मचरित्रें प्रामाणिक साक्षेपानें लिहिलीं

असूनहि व भाषेच्या जिल्हईनें सजविलेलीं असूनहि मुळांत घटनात्मक प्रसगांच्याच अभावीं नीरस व पोकळ ठरतात व पहिल्या प्रकारच्या चरित्रांच्या मानानें तर अत्यंत फिक्की पडतात यात नवल काय ? म्हणून या दुसऱ्या प्रकारच्या चरित्रनायकांविषयीं एकवार आदर वाटतो पण प्रेमा मात्र तितकासा वाटत नाहीं ! कारण ज्या भडक भावनात्मक अथवा अद्‌भुत घटनात्मक बऱ्यावाईट प्रसंगात चरित्रनायकाच्या हृदयाच्या भावनांना आव्हान मिळतें व तजेला चढतो तेच नेमके प्रसंग वाचकांच्या हृदयांतील सहानुभवी तारा सूक्ष्मपणें छेडण्यास समर्थ ठरतात. आणि जेथें अशा प्रसंगाचेंच नेमकें दुर्भिक्ष्य असतें तेथें वाचकाना प्रेमाचा जिव्हाळा कसा वाटेल बरें ?

प्रस्तुतचा आत्मचरित्रनायक एडवर्ड गिबन् दुसऱ्या प्रकारच्या थोर व्यक्तींच्या मालिकेंत सामावण्यासारखा आहे. त्यानें सतत वीस वर्षें निरलसपणें खपून "रोमन साम्राज्याचा ऱ्हास व नाश" नांवाचा सहा खंडांचा प्रचंड व अजरामर इतिहासग्रंथ रचिला. ऑगस्टाईन बिरेल नावाचा इग्रज टीकाकार म्हणतो, "गिबन्‌नें रोमन साम्राज्याचा अत्यंत भव्योदात्त इतिहास लिहिला पण स्वतः त्या इतिहासकाराचा इतिहास लिहिण्याचें राहून गेलें होतें. म्हणून त्याचा इतिहास व आत्मचरित्र या दोन अमर कृति एकमेकाना पूरकच होत. इतिहास आम्हाला आत्मचरित्राकडे पाठवितो आणि उलट आत्मचरित्र आम्हांला इतिहासाकडे परतवितें असा हा दुहेरी दुवाच म्हणाना !"

दुसरा एक टीकाकार प्रो. स्मीटन म्हणतो, "गिबन्‌चें आत्मचरित्र प्रामाणिकपणे चित्रिलेलें आहे; त्याचे गुणदोष त्यांत सारखेच मुक्तहस्तानें रंगविलेले आहेत." इत्यादि

तिसरा एक टीकाकार प्रो. बेरी आपल्या विवेचक प्रस्तावनेंत लिहितो, "आत्मचरित्रांतील गिबन् म्हणजे इतरासारखा नाहीं हो तो ! प्राणी मोठा संयमी आहे ! म्हणाव, रंगभूमीवर राहून श्रोत्यापुढं भाषण करणाऱ्या एखाद्या कुशल नटाची संयमशील भूमिका त्याची आहे ! रूसो किंवा गटेसारख्या इतर थोर आत्मचरित्रकाराप्रमाणं कांही तो स्वतःला भलतीकडेच वाहवून जाण्यास सोडीत नाहीं ! त्याच्या आठवणी किती वास्तविक आहेत

आणि त्याच्या कथनाचा झोक तरी किती नैसर्गिक आहे !"

वरील टीकाकारांनीं उधळलेला गुणगौरव पाहून हें आत्मचरित्र मोठ्या उत्कंठेनें वाचण्यास हातीं घेणाऱ्या वाचकाच्या माथीं माझ्याइतकीच निराशा बसली नाहीं म्हणजे नशीब म्हणावयाचें ! कारण गिबन्चा पूर्वोक्त इतिहासग्रंथ कितीहि अजरामर असला तरी—किंबहुना म्हणूनच—त्याचें आत्मचरित्रहि तितकेंच अजरामर असलें पाहिजे असें जे बिरेल वर म्हणतो तें तितकेंसें यथार्थ नाहीं. दुसरें, गिबन्च्या आत्मचरित्रात प्रो. स्मीटन म्हणतो त्याप्रमाणें गुणदोष तितक्या प्रमाणांत मुक्तकंठानें निरूपिलेले आढळत नाहींत. माणसांचा सहवासच मुळीं कटाक्षानें टाळून इतिहास-ग्रंथाच्या अजस्र ढिगात डोकें खुपसून बसणारा गिबन् आपले अनुभव लिहिण्यास बसला म्हणजे त्यांना नकळत एखाद्या रूक्ष व अहंमन्य पंतोजीच्या अभिनिवेशाचें स्वरूप येतें. मग तो आपली भाषाशैली कितीहि घोटेना व प्राचीन ग्रीक-रोमन लेखक-वक्त्यांच्या अनुकरणानें वक्तृत्वशैलीची तिला कितीहि पुटें देईना ! त्यात कोमल भावनाचा होम होऊन त्या चितेवरील विरल व धूसर धूरच दिसावयाचा ! गिबन्च्या इतिहासांतील तर्कात्मक ओजस्वी घटना वाचताना आदरानें डोलणारा वाचकवृंद स्वतः इतिहासकाराचेंच तर्ककर्कश, भावनाविहीन जीवन पाहून उद्गारेल— "इतक्याकरताच का या लेखकानें आत्मचरित्र लिहिण्याची इतकी यातायात सोसली ? भावनातर्कांच्या द्वंद्वाचा कांहीं तरी दुर्लभ संगर अथवा संगम पहाण्यास मिळतो तर पहावा म्हणून मोठ्या जिज्ञासेनें हें आत्मचरित्र आम्हीं बुद्ध्या आणून वाचले तों काय ! येऊन जाऊन आपण रोमन साम्राज्याच्या इतिहासग्रंथाची रचाई कशी केली, आपला वाचन-लेखन-व्यवसाय कसकसा पद्धतशीरपणें वाढत गेला, व आपली खोंचदार व सफाईदार लेखनशैली कशी साधली या व अशाच गोष्टी सांक्षेपानें आर्जवून ज्यात सांगितलेलें आहे, व इतर वैयक्तिक एकांगी माहिती ज्यात मधून मधून आहे, असें नीरस पुराण ! तेणेंकरून कांहीं अस्सल लेखन-व्यवसायेच्छूंचा फायदा होईल कदाचित्; पण सामान्य इतरेजनांची वाट काय ? त्यांनीं अशा आत्मचरित्रापासून बोध तो काय घ्यावा ? बोध, मनो-

रंजन व मनोविकास असे त्रिविध प्रकार ज्यांत सारख्याच प्रमाणांत सामावलेले आहेत अशीं चरित्रें किंवा आत्मचरित्रें कशीं हृदयंगम वठतात !"

गिबन्चा समकालीन असलेला ओजस्वी व जोरदार गद्यशैलीचा जनक सुप्रसिद्ध पंडित डॉ. जॉनसन्, नर्मविनोदी व गुळगुळीत लेखनशैलीविषयीं प्रसिद्धि पावलेला कविवर्य गोल्डस्मिथ, विद्वान् चित्रकार सर जोशुआ रेनॉल्डस्, उपजत नटवर्य व अभिनयपटु संभाषकवर्य गॅरिक, अशीं नररत्नें ज्या साप्ताहिक 'जॉनसन' क्लबमध्यें वावरत होतीं आणि ज्यांच्या सूक्तिरत्नांची अत्यंत उज्ज्वल प्रभा चोहींकडे फांकून लंडनची धवल कीर्ति सारा युरोपखंड उजळवीत होती, त्यांत गिबन्हि मधून मधून चमकत होताच. पण तो निव्वळ आपल्या उंची तपकिरीच्या डबीशीं लीलेनें खेळणारा अबोल व आढ्यताखोर पंडित म्हणून ! मग त्या क्लबाचा किंवा त्यांतील थोर थोर व्यक्तींचा आपल्या आत्मचरित्रांत ओझरता परिचयहि करून देण्याचें व तें असें विटाळण्याचें त्यानें सुखासुखी कां म्हणून पतकरावें ? पण छे ! मी विसरलों. तें प्रसिद्ध इतिहासधुरंधर, लेखनपटु, बहुभाषाभिज्ञ, पंडितमान्य, गिबन्चें आत्मचरित्र होय ! पुढें योग्यतेस चढलेल्या गुणदोपलाछित सामान्य पुरुषाचें चरित्र नव्हे !

गिबन्नें आत्मचरित्रांत आपल्या समकालीनांचा नुसता ओझरता स्पर्शहि टाळल्यानें तें एक त्याच्या अहंमन्य आढ्यताखोरीचें अढळ प्रदर्शन म्हणून कोणीहि त्याच्यावर दोषारोप चिकटवितील यांत शंका नाहीं. पण जेव्हां प्रो. स्मीटनसारखे आधुनिक चरित्रसंपादक त्याच्या आत्मचरित्रात दिसून येणाऱ्या 'संयमाची' वर सांगितल्याप्रमाणें मनमुराद स्तुति करतात आणि दोषालाच गुण म्हणत सुटतात तेव्हां त्याला काय म्हणावें ? गिबन्च्याविषयीं कींव उत्पन्न होते तर त्याच्या या टीकाकारांच्या विलक्षण मल्लिनाथीमागील धाडसाचें कौतुक करावेंसें वाटतें !

आत्मचरित्राचा प्रधान हेतु काय ?

कलाकोविदांच्या किंवा शास्त्रज्ञांच्या आत्मचरित्रवाचनामुळें त्यांच्या कलाकृतींच्या गुणग्राहकतेंत स्वसंवेद्य भर पडते व त्यांच्याविषयीं उत्कंठा व आदर दुणावतात.

चरित्रापेक्षां आत्मचरित्राची थोरवी अधिक कां ?

तर त्यांत चरित्रलेखकाऐवजीं स्वत: चरित्राविषयच आपले गुणदोष व बरे-वाईट अनुभव, खडकांना व रोपट्यांना वळसे देऊन उडी घेत धांवणाऱ्या गर्जणाऱ्या लोंढ्याप्रमाणें, अत्यंत जिव्हाळ्यानें सांगण्याच्या निमित्तानें, वाचकांना आपल्या हृदयसंपुटांत खोल दडून बसलेले गूढतम विचारविकार इतक्या मोकळेपणानें, जणूं हासत-बागडत, उकलून व उलगडून दाखवूं शकतो म्हणून ! आणि जितक्या प्रमाणांत त्याच्या आयुष्यांतील संबध जगांतील घनघोर आपत्तींशीं किंवा मृदुमधुर प्रेमोपासक प्रसंगांशीं विविधार्थानें व उत्कटतेनें येतील तितक्या प्रमाणांत तें सजीव, ओजस्वी उद्बोधक व मनोविनोदनात्मक ठरेल.

एखाद्या सर्वोत्कृष्ट कादंबरीच्याइतक्याच आवडीनें महात्मा गांधींच्या किंवा जवाहरलाल नेहरूसारख्यांच्या चरित्रांवर जगांतील वाचकांच्या इतक्या उड्या पडतात व त्यांच्या अल्पावधींत आवृत्त्यांवर आवृत्त्या काढाव्या लागतात तें कां ? तर, त्यांत आत्मचारित्रनायक आमच्यासारखाच गुणदोषांचा सामान्य पुतळा असून कांहीं थोड्या गुणाचा मात्र त्याच्या ठायीं प्रकर्षानें विकास झालेला असतो आणि त्याचे दोष आमच्यापेक्षांहि कित्येकदा भडकच असतात, ही जाणीव आमचें समाधान व उत्कंठा सारखीच वाढवूं शकते हें एक प्रधान कारण होय. थोर व्यक्तींविषयीं सामान्य जनाच्या अतिमानुषत्वाच्या कल्पना असतात ! पण त्याच्या चरित्रवाचनानें या भ्रमाचा भोपळा भंगतो; आणि त्या व्यक्ति पुष्कळ बाबतींत आमच्या-तुमच्यासारख्याच सामान्य व्यक्ति होत कीं ! या जाणिवेमुळें त्यांच्यासंबंधीं एकप्रकारचा सहृदय जिव्हाळा उद्भवतो व तो पुढें वाढतोहि. या दृष्टीनें गिबनचे समकालीन डॉ. जॉन्सन्, गोल्डस्मिथ व गॅरिक, स्पेनचा विनोदमूर्ति सर्व्हांटेस, जर्मनीचा नाटककार शिलर इत्यादि लेखकांचीं चरित्रें उगाच का अजरामर झालेलीं आहेत ? एक तर त्यांचें जविनच मुळांत अत्यंत अद्भुत-घटनापूर्ण होतें; गिबन्‌च्यासारखें एकलकोंडें व एकांगी नव्हतें. आणि 'आडांत आहे तें पोहऱ्यांत यायचेंच' असा म्हणींत थोडासा फरक करून अर्थेहि

म्हणतां येईल कीं, त्यांच्या जीवनांतील थोडींच प्रतिबिंबें जरी त्याच्या चरित्रकासारात उमटलीं तरी तीं सार्वकालिक ठरतात. मग अशा चरित्र-नायकांनींच आत्मचरित्रें लिहिण्याचें मनांत आणल्यास तीं कशीं काय उतरतील या मानसिक सुखसंवेदनेची हुरहूर ती काय वर्णावी !

म्हणून अशा थोर व्यक्तींचीं चरित्रें किंवा आत्मचरित्रें कादंबऱ्यां इतकीच–किंबहुना त्यांहूनहि–सरस व हृदयगम ठरतात. कारण कादंबरींत कल्पनेचाच अंश पुष्कळ असतो; पण हीं चरित्रें पावलोपावलीं इतक्या रम्याद्‌भुत विविध घटनांनी खचून भरलेलीं असतात कीं, 'सत्य हें कित्येकदा नवलकथेपेक्षांहि अद्‌भुत असतें' ही म्हण तीं सार्थच करतात.

आतां रोमच्या इतिहासग्रंथामागील दुव्याचा उलगडा करण्याच्या दृष्टीनें गिबन्‌च्या आत्मचरित्राची विशेष महती आहे असें जें प्रो. बेरी वर म्हणतो त्या दृष्टीनें मात्र त्याच्यापासून काही बोध घेण्यासारखा आहे ही गोष्ट मान्य. पण तेवढ्याच दृष्टीनें तें आत्मचरित्र वाचणारे कितीसे आढळतील !

प्रो. बेरी म्हणतो :—"इतिहासाभ्यासूंना इतिहासकाराच्या चारित्र्याची किंमत फार ! एकुण भूतकालाची कोणाची तरी प्रतिमा म्हणजेच इतिहास होय हें सत्य कोठें आताशा हळू हळू उलगडूं लागलें आहे. आणि जो कोणी ती प्रतिमा चितारतो त्याची त्या वेळची मनःस्थिति, संवेदना व अनुभव यांची मर्यादा त्या प्रतिमेला बाधल्याविना कशी राहील ! नुसत्या तारखा व वंशावळी या बाहिर्‍यांत घटना म्हणतां येतील. पण त्यांच्यामागील कारणें व हेतु हुडकून त्यांची कसोशीनें छाननी करून व त्यांचा सुंदर समवाय साधून, फिरून सर्व उपलब्ध सामग्रीची पुनर्रचना करणें, या कामांत केवळ बहिर्गत दृष्टिकोनाचेंच प्रयोजन नसून अंतर्मुख व सूक्ष्मदर्शी दृष्टिकोनाची फार आवश्यकता आहे. आणि त्याच्याविना तो इतिहास पोकळच ठरेल ! आणि येथेंच तर इतिहासकाराच्या मानस-प्रतिभेच्या उड्डाणाचा प्रश्न उद्भवतो. इतिहासलेखकापासून त्याचा इतिहास वगळतां येत नाहीं, किंवा लेखकाच्या काळापासून स्वतः लेखकाची फारकत करतां येत नाहीं. आणि इतिहासकारानें वर्णिलेल्या भूतकालाची थोरवी पुरती उकलायची असेल तर कोणत्या विशिष्ट संस्कारांमुळें

त्याच्या मनोभूमीला इष्ट वळण लागलें आणि त्याच्या जीवितगोष्टींचीं बाह्य स्वरूपें कोणतीं हें जाणण्याची उत्कंठा वाचकांचें मन कुरतडते."

गिबन्‌सारख्या इतिहासकाराच्या चरित्राची आवश्यकता वर प्रो. बेरींनीं कथिलीच आहे. पण ती त्या व्यक्तीच्या सर्वांगीण चरित्राऐवजीं इतिहासकाराच्या वाङ्मयचरित्रापुरती मर्यादित करून त्या दृष्टीनें कोणी आत्मचरित्र लिहिल्यास किंवा त्याचें चरित्र लिहिण्यांत आल्यास, आणि वाचकांची देखील तितकीच अपेक्षा असल्यास मग मात्र हा वाद मिटतो. इतिहासकाराची मनोभूमिका कसकशी बनत व विकसत गेली हें कळण्याकरितां गिबन्‌सारख्याच्या घरच्या रूक्ष व रसहीन कर्मकथा वाचकांनीं कां म्हणून निमूटपणें ऐकाव्या ? तो प्रवासी, कवि, कादंबरीकार किंवा योद्धा थोडाच होता ! म्हणून घरच्या व सभोंवतालच्या वातावरणाचा इतिहासकाराच्या बालमनावर थोडाच परिणाम होतो !

इतिहासकाराची प्रज्ञा प्रायः स्वतंत्र असते. घरचें वातावरण ती पोषवूं किंवा दोषवूं शकत नाहीं. मात्र, निवांतपणें व नेमानें प्रचंड बौद्धिक कार्य करण्याइतकें भरपूर चित्तस्वास्थ्य, प्रकृतिस्वास्थ्य, सुसंपन्नता, श्रमक्षमता व बुद्धिवैभव त्याला लाभलीं कीं बहुतेक कार्यभाग साधल्यासारखाच. त्याला जनसमूहाचा सहवास शक्य तों टाळणेंच इष्ट असतें. म्हणून कित्येकदां असेंहि वाटतें कीं, हा मुख्यतः दैवाचा प्रश्न असतो. इतिहासकार होण्याइतकें किंवा अधिक बुद्धिवैभव असूनहि अनुकूल दैवाच्या अभावीं आंग्ल कवि 'ग्रे'नें म्हटल्याप्रमाणें 'रद्दींत पडलेलीं रत्नें' थोडीं का जगांत आढळतात ! म्हणून गिबन्‌सारख्या इतिहासकाराच्या जीविताच्या बाह्य स्वरूपापेक्षां त्याच्या दैवाधीन सुसंपन्न आर्थिक स्थितीकडेच आशेचे दीर्घ निःश्वास सोडण्यापलीकडे तरी गरीब पण होतकरू लेखक अधिक काय करूं शकतो !

रोमच्या साम्राज्याच्या इतिहासाचे खंड लिहिण्याचें अवजड काम संपल्यानंतर आपल्या वयाच्या बावन्नाव्या वर्षी गिबन्‌नें आत्मचरित्र लिहिण्यास हातीं घेतलें. पण तें नीट जुळवून ग्रंथासाठीं त्यांत अवश्य त्या सुधारणा करण्यापूर्वीच तो उदराच्या विकारानें वारला. म्हणून हें काम त्याचा

विश्वासू मित्र लॉर्ड शेफील्ड याच्यावर पडलें. त्यानें या आत्मचरित्रांतील आठवणी एकत्र गोंवून गिबन्‌च्या इच्छेप्रमाणें त्याच्या मृत्यूनंतर त्या प्रसिद्ध केल्या. त्यांत भाषाशैलीच्या किंवा सुसंगतीच्या दृष्टीनें जे कांही दोष आहेत त्याला वर सांगितलेलें कारण आहे.

## गिबन्‌चें आत्मचरित्र

गिबन् आत्मचरित्राच्या प्रस्तावनेंत म्हणतो, "महत्त्वाचें यशस्वी कार्य उरकल्यानंतर हें काम मी हातीं घेत आहें. सारी लाज व भीड सोडून निर्भेळ सत्य सांगणें इतकाच या आत्मचरित्राचा हेतु आहे. स्वतःचें विनोदन व आनंद हाच माझा हेतु आहे आणि तेंच माझें फळहि आहे. माझ्या मृत्यूपर्यंत हा मजकूर वाचकांपासून लपविण्यात यावा. ज्या माणसानीं आपल्या मनाच्या कांही प्रतिमा मागें ठेवलेल्या असतात अशांचें चरित्र पडताळण्याची जनतेला नेहमीं उत्सुकता असते. कोणत्याहि पंथाचा विद्यार्थी असो, त्याच्या जीवितार्शी समरस असलेल्या चरित्रनायकांच्या चरित्रांपासून त्याला धडा किंवा दृष्टांत मिळूं शकेल. माझ्या विचारविका-रांची ठेवण व माझ्या कृति यांचें वर्णन करण्याला स्वतः माझ्याइतका दुसरा कोणीहि लायख व अधिकारी जन नाहीं हें मी जाणतों."

एडवर्ड गिबन्‌चा जन्म सरे नामक परगण्यांतील पुटने या इंग्लंडांतील गांवीं ता. २७ एप्रिल १७२७ रोजीं झाला. त्याच्या बापाचें नावहि एडवर्ड व आईचें नांव ज्युडिथ पोर्टेन. गिबन्‌चा बाप चागला सुशिक्षित व सुसंस्कृत गृहस्थ म्हणून त्याची गावभर ख्याति होती. शिवाय तो पिढी-जाद श्रीमंत असून त्याला जमीनजुमला बराच होता. त्याच्या पहिल्या मुलानंतर त्याला पांच मुलें व एक मुलगी झाली. पण तीं सर्व कोंवळ्या वयांतच मृत्यु पावलीं आणि आमचा चरित्रनायक मात्र जगला. गिबन्‌च्या अजाणतेपणींच त्याचे भाऊ वारल्यामुळें त्यांचें सुखदुःख अनु-भोगण्यास तो असमर्थ होता. पण त्याच्या बहिणीच्या आयुष्याची दोरी थोडी अधिक लांबली होती म्हणून तिच्या मृत्यूमुळें गिबन् हळहळला. तो म्हणतो— "अविवाहित बहीण भावंडांचा परस्पर संबंध मला केवळ अनुपम वाटतो. लिंगाच्या मुग्ध व गूढ गुणविशेषांमुळें त्यांच्यामधील

सहानुभूतीला मार्दव चढतें. आणि म्हणून त्यांजमधील लोभ अनर्था-पासून अलिप्त आणि वासनारहित प्रेमप्रकाराचा (Platonic love) एकच एक प्रतीक असूं शकतो.''

गिबन्ची प्रकृति उपजतच 'तोळा मासा' होती. हें हाडकुटें मूल जगून पुढें मागें नाव काढील असा मुळींच भरंवसा नव्हता. म्हणून त्याच्या वारलेल्या बंधूंच्या 'बाप्तिस्माच्या' वेळीं देखील त्यांचीं 'एडवर्ड' हीं पित्या-चींच नांवें ठेवण्यात आलीं होतीं ! हेतु हा कीं, थोरला मुलगा वारल्यास हें आनुवंशिक नांव दुसऱ्या बंधूपासून तरी पुढें कुटुंबांत चिरस्थाई लेखण्यांत यावें व गिबन् घराण्याचा वंशवृक्ष नांवानें तरी निर्मूल होऊं नये !

गिबन्च्या आईचे दिवस सुखसमाधानांत असे गेलेच नाहींत. बिचारी वारंवार बाळंतपणाचीं दुःखें व पुढें अपत्यनाशाचे शोक भोगतां भोगतां जेरीस आली. पण गिबन्च्या सुदैवानें तिची वडील बहीण सौ. कॅथेराईन पोर्टेन हिनें गिबन्चें प्रत्यक्ष मातेपेक्षाहि अधिक जिव्हाळ्यानें लालनपोषण करून त्याची सर्व तऱ्हेची चिंता वाहिली व त्याला कसलीहि कमतरता भासूं दिली नाहीं. म्हणूनच तिचें नांव काढतांच गिबन्च्या डोळ्यांत कृतज्ञतेचे प्रेमाश्रु येत असल्यास नवल नाहीं. तिला मूलबाळ नव्हतें. तिनें आपलें अपत्यप्रेम बहिणीच्या या पहिल्याच मुलासाठीं राखून ठेवलें. गिबन्चा उपजत पंगूपणा पाहून तिला दया आली. त्याच्या बिछान्यापाशीं बसून तिनें किती तरी रात्री जागून काढाव्या. याचा परिणाम मात्र नकळत असा झाला कीं, गिबन्च्या शरीरस्वास्थ्यासंबंधीं तिनें चिंता वाहतां वाहतां त्याच्या मनाच्या पोषणाची व संवर्धनाची आबाळच झाली. शाळेंत त्याला घातल्यानंतर तो वारंवार आजारी पडूं लागला, आणि शिक्षणाची साखळी वारंवार तुटत गेली.

गिबन् विद्यार्थिदशेंत स्मरणानेंच पाढे पाठ करण्यांत हुषार होता. आणि त्यानें हें अंग वाढविल्यास तो कदाचित् चांगला गणितशास्त्रज्ञहि झाला असता. गिबन्ला सातवें वर्ष लागल्यानंतर जॉन कर्कबी नांवाच्या शिक्षकाच्या हवालीं त्याला केलें. त्यानें गिबन्ला अठरा महिनेपर्यंत शिक्षण दिलें. भाषाविषय व शिक्षणशास्त्र या विषयांवर त्यानें बराच विचार केला होता. तो गिबन्चा शिक्षणक्रम घाईनें सोडून निघून गेल्यामुळें गिबन्चें

फार नुकसान झालें.

गिबन्च्या नवव्या वर्षी डॉ. वुडेसन नांवाच्या दुसऱ्या एका मुख्याध्यापकाच्या शाळेंत त्याला पाठविलें. ममताळू व ऐदी वातावरणांतून अशा निराळ्या जागीं मुलांना पाठविण्यांत आलें कीं त्यांच्या आचारक्रमांत फरक पडतो. गिबन्चा लाजरा संकोची भाव इतर विद्यार्थ्यांच्या संगतीनें बराच बुजला. पण त्याची शरीरयष्टि किरकोळ होती. म्हणून त्याला क्रीडांगणावरील खेळात भागीदार होतां येईना.

दरम्यान मधून मधून गिबन्चा किरकोळ आजार असावयाचाच. तेणेंकरून त्याच्या अभ्यासाला खंड पडत असे. इतक्यांत त्याची आई शेवटल्या बाळंतपणांत वयाच्या अडतीसाव्या वर्षी एकाएकीं वारल्यामुळें त्याला १७४७ सालीं घरीं जावें लागलें. तेव्हा गिबन् लहान होता. तो म्हणतो— "माझ्या बापाच्या दुःखाला पार नव्हता. त्याचें कोणी सांत्वन करूं शकला नाहीं. या दुःखाची परमावधि इतकी झाली कीं, तेणेंकरून त्याच्या जीविताला किंवा प्रज्ञेलाच धक्का बसेल कीं काय म्हणून भीति वाटली !"

बिचाऱ्यानें पत्नीचा मृत्यु मनास फार लावून घेतला, गजबजलेलें लंडन शहर सोडलें आणि ब्युरिटन नांवाच्या प्रशान्त खेड्यांत जाऊन त्यानें स्वतःला जणूं पुरून घेतलें ! पण गिबन्चा बहुतेक काळ शिक्षणापायीं लंडनांतच गेला. बरोबर त्याची मामी असे. ती त्याच्या प्रकृतीची व मनःसंवर्धनाची डोळ्यात तेल घालून चिंता वाही. ती चांगली सुसंस्कृत होती. इंग्लिश भाषेंतील कांहीं उत्कृष्ट ग्रंथ वाचून ती सस्कारक्षम झालेली होती. हिंदुस्थानातील सारी गडगंज संपत्ति देऊं केली तरी आपलें वाचनव्यसन सोडण्यास आपण बिलकूल राजी नसल्याचें गिबन् सागतो ! तें व्यसन तिच्या संगतीनें व शिक्षणानेंच त्याला लागलें यांत शंका नाहीं.

डॉ. वुडेसनची शाळा सोडण्यापूर्वी गिबन्नें 'पोपचें होमर काव्य' व 'अरबस्थानांतील सुरस व चमत्कारिक गोष्टी' वाचलीं होतीं. या दोनहि पुस्तकांत मानवी विचारविकारांचें चलत् चित्र असल्यामुळें तीं केव्हांहि वाचनीयच ठरतील असें तो म्हणतो. पोपच्या काव्यांतील तालबद्ध चरणांनीं

गिबन्‌ला काव्यातील स्वरमिलाफाची श्रवणमधुर गोडी प्रथम कळली. गिबन्‌च्या आज्याचें साधारणसें ग्रंथालय होतें. त्यांतील वाटेल तें आवडीचें पुस्तक मथळ्यावरून चटकन हेरून तो नेहमीं वाचीत पडत असे.

गिबन्‌च्या मातामहाची आर्थिक स्थिति कंगाल होती. गिबन्‌च्या मामीला चाळीस वर्षें होऊन गेलीं होतीं. पण तिच्या योगक्षेमाची योग्य योजना नव्हती. म्हणून तिनें वेस्टमिन्स्टर शाळेला जाणाऱ्या विद्यार्थ्यांसाठीं भोजनालय काढलें.

डॉ. जॉन निकॉल नावाचा ज्याचा मुख्य अध्यापक होता अशा शाळेंत तिनें गिबन्‌ला घातलें. पण गिबन्‌च्या शारीरिक व्याधीनें त्याचा जणूं पिच्छाच पुरविण्याचें ठरविलें होतें ! येथेंहि त्याला व्याधीनें ग्रासलें. म्हणून त्याला बाथ येथें नेण्यांत आलें आणि तेथील झऱ्याच्या पाण्यानें त्याची व्याधि हटविण्याचा प्रयत्न झाला. त्याला आतां एक प्रकारची स्नायुबद्धतेची व्याधि जडली होती. तेणेंकरून त्याला पाय मोकळे सोडतां येईनात ! आणि तसे सोडण्याचा प्रयत्न केल्यास मोठी कळ येत असे. पण उष्ण झऱ्यांत केलेल्या स्नानानें ही व्याधि सुधारली नाहीं. तेथून विंचेस्टर येथील एका डॉक्टरकडे गिबन् गेला. त्याचाहि कांहीं उपयोग झाला नाहीं. म्हणून फिरून बाथ येथें उष्णोदकाचे झरे अंगावर घेण्याकरितां तो आला. त्याच्या मनानें तर भीतीच घेतली कीं, आपण जन्मभर असाच अर्धशिक्षित पंगु रहाणार कीं काय ! पण सुदैव काय असेल तें असो, सोळाव्या वर्षीं त्याची प्रकृति एकाएकीं सुधारली, व्याधीचा लवलेशहि नाहींसा झाला आणि तो दुप्पट जोमानें आपल्या अत्यंत आवडीच्या विद्याभ्यासाच्या मागें लागला.

पण या आजारांत गिबन्‌ला अवांतर वाचनाचें इतकें जबरें व्यसन लागलें होतें कीं, त्याला आतां शाळेंतील नियमित अभ्यासक्रमाचा अतिशय कंटाळा येऊं लागला ! तो इतका कीं, आपल्या अंगचें व्यंग आणखी कांहीं वर्षें जीव धरून राहिल्यास फार चांगलें झालें असतें असेंहि त्याच्या मनांत आलें ! पण त्याच्या अवांतर वाचनाची आगगाडी क्रमेण इतिहासविषयाच्या रुळाकडे झुकूं लागली. जागतिक इतिहासाचे खंड त्यानें नुकतेच कसोशीनें वाचले होते. त्यामुळें त्याला इतिहासविषयाची अवीट गोडी लागली.

इतिहासाच्या या अवांतर व अत्यंत विस्तृत वाचनामुळें वाङ्मयाची व भाषा-विषयांची गोडी त्याला आतां तितकीशी लागेनाशी झाली. तो कादंबऱ्यां-प्रमाणेंच इतिहासाचे ग्रंथ बैठक मारून सपाटयानें वाचून काढूं लागला. हिंदु-स्थान व चीन, मेक्सिको व पेरू अशा दूरदूरच्या देशांच्या इतिहासांचीं त्यानें नुसतीं पारायणें केलीं! तत्पूर्वी इंग्रजी भाषेंत अरब, टार्टर व टर्क जनांगां-विषयीं जितकी म्हणून माहिती उपलब्ध होती तितकीहि त्यानें वाचून काढली. पण अशा अघळपघळ अवातर वाचनाने त्याला पद्धतशीर विचार करतां येत होता, लिहितां येत होतें किंवा कोणताहि कार्यक्रम आंखता येत होता, असें मात्र थोडेंच होतें !

शेवटीं त्याच्या बापानें जेव्हां त्याला ऑक्सफर्डच्या प्रसिद्ध विश्वविद्याल-यांत पाठविलें तेव्हां त्याच्यापाशीं एखाद्या पडिताच्या तोंडांत मारण्याइतकी पुस्तकी विद्वत्ता होती, पण तिच्याबरोबरच प्रत्यक्ष जगाचें इतकें अज्ञान होतें कीं तेणेंकरून कोणताहि विद्यार्थी खचित ओशाळला असता! ऑक्स-फर्डला जेव्हां गिबन् गेला तेव्हां तो पंधरा वर्षांचा होता.

गिबन्चें बालपण व्याधींत एकलकोंडेपणांत गेल्यामुळें बाल्यांतील आनंद त्याला कसा तो ठाऊक नव्हता. पण त्याचा स्वभाव धीरगंभीर, संयमशील व सहिष्णु होण्यास त्यामुळें थोडेंफार साह्यच झालें असावें.

याच वेळीं गिबन्नें आपला पहिला ग्रंथ रचण्याचें मनांत आणलें. स्वतंत्र विद्या पदरीं नाहीं, पद्धतशीर विचार करण्याची अजून संवय जडलेली नाहीं, पदरीं लेखनपटुत्व नाहीं, अशा नवख्या स्थितींत हें विलक्षण धाडस त्याच्या मनांत आलें खरें. या नूतन निबंधाचें नाव 'सिसोस्ट्रीसचा काळ' हें होय. फ्रेंच लेखक व्हॉल्टेरकृत 'चौदाव्या लुईचें युग' या ग्रंथापासून त्याला चेतना मिळाली. तेव्हां त्याचें वय अवघें पंधरा होतें. पण प्रत्यक्ष लेखनाला प्रारंभ करतांच अडचणींचे डोंगर त्याच्यापुढें नुसते 'आ' वासून उभे ठाकले !

ऑक्सफर्डला जेव्हां गिबन् फिरून गेला तेव्हा त्यानें अर्थात् आपल्या या नूतन ग्रंथाचा संकल्प रहित केला. पण हीं वेडींवांकडीं टांचणें पुढें वीस वर्षेंपर्यंत त्याच्या मेजांतील खणांत तशींच पडून राहिलीं होतीं ! शेवटीं

१७७२ इसवीच्या नोव्हेंबर महिन्यात अडगळीची आवराआवर करतांना तीं एकदांचीं अग्नीला समर्पण करण्यात आलीं !

दरम्यान गिबन् व त्याचा बाप याच्यांत तीव्र विरोध उद्भवणारी एक विलक्षण घटना घडली ती अशी. गिबन्चा प्रॉटेस्टंट पंथ होता. पण गिबन् कोणास न कळवितां ता. ८ माहे जून १७५३ रोजीं एका पाद्रयापाशीं गेला आणि त्यानें रोमन कॅथोलिक पंथाची विधिपूर्वक दीक्षा घेतली. ही गोष्ट त्याच्या बापास कळतांच त्याच्या अंगाचा नुसता भडका उडाला ! पण गिबन्च्या कोंवळ्या वयाकडे पहाता त्याला कसें सुधारावें याचीच त्याला भ्रांति पडली !

पुष्कळ विचार करून शेवटीं त्यानें असा निर्णय केला कीं, गिबन्ला शिक्षणासाठीं स्विझर्लंडमधील लॉसेन नांवाच्या आरामदायक, निवांत व हवेशीर ठिकाणीं पाठवावें आणि तेथें त्याचें हें उतावळें धर्मवेड सुधारतें का पहावें. लगेच त्याची परिपूर्ति देखील झाली. पॅव्हिलिअर्ड नांवाच्या एका विद्वान् पाद्रयाच्या घरीं त्याच्या जेवणाखाणाची व शिक्षणाची सोय करण्यांत आली. इकडे गिबन्चा बाप आपल्या बंडखोर मुलाला हांकून लावण्याचा व त्याचें तोंडहि न पहाण्याचा निश्चय करीत होता, तर तिकडे बिचारा मुलगा मनातल्या मनात म्हणत असे कीं, 'माझा बाप आपला निश्चय कृतींत बहुधा आणणार नाहीं.'

पण लॉसेनच्या या अभिनव वातावरणांत दुसरेंच एक संकट उद्भवलें ! युरोपांत सर्वत्र देशभाषेखालोखाल फ्रेंच भाषेची चलती आहे. आणि गिबन्ला तर ती चागली अवगत नव्हती. म्हणून ती प्रथम शिकणें त्याला भाग पडलें. कोठें ऑक्सफर्डचें वैभवशाली विद्यापीठ आणि कोठें लॉसेनची अंधारी, भिकार कोठडी ! पण पित्याच्या रोषाचें फळ भोगणें त्याला थोडेंच चुकणार होतें ! गिबन्नें तेथें पांच वर्षें काढलीं. थोड्याच दिवसात तो फ्रेंच भाषेंतून बोलण्यास व लिहिण्यास शिकला आणि तो स्वगृहीं जाण्यापूर्वी त्याचा फ्रेंच भाषेंत इतका सराव वाढला होता कीं, इंग्रजीपेक्षां फ्रेंच भाषाच त्याला अधिक जवळची वाटूं लागली ! शिक्षकाच्या ग्रंथालयांतील एकूण एक पुस्तक त्यानें वाचून काढलें. लॉसेनच्या चागल्या चागल्या मंडळींशीं त्याचा परिचय घडून आला. आणि याच

सुमारास त्याचा डेव्हरडन् नांवाच्या सद्‌वृत्त तरुणाशीं परिचय घडून येऊन त्याचें क्रमेण अखंड गट्टींत रूपांतर झालें.

गिबन्‌चा गुरु पॅव्हिलियर्ड याची बुद्धि सुसंगत होती व हृदय मोकळें होतें. पुष्कळ वर्षांच्या अनुभवानें तो अध्यापनाच्या कार्यांत वाकबगार होता. एकसारखें वाचन-मनन करणें यापरतें गिबन्‌ला दुसरें काय ठाऊक होतें ! पण नुसत्या वाचनावरच न रहाता सततपणें विचार करण्यासहि कसें शिकावें याचें पद्धतशीर शिक्षण प्रथम पॅव्हिलियर्डनेंच त्याला दिले. सन १७५३ ते १७५५ पर्यंत गिबन्‌चें या शिक्षकाखालीं शिक्षण झालें. याविषयीं गिबन् लिहितो, 'सामान्य माणसाच्या दर्जापासून डोकें वर काढलेल्या विद्यार्थ्यानें द्विविध शिक्षण पचविलेलें असतें. पहिले शिक्षण गुरुमुखांतून; दुसरें शिक्षण, जें अधिक वैयक्तिक व महत्त्वाचें असतें, तें मात्र स्वतःपासून ! मला किती प्रमाणात शिकवावें व केव्हां मोकळें सोडावें हे माझ्या गुरूला चांगलेंच अवगत होतें. क्रमेण त्यानें मला स्वतंत्रपणें विचार करण्याची दिशा दाखवून मला मोकळा सोडून दिला. वेळेचा भरपूर उपयोग साधता यावा म्हणून मी उत्तरोत्तर नित्य प्रातःकाळीं उठण्याची संवय केली व ती अभ्यासानें माझ्या अंगवळणींहि पडली. रात्रभर जागरण करून डोळ्यांबरोबरच प्रकृतीचाहि नाश करून घेण्याची दुष्ट सवय मी मुळांतच लावून घेतली नाहीं याचें मला फार समाधान वाटतें.'

गिबन् म्हणतो, 'माझ्या पहिल्या प्रणयप्रसंगाचा उल्लेख करतांना लोक माझा उपहास करतील अशी मला भीति वाटते !' 'गुन्हेगाराचें मन, त्याचें त्यालाच खातें' या न्यायानें गिबन्‌ची भीति साधारच ठरते. कशी ती पहा.

लॉसेन येथें गिबन् शिकत असतां सुझॅन करचॉड नावाच्या सुंदर फ्रेंच कुमारिकेशीं त्याचा परिचय घडून आला. तिचें बुद्धिवैभव असामान्य व सद्‌गुण अपरूप होते. तिची संपत्ति यथातथाच होती पण तिचें घराणें लौकिकवान् होतें. तिचा बाप क्रॅसी येथील चर्चांत पाद्री होता आणि त्याचें उत्पन्न थोडेंच होतें. सुझॅन त्याची एकुलती एक मुलगी म्हणूनच कीं काय त्यानें तिच्या शिक्षणापायीं पाण्यासारखा पैसा खर्चिला होता. शास्त्रें व वाङ्मयप्रकार यांत तिची गति सारखीच अनिरुद्ध चालत असे.

आणि जेव्हां ती लॉसेनच्या आपल्या नातेवाईकांना भेट देण्यासाठीं येई तेव्हां तिच्या कोटिगर्भ उक्ति, तिचें दिव्य सौंदर्य आणि तिची विद्वत्ता व रसिकता यांची छाप सर्वत्रांवर पडून त्यांची ती लौकरच कौतुकविषय बनली असल्यास नवल नाहीं. गिबन्नें तिची कीर्ति ऐकली, तिला प्रत्यक्ष डोळे भरून पाहिलें आणि लगेच त्याचें प्रेम तिच्यावर जडलें. गिबन् म्हणतो—

"मला ती चारुगात्री पांडित्यप्रकर्षाविना विदुषी, संभाषणांत चतुर, भावनात पवित्र व वागणुकींत सुरेख दिसली. बरगंडीच्या डोंगराच्या पायथ्याशीं असलेल्या तिच्या घरीं मीं दोन खेपा घातल्या. तिच्या आई-बापांनीं आमच्या प्रेमसंबंधाला संमति दिली व पुढें उत्तेजनहि दिलें. मला असेंहि वाटलें कीं, मीं एका सुशील व निष्पाप हृदयाचे धागे मजकडे आकर्षून घेतले खरे ! पण काय योगायोग पहा ! मी इंग्लंडला जातांच मला असें आढळून आलें कीं, माझा पिता या विलक्षण भावी संयोगाच्या पुरता विरुद्ध होता ! आणि त्याच्या संमतीविना तर मी अगतिक व निराधार होतों ! तेव्हां माझ्या मनाचा किती क्षोभ झाला असावा हें सांगण्याच्या भरीस फारसा न पडतां थोडक्यांत इतकेंच सांगतों कीं, मीं शेवटीं माझ्या दैवाला निमूटपणें मान दिली ! मीं वल्लभ या नात्यानें निराशेचे उष्ण निःश्वास सोडले; पण पुत्र या नात्यानें आज्ञापालन केलें ! माझ्या मर्मस्थानीं झालेली ही खोल जखम पुढें काळ, स्थलांतर व नवीन व्यवसायाचा व्याप यांनीं हळू हळू बुजूं शकली ही गोष्ट वेगळी. तथापि या प्रणयभंगा-नंतरहि ती साध्वी गंभीर व आनंदीच राहिलेली पाहून माझा तिज-विषयींचा नितांत आदर दुणावला आणि आमच्या प्रणयाचें रूपांतर पुढें मैत्रींत व लोभांत झालें. पुढें त्या बिचारीचा बाप वारला आणि स्वतःच्या व आईच्या निर्वाहासाठीं तिला लॉसेन येथील तरुण कुमारींच्या शिक्षणाचा एक खाजगी वर्ग उघडावा लागला. मध्यंतरीं हें उज्ज्वल रत्न नेकर नांवाच्या पॅरिसच्या एका धनाढ्य पेढीवाल्याच्या दृष्टीस पडलें आणि आता ती याच भाग्यवंताची गृहलक्ष्मी म्हणून वावरत आहे." असो.

गिबन्च्या रुक्ष पण दुर्बल स्वभावाची पारख होण्यास वरील एकच कारण पुरेसें आहे. बापाविरुद्ध उघड बंडखोरी करून रोमन कॅथोलिक पंथ

वरणारा हा मानी तरुण लग्नासारख्या जन्माच्या गांठींत मात्र त्याच्या आदेशाला आपल्या मनाविरुद्ध मान तुकवतो या विचित्र घटनेची संगति एरवीं लावतां येणें कठिण. मात्र गिबन्‌विषयीं वाचकांच्या आदराला या घटनेनें पहिला जोराचा धक्का बसतो यांत तिळमात्र शंका नाहीं. अथवा गिबन्‌ला तरी यांत दोष लावण्यांत काय प्रयोजन! बालपणांतच त्याच्या भावनांचें रोंपटें प्रेमळ सहवासाच्या झऱ्याविना सुकत आलें होतें! लॉसेन येथील परकी वातावरणांत तर त्यानें पुस्तकांतच डोकें खुपसलें! मग तें क्षीण रोपटें मरून गेल्यास त्यांत आश्चर्य कसलें!

म्हणूनच प्रारंभीं उल्लेखिल्याप्रमाणें भावनाविहीनांचीं किंवा बुद्ध्या भावना मारलेल्यांचीं चरित्रें इतकीं रूक्ष व ठरीव भासतात. पुढें पुढें तर त्यांचा हा दुर्गुण इतक्या विकोपास जातो कीं त्याला 'संयम' या नांवाची पाटी त्यांच्या स्तुतिपाठकांकडून बळेंच अडकविण्यांत येते! म्हणून गिबन्‌च्या गळयांत कु. करचॉडसारखी विदुषी पडली असती असें क्षणभर गृहीत धरलें तरी प्रत्यक्ष तिला कितीसें अपेक्षित संसारसुख मिळूं शकलें असतें हें एक कोडेंच आहे! किंबहुना तसें तें लाभलेंच नसतें असें प्रसिद्ध फ्रेंच तत्त्ववेत्ता रूसो म्हणतो.

गिबन्‌च्या शिक्षणाचीं जीं काहीं फळें दिसूं लागलीं त्याचें कारण त्यानेंच म्हटल्याप्रमाणें त्याला लॉसेन येथील अज्ञातवासात निवांतपणें काम करण्यास भरपूर चित्तस्वास्थ्य व प्रकृतिस्वास्थ्य लाभलीं हें होय. मग यात स्वतः गिबन्‌विषयीं कौतुकास जागा ती कोठें आहे! उदाहरणार्थ, रवींद्रनाथ टागोरांसारख्या गर्भश्रीमंतींत व गर्भविद्वत्तेंत लोळणाऱ्या दैववानाची जेव्हां कविवर्य म्हणून जगभर स्तुति होते तेव्हां आम्हांस आनंदच होतो. पण त्यांत नितांत कौतुकाचा अंश कितीसा असतो! पाण्याच्या अनुकूल प्रवाहाबरोबर होडी वल्हवीत जाण्याइतकें सौभाग्य लाभलेल्या नावाड्याची कोणीहि स्तुतीच करील; पण उलट दिशेनें धैर्यानें प्रवाहाचें पाणी कांट-णाऱ्या निधड्या नावाड्याविषयीं आमची काय भावना असते किंवा असावयास पाहिजे!

सोळा ते एकवीसपर्यंत गिबन्‌च्या वयाचीं पांच वर्षें अशीं परगांवांत व

परसंस्कृतींत गेली. त्याची घरची आठवण देखील पार बुजून गेली, आपण इंग्लिश भाषा विसरतों कीं काय अशी त्याला कित्येकदा शंका आली आणि तो घरीं जाण्यास अत्यंत समुत्सुख झाला. शेवटीं हा आनंदाचा दिवस एकदाचा उजाडला. सन १७५८ सालीं गिबन्ला बापाकडून तांतडीचें पत्र आलें. ताबडतोब घरीं निघून येण्याविषयीं त्यात लिहिलें होतें.

कसें काय दैव फिरलें असेल तें असो, या खेपेस गिबन्च्या पित्यानें आपल्या एकुलत्या एका मुलाची अगत्यानें विचारणा करून त्याच्या विद्याभ्यासातील यशस्वितेची प्रशंसा केली खरी! दरम्यान गिबन्च्या पित्याचें डॉरॉथिया पॅटन नांवाच्या प्रौढ कुमारिकेशीं दुसरें लग्न झालेंच होतें. प्रिय मातेच्या या सवतीस प्रथम पहातांच गिबन्च्या कपाळास आठ्या चढल्या. पण प्रत्यक्ष वस्तुस्थिति पहाता त्याला लौकरच आढळून आलें कीं, ती मत्सराची मंथरा नसून सहानुभूतीची सखी होती! तिला मूलबाळ नव्हतें किंवा तें पुढेंमागें होण्याचीहि आशा नव्हती. गिबन्च्या मृत आईचें स्थान तिनें लौकरच पटकावलें. त्या साध्वीनें फुरसतीच्या वेळांत कायद्याचा अभ्यास करण्याबद्दल गिबन्चें मन वळविलें. पण तिच्या अमोलिक उपदेशाचा त्याच्या मनावर फारसा परिणाम झाल्याचें दिसलें नाहीं. तो म्हणतो, 'तिचा उपदेश मीं झिडकारला म्हणून मला पश्चात्ताप कसा तो वाटतच नाहीं! कारण माझा उपजत कलच जर कायद्याच्या ऐवजीं वाङ्मयेतिहासाकडे होता, तर त्याला मी तरी काय करूं शकतों!' या खेपेस गिबन् इंग्लंडात चार वर्षें राहिला. त्याच्या मैत्रीचें क्षेत्र बरेंच वाढलें. परत लॉसेनला जातांना तो वाटेंत पॅरिसांत उतरला आणि तेथील कित्येक प्रथितयश साहित्यसेवकांच्या त्यानें भेटी घेतल्या. दरम्यान त्याच्या विद्वत्तेची कीर्ति हळू हळू फ्रान्सांत चोहींकडे पसरूं लागली होती. आपल्या शिष्याच्या सद्‌गुणांची कीर्ति ऐकून पॅव्हिलियर्डनें आनंदाश्रु सोडले आणि त्याला गाढ प्रेमालिंगन दिलें.

गिबन्ला अजून त्याच्या सुखदुःखाचा समान वांटेकरी एखादा सन्मित्र लाभला नव्हता. आणि याचा दोष त्याच्याकडेच कसा येतो हें त्याच्या पूर्वचरित्रावरून कळून येतें. एके दिवशीं लॉसेनांत इंग्रज व फ्रेंच प्रवाशांची

संयुक्त बैठक भरली होती. त्यांत इंग्लंडचा हॉलरॉईड (पुढें तो लॉर्ड शेफील्ड बनला) हाहि एक होता. गिबन्चा व हॉलरॉईडचा येथेंच परिचय घडून आला. पुढे ते दोघे मिळून इटालीच्या प्रवासाला निघाले आणि या प्रवासांत त्यांची गट्टी जमली ती अढळच. गिबन्च्या मृत्यूनंतर याच मित्रानें त्याच्या आत्मचरित्रात्मक आटवणी एकत्र करून प्रसिद्ध केल्या आणि पर्यायानें मित्रेच्छा सफल केली.

आतां ज्या रोमच्या साम्राज्याच्या ऱ्हासाच्या व नाशाच्या वृत्तानें सजलेल्या प्रचंड इतिहासग्रंथामुळें गिबन्चें नांव सर्वतोमुखी झालें त्याच्या रचनेचीच गोष्ट सांगतो.

गिबन् लॉर्ड शेफील्डबरोबर रोमच्या प्रवासास निघाल्याचें वर्तमान वर आलेंच आहे. पण त्याच्या किती तरी वर्षें पूर्वी रोमच्या प्राचीन इतिहासाची सारी सामग्री त्यानें अत्यंत बारकाईनें वाचून काढली होती. येणेंप्रमाणें आधीं रोमविषयीं सर्व उपलब्ध माहिती वाचून मग रोम शहराला भेट दिल्यावेळीं त्याच्या मनात कोणकोणते विचारतरंग उमटले ते त्याच्याच शब्दांत सांगणें उचित होईल.

गिबन् म्हणतो, 'उपजत मला अत्युत्साहाचें वावडेंच आहे. आणि जो उत्साह खरोखर माझ्या अंगात नाहीं त्याचें उगाच प्रदर्शन करणें मला मुळींच सोसत नाहीं! पण जेव्हां रोम शहर पहिल्या प्रथम माझ्या दृष्टीस पडलें तेव्हां माझ्या मनात ज्या भडक भावनांचा एकदम स्फोट उडाला त्याचें मी वर्णन करूं किंवा त्याला विसरूंहि शकत नाहीं! रात्रभर मी झोंपेविना शय्येवर सारखा तळमळलों! वैभवशाली रोमच्या भग्नावशेषांवरून तंद्रींत चालताना माझी गति आपोआप मंद झाली! या जागेवर रोम्युलस उभा राहिला होता; त्या पलीकडच्या ठिकाणीं टयूली आपलीं वक्तृत्वपूर्ण भाषणें करीत होता! या जागेवर सीझर मरून पडला; त्या पलीकडच्या ठिकाणीं ब्रूटसनें त्याच्यावर पहिला विश्वासघातकी वार केला! अशीं एक ना दोन अनेक स्मरणीय ठिकाणें माझ्या जागत्या अंतश्चक्षूसमोरून एकामागून एक झरझर चित्रपटाप्रमाणें निघून गेलीं!'

'ती तारीख १५-१०-१७६४ होती. रोम शहराच्या भग्न अव-

शेषांपाशीं मी विचाराच्या तंद्रींत गढून गेलों होतों. अनवाण्या पायांनीं भाटजन ज्युपिटरच्या देवळांत ईश्वराचें गुणगान करीत होते. याच वेळीं मला रोमचा ऱ्हास व नाश इतिहासग्रंथांत गोवण्याची कल्पना प्रथम सुचली. पण माझी प्राथमिक योजना रोम शहराच्या नाशापुरतीच मर्यादित होती. सबंध रोमन साम्राज्याच्या नाशाची योजना मीं तेव्हां आंखली नव्हती. १७६५ सालीं मी फिरून घरीं गेलों. माझ्या प्रवासाचा समय व माझ्या बडलाचा मृत्यु यांच्या दरम्यान जीं पाच वर्षे गेलीं तीं माझ्या मतें माझ्या आयुष्यांत अत्यंत आनंदाचीं गेलीं.

'पूर्वोक्त इतिहासाची आखणी करण्यांत आणखी दोन वर्षे गेलीं. माझ्या इतिहासाचा पहिला खंड परदेशींच्या विद्वानांच्या समितीपुढें वाचण्यांत आला. या वेळीं मीहि तेथें होतों. पण अनोळखी तरुण म्हणून ! आणि त्यामुळेंच त्या टीकाकारांच्या मोकळ्या सूचना व दोषदर्शक वचनें मला पुरतीं ऐकतां आलीं. आता तितक्या वेळेपुरत्या मला मनोयातना सोसाव्या लागल्या हें खरें पण त्यांच्या दोषदिग्दर्शनात सत्याचा अंश पुष्कळच होता हें मला अंमळ शांतपणें फेरविचार करता कळून चुकलें.'

इकडे गिबन्‌चा बाप म्हातारपणीं अधिकाधिक कर्जात अडकत चालला होता. त्याची मिळकत गहाण पडूं लागली. मग काय विचारता ! त्याचें कर्ज दिवसेंदिवस फुगतच चाललें आणि त्याची दारुण चिंता त्याचें शरीर सतत शोषू लागली. त्या बिचाऱ्याला शेवटीं उदराचा दुर्धर विकार जडला आणि तो वयाच्या ६४ व्या वर्षीं वारला.

पित्याच्या मृत्यूनंतर गिबन् घरीं काही काळपर्यंत स्थिरस्थावर झाला. तेव्हां त्यानें आपल्या इतिहासाचा पहिला खंड लिहिण्यास हातीं घेतला होता. पण प्रारंभीं त्याच्या डोळ्यांपुढें अंधार व संशय यांचा भला मोठा डोंगरच उभा ठाकल्यासारखें झालें ! प्रथम प्रथम तर त्याला ग्रंथाचा मथळाही नीट सुचेना ! रोमन साम्राज्याच्या कालखंडांचाहि त्याला विसर पडला ! प्रस्तावनेची मर्यादा व प्रकरणांची वर्गवारीदेखील त्याला नीट सुचेनाशी झाली आणि त्याच्या निरूपणाचा अभिनिवेशहि पार ओसरला ! परंतु त्यानें पुढें चिकाटी धरतांच हे अडचणींचे मेघ इतस्ततः विरून गेले.

इतिहासाचा पहिला खंड सिद्ध तर झाला. हस्तलिखितांत सहसा न आढळणारे लेखनशैलींतील किरकोळ दोष मुद्रणप्रतींत आढळले व ते सुधारण्यांत आले. ग्रंथाच्या लोकप्रियतेबद्दल गिबन्‌ला तितकीशी खात्री वाटत नसल्यामुळें पहिल्या आवृत्तीच्या पांचशेंच प्रती काढण्यांत आल्या. दरम्यान तो आनंदानें फुलून गेला नाहीं किंवा चिंतेनें उद्विग्नहि झाला नाहीं. त्याच्या विवेकबुद्धीनें कौल दिल्याप्रमाणें तो आत्मसंयमनाचा आनंद उपभोगीत होता. शेवटीं ग्रंथाचा पहिला खंड छापखान्यांतून बाहेर पडला. त्या वेळची गिबन्‌ची मनःस्थिति त्याच्याच शब्दात सांगूं. तो म्हणतो :—

'मी जर ग्रंथाचें यश वर्णन करूं लागलों तर उगाच माझी प्रौढी मीच मिरवल्यासारखें होईल ! कारण ग्रंथाची पहिली आवृत्ति थोडयाच दिवसांत संपून गेली ! तात्काळ दुसऱ्या व तिसऱ्या आवृत्त्या काढल्या असतांहि मागणीचा पुरवठा अतोनात कमी पडला ! आणि आश्चर्याची गोष्ट ही कीं, डब्लिनच्या चाचेगिरी करणाऱ्या प्रकाशकांनीं लंडनच्या पुस्तकविक्रेत्यांच्या दुकानावर धाडच घातली ! माझा ग्रंथ प्रत्येकाच्या घरीं, फार काय प्रत्येक सुसज्जित दिवाणखान्यांत, डौलानें झळकूं लागला ! स्तुतीचें कर्णमधुर संगीत मी एकीकडे साभिमान ऐकीत असतांहि माझ्या रसज्ञ टीकाकारांच्या पसंतीनें, मला वाटतें, माझ्या अंगात मूठभर मांस चढलें ! डॉ० रॉबर्टसन् नांवाच्या इतिहासकारानें प्रांजलपणें माझा पाठपुरावा केला. ह्यूम नांवाच्या दुसऱ्या एका इतिहासकाराचें पत्र वाचून माझे दहा वर्षांचे श्रम भरून निघाल्याचें सार्थक झालें !' दरम्यान गिबन्‌ला पॅरिसच्या नेकर दंपत्यानें भेटीसाठीं बोलाविलें. गिबन्‌चा व नेकर पत्नीचा भग्न संबंध यापूर्वीच सांगितला आहे. त्यांच्या विनंतीला मान देऊन गिबन् जेव्हां पॅरिसला गेला तेव्हां त्याची पॅरिसमधील विद्वान् व कलावंत स्त्रीपुरुषांत आयतीच ओळख झाली. फ्रान्सांतील पहिल्या दर्जाच्या थोर थोर लोकांनीं त्याला इतक्या लोभमूलक सुजनतेनें पावलोपावलीं वागविलें कीं, कृतज्ञतेमुळें त्यांचा विसर त्याला कधींहि पडला नाहीं किंवा शालीनतेमुळें त्याला त्या त्या प्रसंगांचा नामोच्चारहि करवला नाहीं.

गिबन्‌चा बाप कर्जबाजारी होऊन वारल्यानंतर त्याच्या मुलाची संप-

त्तिक स्थिति तितकीशी समाधानकारक नव्हती. बापाच्या मृत्यूपूर्वी गिबन्‌ला आर्थिक ताण फारसा पडत नव्हता. तरी पण बापानें इंग्लंडहून पाठविलेल्या तुटपुंज्या मासिक वेतनावर तो मनाचें धीरानें समाधान करून घेऊन आपल्या आवडीच्या किचकट इतिहाससंशोधनाला स्वतःला निष्काम-पणें सर्वस्वीं वाहून घेई. पण अजून त्याची स्वतंत्र अशी मिळकत मुळींच नव्हती. इतिहासग्रंथाच्या खपामुळें त्याला पुढेंमागें कदाचित् पैसा मिळाला असता खरा, परंतु तोंपर्यंत त्याची घरची स्थिति सुधारावी म्हणून त्याच्या मित्रमंडळीनें त्याला एखादा धंदा कर म्हणून गळ घातली. मध्यंतरीं त्याच्या कांहीं मित्रानीं त्याला सरकारी व्यापारखात्यांत चांगली नोकरी लावूनहि दिली. तेणेंकरून त्याच्या वार्षिक उत्पन्नांत ७०० ते ८०० पौंडांची भर पडली. ही नोकरी साभाळून त्यानें आपल्या इतिहासग्रंथाचा दुसरा व तिसरा खंड प्रसिद्ध केले. प्रथमपासून गिबन्‌चा असा विचार होता कीं, आपण बाल्यात ज्या लॉसेनमध्यें आपल्या आयुष्याचीं महत्त्वाचीं वर्षे घालविलीं तेथेंच आपल्या मावळत्या वयाचा संध्याकाळहि शांतपणें साजरा करावा.

गिबन्‌नें जेव्हां आपल्या इतिहासाच्या शेवटच्या खंडाचें लेखन पुरें केलें तेव्हां रात्रीचा समय होता. तो दिवस २७ जून १७८७ चा होता. वेळ ११ ते १२ वाजण्याच्या दरम्यान होती. लॉसेनच्या बागेतील मोकळ्या जागेंत बसून तो लिहीत होता. इतक्या वर्षांच्या सतत परिश्रमांनंतर त्यानें एकदांची लेखणी खालीं ठेवली. तेव्हां त्यानें इतस्ततः फेऱ्या घातल्या. जवळच रम्य वनश्री, सरोवर व बर्फाच्छादित पर्वतश्रेणी विलसत होतीं! हवा छान होती. आकाश निरभ्र होतें. चंद्राचें रुपेरी बिंब सरोवराच्या प्रशांत पाण्यांत प्रतिबिंबित झालें होतें! सर्वत्र पूर्ण शांतता नांदत होती! या प्रसंगाच्या आपल्या मनःस्थितीचें वर्णन तो खालील वेंचक शब्दांत करतो:—

'माझ्या स्वातंत्र्याचा नी कदाचित् कीर्तीचाहि पुनर्लाभ ज्या क्षणीं मला झाला त्या क्षणीं मला किती किती समाधान वाटलें हें मी पुरतें उलगडून सांगूं शकत नाहीं! पण माझा हा अभिमान लगेच ओसरला! माझ्या

मनावर एकप्रकारचें उदासीनतेचें दाट पटल पसरलें ! इतिहासग्रंथच काय तो माझा जुना व परम आवडीचा मित्र होता ! त्याला शेवटचा निरोप देण्याची नुसती कल्पनाहि मला असह्य झाली ! आणि असाहि एक विचार क्षणांत मनांत चमकून गेला कीं, इतिहासग्रंथाची अढळ शाश्वति कशीहि कां असेना, स्वतः इतिहासकाराचा जीवनपट मात्र अत्यंत अस्थिर व अनिश्चितच !' गिबन्च्या इतिहासाचे शेवटचे तीन खंड छापून तयार होते, पण प्रकाशनसमारंभ साजरा करतांना त्याच्या एकावन्नाव्या वाढदिवसाचा आयताच फायदा घेतल्यास दुधात साखर पडल्यासारखें होईल असें त्याच्या मित्र-मंडळींचें मत पडलें. कॅडेल नांवाच्या त्याच्या प्रकाशकाच्या घरीं या दोनहि जोडसमारंभांनिमित्त विद्वानांचें भोजनसंमेलन भरविण्यांत आलें. हेली नांवाच्या गिबन्च्या एका चहात्यानें प्रसंगोपात्त रचलेली स्तुतिपूर्ण कविता म्हटलेली ऐकून गिबन्चें तोंड लाजेनें गोरेंमोरें झालें.

गिबन्ची इच्छा लॉसेनांतच आपल्या आयुष्याचे शेवटचे दिवस घालविण्याची होती. तेथें त्याला सर्व अर्थानीं सुख व समाधान लाभत असत. तेथेंच त्यानें दुर्मिळ इतिहासग्रंथांचा संग्रह केला होता. तो आतां ६००० ते ७००० च्या दरम्यान झाला होता.

इंग्लंडहून गिबन् लॉसेनला शेवटच्या खेपेस गेला तो १७९३ सालापर्यंत तेथेंच राहिला. त्याची प्रकृति ठीक होती. पण हळू हळू पोट वाढत गेल्यामुळें एकंदर शरीराच्या बांधेसूदपणाला बाध येऊन तो कितीकांचा थट्टेचा विषय बनला होता. त्याच्या मित्राच्या साह्यानें पोटाचें ऑपरेशन करून घेण्यासाठीं तो जून १७९३ च्या पहिल्या आठवड्यात इंग्लंडांत आला. पण डॉक्टरांनीं त्याच्या उदरांतून पाणी काढलें तरी तो न सुधारतां अखेरीस उदराच्या विकारानें लंडनांत ता. १६ जुन १७९४ रोजीं मरण पावला.

त्याच्या आत्मचरित्राचें कथानक १७८९ वर्षापर्यंतच आहे. १७८९ ते १७९३ पर्यंत तो लॉसेनांत होता. तेथील कार्यक्रमाची माहिती अर्थात् त्यांत आलेली नाहीं.

## वाचन, लेखनव्यवसाय व भाषाशैली यांच्याविषयीं गिबन्‌चे अनुभव

गिबन्‌नें ओजस्वी व प्रमाणबद्ध लेखनशैली पचविण्यासाठीं खालील क्रम अनुसरला. उदाहरणार्थ, सिसिरोसारखा लॅटिन भाषेंतील सुप्रसिद्ध पंडित त्यानें घेतला आणि त्याच्या लॅटिन लेखांचा फ्रेंच भाषेंत कसोशीनें अनुवाद केला. मूळ लॅटिनचे विशिष्ट शब्दप्रयोग व भाषाशैली मनांतून पुरती विसरेपर्यंत हें भाषांतर त्यानें तसेंच एकीकडे ठेवून दिलें आणि नंतर त्याचा फिरून लॅटिन भाषेंत अनुवाद केला व तो मूळ लेखकाच्या कृतीशीं ताडून पाहिला. अर्थातच प्रारंभीं त्याला आपले ठळक दोष दिसून आले आणि ते त्यानें प्रयत्नपूर्वक सुधारले. अशा भाषांतरांच्या कित्येक चोपड्या त्यानें न कंटाळतां लिहून काढल्या आणि नंतरच त्याची लेखनशैली इतकी ओजस्वी व प्रमाणपूरित झाली! पण हीं भाषांतरें करण्याबरोबरच ग्रीक, रोमन, फ्रेंच व इंग्लिश भाषांतील उत्तमोत्तम लेखकांच्या कृति अत्यंत आस्थेनें वाचण्याचा अखंड क्रम त्यानें आखला होता. लॅटिनांत सिसिरो व ग्रीक भाषेंत झेनोफोन हे त्याचें अत्यंत आवडते ग्रंथकार होते आणि प्रत्येक विद्यार्थ्यानें या दोन ग्रंथकारांच्या कृतींचें प्रथम पारायण करावें असें तो निक्षून सांगे. लॅटिन भाषेंतील अभिजात ग्रंथ वाचीत असतां त्यानें खालीलप्रमाणें वर्गवारी पाडली:— (१) इतिहासकार, (२) कवि, (३) वक्ते, व (४) तत्त्वज्ञ. आणि त्या त्या वर्गांतील सारे ग्रंथ आस्थेनें वाचून काढले. प्रत्येक ग्रंथाचीं टांचणें काढून तीं आपल्या चोपडींत लिहिण्याबद्दल त्याचा कटाक्ष होता. व्हर्जिलच्या आठ काव्यपंक्तींवर टीका करून त्यानें आठ पृष्ठांचे मोठे ताव लिहिले होते! यावरून त्याच्या सूक्ष्म अभ्यासाच्या पद्धतीची कांहीशी कल्पना येईल. पण केवळ लॅटिन भाषेवर विसंबून ज्ञानाचा परिघ वाढविण्यासारखा नव्हता अशी त्याची पुढें खात्री होतांच त्यानें तिच्यापेक्षां प्राचीन असलेल्या ग्रीक भाषेचा कसून अभ्यास केला. कारण ग्रीक लोकांना रोमन लोक गुरुस्थानीं मानतात. प्रारंभींच इंग्लिश भाषा पढविण्याची इंग्लिश शाळांतील शिक्षणपद्धति गिबन्‌ला सदोष वाटली. प्रारंभापासून प्रत्येक आंग्ल विद्या-

ध्यीला लॅटिन व ग्रीक भाषा शिकविण्याची व्यवस्था झाली पाहिजे म्हणजे त्याचा दृष्टिकोन विस्तृत झाल्याशिवाय रहाणार नाहीं असें त्याचें ठाम मत होतें. आपल्या एकोणीसाव्या वर्षी तो ग्रीक भाषा शिकला. होमरचें सुप्रसिद्ध ईलियड काव्य मूळ ग्रीक भाषेंतून वाचतांच त्याला त्यांतील अपूर्व रस-माधुरी चाखतां आली. आणि तेव्हांपासून त्यानें ग्रीक वाङ्मय-परिशीलनाचा पाया सुदृढ करण्याचा चंगच बाधला.

ज्या तीन ग्रंथांचा गिबन्च्या आयुष्यावर विशेष परिणाम झाला ते म्हणजे (१) पास्कलचीं प्रांतिक पत्रें, (२) ब्लेटेरीकृत ज्युलियनचें चरित्र व (३) ग्यानोनेकृत नेपल्सचा इतिहास. त्यांतल्या त्यांत पास्कलच्या पत्रांचीं त्यानें दरवर्षी पारायणांवर पारायणें केलीं होतीं ! धार्मिक किंवा गंभीर विषयांच्या उपन्यासांतहि औपरोधिक लेखनाचें जळजळीत हत्यार कसें कौशल्यानें वापरावें हें तो पास्कलापासूनच प्रथम शिकला.

लॉक नांवाच्या ग्रंथकाराच्या उपदेशानुसार गिबन्नें आपण वाचलेल्या प्रत्येक ग्रंथाचा साराश एका चोपडींत लिहिण्याचा परिपाठ ठेवला होता. पण प्रत्यक्ष अनुभवान्तीं ही पद्धत श्रमांच्या मानानें त्याला तितकीशी फलदायी वाटली नाहीं. डॉ. जॉन्सन्नें म्हटल्याप्रमाणें 'एखादें पुस्तक नीट लक्ष्य-पूर्वक दोनदा वाचलें कीं त्याची स्मृति मनावर पक्की बिंबते. नुसत्या भारा-भर नकला करून कार्यभाग साधत नाहीं !' हेंच मत गिबन्ला पुढें ग्राह्य व अनुकरणीय वाटलें.

लॉसेन येथें असतां फ्रान्समधील कित्येक लेखकांची गिबन्नें पत्रद्वारा ओळख करून घेतली. प्रसिद्ध फ्रेंच नाटककार व्हाल्टेअर याची त्यानें बुद्ध्या पॅरिसात भेट घेतली. त्याचीं कांहीं नाटकेंहि त्यानें पॅरिसच्या रंग-भूमिवर पाहिलीं. पण व्हाल्टेअरच्या अंगांत त्याला कसलाहि गुणोत्कर्ष आढळला नाहीं. आणि म्हणूनच या पहिल्या भेटीनंतर त्याच्याविषयीं त्याला तितकासा आदर वाटला नाहीं.

केवळ डामडौलासाठीं गिबन्नें एकहि ग्रंथ विकत घेतला नाहीं ! प्रत्येक ग्रंथ त्यानें कसोशीनें वाचून काढला होता. थोरल्या प्लिनीची खालील सूक्ति त्याला पुरी पटली होती.

'कोणतेंहि पुस्तक सबंधच्या सबंध टाकाऊ असूं शकत नाहीं ! त्याचा कांही भाग तरी वाचनीय असतो व त्याच्यापासून थोडाफार बोध घेतां येतो.'

एखादा नवीन ग्रंथ वाचण्यापूर्वी गिबन् प्रथम त्याची रूपरेषा आपल्याशींच आंखीत असे. त्या विषयावर आपल्याला सुचलेले सर्व विचार तो नीट मनांत आणी व एकान्तीं फिरत असतांना त्यांची पद्धतशीर जुळवाजुळव करून नतरच तो ग्रंथ वाची. या पद्धतीमुळें त्याला नेमकें कळत असे कीं, आपल्या ज्ञानांत या ग्रंथकारानें कितीशी नवीन व स्वतंत्र भर घातली. ती तशी खरोखरीच पडली असल्यास त्याला समाधान वाटे; नसल्यास ग्रंथवाचन तो तितक्यावरच सोडून देई. आणि कित्येकदा त्याच्या व ग्रंथकाराच्या विचारसरणींत चिंतनीय विरोध आढळल्यास तो त्याचें कौतुकच करी !

दोन इतिहासकारांना गिबन्नें आपल्यापुढें आदर्श म्हणून ठेवलें होतें. स्कॉटलंडच्या इतिहासाचा कर्ता डॉ. रॉबर्टसन् व स्टुअर्टच्या काळच्या इतिहासाचा कर्ता ह्यूम. रॉबर्टसन्च्या मोहक व वक्तृत्वपूर्ण लेखनशैलीचा तर ह्यूमच्या धीरगंभीर, अननुकरणीय पद्धतीचा गिबन्च्या कोंवळ्या मनावर चिरंतन परिणाम झाला. त्यांचे ग्रंथ वाचून त्याच्या ठायीं आनंद व निराशा यांची संयुक्त भावना एकदमच उद्भवत असे.

होतकरू लेखकाच्या पहिल्या कृतीविषयीं गिबन्नें जे अनुभव सांगितले आहेत ते चिंतनीय आहेत. तो लिहितो :—

"समोंड नावाच्या एका विद्वान् लेखकानें आपल्या उतावळ्या तरुण मित्राला असा उपदेश केल्याचें सांगतात कीं, 'बाबा रे, तुला पन्नास वर्षें होण्यापूर्वी तूं तुझी लेखनकृति जनतेपुढें ठेवूं नकोस !' स्वतः समोंडनें १६१४ सालीं जेव्हां आपली पहिली कृति प्रसिद्धिली तेव्हां त्याचें वय ५४ होतें !"

होतकरू लेखकाला आपल्या प्रथम कृतीविषयीं भलतीच अपेक्षा असते ! जणूं सारें जग आपल्या कृतीकडे टक लावून पहात आहे असें तो मनांतल्या मनांत मांडे खात असतो ! पण ही त्याची निव्वळ आत्मवंचनाच होय. असें आपलें प्रांजल मत कटु अनुभवान्तीं गिबन्नें सांगितलें आहे.

आपल्या अंगींच्या आदिप्रेरणा कोणी कशा ओळखाव्या ?

पुष्कळ नवखे लेखक प्रारंभीं वाङ्मयविभागांतील कोणता भाग आपल्या प्रकृतीला मानवेल व आपली त्यांत विनासायास प्रगति होत जाईल हें स्वतः जाणण्यास असमर्थ असतात. म्हणून त्यांना मनस्वी मनोयातना सोसाव्या लागतात. या बाबतींत गिबन्चें मत सर जोशुआ रेनॉल्डस्‌च्या विरुद्ध आहे. गिबन् म्हणतो :—

'आपलें आदिदैवत डॉ. जॉन्सन् याच्या कौलाप्रमाणें सर जोशुआ रेनॉल्ड्स् म्हणतो कीं, स्वतंत्र प्रतिभा अशी वस्तूच आढळत नाहीं ! म्हणून अमक्याची प्रतिभा अमुक विषयाकडेच अधिक झुकती आहे असें म्हणणें म्हणजे अवस्त्वारोप करणें होय.' पण गिबन्चा विपरीत अनुभव ऐका ! तो म्हणतो :—
'या बड्या पंडिताबरोबर मी पोकळ वाग्युद्ध खेळूं इच्छीत नाहीं. पण इतकें मात्र निश्चित सांगूं शकतों कीं, माझ्या मनाच्या कलाप्रमाणें व प्रत्यक्ष अनुभूतीप्रमाणें मी वाङ्मयांतील इतर सर्व प्रकार वगळून इतिहासकार होण्याची शोषक व प्रबळ महत्त्वाकांक्षा लहानपणापासून बाळगली होती ! पुढें पुढें तर या आकांक्षेचा अभिनंदनीय विकास होत गेला आणि ती माझ्या मनोमंदिरांतून कधींहि ढळली नाहीं !'

गिबन्नें रोमचा इतिहास लिहिण्याच्या पंधरा वर्षांपूर्वी 'वाङ्मयाच्या अभ्यासा'वर एक निबंध फ्रेंच भाषेंत लिहून प्रसिद्ध केला होता. त्याचा इंग्लंडांत विशेष बोलबाला झाला नाहीं, पण फ्रान्सांत त्याची जिकडे तिकडे चर्चा होऊन त्याच्या लौकिकांत भर पडली.

### लेखकाच्या सांपत्तिक स्थितीचा त्याच्या आयुष्यावर परिणाम

गिबन्चा अनुभव असा कीं, लेखकाची सांपत्तिक स्थिति अतिशय संपन्न असूं नये किंवा तितकीच कंगालहि असूं नये; पण ती मध्यम असावी. म्हणजे त्याच्या व्यवसायाला ती पोषक होते. कारण अतिशय दारिद्र्यापायीं होतकरू लेखकाचे आशांकुरच जागच्या जागीं जळून जाण्याचा संभव फार, आणि खचून श्रीमंती असल्यास तिची ऐदीपणांत परिणति होऊन पुढें पुढें तिच्या प्रभूला उद्यमाचें वावडें होतें. गिबन्ची स्थिति वरील प्रकारांपैकीं मध्यम होती. तो गर्भश्रीमंतींतच शेवटपर्यंत लोळता तर तो इतका थोर इतिहासकार होण्याची आशाच नव्हती.

## लेखनशैली

गिबन्‌चे लेखनशैलीविषयींचे विचार सुप्रसिद्ध आहेत. तो म्हणतो, 'लेखनशैली लेखकाच्या मनोव्यापाराची व त्याच्या स्वरूपलक्षणाची चालती बोलती प्रतिमाच आहे. पण कमावलेली व निवडक भाषाशैली अनायासें सफाईदार लिहितां येणें पुष्कळ अंशीं सतत संवयीच्या परिश्रमांवर अवलंबून असतें.'

स्वतः आपल्या इतिहासग्रंथाला साजेशी कोणती लेखनशैली सुस्थिर करावी याच्या विवंचनेंत त्यानें बराच वेळ घालविला. नीरस कथनाची शैली व अलंकारिक पण बोजड पंडितगिरीची हौस हीं दोनहि अतिमात्र टोंकें त्यानें सारखींच वगळून मधली आवेशयुक्त पण संयमित व प्रमाणबद्ध लेखनशैली योजली व ती शेवटीं स्थिर केली. पण या कामांत त्यानें घेतलेल्या अगार किचकट परिश्रमाना सीमा नव्हती. इतिहासाच्या पहिल्या खंडाचें पहिलें प्रकरण त्यानें तीनदा लिहिलें, आणि दुसरें व तिसरें प्रकरण तर दोनदोनदा सबंध लिहिलीं तरी त्याच्या सूक्ष्म मनाप्रमाणें तीं सरस उतरलीं नाहींत! म्हणून पुढेंहि त्यांत त्यानें कित्येक सुधारणा केल्याच. पुढें मात्र त्याची लेखनाची गाडी संथपणें चालली. पण पंधरावें व सोळावें प्रकरण मिळून प्रथम भला मोठा ग्रथच झाला होता! त्याचा फिरफिरून तीनदा संक्षेप करून तेवढींच प्रकरणें आता राहिलीं आहेत! यावरून त्यांचा कसोशीनें संक्षेर करतांना त्यानें केलेल्या निरलस व अपार श्रमांची कांहीशी कल्पना येईल. अजूनहि अर्थाला किंवा मजकुराला विशेप बाध न आणतां त्यांचा संक्षेप करण्यासारखा आहे असें गिबन् म्हणतो. पण ही त्याची पश्चाद्‌बुद्धि होय!

लेखकानें आपलें हस्तलिखित उठल्यासुटल्या इतरांना दाखविण्याचा क्रम गिबन्‌ला तितकासा पसंत नव्हता. तो म्हणतो, "कांहीं जण विनयानें त्याची स्तुति करतील तर कांहीं जण केवळ दिमाखानें त्यांतील दोष दाखवून टीका करतील! सतत आत्मनिरीक्षणान्तीं स्वतः लेखकच आपल्या कृतींतील गुणदोष उत्कृष्टपणें हेरूं शकेल; कारण त्या विषयावर त्याच्या-इतका खोल विचार बहुधा दुसऱ्या कोणी केलेला नसतो किंवा त्यासंबंधीं त्याच्याइतका जिव्हाळा दुसऱ्या कोणास असणें संभवनीय नसतें!"

गिबन्नें आपल्या इतिहासांत कांहीं चिरस्मरणीय प्रसंग वक्तृत्वपूर्ण शैलीनें रेखाटले आहेत. जेथें जेथें मोठमोठीं आवेशपूर्ण व प्रमाणबद्ध वाक्यखंडें रचण्याचा प्रसंग येई तेथें तेथें तो तीं आधीं आपल्या मनांतल्या मनांतच योजून घोळवी, त्यांचा ध्वनि कानाला गोड लागतो कीं काय तें कसोशीनें पाही, आणि तीं लख्ख घासूनपुसून व ठाकठीक करून त्याच्या मनाचें पुरतें समाधान झाल्यानंतरच कागदावर लिहून काढी! त्याच्या-पूर्वी तो लेखणीला शिवत नसे! इतिहासाच्या रचनेच्या क्रमांत गिबन्नें प्रथम पुष्कळ पद्धती योजून पाहिल्या. तारीखवार इतिहासाची संगति लावण्याऐवजीं जनांगांप्रमाणें ती लावल्यास निरूपण अधिक आकर्षक व भरदार होतें असा आपला अनुभव तो सांगतो. तेणेंकरून सनावलींतील निर्जीव रूक्षपणा लोप पावतो आणि प्रबंधाला सुस्पष्ट व घोंसदार स्वरूप येतें.

गिबन्च्या इतिहासाच्या पहिल्या खंडाची भाषाशैली त्याच्याच मता-प्रमाणें कांहीशी कची पण श्रमकौशल्यनिर्मित झालेली आहे. पुढें सरावानें ती दुसऱ्या व तिसऱ्या खंडात पुष्कळच सुधारली व अधिक मोकळी, शुद्ध व सोज्वळ बनली. पण शेवटचा खंड लिहीत असता तो आपल्या कुशल कलमाच्या क्रांतीच्या सर्वस्वीं आधीन झाला होता. आरंभींप्रमाणें लेखन-शैलीविषयीं किचकट परिश्रम करण्याची परिस्थिति तेव्हां राहिलीच नव्हती!

## गिबन्च्या लिहिण्याच्या वेळा

शिलरसारखे कित्येक प्रसिद्ध ग्रंथकार रात्रीचे लेखक असतात. दिवसभर वाचलेल्या, पाहिलेल्या किंवा मनन केलेल्या गोष्टी रात्रीच्या प्रशान्त समयीं त्यांच्या डोक्यांत नीट एकत्रित होतात आणि त्यांच्या विचार-विकारांना विशिष्ट गति व स्वरूप मिळून त्यांना अपरात्रपर्यंत लेखन करण्यास प्रेरणा करतात. पण याचा परिणाम त्यांच्या शरीरावर झाल्याविना रहात नाहीं. पण गिबन्ची अभ्यासाची पद्धति वेगळी होती. तो गटेप्रमाणें दिवसा नियमितपणें श्रम करी. विशेष आयास घेत नसे. तेणेंकरून त्याच्या मनाला किंवा शरीराला थकवा येत नसे. रात्रभर जागून अभ्यास करण्याचें किंवा लिहिण्याचें तो टाळी. या पद्धतीनें त्याच्या डोळ्यांना विशेष ताण बसला नाहीं.

## गिबन्चीं हस्तलिखितें

गिबन्च्या इतिहासाच्या खंडांचीं हस्तलिखितें त्यांच्या दुसऱ्या सुवाच्य प्रती करण्यापूर्वीं किंवा तीं दुसऱ्या कोणाला दाखविण्यापूर्वीं परस्पर लंडनच्या प्रकाशकाकडे छापण्यास पाठविण्यांत येत असत. अर्थात् त्यांचे गुणदोष सर्वस्वीं आपले असल्याबद्दल तो प्रांजलपणें ग्वाही देतो. पण याच्याहून गिबन्नें सांगितलेली एका फ्रेंच मुद्रितशोधकाची गोष्ट फारच नवलपूर्ण आहे.

रेलिफ डि ला ब्रेटोन् नांवाचा बहुप्रसू फ्रेंच कादंबरीकार होऊन गेला. निर्वाहासाठीं त्यानें छापखान्यांत मुद्रितातील चुका सुधारण्याची लहानशी नोकरी पत्करली होती. पण मौज ही कीं, तो आपले विचार प्रत्यक्ष कागदावर न उमटवितां ते थेट खिळे जुळविणाऱ्याला दररोज थोडथोड्या प्रमाणांत सांगत असे. आणि असें करून त्यानें मोठमोठ्या कादंबऱ्या छापविल्याची गोष्ट सांगतात! पण स्वारीनें उभ्या जन्मात कागदावर लेखणी कशी ती झिजविली नाहीं!

## गिबन्च्या सुखशांतीच्या गुरुकिल्ल्या

१. अंतःकरण स्वच्छ असावें. त्याला अपवित्र कृत्याचा विटाळ किंवा वंचनेची भावना लागू नये याबाबत दक्षता असावी.

२. प्रत्येकाचा स्वभाव शक्य तों आत्मसंतुष्ट असावा. त्याची विषयग्रहण-शक्ति विशेष तीव्र नसावी. ती मध्यम असावी.

३. गिबन्च्या बालपणांतील आरंभींच्या पंगूपणानंतर आत्मचरित्राचा शेवट केलेल्या तारखेपर्यंत त्याला कसलीहि व्याधि जडली नाहीं. म्हणून त्याला भरपूर शरीरस्वास्थ्य व त्यामुळें मनःस्वास्थ्य लाभलें.

४. त्याचें खर्चापेक्षां उत्पन्न अधिक होतें आणि त्याच्या आकांक्षांप्रमाणें त्याचा खर्च होता.

५. सुझॅन करचॉड नांवाच्या फ्रेंच कुमारिकेशीं गिबन्चा होऊं घातलेला लग्नसंबंध त्यानें बापाच्या सांगण्यावरून दूर केल्यानंतर तो पुढें कोणाशीं लग्नबद्ध झालाच नाहीं किंवा तसा निश्चित विचारहि त्याच्या मनाला शिवला नाहीं!

६. वाङ्मयसेवकांच्या बाह्य दिमाखाचा त्याला तिटकारा असे. खरी

घटना सोडून तिच्या पळत्या सांवलीच्या मागें आपण धांवत असल्याचें हे जन पोळलेल्या अंतःकरणाने मान्य करतात. त्याना कीर्तिलाभ झाल्यासारखा दिसतो ही गोष्ट खरी; पण कीर्तीबरोबरच मत्सर, निंदा, द्वेष व छळ याचा प्रच्छन्न व उघड अहेरहि त्यांना मिळतो. म्हणून गिबन्‌नें केवळ कीर्तिध्येयाच्याच मागें लागून आपली अंतःशांति गमावण्याचें कटाक्षानें टाळलें होतें.

७. गिबन्‌चा स्वभाव शंभर टक्के भावनाप्रधान नव्हता. आनंदापेक्षां दुःखाची चिंता तो मनात कमी बाळगीत असे. त्याला भरल्याच्च अवास्तव स्तुतीचा तिटकारा असे. कारण अशानें ग्रंथकाराच्या विवेकपूर्ण स्वाभिमानाला स्तुतीच्या ऐवजीं धक्काच बसावयाचा असें त्याचें मन हातें; तथापि खाजगी व सार्वजनिक स्तुतीच्या प्रत्यक्ष प्रमाणाकडे मात्र कोणी डोळेझांक करून चालणार नाहीं असें तो म्हणे.

## गिबन्‌चे संकल्पित ग्रंथ

गिबन्‌नें आपल्या उत्तर आयुष्यांत काहीं चरित्रें लिहिण्याचें मनांत योजिलें होतें. ही योजना त्यानें आपला मित्रवर्य लॉर्ड शेफील्ड याच्यापुढे ठेवली होती. पण ती कृतींत आणण्यापूर्वीच तो वारला. हें त्याचें व त्याच्या चहात्यांचें दुर्दैवच होय. आठव्या हेन्रीच्या कारकीर्दीपासून गिबन्‌च्या काळापर्यंत इंग्लंडांत जे थोर थोर मुत्सद्दी, वाङ्मयसेवक, रणधुरंधर व राजकारणी पुरुष होऊन गेले, त्यांच्या चरित्राची व स्वभाववैशिष्टयाची महति गाणारे उद्बोधक प्रबंध लिहिण्याची त्यानें पद्धतशीर योजना आखली होती.

## गिबन्‌च्या बुद्धीचे व हृदयाचे गुणदोष

गिबन्‌ची स्मरणशक्ति अलौकिक होती. एकदा वाचलेला मजकूर तो कधींहि विसरला नाहीं ! इतिहासाचे त्यानें इतके ग्रंथ वाचले पण त्याच्या स्मरणशक्तीनें त्याला एकदाहि वंचिलें नाहीं ! या बाबतींत त्याची त्याच्यानंतरचा सुप्रसिद्ध इतिहासकार मेकॉलेशीं तुलना करतां येण्यासारखी आहे.

लेखनशैलीविषयीं गिबन् अतिशय चोखंदळ व कांटेकोर होता. याची पुरती कल्पना यायला त्यानें आपल्या इतिहासग्रंथांना लिहिलेल्या नुसत्या प्रस्तावनांचा निर्देश करतां येईल. त्या ग्रंथाच्या दुसऱ्या आवृत्तीच्या समयीं

त्यानें त्या प्रस्तावनांतील कित्येक वाक्यांत अर्थव्यक्तव्याच्या दृष्टीनें नव्हे तर केवळ आपल्या चोखंदळ लेखणीचे नटवे चोज पुरविण्याकारितांच लहान सहान किरकोळ सुधारणा केल्या. त्याच्या या कांटेकोर अभिरुचीमुळें त्याच्या लिखाणाच्या प्रत्येक ओळींत श्रेष्ठ कलाकोविदाची अपूर्व कलाकुसर दिसून येते.

पण आरंभीं सांगितल्याप्रमाणें त्याच्या परिश्रमांविषयीं आदर वाढत असला तरी त्याच्या तुसड्या व अहंमन्य स्वभावाविषयीं लोक त्याचा तिरस्कारच करीत. जॉन्सन् क्लबांत ही स्वारी संभाषणाच्या ओघात सहभागी न होता आपल्याच विचारांच्या तंद्रींत गढून गेलेली, मधून मधून आपल्या उंची डबींतील तपकिरीची चिमूट नाकास लावीत असलेलीं आणि मध्येंच जॉन्सन्‌विषयीं आपल्याशींच विरोधभक्तीचे सहजोद्गार काढीत असलेली अशी कधीं कधीं विलसत असावयाची. कारण वक्तृत्वपूर्ण शैली लिहिण्यांत वाकबगार असलेला हा फर्डा लेखनबहाद्दर बोलताना मात्र अडखळत असे! आणि आपलें हें उपजत व्यंग लोक ओळखून मुखदुर्बळ म्हणून आपली टर उडवितील म्हणून हा मनस्वी मानी प्राणी सभा-संमेलनांच्या प्रसगीं तोंडच उघडण्याचें टाळीत असे!

त्यांतच त्याच्या फुगीर गालांची व प्रमाणाबाहेर वाढलेल्या पोटाची भर पडल्यामुळें तो अधिकच उपहासविषय बनला होता! त्याच्या अहंपणाची एक गोष्ट प्रसिद्ध वक्ता फॉक्स यानें खालील मार्मिक शब्दांत सांगितली आहे:— 'मी जेव्हां लॉसेन येथें गेलों तेव्हा गिबन्‌ची कीर्ति ऐकून त्याला भेटलों. स्वारी खुषींत होती. तो खोलींत इतस्ततः येरझारा घालीत पुष्कळ बोलला. आपल्या सफाईदार लेखनशैलीप्रमाणेंच त्यानें भाषणांतील वाक्यांचा विशिष्ट प्रकारें शेवट केलेला पाहून मला नवल वाटलें! पण लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट तर पुढेंच आहे. सर जोशुआ रेनॉल्ड्सनें रंगविलेल्या आपल्या मोठ्या रंगीत भावाचित्राकडे अत्यंत प्रसन्न चित्तानें तो मधून मधून टक लावून पहात होता!'

पूर्वोक्त जॉन्सन् क्लबांतील कांही मनोरंजक आठवणी गिबन्‌च्या गुणदोषांवर इतका प्रखर प्रकाश पाडतात कीं, त्या खालीं देण्याचा मोह अनावर होतो. सॅम्युएल जॉन्सन् व एडवर्ड गिबन् यांजमधील स्वभावभेद यांच्या

क्लबांतील भाषणाच्या वेळीं तेथें असलेल्या एका तरुणानें खालील वेंचक शब्दांत फार मार्मिकपणें विशद केला आहे :—

'गिबन्चा अहंभाव, मनाचा चिरचिरीतपणा, एखाद्याशा बोलण्यानें मनाला लावून घेऊन तात्काळ प्रत्युत्तर देण्याचा त्याचा आवेश, आपला पोषाख दररोज बदलण्यांत व त्याला उंची शृंगारसाज चढविण्यांत तो दाखवीत असलेली तत्परता पाहून हें ध्यान लवकरच माझ्या दृष्टींत भरलें.

'त्या दिवशीं स्वारीनें उंची मखमलीचा पोषाख चढविला होता. त्याच्या हातांत पैशांची पिशवी होती. कमरेला तलवार लटकलेली होती. संभाषणाला जेव्हां प्रारंभ झाला तेव्हां जॉन्सन्ची धीरगंभीर भाषणशैली तर गिबन्ची नाजूक व अलंकारिक वक्तृत्वशैली ठळकपणें दृष्टीस पडली. आणि या दोघांचीं तोंडें अशींच एकमेकांशीं फिरलेलीं रहातील कीं काय अशी मला भीति पडली ! जॉन्सन्च्या भाषणशैलीचा गंभीरपणा कित्येकदा पंडितगिरीकडे झुकत असे; तर गिबन्च्या भाषेचें मार्दव चोखंदळपणाच्या सीमेवर जाई ! जॉन्सन्चें भाषण म्हणजे जणूं मोठमोठ्या तुतारींशीं गायिलेलें संग्रामगीतच; गिबन्च्या सूक्ति मधुर मुरलीरवासारख्या ! जॉन्सन्चा एकंदर जोष बर्फाच्छादित आल्प्स पर्वताच्या रांगांतून बेदरकार वाट कांटीत जाणाऱ्या नेपोलियनासारखा; गिबन्चा संयमित आवेश क्रीडोद्यानांतून विहरणाऱ्या सुखासीन श्रीमंतासारखा ! जॉन्सन्रूपी आस्वलानें मीं मध्येंच तोंड टाकल्याबद्दल मला ओरखडे काढले, हें पाहून गिबन्नें मला सहानुभूतीच्या अंजनाची मलमपट्टी बांधली. त्या निमित्तानें तरी ही एरवीं अबोल असणारी स्वारी सहताप व्यक्त करण्याकरतां माझ्याशीं बोलली. एवढा जाडा इतिहासकार, पण कसें काय कुणास ठाऊक, तो त्या दिवशीं मारे हंसत बागडत विनोदांत डुंबत होता; त्याच्या त्या विशिष्ट संवई तेव्हांहि व्यक्त होत होत्या; मधून मधून तो आपली तपकिरीची डबी हाताळीत तेव्हांहि वरकरणी स्मित करीत होता आणि आपण आपल्या इतिहासाचा एखादा जोरदार प्रवेश लिहीत आहों कीं काय अशा अभिनिवेशानें तो मोठमोठीं वक्तृत्वपूर्ण प्रमाणबद्ध, वाक्यखंडें तेव्हांहि बुजत बुजत बोलत होता !' जॉन्सन्चा पट्टशिष्य बॉस्वेल तर गिबन्ची मिळेल तिथें टरच उडवी ! आपल्या गुरुमाउलीच्या विरुद्ध पंथांतील

प्रत्येकाला कांहीना कांही अहेर देणाऱ्या स्कॉटलंडच्या या वाङ्मयव्यसनी भाटाच्या तावडींतून आमचा चरित्रनायक तेवढा सुटणें मुळीं शक्यच नव्हतें!

बॉस्वेल म्हणतो, "हा गिबन् म्हणजे कुरूप, दिमाखबाज, उपहासविषय असा विलक्षण प्राणी आहे! बेटा आमच्या वाङ्मयसमितीविषयीं माझें मन कलुषित करूं पहातो!" या समितींतील एका भोजनाच्या प्रसंगीं जॉन्सन् आपल्याशींच अर्ध्या विनोदानें म्हणाला, "काळें अस्वल निरुपद्रवी असल्याची आख्यायिका आहे. तरी पण मी त्याच्यावर विश्वासायला तयार नाहीं हो!"

याला उत्तर म्हणून गिबन् हळूच पुटपुटला, 'म्हणावं, मी किनई 'आपणावर' विश्वासायला तयार नाहीं हो!' शेवटीं गिबन्च्या एकंदर स्वभावाच्या ठेवणीविषयीं त्याच्या समकालीनांचें काय मत होतें हें थोड-क्यांत सांगून या लेखाची समाप्ति करूं.

एडवर्ड गिबन् या व्यक्तीविषयीं आपलेपणाचा जिव्हाळा कोणाला वाटण्यासारखा नव्हता. त्याचा तो विलक्षण मानीपणा व ती दुर्दम्य आत्मे-षणा पाहून तिऱ्हाइताला प्रथमदर्शनींच असें वाटायचें कीं, हा माणुस ढोंगी व कांगावखोर आहे आणि म्हणूनच ज्या स्थायी भावांवर प्रेमादर वसत असतात, त्यांनाच हा जणूं ठार करण्यास सरसावतो.

म्हणून डॉ. बर्कबेक हिल म्हणतो :—

"गिबन्विषयीं आम्हांला प्रेमा वाटतो कीं नाहीं हा प्रश्न वेगळा; परंतु तो आमच्या आवडीस उतरत नाहीं इतकी गोष्ट खचित! त्याच्या आत्मगौरवाची भावना, त्याचा भावनाशून्य किंबहुना भावनांच्या चितेवर रचलेला तर्काधिष्ठित युक्तिवाद बहुजनांच्या तरी पसंतीस उतरण्यासारखा नव्हता! म्हणून मी पुनः म्हणतों कीं, गिबन्चें स्वरूप, लक्षण व वागणूक पाहून आम्ही स्वतः त्याची प्रशंसा करूं, वाटल्यास त्याची इतरांस शिफा-रसहि करूं, एकवार त्याच्या विद्वत्तेविषयीं पूर्ण पसंतीहि दर्शवूं; परंतु त्याच्या सगुण मूर्तीविषयीं मात्र 'अन्तरींचें' अगत्य कसें तें वाटतच नाहीं!"

---

## उत्कृष्ट जीविताचा प्रधान हेतु कोणता ?

उत्कृष्ट जीवित तेंच की ज्यांत एखाद्याचें अंतःकरण पूर्णपणें विकसित होतें आणि त्याची बुद्धि परमावधीला पोंचण्यास पूर्णपणें समर्थ होतें. कोणी आपलें जीवित आदर्शदर्शी करण्यास जितक्या प्रमाणांत प्रामाणिक पराकाष्ठा करील तितक्याच प्रमाणांत तें त्याला मोलाचें वाटेल. पण माणसाच्या अंतःकरणाच्या मुलभूत प्रवृत्तींवर हें बहुताशीं अवलंबून असणार. ह्या प्रवृत्ति दोन–अंतर्मुख व बहिर्मुख. अंतर्मुख वृत्तीचा मनुष्य आपल्या आवडीनिवडीच्या वस्तु मनोवांछित भावनांच्या रंगीत चष्म्यातून पहातो आणि आपले भावविभाव व विशिष्ट पूर्वग्रह यांच्याच कसोटीनें त्यांची वरकरणी घाईनें पारख करतो. एखादी वस्तु किंवा घटना कशी आहे हें तो बुद्धया सूक्ष्मपणें पहाण्याचें टाळतो; तर ती आपल्या मनाप्रमाणें कशी असावी अशा गोड स्वप्नाच्या भुलभुलाईतच मनचे मांडे खात असतो !

बहिर्मुख दृष्टि वरील प्रवृत्तीला नेमकी प्रतियोगी असते. ती भावनाच्या ऐवजीं सारासार तर्कावर व विवेकावर आधारलेली असते. ती माणसाला त्याच्या बऱ्यावाईट पूर्वग्रहांपासून किंवा काल्पनिक आशा-आकांक्षांपासून सुटका करते आणि सभोंवार ज्या घटना जगांत घडतात, त्या जशा घडतात तशा –मनोवांछित कल्पनेप्रमाणें नव्हे–विवेकाच्या कसोटीस पूर्णपणें उतरतील अशा रीतीनें त्याला पहावयास भाग पाडते.

आतां कोणतीहि मनोभूमिका शंभर टक्के अंतर्मुख किंवा तितक्याच्च प्रमाणांत बहिर्मुख वृत्तीची असलेली सहसा आढळत नाहीं. पण या दोन्हीपैकीं

एकीकडेच तिचा अधिक कल असल्याचें नित्याच्या व्यवहारांत पदोपदीं आढळतें. पण तीच व्यक्ति धन्य आणि तिनेंच लोकसंग्रह पुरता साधला म्हणावयाचा कीं, जी आलटून पालटून या दोनहि दृष्टिकोनांचा लीलेनें उपभोग घेते आणि तारेवर चालणाऱ्या कसबी कसरतवाल्याप्रमाणें आपल्या मनाचा तोल सुटूं न देतां संयम साधूं शकते. तसें ती न करील आणि एकाच भूमिकेवर सर्वस्वीं स्थिरावेल तर तिच्या सुखाला ओहोटी लागलीच म्हणावयाची !

कारण काल्पनिक ध्येयवर्तुलाभोंवतीं गुंगणाऱ्या अंतर्मुख वृत्तीच्या हळव्या मनाच्या जनापुढें जेव्हां प्रत्यक्ष विषम परिस्थिति सामोरी येते तेव्हां तो गोंधळून जातो आणि पावलोपावलीं त्याची फसगत होऊन त्याचें भ्रांतीचें पटल लौकरच दूर होतें !

उलटपक्षीं केवळ तार्किक बहिर्मुख दृष्टिकोनच जर कोणी कवटाळला तर मानवी हिताचीं व भूतदयेचीं भारी कर्तव्यें नीट पार पाडण्याचें त्यास भानच रहाणार नाहीं ! याचा परिणाम मात्र असा होतो कीं, प्रत्येक माणसाला कलोपासक किंवा ज्ञानोपासक किंवा धंदेवाईक कर्तव्यें करण्यापूर्वी मानवी व वैयक्तिक कर्तव्यें त्याला पार पाडायचीं असतात या महत्तम गोष्टीकडे डोळेझाक होते.

विशुद्ध भावनांचा पूर ओसरल्यावर त्यांचा गाळीव अर्क काव्याच्या रूपानें स्रवतो. आणि हें काव्य हृदयाच्या वेदनांना शांति देण्यास समर्थहि होतें. पण मागचा पुढचा विचार न करतां व न विश्रमितां जर कवि प्रतिभेचे पंख अंतराळात दिवसरात्र फडफडूं लागले तर त्यांचें बळ कमी होऊन लौकरच त्याना ग्लानि आल्याविना कशी राहील ? म्हणून तर अंतर्मुख भावनांच्या काव्याच्या जोडीला बहिर्मुख बुद्धीचें विज्ञानहि अवश्य हवें. काव्य भावनांच्या गाळीव अर्कांतून स्रवतें तर भौतिक विज्ञान जगांतील सत्याकडे पूर्णपणें लक्ष देऊन त्याचें निर्विकारपणें पृथक्करण करतें. काव्य रचून रचून जर कवि दमला तर विज्ञान त्याच्या श्रांत मनाला ताजा हुरूप आणील आणि नवनवीन काव्यें रचण्यास त्याला मनापासून स्फूर्ति देईल. उलटपक्षीं मृदु भावनांचा नाजूकपणा व जीवितामागील असंवेद्य गूढ आदिप्रेरणा यांचा अहेर कवि विज्ञानशास्त्रज्ञाला खचित करील.

म्हणून उत्कृष्ट जीविताला मानसिक किंबहुना आध्यात्मिक शांतीबरोबरच शारीरिक व स्थानिक स्वास्थ्याचीहि आवश्यकता आहे. बहिर्मुख सत्यान्वेषण-बुद्धीचें मूर्त फळ म्हणजे विज्ञान. विज्ञानामुळेंच मानववर्गाचे अगणित क्लेश मोठ्या प्रमाणात निवारतां आले आहेत. पण केवळ विवेकाधीन, तार्किक निष्ठाच पदरीं असून पुरणार नाहीं; भावनांच्या रसरसत्या ज्वालामुखीच्या पोटांतील तप्त लावारसाचीहि थोडीशी कल्पना हवी. कारण केवळ ज्ञान व अनुभूति यांचा संगम साधून भागणार नाहीं; त्याबरोबरच श्रद्धा व विश्वास यांचें अभेद्य कवचहि हवें.

येणेप्रमाणें विज्ञान व काव्य, तत्त्वज्ञान व कला, बहिर्मुख व अंतर्मुख प्रवृत्ति, एकमेकांना साह्य करून परस्परपूरक होऊं शकतात आणि या दोन्हींचा मधुर मिलाफ झाला म्हणजे अंतरात्म्याची शांति ती कितीशी दूर आहे बरें ?

आतां प्रस्तुतच्या चर्चाविषयाकडे वळूं. वैयक्तिक संबंधांचें सांसारिक जीवन चांगलें कीं कल्पनाकाशांत तरंगणाऱ्या कलोपासकाचें जीवन चांगलें ?

सर्वसाधारण मानवी कर्तव्यांचीं जितकीं म्हणून अंगोपांगें आहेत त्यांचा समावेश वैयक्तिक जीवनांत होतो. सांसारिक जीवनांत हरघडी जे अकल्पित बरेवाईट प्रसंग येतात त्यांचा ओझरता तरी अनुभव घेण्याच्या दृष्टीनें देखील हें जीवन खचित उपभोगण्यासारखें आहे. मानवी आदिप्रेरणांना वाचा फोडणारें हें भूतदयापर गृहजीवन लाथाडून कलोपासकाचें मनोवांछित पण कांहींसें उग्र व एकांगी जीवन कोणी पसंत करणें ही घोर आत्मवंचनाच नव्हे तर काय ? आणि तेणेंकरून त्याला जीविताचें प्रत्यक्ष सुख व त्यामागील शांति यांनाच पारखा झाल्याचें दुःख भोगावें लागतें.

समजा, एखादा कवि आपलीं घरचीं व सामाजिक कर्तव्यें बुद्ध्या लाथाडतो आणि स्वतःच्या उतू पहाणाऱ्या आनंदाला किंवा पिचणाऱ्या आर्तत्वाच्या भावनांना कवनद्वारा वाचा फोडण्याचा कांहींसा स्वार्थी व एकांगी प्रयत्न करितो. पण तो बहुधा ही गोष्ट विसरतो कीं, आपण थोर कवि किंवा उच्च कलोपासक किंवा रसिक सौंदर्यसमीक्षक असण्यापूर्वीहि मुळांत मानवी प्राणी आहों. आणि त्या दृष्टीनें आपण प्राप्त कर्तव्यें प्रथम कसोशीनें केलींच पाहिजेत. प्रयत्न करतां करतां सुदैवानें एखादें मनाजोगतें उत्कृष्ट काव्य रचण्याइतका तो

यशस्वी झाला तर त्याला लोकस्तुतीचा किंचित् प्रसाद मिळतो. पण त्याची अंतर्मुख भावना त्याला लगेच विचारते की, "पण आधीं मला या प्रश्नाचें सरळ उत्तर देशील कीं नाहीं ? तुला स्वत: तुझ्या हृदयाची तरी शांति लाभली का ? तुझ्या आप्तस्वकीयांच्या प्रेमभावनांचा उतराई होण्यासाठीं त्यांना तूं प्रेमाची परतभेट केलीस का ?"

म्हणून असा अनुभव आहे कीं, जे कोणी वैयक्तिक किंवा सांसारिक संबंध निष्ठुरपणें लाथाडून शंभर टक्के वैज्ञानिक किंवा कलोपासक किंवा काल्पनिक जीवित कंठण्याचा अट्टाहास करितात त्यांना निराशेचीं फळें भोगतां भोगतां अखेर उष्ण निःश्वास सोडावे लागतात. कारण वाङ्मय, कला व विज्ञान यांच्या-मागें सदैव प्रेरक शक्तीप्रमाणें असणारें व त्यांचें पोषण करणारें तरी जीविता-विना अन्य कोणतें ? म्हणून जीविताविना, किंवा त्याच्या चितेवर उभें असलेलें वाङ्मय काय, कला काय, विज्ञान काय, त्यांचा उपयोग यथातथाच ! कारण 'जीवित जीवित' म्हटलें तरी असें काय मोठेंसें गूढगुंजन लागून राहिलें आहे कीं ज्यांत वैयक्तिक मानवी हितसंबंध रेशमाच्या मृदुमधुर पाशांनीं सामावले जाऊं नयेत ? आणि हे संबंध तर अंतरींची शांति पुरविण्यास पूरकच ठरतात.

पण ज्या जीवनभ्रमांत केवळ वैयक्तिक हितसंबंधांची मात्र पूर्ति संकल्पित असते पण ज्याच्यामागें उज्ज्वल ध्येयसूर्याची तळपती प्रभा नसते, तें वंचित आत्मतृप्तींतच रंगेल ! कारण म्हणच आहे कीं, 'जेथें अज्ञान हेंच कांही धन्यता म्हणून मानलें जातें तेथें ज्ञानाचा उपदेश करणें मूर्खपणाचें होईल!' पण विवेक-युक्तिवादी सुसंस्कृत मनुष्य व असंस्कृत रानटी राक्षस यांच्यामध्यें एक ठळक भेद आहे. तो हाच कीं, पहिल्याच्या ठायीं पृथक्करणशील तर्कबुद्धि वास करीत असते आणि ती त्याला आपल्या डोळ्यांपुढें कोणतें तरी उन्नत ध्येय सदैव ठेवून आपल्या आश्रितांचीच काय, पण साऱ्या भूतमात्रांचीहि निष्काम सेवा करण्यास वरचेवर प्रेरणा करीत असते. आणि नरराक्षसाचें ध्येय कोणतें ? तें सांगितलें पाहिजे काय ? किंवा सांगण्यासारखें आहे काय ?

---

# लेखकांची प्रतिभा व नीति यांविषयीं गॅल्सवर्दीनें काढलेला रसबोध

## जॉन गॅल्सवर्दी यांच्या आठवणी व पत्रें

(सुप्रसिद्ध. आग्ल कादंबरीकार, नाटककार व विख्यात नोबेल पारितोषिक मिळविलेले कि० जॉन गॅल्सवर्दी यांच्या आठवणी व पत्रव्यवहार "जोन ओ' लंडन्स वीक्ली" लंडन, या सुप्रसिद्ध साप्ताहिकांत प्रसिद्ध झालीं आहेत. वाङ्मय, लेखन व जीवित या विषयाला अनुलक्षिलेले त्यांपैकीं कांहीं मननीय विचार खालीं दिले आहेत)

### आर्. एच्. मोट्रॅम यांस गॅल्सवर्दीनें लिहिलेलें एक पत्र

ता. ४ ऑगस्ट १९०६

(१)

"कला व नीति यांजविषयीं आपण मला एक खोंचदार प्रश्न विचारला आहे. म्हणून मी थोड्याच अर्थगर्भ सूक्तींचा आश्रय करून उत्तर देतां येतें कीं काय पहातों. जीवित म्हणजे एक मोठें यंत्र असें कल्पिलें तर कला व नीति हे दोनहि त्याचे सुटे भाग होत. दोन्हीहि तितक्याच महत्त्वाच्या आहेत. मात्र, त्यांच्यांत एक ठळक विरोध आहे.

कलोपासक काय करतो ? तो जीविताचें यथातथ्य निरीक्षण करतो व आपल्या जागृत भावनाचक्षूंच्या योगानें नवनवीन विचारांचा संग्रह सांठवितो. आणि या संग्रहांतून आपल्या प्रकृतिधर्माप्रमाणें अभिनव रचना व बांधणी करतो. पण त्याचा एकमात्र प्रधान हेतु असतो. तो

हाच कीं, वाचकांच्या भावनाप्रावान्याला आव्हान देऊन तेणेंकरून आनंदाची त्वरित उत्पत्ति करणें.

नीत्युपासक साधक-बाधक रीतीनें जीविताचें कसोशीनें परिशीलन करतो, त्यापासून समान सत्यें सूक्ष्मपणें पडताळतो, जीवितांत खरें काय, खोटें काय याविषयीं सिद्धांत पाडतो आणि असे नियम व उपनियम रचितो कीं, जे भावनाप्राधान्याचा उपयोग किंवा दुरुपयोग होऊं न देतां, थोड्याशा विशिष्ट व्यक्तींनाच नव्हे तर बहुजनांनाहि आनंद देण्यास व तो पुढें सतत टिकवून धरण्यास समर्थ ठरतात.

तात्पर्य त्यांची कार्यपद्धति कलोपासकांशीं प्रतियोगी आहे.

आनंदानिर्मितीच्या दृष्टीनें कलाकोविद कुशल असतो; तर नीत्युपासक अभावसूचक किंवा नकारात्मक असतो.

निर्भेळ कलोपासक किंवा पुरेपूर नीतिवादी अशा व्यक्ति क्वचित्च आढळतात हें उघड आहे, किंबहुना जवळ जवळ नाहीं-तच म्हटल्या तरी चालेल !

या दोन्ही प्रकारच्या व्यक्तींमधील 'मी'पणा जेव्हां व्यक्त होतो तेव्हां मात्र त्यांजमधील विरोध उघड दिसूं लागतो. तेव्हां 'व्यक्ति' या नात्यानें कलोपासक स्वभावतः नीत्युपासकाच्या विरुद्ध गोटांत जातो. म्हणजेच ते दोघेहि अतिवादी असतील तर त्यांची हमरी-तुमरी जुंपेल, एरवीं नाहीं.

आतां नीतीचीच गोष्ट घ्या. जगात जी आज नीति म्हणवून घेते तीच उद्यां अनीति ठरते आणि म्हणून तिच्या व्याख्येंत पुष्कळच घोंटाळा उत्पन्न झाला आहे. तथापि या दोन्हींपैकीं कलो-पासकाची भूमिका कांहींशी अधिक अनुकूल असते. कारण तो अशा वस्तु हाताळीत असतो कीं ज्या बहुधा बदलत नाहींत. उदाः— निसर्गाच्या क्रिया म्हणा, त्यांच्यांशीं पंचेंद्रियांचा संबंध म्हणा, बद-लत नाहींत. (कदाचित् त्यांची बदलण्याची अवस्था इतकी सावकाश होते कीं, ती मुळीं डोळ्यांतच भरत नाहीं !)

शेक्सपीअरचेंच उदाहरण घेऊं. तो श्रेष्ठतम कलाकोविद होय

ही गोष्ट तर निर्विवाद आहे. पण कांहीं जण त्याला तितकाच श्रेष्ठ नीतिवादी म्हणून संबोधतात. "नीतिवादी" या शब्दाचा अतिशय विस्तृत व सढळ उपयोग ते करीत असतात असें मला तरी वाटतें. कारण नीतिवादी झाला तरी विशिष्ट नीतिप्रणालींचा शकप्रवर्तकच असतो. आतां तें शक त्याच्या आयुष्यांतील असेल किंवा पुढचेंहि असेल. पण तें शक असतें इतकें खास. पण शेक्सपीअरच्या कलाकृति निरवधि होत !

कित्येक लेखकांच्या लिखाणाचा—विशेषतः औपरोधिक लेख-कांच्या लिखाणाचा—नीतिबोध हा आत्मा असतो. पण कला व नीति या दोन प्रवृत्ति एकमेकींशीं भांडल्याच पाहिजेत असें नाहीं. मग त्यांचा लाक्षणिक अर्थ कांहीसा भिन्न भासेना ! लेखकानें दोन्ही प्रका-रांना पुरता वाव देणें आणि त्यांचें ठसठशीत वैशिष्ट्य दाखविणें यापरता त्यांच्यांत भेद नाहीं !

कलाकोविदाला जीविताचा पुरेपूर उपभोग घेणें साधेल का ? पण त्याची भूमिका अतीत प्रेक्षकाची असावी आणि त्याची बुद्धीहि अतिशय चिकित्सक हवी.

कॉन्रॅड या कादंबरीकाराचेंच उदाहरण घेऊं. शुद्ध कलानिर्मात्यांत मी त्याला कदाचित् उच्चतम स्थान देईन. त्याच्यांत नीतिबोधकाचा जोशच नाहीं !

टर्जेनिव्ह कॉन्रॅडपेक्षां श्रेष्ठतर कारागीर होय. पण त्याच्या अंगींचा नीत्युपदेशकाचा संचार त्याला पूर्णपणें आवरतां आलेला नाहीं !

बंडखोर टॉलस्टॉयच्या अंगीं या दोनहि प्रवृत्ति सारख्याच दृष्टीस पडतात. पण त्याचे विचार व भावना इतक्या आवेशपूर्ण व भडक आहेत कीं, संयम नसलेल्या झोंपाळ्यासारखी कांहीशी त्याची मनः-स्थिति दिसते ! म्हणून कला व नीति या दोहोंच्या संगमामुळें त्याला कित्येकदा कष्ट झाल्याचें आम्ही पहात नाहीं काय ?

सामान्यपणें असेंहि म्हणतां येईल कीं, जितक्या प्रमाणांत नीति-

वाद्याच्या अंगांत कलाकोविदाचे गुण वसत असतील तितक्या प्रमाणांत त्याच्या कृति चिरस्थायी ठरतील. उलटपक्षीं, शेक्सपीअर होमरसारखे जे श्रेष्ठतम कलाकोविद माणसाच्या नीतींच्या ऐवजीं विश्वासंबंधीं व निसर्गासंबंधीं नीतींचा ऊहापोह करतात त्यांची कीर्ति अक्षय्य ठरते. पण बहुतेक कीर्तिवंत साहितींच्या कलाकृतींत कला व नीति यांचें कमीअधिक मिश्रणच आढळतें. कदाचित् 'नीति' म्हणजे केवळ निसर्गासंबंधींची नीति अशी आपली कल्पना असेल तर अशा भ्रमापासून आपण सावध रहाणें बरें. कारण इतरांच्या दृष्टीनें तरी ही नीतीची अस्पष्ट छटाच होय !"

(२)

लेखक व कादंबरीकार यांनीं पाळावयाच्या नियमासंबंधीं कांहीं विचार गॅल्सवर्दीनें पूर्वोक्त "जॉन ओ' लंडन्स वीक्ली" या साप्ताहिकाच्या ता. १९-१०-१९३५ च्या अंकांत प्रसिद्धिले आहेत ते येणेप्रमाणें :—

"लेखनव्यवसायास प्रारंभ केल्याच्या पहिल्या सात वर्षांपर्यंत मला कसलाहि मोबदला मिळाला नाहीं !

(१) पहिला मुद्दा हा कीं, कांहीं लेखक तरी 'जन्मसिद्ध' नसतात.

(२) दुसरा मुद्दा हा कीं, अशा लेखकांना 'लेखनव्यवसायाची उमेदवारी' करतांना निर्वाहासाठीं दुसरा एखादा स्वतंत्र व्यवसाय किंवा नोकरी अवश्य हवी.

(३) तिसरा मुद्दा हा कीं, ज्याचा लेखक होण्याचा दृढ निश्चय आहे आणि जो कशाहि अडचणींना न जुमानतां निधड्या छातीनें आपला गाडा पुढें रेटतो, तोच पुढें यशस्वी होऊं शकतो.

(४) चौथा मुद्दा हा कीं, जो लेखक जनता, संपादक किंवा प्रकाशक यांच्या अभिरुचीच्या मुळींच आहारीं न जातां आत्म-तृप्तीसाठीं प्रामाणिकपणें लेखन करतो, तोच शेवटीं यशस्वी होऊन उत्कृष्टतेच्या पदवीला पोंचतो.

(५) पांचवा आणि विशेष महत्त्वाचा मुद्दा हा कीं, अननुभवी तारुण्यांतच लेखनास प्रारंभ करणें आत्मवंचना होय. आधीं जगा,

जगांतील विविध अनुभव पुरते चाखा, आणि नंतरच लिहि-ण्याचा विचार करा. माझीच गोष्ट सांगतों. मी लेखनास प्रारंभ करण्यापूर्वी जगाचा बराच अनुभव अनहंकारपूर्वक घेतला होता. पण आतां मला असें वाटतें कीं, वयाच्या अठाविसाव्या वर्षी देखील मीं प्रथम लेखनांत उडी घेण्यांत कांहींशी घाईच केली !

(६) सहावा मुद्दा हा कीं, होतकरू लेखकाला बहुधा एक किंवा फार तर दोन आदर्श साहित्याचार्योंकडून स्फूर्ति व साह्य मिळूं शकतात. पण सामान्यपणें असें म्हणतां येईल कीं, जगांतील सार्‍याच थोर लेखकांपासून तो स्फूर्ति शोधूं पाहील तर त्याला लाभ होण्याऐवजीं तोटा होण्याचाच संभव फार ! कारण प्रत्येक भावी लेखकाला, जो कोणी त्याच्या अंतःकरणाच्या भावनांना पुरतें आव्हान देईल व त्याच्याशीं सहानुभूतीनें समरस होईल अशा एखाद्या कसलेल्या विद्यमान साहित्याचार्यापासून त्याच्या मनोधर्मा-प्रमाणें व अंतःशक्तीप्रमाणें हवी ती अंतःस्फूर्ति लाभेल; आणि त्याच्या आकांक्षेप्रमाणें त्याला शिक्षण मिळेल. त्याच्या प्रतिभेचे कोवळे पंख त्या स्फूर्तीमुळें जसजसे सुदृढ होतील तसतसें तो इतरांचें अनुकरण करण्याची प्रवृत्ति घालवून देईल."

## (३)

("जॉन ओ' लंडन्स वीक्ली"च्या ता. २-११-१९३५च्या अंकावरून)

### गॅल्सवर्दीच्या पत्रांतील कांहीं निवडक वेंचे

"दोघां मित्रांच्या मनोभूमिकेंत जर एक प्रकारचें निकटवर्ती साधर्म्य असेल तर मात्र, त्यांजमधील विचारविनिमयापासून झाल्यास कांही तरी फायदा होईल असें मला वाटतें..........

ललित कलांची जे उपासना करतात त्यांनीं जगांतील प्रत्यक्ष अनुभवांशीं आपल्या व्यक्तिमत्वाचा जितका संबंध घडेल तितका आनंदानें सोसून त्यांत दडलेलें आपलें चैतन्य कुशलपणें हुडकण्याचा प्रयत्न करावा. "परिपूर्ण सत्य" अशी वस्तु आढळत नाहीं ! जगांत आम्हांला जितकें सत्य किंवा त्याचा अंश कसोशीनें पहातां दिसून

येतो व त्यांत जी सुंदर प्रमाणबद्धता आढळते ती पाहून आनंद पावणें उचित. पण त्या प्रमाणबद्धतेच्या घटनेचें पृथक्करण करूं पाहणें व त्याविषयीं तावातावानें वादविवाद करणें पोकळ होय.''

(४)

आपल्या लेखनाच्या हेतूबद्दल एका महिलेस लिहिलेलें उत्तर.

११ डिसेंबर १९१२

''प्रिय सौ......ला अनेक नमस्कार. आपण माझ्या लेखनाचा हेतु विचारता. माझ्या भावनांना वाट सोडणें, मनोभूमिकेला व इंद्रियांना योग्य प्रकारें वाचा फोडणें, माझ्या दृष्टीनें जीविताच्या अवतारकार्याचा साक्षात्कार करणें यापरती माझी कोणतीहि सहेतुक आकांक्षा नाहीं! विशिष्ट वाचकांकरितां किंवा श्रोत्यांकरिता म्हणून मी लेखन करीत नाहीं! आणि माझ्या लिखाणापासून वाचक प्रत्यक्ष कोणता धडा किंवा बोध घेतात याचीहि मला मुळीं चिंता नाहीं! मात्र ज्यांच्या हृदयवीणेच्या तारा माझ्या तारांशीं समरस असतील अशानाच मजविषयीं सामान्यपणें सहानुभव वाटेल. ज्यांना तसा तो वाटत नसेल ते अर्थात्‌च माझी उपेक्षा करतील! माझें तात्त्विक म्हणा, धार्मिक म्हणा, ध्येय एकच आहे. तें ॲडम लिंडसे गॉर्डनच्या शब्दांत सांगतों :—

'जीवित म्हणजे नुसता फेंस व बुडबुडा होय! पण त्यांतहि दोन गुण ठळकपणें दिसतात. इतरांच्या कष्टाविषयीं सहानुभूति आणि स्वतःच्या कष्टांसंबंधीं धैर्याची भावना. फलाच्या कामनेनें जीविताच्या आचरणामागील सौंदर्य निरखूं पाहणें माझ्या मतें निरर्थक होय. पूर्णावस्थेच्या सिद्धीसाठीं तिचा निष्काम ध्यास धरणें यांतच खरी सौंदर्यसमीक्षक बुद्धि सांठविलेली आहे. ''The Inn of Tranquillity'' हें माझें पुस्तक वाचून कदाचित् माझ्या अयशस्वी जीवितामागील अंतःकरणाचा गाभा आपल्याला आकलतां आल्यास पहा'.''

(५)

वरीलप्रमाणेंच पृच्छा करणाऱ्या एका पुरुषाला लिहिलेलें पत्र.

२२ जानेवारी १९१४

"प्रिय......यांस नमस्कार.

कोणीहि आपल्या अंतःकरणाच्या मूलहेतूंची फोड करण्याचा फारसा प्रयत्न करूं नये अशी आपली माझी धर्मभोळी समजूत आहे ! ज्या अंतःप्रेरणा माणसाला लेखनाला प्रवृत्त करतात त्यांचें दर्शन आपल्या मनोभूमिकेच्या पारदर्शक आरशांतून दाखविण्यास त्यास शक्य होईल हा विचारहि मला सहन होत नाहीं ! कारण भावना आकांक्षा व तत्त्वज्ञान यांच्या उलट सुलट भोवऱ्यांनीं घुसळून निघणाऱ्या पाण्याच्या प्रवाहांतून तो आपल्या लेखनाचें होडकें सुरक्षित नेण्यासाठीं आपल्या साऱ्या व्यक्तिमत्वाची पराकाष्ठा करीत असतो ! 'आपली व्यक्तिमत्ता' ही कांहीशी गूढ व अतर्क्य वस्तु आपल्या कृतीच्या आरशांत प्रतिबिंबित करण्यासाठीं, आपल्या व्यक्तित्वाला वाचा फोडण्यासाठीं तो लिहितो. या दृष्टीनें मी स्वतः माझ्याच मनोव्यापारांचें व अतःकरणाचें अजून आत्मलक्षी पृथक्करण केलेंच नाहीं; आणि तसें तें करण्याचा प्रयत्न करणेंहि ठीक होणार नाहीं ! कलाकोविदाची किंवा निर्मात्याची जी अंतर्भेदी सृजनशक्ति असते तिचे तंतू न् तंतू उलगडून पृथक्करण करण्यांत विधायकतेपेक्षां विध्वंसतेचाच भाग अधिक आहे. कारण सृजनशक्तिरूपी हंस अत्यंत लाजाळू असल्यामुळें त्याच्या अंगोपांगाविषयीं अतिमात्र चिकित्सा करूं पाहिल्यास तो मुळांत अंडीं घालण्याचेंच रहित करील याची वाट काय ?

आतां आपल्या दुसऱ्या प्रश्नाला उत्तर देतों. आपण विचारतां— "देशाच्या उत्क्रांतियुक्त संस्करणाला हातभार लावण्यांत प्रस्तुतच्या कादंबरीकारांच्या कलाकृति कितीशा प्रेरक ठरल्या आहेत ?"

अशा कलाकृति जनजीवनाच्या संस्करणाला मोठ्याच प्रमाणांत इष्ट वळण लावूं शकतात यांत शंका नाहीं. पण तें तागडींत घालून

त्याचें माप इतकेंच भरेल असें म्हणणें मात्र धाडसाचें होईल ! कादंबरीच्या वाचकांच्या हृदयांत जे लेखकाच्या विचार-विकारांच्या सुकुमार फुलांचे बाण रुततात त्यांचें रेखीव स्वरूप ठरवून त्यांच्या गुण-धर्मांची कसोटी पारखूं पाहणें हें काम अतिशय सूक्ष्म व गुंतागुंतीचें असून तें हाताळतां येणें कठिण आहे ! समजा, एखादा माणुस शह-राच्या एका गजबजलेल्या आळींतून त्वरेनें जात आहे. त्याला जीं दृश्यें दिसतील, ज्या घटना तो अनुभवील, ज्या गोष्टी तो ऐकेल आणि ज्या वस्तूंचा तो वास घेईल त्या सर्वांचें सामुदायिक मिश्रण जर तो प्रत्यक्ष आपल्या हातांत घट्ट आवळून धरूं पाहील तर त्याची स्थिति काय होईल बरें !

कादंबरीवाचकाची स्थितीहि कांहींशी अशीच असते. तो कल्पित जीविताच्या आळींतून जातो. त्याच्या हातीं शेवटीं काय वस्तु सांपड-तील आणि कोणत्या निसटून जातील हें पूर्वींच कोणी कसें सांगावें ! कादंबरी हें अत्यंत लवचिक पण दूरवर परिणामकारक असें मनुष्यां-मनुष्यांमधील विचारविनिमयाचें एक उत्कृष्ट साधन होय. याचें एक प्रमुख कारण असें कीं, कादंबरी-लेखन हें कांही मूलतः उपदेशकाचें व्यासपीठ नव्हे ! पण कादंबरीकार अशीं कांहीं शब्दचित्रें व प्रसंगचित्रें काढतो कीं, ज्यांच्या अनुभूतीपासून ज्या वाचकाला जी कथावस्तु आपल्या प्रकृतिधर्माला मानवते ती त्याला सहज घेतां येईल. म्हणून कादंबरीचें अवतारकार्य, उगाच गाजावाजा न करतां, जन-तेच्या कल्पकतेची सुसमृद्धि करणें असेंहि म्हणतां येईल. म्हणून ज्या कादंबऱ्या उघड उघड विशिष्ट प्रचारकार्यासाठीं रचल्या जातात अशा कादंबऱ्यांवांचून इतरांपासून आपण प्रत्यक्ष तो काय बोध घेतला आणि कोणतें अभिनव परिशीलन केलें असें कोणास विचारलें तर तो काय उत्तर देईल बरें ! आतां मीं ही गोष्ट सांगितल्यास कदा-चित् अयुक्ताभास व्हायचा कीं, अशा प्रचारमुखी कादंबऱ्यांपासून खरा व चिरकालिक असा परिणाम फारसा मागें रहात नाहीं ! कारण प्रत्येक कलाकृतीचा प्रधान हेतु आत्मसाक्षात्काराचा आनंद

हाच होय. आणि त्यांतील कादंबरीरूपी विशिष्ट कृति तर माणसाच्या मनाचे व विवेकबुद्धीचे धागे न् धागे उकलून नी उलगडून त्यांच्या अवयवांमागील अत्यंत नाजूक लवचिक व गूढ संवेदना वाचकास जाणविते; आणि तेणेंकरून कादंबरीकाराच्या अनुभवांचा व भावनांचा साक्षात्कार सहानुभवी वाचकांच्या अंतःकरणांत होऊन त्याना पुनःप्रत्ययाचा आनद होतो. म्हणून नाटकापेक्षाहि कादंबरी अधिक भावद्रावक व सुधारणाप्रसारक होय अशी माझी दृढ श्रद्धा आहे. कारण नाटकाचा परिणाम तितक्या तासापुरताच व्यक्त असतो. पण कादंबरीचें वाचन त्या मानानें किती तरी अधिक काळपर्यंत सावकाश, निवांत व पूर्णांशानें पचविणारें, असें असतें. कारण स्वतः वाचकाला प्रत्यक्ष कळण्यापूर्वीहि कादंबरी हळूच त्याच्या मनोभूमिकेंत नकळत मूक क्रांति घडवून आणीतच असते. आणि तो जितक्या अबोधपूर्व रीतीनें कादंबरीवाचन करतो तितक्या प्रमाणांत कादंबरीचा परिणाम त्याच्या मनावर सूक्ष्मपणें होतोच होतो! त्याला त्यातून स्वतःची सुटका करण्याइतकेंहि भान राहत नाहीं!

तथापि एखाद्या कादंबरीकारानें त्याच्या मातृभूच्या उत्क्रांतीला कितीसा सक्रिय हातभार लावला याचें रसिक समीक्षण करून मला बोधामृताचे घुटके पाजा असें जर आपण सागाल, तर मात्र माझ्यानें हें काम होणार नाही हें मी तात्काळ मान्य करतों."

(६)

## कलानिर्मितीचा प्रधान हेतु कोणता ?

कारागीर सुंदर कलाकृति रचण्यास इतका उतावीळ कां होतो? त्याला तसें काहीं पटवणारें कारण सांगता येणार नाहीं! त्याला तें विशद करतां येणार नाहीं! विश्वगोलाचेंच उदाहरण घ्या. तो सदासर्वदा वर्तुळाकार फिरतो व या भ्रमणांतच नित्य नवनवीन सृष्टि निर्माण करतो तें कां? आणि अंमळ विचार करूं जातां या बाबतींतील मानवी हृदयाच्या आदिप्रेरणा व वेदना जीवितरूपी शिंपल्यांतील जणूं मोतींच नव्हत काय? ज्याप्रमाणें निसर्गाला संशय किंवा पराजय

यांचा लवलेशहि नसतो, आणि तो धैर्यानें आपला अजस्र गाडा पुढें चालवितो, त्याचप्रमाणें निर्धास्त कलोपासक आश्चर्यकारक अद्‌भुततेनें यशस्वी व अयशस्वी कलाकृति सारख्याच रचतो, तसा तो आजवर रचीत आला आहे आणि यापुढेंहि रचीलच रचील !

माणसानें जेव्हां करुणभावनेची प्रथम योजना केली तेव्हां त्याच्याकडून एक नवल वर्तलें. जसें जीवित आहे त्याचप्रमाणें तें उपभोगण्याचें सामर्थ्य त्यानें आपल्यापासून असें हिरावून घेतलें. पण त्या जीवितापासून आपणास पुढें इष्ट तो बदल घेतां यावा अशी कांही त्याची इच्छा दिसली नाहीं, हें ठीक झालें नाहीं असें मला वाटतें. कारण ही करुणभावना नसती तर आमच्या जीविताच्या प्रयोजनाची आम्हांस तितकीशी चिंता वाटली नसती. कारण करुणभावना झाली तरी तो एक आत्मसंवेदनेचाच भाग आहे. पण त्या भागाच्या अभावीं आमच्या जीवितहेतूवर प्रकाश पाडणाऱ्या विविध गोष्टींविषयीं आम्हांस तितकेंसें अगत्य वाटणार नाहीं. शिंपल्यांतील जंतु मेले तरी त्यांतील मोत्यांची जगांतील अत्यंत सुंदर वस्तूंतच गणना होते ! आणि शिंपल्यापेक्षांहि मोत्यांचें मोल किती तरी पट अधिक मानतात !"

## जॉसेफ मॅझिनीचीं कार्लाईल बाईला पत्र

### पूर्वपीठिका

(प्रसिद्ध स्कॉच तत्त्ववेत्ता टॉमस कार्लाईल याची जेन वेल्श कार्लाईल ही पत्नी होय. या दोघांमध्यें जिव्हाळ्याचें प्रेम होतें. पण कार्लाईक कित्येकदा लेखनासाठीं एकांतीं उंच माडीवर जी बैठक मारी तेथून तासन् तास खालीं येतच नसे ! लेखनवाचनांत तो दररोज इतका गढून असावयाचा कीं आपल्या प्रिय पत्नीशीं प्रेमाचे चार शब्द बोलण्याचें मनात असूनहि त्याला तसा अवकाश सांपडत नसे ! ती माहेरीं किंवा दुसरीकडे गेल्यावेळीं तो नेहमीं आपलें अंतःकरण तिच्यापुढें पत्रद्वारा मोकळें करी व क्षमायाचना करी. पण फिरून त्याचा कामाचा गाडा यथापूर्व चालत असे. तिच्या अंगीं लेखनगुण बीजरूपानें वास करीत होते हें तिच्या प्रकाशित पत्रव्यवहारावरून दिसून येतें. त्यांची पतिसंनिध वाढ होण्यासारखी परिस्थिति मुळींच नसल्यामुळें ती जिवाला अतिशय कंटाळत असे. अशाच एका प्रसंगीं झालेल्या पतिपत्नींमधील भांडणानंतर अत्यंत उदास मनःस्थितींत तिनें त्यांचे सन्मित्र, प्रसिद्ध निर्वासित इतालियन देशभक्त जॉसेफ मॅझिनी याला हृदयद्रावक दोन पत्रें लिहिलीं. त्यांना हीं मॅझिनीचीं उत्तरें होत)

(१)

लंडन, जुलै १८४६.

"अनेक आशीर्वाद.

आपल्या एवढ्याशाच पत्रामुळें देखील आपल्या उदास मनःस्थिती-

मागील खळबळीची पूर्ण कल्पना आली. पण 'आपुला आपण वैरी' या वचनाचें सार मीं आपल्याला निराळें का सांगायला पाहिजे ? आपणच आपल्या गतचारित्राचें व चारित्र्याचें संथपणें, निर्विकारपणें, परीक्षण व पृथक्करण करूं शकतां. उडत्या कल्पनांची नसती भुतावळ जी आपणच आपल्यासभोंवतीं उभी केली आहे आणि जी आपल्याला नित्य भेडसावीत आहे, तिला पार हांकलून लावण्याचा यशस्वी प्रयत्न आपणच करूं शकता. दुसरा कोण करील बरें ! वर्तमानकाल कसा का असेना, त्याला अचल धैर्यानें तोंड दिलें पाहिजे, निज-कर्तव्यांची पुरती जाणीव मनांत सदैव बाळगली पाहिजे, अमर आत्म्याविषयीं नितात आदरबुद्धि ठेवली पाहिजे, भविष्यकालाविषयीं एक प्रकारची धर्मपरायण आस्तिक्यबुद्धि बाळगली पाहिजे, ही सारी शिकवण आपणच मनन करून शक्य तेथें आचरणांत आणण्याची पराकाष्ठा करायला हवी. म्हणजे भावी कालात संकटाच्या घनदाट मेघा-तून सुखशांतीचा उज्ज्वल सूर्य तळपल्यावांचून राहणार नाहीं. असा दुर्दम आशावाद आपणच आपल्या मनांत सदैव तेवत ठेवूं शकतां. कारण कर्तव्याच्या नुसत्या जाणीवेमुळें नव्हे, तर त्याच्या परिपूर्तीमुळें जीविताला उत्कंठित स्वरूप येतें व तें पवित्र, निष्काम व आत्मसंतुष्ट होतें. पण म्हणून जीविताला सदैव संपूर्ण सुखाचा लाभ होईलच अशी कोण कशी ग्वाही देईल बरें ! आता या माझ्या प्रश्नामुळें आपला कदाचित् विरस होईल आणि आपण फुरंगटून बसाल किंवा मजविषयीं तिरस्कारहि बाळगाल हें मी पुरता जाणून आहें.

खरोखर कर्तव्यबुद्धीच्या या जाणीवेमुळेंच मी कित्येकदा निराशेच्या नास्तिकतावादापासून जगलों आहें. आणि नित्याचें जीविताचें ओझें धैर्यानें थोडें थोडें पुढें रेटीत आहें. वास्तविक आपल्या जीविता-हूनहि माझें जीवित अधिक उदास व जबाबदारीचें आहे हें आपण पूर्णपणें जाणतांच. पण तें मी अज्ञातवासांत संथपणें व सयमपूर्वक कंठीत आहेच कीं नाहीं ? प्रत्येक मनुष्यमात्राच्या अंतःकरणाच्या आंतल्या गाभ्यांत जी एक प्रकारची पवित्र व सनातन आदिप्रेरणा

दडलेली असते तिच्या संवेदनेमुळें माणुस संसारसागरांत धैर्यानें उडी घेऊन त्यांतील बरेवाईट प्रसंग सहन करण्यास आपला आपणच शिकतो.

आतां आपल्याला मजसंबंधांच्या कांहीं गोष्टी ठाऊक असतील, कांहीं नसतील. मात्र इतकें खरें कीं, आपल्यापेक्षां किती तरी मोठें ओझें मीं उचललें आहे ! आणि आपल्यापेक्षां किती तरी कटुतर आत्मवंचनेचे प्रसंग मीं पचविले आहेत ! पण मी माझ्या मनाला वारवार निक्षून सागतों कीं, "बा मना, या जगांत सुख पाहतां जवाए-वढें!" कोणत्या तरी उच्च व सुखकर पण अजून अज्ञात ध्येयाच्या दिशेनें जीविताची गाडी सारखी मार्ग कांटीत आहे. मजवर अपार लोभ करणाऱ्या निवडक व्यक्ति असाव्यात आणि त्याहि नसल्यास माझ्या प्रिय इतालींतून किंवा कदाचित् स्वर्गातूनहि मूक आशीर्वाद देणारी माझ्या आईसारखी एखादीच माउली जरी असली तरी ती मला जीवितसंशया-पासून तरण्यास पुरेशी आहे असें मला खचित वाटतें. म्हणून मीं माझ्या जीविताची होडी खवळलेल्या समुद्रांत धैर्यानें लोटण्याचा निश्चय केला आहे ! मला जितकें स्फुरतें व कळतें तितक्या प्रमाणांत हातीं घेतलेलें कार्य निरलसपणें करणें आणि मध्येंच मृत्यु आला तर त्याला धैर्यानें तोंड देणें यांत मला कसलीहि भीति किंवा शंका वाटत नाहीं ! आणि मी उगाच स्वतःस निराशहि करून घेत नाहीं ! कारण मीं न बोलावतांहि मृत्यूच्या घटका रोज भरतच आहेत हें का मला कळत नाहीं !

म्हणून सागतों, आम्हांला दुःखाची प्रत्यक्ष अनुभूति असो वा नसो, आम्हीं आमच्या मुखकमलावर स्मिताची क्षीण प्रभा तरी सदोदित टिकविण्यासाठीं धडपडूं या आणि स्वतःच्या जीवितापासून नसेना का, इतरांच्या विविधार्थपूर्ण जीवितापासून तरी भरीव स्फूर्ति मिळवून आमच्या संकल्पित कार्यास हातभार लावूं या. आम्हां सर्वांत असें एक गूढ ईश्वरी चैतन्य आहे कीं, ज्याचा परिपोष व विकास करण्यासाठीं आम्हीं कसून झटायला हवें. कितीहि मोठ्या व्यक्तीच्या आहारीं, आम्हीं जीवनांतील हें व्यक्तिगत पवित्रतम चैतन्य नेऊन मुळींच

सोडतां कामा नये किंवा त्याला कसलीहि मुरड घालण्याचा प्रयत्न करतां कामा नये.

आपलें जीवित 'पोकळ व असार' वाटतें असें आपण लिहितां. पण खरोखर का तें तसें आहे ? उगाच त्याची भलतीसलती निंदा करूं नका किंवा रडगाणें गाऊं नका ! अशा प्रसंगीं आपल्या आईचें भक्तीनें स्मरण करा आणि आपल्या प्राप्त कर्तव्याला लागा. त्या दयाघन परमेश्वराकडे नम्रपणें दृष्टि लावा. उगाच नव्हे ईश्वरानें आपली येथें योजना केली ! उगाच का त्यानें आपल्या अंतःकरणांत या सळसळणाऱ्या अतृप्त ऊर्मि, सुखाचा शोध घेऊं तळमळणाऱ्या या अनंत मनोयातना निर्माण केल्या ? तेणेंकरून आज आम्ही दुःखी असूं कदाचित्, पण त्या ईश्वरावर आणखी कांहीं काळ तरी धीर धरून आपण भरंवसा कां ठेवूं नये ?"

सदैव आपलाच,
जॉसेफ मॅझिनी.

(२)

लंडन १५ जुलै १८४६.

"अनेक आशीर्वाद.

सुख व दुःख, इच्छापूर्ति व मनोवंचना यांना प्रवाशाच्या वांट्याला येणाऱ्या ऊनपावसाची उपमा खचित शोभेल. परमेश्वरानें आपल्याला ऊन पाठविलें तर त्याला अवश्य दुवा द्या. पावसाची सर येत असल्यास हातांत छत्री घ्या. पण इतकें मात्र निश्चित लक्षांत ठेवा कीं, आपल्या प्रवासाच्या शेवटाशीं या दोन्हींचा कसलाहि नित्य संबंध नाहीं ! आपल्याला पण हें विदितच आहे. पण बुद्धीनें उमजलेलें कार्य नीट पार पाडण्यास अंगीं हुरूप यावा म्हणून आपल्याला श्रद्धा हवी आहे, होय ना ? आतां ही श्रद्धा लाभण्यासाठीं आपण योग्य दिशांनीं सतत प्रयत्न करायला हवेत. सर्व भूतमात्रांविषयीं प्रेम, धार्मिक श्रद्धा, आणि मृतांचें गुणसंकीर्तन हे ते तीन मार्ग होत. आपला मजवर लोभ आहे त्याचप्रमाणें माझाहि आपल्यावर

आहे. आपण माझ्या लोभाला वितळून का काढणार आहां ? माझ्या मनाला देखील जी एक प्रकारची निराशेची क्षीण भावना ग्रासूं पाहते तिला आपण असें अकारण खाद्य का पुरविणार आहां ? आपलें हें स्वार्थी संकुचित व देहात्मवादी धोरण दाखवून मला अवदसेच्या गर्तेत तर ढकलण्याचा आपला विचार नाहीं ना ? म्हणून पुनः सांगतों कीं, आपण ईश्वरावर दृढ भरंवसा ठेवा. आपल्याला असें वाटत नाहीं का कीं, हें जीवित म्हणजे नुसता क्षणविनाशी बुडबुड्यांचा जणूं खेळ आहे, आणि तो दयाघन ईश्वर पितृतुल्य प्रेमानें आपल्याला प्रवासाच्या शेवटीं कुरवाळणार आहे ? आपला बाप वारला असेल. पण आई तरी अजून जिवंत आहे ना ? तिच्याशीं आपण एकजीव होऊं शकणार नाहीं का ? तिच्याकडे तरी आपल्या अंतरींच्या अत्यंत गूढ सुखदुःखांच्या निर्मळ भावनोर्मींना एकीकडे मनोमन वाचा फोडतां येणार नाहीं का ? मी येरवीं आपणास कसा कितीहि उपदेश केला तरी त्याची सर त्या प्रसंगाला यायची नाहीं हें काय मीं सांगितलें पाहिजे ?

आपला बाप जर आज जिवंत असता तर त्याच्याकडे आपण धांवतच गेलां नसतां का ? आपलें मुखकमल त्यांच्या कुशींत आपण कडिवाळपणें लपविलें नसतें का ? वास्तविक मृत आप्तस्वकीयांची मधुर स्मृति आम्ही सुखासुखी कां म्हणून पुसूं द्यावी ? एके काळीं आमच्या वर इतका लोभ करणारे त्यांचे अमर आत्मे का कधीं काळीं नाश पावतात ? त्यांच्या या क्षणिक अंतर्धानामुळें आपलीं त्यांच्याविषयींचीं सारीं कर्तव्यें खुंटलीं असें तर आपल्याला वाटत नाहीं ना? तात्पर्य, एका शब्दांत सांगावयाचें झालें तर आपल्या दृष्टिपथापासून ते दूर आहेत इतक्याकरतांच का आपला त्यांजवरील लोभ वितळूं शकतो ? मला कित्येकदा तर असेंहि वाटतें कीं, एकमेकांबद्दल अतोनात लोभ बाळगणाऱ्या दोघांपैकी जेव्हां एखादा मरतो तेव्हां ईश्वर मृत्यूच्या द्वारें जणूं मानवी लोभाची पारखच करतो ! आणि मीं आपल्याला कित्येकदा असेंहि सांगितल्याचें स्मरत असेल कीं, माझ्या मृत मित्रांशीं

एकांतीं गुजगोष्टी करण्यांत आणि त्यांच्या आत्म्याशीं असें मूक संधान बाधण्यात माझे एक दोनच क्षण जरी गेले तरी तितकेच मला अकल्पित धीर देण्यास व माझ्या उदास मनाचें तात्पुरतें समाधान करून त्याला ताजा हुरूप आणण्यास पुरेसे होतात ! प्रत्यक्ष जीवित व आदर्श जीवित याजमधील दुव्याच्या ज्या अंधुक कल्पना मागें आम्हीं उभयतां मिळून योजिल्या होत्या त्यांजविषयीं आमचें पुष्कळदा मतैक्य झालें नव्हतें काय ? आतां आम्ही तें अकारण अमान्य करणार काय ? तेव्हां धीर धरा ! ज्याच्यावर आपला लोभ आहे त्यांना अंतर देऊं नका आणि ज्याच्याविषयीं आपल्याला नितांत आदर आहे त्याजविषयीं अभिमान बाळगा ! जगांत आपणच तेवढे दुःखीकष्टी आहों असें थोडेंच आहे ! आपल्या लोभाला पात्र ठरलेल्यांपैकीं किती तरी जण आपल्यापेक्षांहि किती तरी अधिक दुःखी व हताश झालेले असतील ! मात्र ते निष्कारण गाजावाजा न करता निमूटपणानें पण धैर्यानें प्राप्त परिस्थिति सहन करीत असतील ! त्यांना कदाचित् आपल्या आधारामुळें तितकेंच हायसें वाटेल ! नाहीं कोणी म्हणावें ?

म्हणून म्हणतों, उठून कार्याला लागा कसा ! आम्हा सर्वांना टाकून स्वतःला एकांतीं कोंडून घेऊं नका ! सैतानाला जेव्हां येसू क्रिस्ताला भुरळ घालायची होती तेव्हां तो त्याला एकांतांत घेऊन गेला हें आपल्याला ठाऊक नाहीं काय ? अधिक काय लिहूं ? ”

सदोदित आपलाच,
जॉसेफ मॅझिनी.

---

## प्रमुख व्यक्तींचा ओझरता वाङ्मय-परिचय

### (१) युरोपीय लेखक

**(गटे)** *Goethe Johann Wolfgang* — प्रसिद्ध जर्मन तत्त्वज्ञ, कवि व नाटककार. जन्म २८-८-१७४९. वकीलीची सनद घेऊनहि आवडीच्या भिन्नत्वामुळें गटे तत्त्वज्ञान व वाङ्मय या विषयांकडे स्वयं-स्फूर्तीनें वळला. इतर कवींप्रमाणें केवळ भावनांना आव्हान देणारीं काव्यें न लिहितां यानें तत्त्वज्ञानपरहि काव्यें लिहिलीं व विज्ञानशास्त्राच्या सागरांत बुडून कित्येक सिद्धांतरत्नें काढलीं. फॉस्ट नांवाच्या अजरामर नाटकाचा कर्ता. कालिदासाच्या शाकुंतल नाटकाचें जर्मन भाषांतर वाचून तो आनंदानें वेडा झाला. त्याचप्रमाणें गोल्डस्मिथच्या "दि विकार ऑफ् वेकफील्ड' या सुप्रसिद्ध कादंबरीच्या वाचनानें त्याच्या जीवितावर परिणाम झाला. जर्मनींतील प्रसिद्ध नाटककार फ्रेडेरिक शिलर व गटे यांची अखंड मैत्री जमली व तिचा त्यांच्या जीवितावर बराच परिणाम झाला. हे दोघेहि युगकर्ते महापुरुष म्हणून जर्मन साहित्यप्रांगणांत यथार्थतेनें मानतात. मृत्यु २२-३-१८३२.

**(टॉड)** *Todd John*--अमेरिकन मिशनरी. याचा The Student's Manual नांवाचा नीति व व्यवहार यांची सुंदर सांगड घालणारा जीवितोपयोगी ग्रंथ प्रसिद्ध आहे.

**(प्रो. फ्रूड)** *Froude James Anthony*–जन्म २३-४-१८१८. प्रसिद्ध निबंधकार व इतिहासकार. याचा "History of England" नांवाचा इतिहास प्रसिद्ध आहे. मेकॉलेप्रमाणेंच त्याची अंतःप्रवृत्ति मूळ साहित्यरसिकाची असून अनुषंगानें इतिहासकाराची आहे. कारलाईलच्या मृत्युसमयीच्या इच्छेप्रमाणें त्याच्या वाङ्मयकृतींचा संपादक; 'कारलाईलच्या आठवणी', त्याच्या 'पत्नीचीं पत्रें' यांचें संपादन त्यानें कसोशीनें केलें. 'कारलाईलचें लंडनांतील जीवित' हा चरित्रांश कारलाईलच्या उपलब्ध लिखाणाच्या आधारें दोन खंडांत त्यानें प्रसिद्धिला आहे. मृत्यु ता. २०-१०-१८९४.

**(मॅझिनी)** Mazzini Joseph–प्रसिद्ध इतालियन् स्वदेशाभिमानी ग्रंथकार. जन्म, स्विझरलंडमधील जिनोवा येथें (ता. २२-६-१८०५). जिनोवांतील विश्वविद्यानिलयांत शिक्षण. १९ व्या वर्षीं वकील म्हणून व्यवसाय प्रारंभिला. मातृभूच्या स्वातंत्र्यार्थ अतोनात कष्ट सोसले. म्हणून सत्ताधाऱ्यांच्या रोषाला बळी पडून त्याला मातृभूमीला निरंतरचें मुकावें लागलें. सन १८३२ सालीं फ्रेंच सत्ताधाऱ्यांनींहि त्याला फ्रान्सांतून गडीपार केलें. त्यानंतर त्यानें युरोपभर राजकीय असंतोष व स्वातंत्र्योर्मि पसरविण्याकरितां व्याख्यानांनीं व लेखनांनीं अतोनात परिश्रम घेतले. स्विझरलंडमधूनहि जेव्हां त्याला हांकलून लावलें तेव्हां शेवटीं त्यानें इंग्लड देशाचा आश्रय केला. त्या कालीं निर्वासित देशभक्तांना आसऱ्याचें व सहानुभूतीचें सुखस्थान म्हणून इंग्लंडची कांहीशी ख्याति होती. त्याचा व कारलाईल पतिपत्नीचा अकृत्रिम जिव्हाळा होता. विशेषतः, सौ. जेन कारलाईलला निराशेच्या निबिड अंधःकारांतून तरण्यास व जीवितसंशयांतून जगण्यास त्यानें धीर धरण्याचा अमोल उपदेश केला. इंग्लंडांत असतांना त्यानें इंग्लिश भाषेंतहि कांही तत्त्वज्ञानविषयक व वाङ्मयविमर्शात्मक वैचारिक निबंध लिहिले. पिसा येथें ता. १०-३-१८७२ रोजीं मृत्यु. त्याच्या कांही अमर कृति: (1) "Duties of Man, (2) Thoughts Upon Democracy in Europe (3) His Life. and Writings (4) Select Essays.

**(लबॉक)** Lubbock Sir John—जन्म लंडनांत ता. ३०-४-१८३४ १८५६ सालीं बापाच्या बँकिंगच्या कचेरींत प्रथम उमेदवारी. पुढें त्या व्यवसायांत विश्वस्त झाला. लंडन विश्वविद्यानिलयाचा उपकुलगुरु (१८७२-८०). मृत्यु २८ मे १९१३. प्रसिद्ध तत्त्वज्ञ, प्राणिशास्त्रज्ञ व निबंधकार. त्याच्या खालील कृति अत्यंत उद्बोधक म्हणून चिरंजीवी आहेतः— (1) Researches on Primitive Man and in the Habits of Bees and Ants, (2) Prehistoric Times, (3) Origin of Civilization, (4) Ants Bees and Wasps, (5) The Senses & Instincts of Animals, (6) The Pleasures of Life, (7) The Beauties of Nature, (8) The Use of Life. यांविना अलीकडे त्यांचे कांहीं साहित्यविषयक निबंध व विश्वविद्यालयांतील उपन्यास प्रसिद्ध झाले आहेत.

**(लुईस)** *Lewes George Henry*–विख्यात तत्त्वज्ञ, निबंधकार, टीकाकार

व सराईत साहिती. जन्म लंडनांत (ता.१८-४-१८१७). गरीबीमुळें याची बाल्यदशा पद्धतशीर विद्यार्जनांत गेली नाहीं आणि म्हणून त्याच्या बहुश्रुततेविषयीं आदर वाटतो. शाळेचें शिक्षण न झेपल्यामुळें त्यानें निर्वाहासाठी वकीलाच्या येथें प्रथम नोकरी धरली. नंतर त्यानें वैद्यकीचा अभ्यास केला. पण 'ऑपरेशन'ची क्रिया त्याच्यानें धीरानें पाहवली नाहीं. म्हणून तोहि व्यवसाय टाकून १८३८ सालांत त्यानें जर्मन वाङ्मय व संस्कृति अभ्यासिण्यासाठीं जर्मनीला प्रयाण केलें आणि जर्मन वाङ्मय परिशीलनांत व परिस्थितिनिरीक्षणांत दोन वर्षें घालविली. तेथून तो लंडनला परत आल्यानंतर वाटेल त्या विषयांवर सकीर्ण लेख लिहून ते नियतकालिकांना पुरविण्याचा त्यानें सपाटा चालविला. ज्ञानकोशकर्त्यांची आपण जणूं 'छोटी प्रतिकृतीच' असें वारें त्याच्या अंगीं संचारीत असल्यासारखें तेव्हां वाटलें ! क्रमेण तो "Leader" व "Fortnightly" या नियतकालिकांचा संपादक झाला. त्याचे वैवाहिक जीवन शांतिदायक व सुखमय नव्हतें. त्याला दोन मुलें होतीं पण त्याचें व पत्नीचें कधीच पटलें नाहीं ! प्रसंगोपात्त त्याचा व 'जॉर्ज ईलियट' नामक टोपणपुरुषनामधारी सुप्रसिद्ध कादंबरीकर्ती कु. इव्हॅन्स, इचा परिचय घडून आला व त्याची परिणति परस्पर लोभांत होऊन तीं दोघे उघडपणें एकत्र राहूं लागलीं (जुलै १८५४). लुईसची पत्नी निराळी राहत असली तरी त्याचीं दोनहि मुलें शिक्षणाकरितां कांहीं काळ परदेशांत व कांही काळ स्वदेशांत बापाकडेच राहत होतीं व त्यांच्यावर इव्हॅन्सबाई आईप्रमाणेंच प्रेम करी. तिच्या कादंबऱ्यांचीं हस्तलिखितें वाचणें, त्यांच्यावर सहानुभवानें सहृदय टीका करून दोष हलक्या हातानें दाखवणें, व तिच्या कादंबऱ्यांच्या कथावस्तूंना सप्रमाण विचार-बीज व अनुकूल स्फूर्ति कसोशीनें पुरविणें, हीं कार्ये इतक्या निरलस जिव्हाळ्यानें करणारा तत्त्वज्ञ पंडित तिला असा लाभला हें तिचें भाग्यच होय ! त्यांच्यामधील लोभ व एकमेकांच्या वाङ्मयिक गुणोत्कर्षावर आधारलेला नितांत आदर, लुईस तिच्या घरीं ता. ३०-११-१८७८ रोजी मृत्यु पावेपर्यंत अमर होता. त्यांचें रीतसर लग्न झालें नसलें तरी ती मिल-मैलिणींप्रमाणें व लोकाप-वादाच्या भाषेंत बौद्धिक लोभानें एकमेकांकडे आकर्षिलेल्या उघड पति-पत्नीं-प्रमाणेंच एकत्र राहत असत व त्याबद्दल त्यांना खंति वाटल्याचें दिसत नाहीं! लुईसच्या मृत्यूनंतर इव्हॅन्सबाईनें लॉर्ड क्रॉस याच्याशीं सरळ लग्न केलें.आणि त्यानें तिच्या मृत्यू-नंतर प्रकाशिलेल्या चरित्रखंडांत तिच्याच रोजनिशींतील पत्रांवरून लुईस व ईलियट

यांजमधील बौद्धिक लोभाचे हे प्रसंग साविस्तर निरूपिलेले आहेत. लुईस ठेंगणा होता. सर्वोत्कृष्ट टीकाकार व सर्वांगपरामर्शी चरित्रकार म्हणून तो इंग्रजी वाङ्मये-तिहासांत प्रसिद्ध आहे. पण त्याची मूल प्रकृति तत्त्वज्ञ पंडिताचीच होती. तत्त्व-ज्ञानासारखा गहन विषय अबालवृद्धांना सुबोध करून सांगण्याच्या हातोटींत त्याचा हात धरणारा कोणीहि नव्हता ! त्याच्या सुप्रसिद्ध गटेच्या चरित्राचा अमोल उपयोग मला झाला आहे. त्यांतील विचारवैविध्याइतकाच भाषावैदग्ध्या-चाहि मजवर परिणाम झाला आहे हें मी ( ग्रंथलेखक ) मान्य करतों व त्या थोर लेखकाचें चिरऋण येथें मानतों. तत्त्वज्ञानाप्रमाणेंच विज्ञानशास्त्रांतहि त्याची तशीच अविद्ध गति असल्यामुळे त्यांतहि त्याच्या बुद्धिवैभवाशीं स्पर्धिणारे पंडित फारच थोडे होते. त्याच्या खालील कृतींवरून त्याचें सर्वस्पार्शीत्व दिसून येतें (1) एक शोकान्त नाटिका,(2) दोन कादंबऱ्या,(3)Biographical History of Philosophy (from Thales to Comte), (4) The Spanish Drama, (5) The Life of Robespierre, (6) Comte's Philosophy of the Sciences, (7) The Life and Works of Goethe, (8) Seaside Studies, (9) Physiology of Common Life, (10) Studies in Animal Life, (11) Aristotle, (12) On Actors and the Art of Acting, (13) Problems of Life and Mind.

त्याच्या गटेच्या चरित्रांतील वाङ्मयविवेचनाला जर्मनींत आजहि आद्य मान दिला जातो. कारण, गटेची मनोभूमिका, जर्मनीतील त्या काळचे विचारप्रवाह, त्यांच्यामागील तत्त्वज्ञानाची भूमिका, गटेच्या वाङ्मयनिष्पत्तीचें सरस रसग्रहण, इत्यादि कार्यें करण्यांत त्याच्याइतका अधिकारी पंडित इंग्लंडांत दुसरा नव्हता. आरंभीं जर्मनींत दोन वर्षांत त्यानें ही सर्व माहिती कसो-शीनें अभ्यासून नंतर तिच्यावर आपल्या पक्क प्रज्ञेचे संस्कार सांठविले होते. त्याच्या गटेचरित्रांत गटेच्या चरित्रापेक्षां त्याच्या वाङ्मयाविषयीं व त्याच्यामागलि आदिप्रेरणांविषयीं फारच सुंदर, प्रमाणबद्ध व सरस विवेचन त्यानें केलें असून, त्यांतील विचार जितके चिंतनीय आहेत तितकीच त्याची लेखनशैलीहि ओजस्वी व वक्तृत्वपूर्ण साधलेली आहे हा त्या ग्रंथाचा विशेष होय.

## (२) मराठी लेखक

(**टीप**—सामान्य मराठी वाचकांना प्रसिद्ध मराठी लेखकांची वाङ्मयदृष्ट्या तरी तोंडओळख आहे असें धरूनच अतिशय त्रोटक विवरण केलें आहे.)

**खांडेकर, विष्णु सखाराम**--(जन्म १८९८) शिरोडें येथील ट्युटोरिअल हायस्कूलमध्यें शिक्षक. टीकाकार, लघुकथाकार व कादंबरीकार. एक नाटक, चार पांच लघुकथासंग्रह, चार पांच कादंबऱ्या, एक चरित्र, एका टीकात्मक प्रबंध इत्यादि विपुल वाङ्मय यांनीं निर्मिलें आहे. त्यांचें लिखाण कोट्यांनीं व उपमांनीं पुष्कळच सजविलेलें असतें.

**जोशी, चिंतामण विनायक**--(जन्म १९-१-१८९२) राज्यदप्तरदार, बडोदें. प्रसिद्ध विनोदी लेखक. कृत्रिम व शब्दनिष्ठ विनोदावर आधारलेल्या पंगु मराठी विनोदवाङ्मयाला सोज्वळ प्रसंगनिष्ठ विनोदाची गोडी यांनींच के. श्री. कृ. कोल्हटकरांनंतर प्रामुख्यानें लावली. त्यांच्या ३-४ विनोदी कादंबऱ्या, इंग्रजी शिष्टाचार, पाली भाषेचें 'मॅन्युअल', हीं पुस्तकें प्रसिद्ध आहेत. पाली वाङ्मयांत हे तज्ज्ञ असून, जातकांतील गोष्टींसारख्या ग्रंथांच्या दिशेनें त्यांची आगामी ग्रंथसंपत्ति अपेक्षितां येईल.

**जोशी, वासुदेव विनायक**--(जन्म १८९२) वकील, बडोदें. स्त्रियांना पुरुषांप्रमाणेंच मानवी हक्क मिळावे म्हणून खटपट करणारे उदार मनाचे समाजसुधारक. सन १९१६ पासून लेखनाला प्रारंभ. त्यांत अनेक लघुकथा, कांहीं निबंध, कांहीं व्याजोक्तिपूर्ण व विनोदी समाजविषयक लेख आहेत. यांनीं तीन सामाजिक कादंबऱ्या लिहिल्या असून त्यांत कलाविलासापेक्षां सामाजिक तत्त्वप्रचाराला अधिक प्राधान्य दिलें आहे. स्त्रियांना पतींपासून घटस्फोटाचा अधिकार मिळण्यासाठीं बडोद्यांत जो कायदा झाला आहे त्यासंबंधांत यांनीं बराच पुढाकार घेतला होता.

**जोशी, वामन मल्हार**—(जन्म १८८३) अध्यापक व आजीव सेवक, कर्वे विद्यालय, हिंगणेबुद्रुक. प्रसिद्ध तत्त्वज्ञ व मानसशास्त्रज्ञ. बहुश्रुत निबंधकार व समतोल व कांटेकोर टीकाकार. साहित्यशास्त्राच्या सूक्ष्म अंगोपांगांवरील त्यांचा अधिकार दांडगा आहे. त्यांची 'रागिणी' कादंबरी विशेष प्रसिद्ध आहे. त्याविना त्यांच्या चार कादंबऱ्या, 'नीतिशास्त्रप्रवेश', 'साक्रेटीसाचे संवाद', 'विचारविलास' हे ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत.

**देशपांडे, वाग्भट नारायण**— (जन्म २६-५-१८९९, मृत्यु १९३६). संपादक, 'ऐक्य' साप्ताहिक, सातारा व वकील. मृत्युसमयीं औंध संस्थानचे दिवाण. कै. हरिभाऊ आपट्यांच्या पंथांतील नेमस्त वृत्तीचे समाजसुधारक. कै. हरिभाऊ आपट्यांचे निःसीम अनुयायी. आपट्यांच्या सर्व कादंबऱ्यांचा व इतर वाङ्मयाचा त्यांचा व्यासंग दांडगा होता. 'आपट्यांच्या आठवणी आणि कादंबऱ्या' हा त्यांचा ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहे. त्यांच्या प्रकाशित लघुकथाचे दोन संग्रह प्रसिद्ध झालेले आहेत.

**पटवर्धन, माधव त्र्यंबक**--प्राध्यापक, राजाराम महाविद्यालय, कोल्हापूर. कवि व कोशकार. हे प्रथम पुण्याच्या रविकिरणमंडळाचे सदस्य होते. 'माधव जूलियन्' या कविनामानें ते काव्यें रचतात. त्यांचीं खंडकाव्यें व काव्यसंग्रह विपुल असून तीं पुण्याच्या आर्यसंस्कृति मुद्रणालयानें प्रकाशिलीं आहेत. छंदः-शास्त्रावरील गाढ अभ्यासक व संशोधक. त्यांचा फार्सी-मराठी कोश, नुकताच सुधारून वाढवून मुंबईच्या कर्णाटक प्रेसकडून प्रसिद्धिलेला 'छंदोरचना' नांवाचा काव्यशास्त्रावरील प्रबंध, त्यांच्या अविरत व्यासंगाचा नी किचकट व सूक्ष्म परि-श्रमांचा पानोपानीं प्रत्यय आणून देतात. मराठी काव्यांत एक विशिष्ट पंथ निर्माण करणारे स्फूर्तिदाते प्रवर्तक नी रसिक व सखोल काव्य-विमर्शक.

**पेंडसे, शंकर दामोदर**--प्राध्यापक, मॉरिस कॉलेज, नागपूर. ओजस्वी वक्ते. महाराष्ट्र संतवाङ्मयाचे गाढ व्यासंगी, मार्मिक टीकाकार व रसज्ञ निबंध-कार. यांचे कित्येक निबंध वेळोवेळीं मराठी मासिकांत विखुरलेले आहेत. "महाराष्ट्राचा सांस्कृतिक इतिहास" या नामांकित प्रबंधाचे कर्ते. महाराष्ट्र संस्कृतीचे गाढ अभिमानी व तिचे उज्ज्वल प्रचारक.

**बनहट्टी, श्रीनिवास नारायण**—मराठीचे अध्यापक, मॉरिस कॉलेज, नागपूर. यांचा साहित्यशास्त्रावरील व्यासंग चांगला आहे.उत्कृष्ट टीकाकार व सरस निबंधकार. 'ज्ञानोपासना व भारतीयांचीं कर्तव्यें' या सुंदर प्रबंधाचे कर्ते. 'नव-भारतग्रंथमाला', नागपूर, या अभिनव ग्रंथमालेचे मूळ उत्पादक, प्रवर्तक व संचालक. दिल्ली येथील "हंस" नांवाच्या हिंदी साहित्यसंस्थेच्या वतीनें नागपूर येथें एक साहित्यसमालोचनपर मराठी मासिक ते अलीकडे संपादतात व त्यांत हिंदुस्थानांतील बहुतेक प्रमुख भाषांतील उत्तमोत्तम कृति नेमानें थोडक्यांत अनु-वादून प्रसिद्ध होतात. मराठी साहित्याच्या सर्वांगीण उत्कर्षासाठी तळमळणारे व त्यापायीं झीज सोसून सक्रिय योजना पुरस्कारणारे साहिती.

**माडखोलकर, गजानन त्र्यंबक**—सहसंपादक, 'महाराष्ट्र' नागपूर. (जन्म २८-१२-१९००). टीकाकार, निबंधकार, कादंबरीकार व काव्यविमर्शक. १९१९ पासून मुंबईच्या माजी 'नवयुग' मासिकांत लेखनाला प्रारंभ. त्यांचा एक काव्यविमर्शात्मक ग्रंथ, दोन चारित्रात्मक व वाङ्मयपरिशीलनात्मक निबंध व तीन कादंबऱ्या प्रसिद्ध आहेत. तर्कात्मक, प्रमाणबद्ध व ओजस्वी लेखनशैलीचे पुरस्कर्ते. मे १९३७ मध्यें भरलेल्या इंदूरच्या प्रांतिक साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष. त्यांचें अध्यक्षीय भाषण सुंदर व विचारप्रवर्तक झालें असून 'कलेकरितां कला' नी 'कलेला व नीतीला कसलाहि नित्य संबंध नाहीं' म्हणून सांगणाऱ्या कांगावखोरांना त्यांनीं सप्रमाण व चोख उत्तर देऊन निरुत्तर केलें आहे. त्यांचा निवडक वाङ्मयविमर्शात्मक निबंधसंग्रह लौकरच प्रसिद्ध होणार आहे.

**सरदेसाई, गोविंद सखाराम**—प्रसिद्ध इतिहाससंशोधक. हे प्रथम बडोदादरबारीं श्रीमंत सयाजीराव गायकवाड महाराजांकडे नोकरीस होते. पुढें मुंबई सरकारकडे नोकरीस राहून यांनीं मराठ्यांच्या इतिहासाचे खंड व पेशव्यांच्या रियासती प्रसिद्ध केल्या. मराठ्यांच्या बखरी व रियासती तपासून व संशोधून त्यांच्यावरील अधिकारी व्यक्ति म्हणून यांची ख्याति असून यांना 'रियासतकार' हें सार्थ उपनांव देण्यांत आलें आहे.

## (३) कानडी लेखक

**अय्यंगार, मास्ति वेंकटेश**—(रेव्हिन्यु कमिशनर, मैसूर). कन्नड कथावाङ्मयांत स्फूर्तिदाते गुरु. तसेंच आधुनिक कन्नड काव्यांत 'श्रीनिवास' या कविनामानें तत्त्वज्ञानपर व भक्तिपर विपुल काव्यनिर्मिति करून होतकरू कवींना मार्गदर्शक होणारे मंत्रद्रष्टे. यांनीं ऐतिहासिक व सामाजिक विषयांवर उद्बोधक नाटकें लिहिलीं आहेत. रवींद्रवाङ्मयाचे एक गाढ अभ्यासक. अलीकडे त्यांना मैसूर विश्वविद्यानिलयानें बुद्ध्या शांतिनिकेतनाला पाठवून रवींद्रबाबूंशीं व त्यांच्या अद्यावत् वाङ्मयाशीं सखोल परिचय घडवून आणून, त्यांच्या या अलौकिक अधिकाराला अनुरूपसा कानडी ग्रंथ लिहवून घेतला आहे. आधुनिक कन्नड विमर्शवाङ्मयाचे जनक व सहृदय टीकाकार व बहुश्रुत संकीर्ण निबंधकार. बेळगांव येथील कर्णाटक साहित्यसम्मेलनाचे अध्यक्ष. त्यांच्या "सुब्बण्ण" नांवाच्या लघुकादंबरींत मानवी हृदयवीणेचा अत्यंत करुणरसात्मक झंकार पानोपानीं ऐकूं येतो व सहानुभवी वाचकांच्या डोळ्यांतून टिपें गळवितो. तींत एका अगतिक

पण कलावान् वीणावादकाचें अत्यंत सहृदयपणें चरित्र चित्रिलें असून, इतक्या संक्षेपांत इतक्या प्रभावी रसांचें उद्घाटन अन्यत्र क्वचित्च आढळतें! त्यांची ग्रंथसंपत्तिः—सहा लघुकथासंग्रह, चार विमर्शसंग्रह, आठ नाटकें, चार कवितासंग्रह व दोन व्याख्यानसंग्रह.

**श्रीकंठय्या, बी. एम्.**—इंग्रजीचे व कानडीचे प्रमुख प्राध्यापक, सेंट्रल कॉलेज, बेंगळूर. कन्नड साहित्यांत सर्व विषयांवरील लेखकांना स्फूर्ति देणारे परिणतप्रज्ञ युगकर्ते आचार्य. ग्रीक शोकान्त नाटिकांच्या धर्तीवर कन्नड वाङ्मयांत (Blank verse dramas) 'विनावृत्त कवनात्मक नाटकांच्या' सम्प्रदायाचे आद्य प्रवर्तक. इंग्रजी भावनात्मक लघुगीतांच्या धर्तीवर यांनीच प्रथम काव्यरचना करून हा पायंडा कानडींत पाडला व आपल्या 'इंग्लिश गीतें' या पुस्तकानें विलक्षण क्रांति केली! इंग्रजी साहित्यांत व विशेषतः शेक्सपिअराविषयक सर्व प्रकारच्या साहित्यांत इतक्या अधिकारी, अस्खलित, रसाळ व वक्तृत्वपूर्ण वाणीनें कानडीइतक्याच इंग्रजी भाषेच्याहि ओघांत सारखेच तन्मय होऊन शिकविणारे व व्याख्यानें देणारे असे सव्यसाची प्राध्यापक फारच थोडे, किंबहुना विरळच! अमोघ व उत्कृष्ट वक्ते व सहृदय सल्लागार. गुलबर्गा येथील कन्नड साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष. यांनीं कर्णाटकांत वेळोवेळी कन्नड साहित्य व संस्कृति या विषयांवर जे विविध उपन्यास दिले आहेत त्यांचे संग्रह जर त्यांच्या अनेक चाहत्या शिष्यवर्गाकडून प्रसिद्ध होतील, तर त्यांच्या अष्टपैलू बुद्धीचे सर्व विहार रसिकांना पाहतां येतील व जगाच्या ज्ञानांत तितकीच अमोलिक भर पडेल! श्री. मास्ति वेंकटेश अय्यंगार-प्रभृति मैसूर संस्थानांतील सर्व प्रसिद्ध व उगवते साहिती त्यांच्याच शिष्यवर्गांत मोडतात व त्यांच्याचकडून अखंड स्फूर्तीचे विद्युत्कण घेतात! यावरून त्यांच्या आचार्यत्वाच्या अलौकिक अधिकाराची कांहीशी कल्पना करतां येईल.

**सीतारामय्या, वी.**—प्राध्यापक, इंटरमीजिएट कॉलेज, बेंगळूर. प्रसिद्ध तरुण कवि व साहित्यविमर्शक. यांच्या कवितांचे संग्रह व खंडकाव्यें प्रसिद्ध आहेत. यांची कविप्रतिभा विशेषतः अंतर्मुख तत्त्वज्ञानांत रमते व त्याच्या भूमिकेनें जीविताचा हेतु उकलण्याचा प्रयत्न त्यांच्या काव्यांत मुख्यतः आढळतो. म्हणून त्यांच्या काव्यांचा दर्जा उच्च असतो व तो सामान्य वाचकांच्या आवांक्याबाहेरचा असतो. डिसेंबर १९३१ मध्यें भरलेल्या कारवार येथील कर्णाटक कविसंमेलनाचे अध्यक्ष. भिडस्त स्वभावाचे सज्जन. व्यासंगी प्राध्यापक व विनीत वक्ते.

# सूचि

## (विषयपर)

### आ


**आत्मचरित्रें**
—त्याच्या लेखकाचे दोन प्रकार ३०५, ३०६
—प्रधान हेतु ३०९
—थोरवी ३१०, ३११


### अं


**अंतःकरणाच्या दोन मूलभूत प्रवृत्ती**
**अंतर्मुख** (Subjective)
**बहिर्मुख** (Objective)
—व्याख्या २०, २६१, २६२, २६५, २७५, २८३, २८४, २८५, ३०१, ३०२
—मनोविश्लेषण २५९
—प्लेटोची विचारसरणी २६०
—ॲरिस्टाटल्ची विचारसरणी २६१
—तर्क व भावना २६२, २६४, २६८, २६९, २७९, २८०, २८१, २८२, २९६
—प्रतिभा व भावना २६३, ३००, ३०१
—प्रतिभेची व्याख्या २६३
—प्रतिभेचे आद्य लक्षण २६७
—वरील दोन प्रवृत्तींची सरसनिरसता २७१
—मन व बुद्धि यांच्या व्याख्या २७५, २७८
—तीतील प्रतियोगी दृश्यें २८७, २९४
—या दृष्टिकोनांतील सरसनिरसता २९८, २९९


### क


**काव्य**
—व्याख्या व लक्षणे ४७, ४८
—आजच्या कवितेचा काल ६८
—त्यांतील जुने नवे ७०
—त्यांतील स्वानुभव व वास्तव यांची कसोटी ७०, ७१, ७२
—प्राचीन व अर्वाचीन दृष्टिकोनांतील फरक ७२
—आमच्या कालांत काय कमी ? ७२
—जुन्या काव्यांतील शृंगाररस ७४, ७५, ७६
—जुने ते सर्व सोने नव्हे ७७
—शांतीच्या मार्गांतील गुप्त प्रवृत्ति ७७, ७८, ७९
—त्यांतील प्रतिभा ७९, ८०
—सद्भावनाचा परिपोष ८०
—सुलभतेची महति ८१
—व गद्य याच्या प्रतियोगी व्याख्या ८१, ८२

**कवि**
—पप व त्याची काव्यें ५६
—आधुनिक कवि त्यांचे टीकाकार ६५
—कवीचा धर्म कोणता ? ८१
—कवि व गायक यांजमधील साम्य ८३

**कवि**
—उगवत्या पिढीला विरस करणें ८५ ८७
—उच्च ध्येयविषयक श्रद्धा ८७
—त्याच्या ध्येयाचें समाधान ८९-९१
—व प्रकृति यांजमधील संबंध ९२
—चे उत्तम भाव ९३
—चे भावनाप्राधान्य २६७
—भावनाप्रधान कवीचा पंथ २९५, २९६
—सहृदयतेची अपेक्षा ८२,८३
—व्यक्तित्व व विविधता ८४
—प्रतिभा व अंत शुद्धि ८४,८५
—संवेदनेची देवाण-घेवाण ८५
—आधुनिक काव्यातील विशेष प्रकार ८८, ८९
—भावना व विमर्श ९१
—भक्ताची भूमिका ९१
—काव्याचा परिणाम ९२

**कारवार**
—त्याची अप्रतिम निसर्गशोभा ५, ७, ६७, ६८

**कला**
—व व्यवहार २०३, २०४
—व्याख्या:(कझिन्स २०५; मॅथ्यू आर्नोल्ड, २०५; लबॉक्, २०५; रस्किन्, २०६; टॉलस्टाय २०७; गटे, २०७; गायडो, २०७; वर्डस्वर्थ, २०७)
—व शास्त्र २०८
—त्यांचे नाते २०९, २१०
—हेतु २१०, २६६
—हेतूच्या यथार्थत्वाची लुईसकृत व्याख्या २११

**कला**
—व शास्त्रांतील भेद (मास्ति वेंकटेश अय्यंगार) २११, २१२
—सूचकता (दोन दृष्टांत) २१२, २१३; प्रो. वा. म. जोशी यांचा अनुभव २१४, २१५
—ललितकलांचें प्रधानकार्य २१५, २१६
—ललितकलांची व विदग्ध वाङ्मयाची प्रवृत्ति (डॉ. जॉनसन्, गोल्डस्मिथ यांचे अनुभव) २१७, २२०
—विदग्ध वाङ्मयाची आदिप्रेरणा २२०
—ची ओळख व पृथक्करण २२०, २२१
—व नीति यांची दोन टोंके २६५, २६६
—निर्मितीचा हेतु ३५३
—व करुण भावना ३५४

**ज**

**जीवन-तत्त्वज्ञान (टागोर)**
—त्यांत संपादण्याचे प्रमुख विषय ५७
—टागोरांचे विचार १०७
—व पाश्चात्य तत्त्वज्ञान १०८
—व पौर्वात्य तत्त्वज्ञान १०८
—बुद्धि व आत्मा यांचे व्यापार १०९
—कर्मसन्यास व कर्मयोग १०९
—अज्ञेय व ज्ञेय ११०
—व धार्मिक निर्बंध ११०
—त्याची दिशा १११
—प्रमाणबद्धता व सौंदर्य १११

**जीवन-तत्त्वज्ञान**
—संदेशाची त्रिपुटी १११, ११२
—राष्ट्रीयत्व व आंतरराष्ट्रीयत्व ११२, ११३
**जीवित** (सहानुभवी)
—त्यांतील आशा-निराशा १६२-१७५
—वासनारहित प्रेम १६६
—प्रेम व त्याग १६६
—बुद्धि व हृदय १६७
—लोकप्रियता व कीर्ति १६८-१७०
—कलेकरितां कला १७३
—ध्येय (टॉडचे विचार) १७६
(हेतु)
—काव्य व विज्ञान यांचा परिणाम ३४२
—त्यांचे वेगवेगळे व्यापार ३४२, ३४३
—अतिरिक्त कलावादी ३४४
—कवीची मानवी कर्तव्ये ३४३, ३४४, ३५६
—त्यांतील निराशा ३५६, ३५७, ३५८
—आईबापांची स्मृति ३५९
—व जिवलग मैत्री ३६०

न

**नौकानयन** (भारतीय)
—व भारतीय स्वराज्य १२४, १२५
—व भिन्न सस्कृति १२५, १२६, १२७
—व बौद्धकाल १२६
—उत्पत्ति, स्थिति व लय १२८, १२९
**नौकानयन**
—राजाश्रय व व्यापार १३०, १३१
—वेदकालीन दाखले १३२-१३५
—व मौर्यपूर्वकाल १३५, १३६
—व आंध्रांचा काल १३७, १३९
—गुप्तांचा काल १३९
—मराठ्यांचा काल १२०

ल

**लेखकाची मनोभूमिका**
—वाङमयीन चरित्रे १७६, १७७
—आत्मचरित्राची वाण १७७
—"शामकांताची पत्रे" १७७
—साहित्याचार्यांना सूचना १७८
—"मी व माझें लेखन" १७८
—गोल्डस्मिथ व गिबन् यांच्या जीविताचा त्यांच्या लेखनावर परिणाम १७८, १७९
—इतिहास व कादंबरी यांतील भेद १७९, १८०
—मराठीतील लेखकाची स्थिति १८०, १८१
—त्याच्या कांही अडचणी १८२, १८३
—(कादंबरीलेखिकेचे विचार) स्त्रीचे वैवाहिक जीवन व कादंबरीलेखन यांतील मर्यादा १८४-१९४
—कार्लाइल व लेखनव्यवसाय १९५-१९९
—अधिकारी लेखक १९७-१९८
—लेखन व निर्वाहाचे साधन १९५, १९६, १९७
—लेखन व आचार १९८, १९९
—ललित-लेखकांचें कर्तव्य २७०
—इतिहासकाराची प्रज्ञा ३१२

**लेखकाची मनोभूमिका**
—लेखनव्यवसाय व भाषाशैली ३२८, ३२९, ३३२, ३३३
—लेखकाच्या आदिप्रेरणा ३३०, ३३१
—सांपत्तिक स्थितीचा आयुष्यावर परिणाम ३३१
—हस्तलिखिते ३३४
—सुखशांतीच्या गुरुकिल्ल्या ३३४
—प्रतिभा व नीति ३४५
—कला व नीति ३४५, ३४६, ३४७
—लेखकांनी पाळावयाचे नियम ३४८, ३४९
—लेखनाचा हेतु (गॅल्सवर्दी) ३५०
—अंत:करणाचे पृथक्करण ३५१
—कादंबरीकाराची मनोभूमिका ३५२, ३५३

व

**वेदकालीन स्त्रिया**
—रूढि व नीति ११७
—आर्थिक व शैक्षणिक स्वातंत्र्य ११८, ११९
—विवाह ११९, १२०, १२१
—विधवाविवाह १२१, १२२

**वाङ्मय**
—व्याख्या : (जगन्नाथ पंडित २२२; मम्मट २२२; विश्वनाथ २२२; अय्यगार २२४; गुंडप्पा २२४; केळकर, न. चि. २२४; केतकर २२४; केळकर, द. के. २२४; जोशी, वा. म. २२५; किलरकच २२२; लिड २२२; सायमनिडस् २२२; काझिन्स २२३; लवाक २२३; कार्लाईल २२३; डन्स २२४; इमर्सन २२४; मोर्ले २२४)
—त्याचे व्यसन व उदासीनत २२६
—व्यसन ओळखण्याचे एक गमक २२७, २२८
—यांत जॉन्सन्‌चरित्राची महति २२८
—व्यसनाचे विवेचन २२९-२३३ २४५, २४६, २५०, २५१, २५२
—सेवकाच्या मनोधर्माच विवेचन २३३-२३६
—व्यसन व मन २३७, २३८.
—व्यसन्यांची उदाहरणें २३८, २४०
—वाचनाचा हेतु २४१-२४३
—च्या व्यसनाने होणाऱ्या उदासीन-तेचे प्रकार २४८, २४९
—व्यसनी माणसांचे तीन प्रकार २४८
—प्रकृतीचे त्रिविध भेद २५३
—ज्ञानोपासना व करमणूक २५३-२५५
—ललितवाङ्मय व व्यवहार २७२, २७३

स

**संस्कृति**
—व्याख्या ९५, ९६
—वाढ ९६, ९७
—व राजाश्रय ९७-१००

**संस्कृति**
—प्रसारांत फरक १००
—चा ऱ्हास १०१,१०२
—चिकित्साबुद्धीचा उदय १०२
—प्रवृत्ति व निवृत्ति १०३, १०४
—इतर मतांचा समावेश १०४
—प्रवृत्तिमार्ग व भक्तिमार्ग १०५

**साहित्य**
—त्याचा उद्देश ४८
—त्यांतील 'ब्रह्मराक्षस' ४८-५३
—त्याचें विश्वकुटुंबत्व ५४,५५

**(कानडी) साहित्य**
—साहित्याच्या उत्कर्षाचे काल ५६
—साहित्यांत काय आहे? ५८,५९
—साहित्यांत वीरशैवांचा काल ६०
—ब्राह्मणाचा काल ६१
—जैनांचा काल ५६
—नाटकें व "यक्षगान" ६१
—उच्चवर्णीयांनी केलेली ज्ञानाची कुचंबणा ६२
—साहित्याची ध्येये ६३,६४

# सूचि
## (व्यक्तिपर)


### अ

अभ्यंगार, मारुति वेंकटेश २११, २२४
ॲडिसन् २४१
ॲरिस्टॉटल २६०

### आ

आपटे, हरि नारायण १४९, १६६, २४४, २८१
,, वा. गो. ३६, १७७
,, वा. शि. २४४

### क

कनकदास ६०
कझिन्स् २०५, २२१, २२३, २४७
कार्लाईल १००, १९५, १९७, २२३, ३५५
कार्लाईल् जेन वेल्श् ३५५
कालिदास ४९, ८१, ८२, १३४, १६६, २७५, २८५, ३०२
किर्लोस्कर, अण्णा ६१
क्विलरकूच २२४
केळकर, न. चिं. १३,१८,२४,२५, १४५, १४९, १६२, १७०, २२४,२२७,२३६,२४३,२८८
केळकर, द के. २२५
केतकर, श्री. व्य. २२४
कोल्हटकर, श्री. कृ. ११,२२७
कॅट २६३
कॉन्‌रॅड ३४७

### ख

खांडेकर, वि. स. १४५, १५२, १५८, १५९, १६१

### ग

गटे २०, २१, १९७, २०७, २११, २६३, २६५, २६६, २६७, २८६, २८७, २९७, ३०२, ३०७, ३३३
गडकरी २१, १८०, १८१,२६९, ३०१
गर्दे बाबा २४६
गॅरिक ३०९, ३१०
गांधी २८७, ३०६, ३१०
गॅल्सवर्दी ५१,३४५, ३४८, ३४९
गिबन् १७८, १७९, १८१, २३८, २४०, २९५, २९७, ३०५
गुंडप्पा डी वी. २२४
ग्रे टॉमस् ३१२
गोल्डस्मिथ् १७८, १७९, १८० २१७, २१८, २१९, २५२, २६८, ३०१, ३०६, ३०९, ३१०

### ज

जगन्नाथ पंडित २२२
जवाहरलाल नेहरू ३०६, ३१०
जॉसेफाईन २८९
जॉन्सन् १६, ४८, १६६, १७० २१७, २२७, २२८, २३०,

जॉन्सन २३५, २३९, २४१, २८२, ३०६, ३०९, ३१०, ३२९, ३३१, ३३६
जोशी चिं. वि. १४७
जोशी वा. वि. १४८
जोशी, वा. म. २१४,२२५,२२७, २४३

झ

झेनोफोन ३२८

ट

टागोर ५१, १०७, २३५, २८७, ३२१
टॉलस्टॉय २०७,३४७
टॉड, जॉन (रे.) १४६, १७४, २३९, २४२, २५१
टिळक १०९, १६३, २२७, २८७ ३०६

ड

डॉयल, आर्थर कॉनन् २८५
डिमॉस्थेनिस् २४०
ड्यूरंट विल् २४६

थ

थेलबाई १६६

द

देशपांडे, वाग्भट ना. १४८

न

नायटिंगेल फ्लॉरेन्स १८४, १८५, १८७,१९४
नाथमाधव २३७
नेपोलियन् २८९,३०६

प

पटवर्धन मा. त्र्यं. १४६
परांजपे, शि. म. २०, २३६
पानसे, वेणूबाई २४
पारसनीस १४९, १८१
पास्कल् १६७, ३२९
प्लिनी १०१, १३५,१३८, २०३, २३९, ३२९
पुरंदरदास ६०
पेंडसे, शं. दा. १५०
प्लेटो २६०, २६१, २८३
पै, मा. अ. १४४, १५५, १५९
पोप २४१, ३१५
पोतदार, द. वा. १६
पंप कवि ५६, ५७, ५८

फ

फॉक्स ३३६
फिट्जिरॉल्ड् ३०१
फ्रूड, जे. ए. १९७

ब

बनहट्टी, श्री. ना. १४५
बर्टन् २४८, २५०, २५१
बाणभट्ट ४९, ८२, २७३
बायरन् २७३, २९३, २९५ ३०१
ब्रॉट् चार्लट १९१
बॉस्वेल् १६, १७०, २२७, २२८, २३९, २८२
बिरेल ऑगस्टाईन् ३०७, ३०८
बेरी, जे. बी. ३०७, ३११, ३१२
ब्रूटस ३२३

म

मम्मट २२२
मॅझिनी ३०६, ३५५, ३५८, ३६०
मॅगेस्थेनिस् १३६
माडखोलकर, ग. त्र्य. १५१,१५८
मित्र राजेंद्रलाल १२१
मुनशी २२६
मेकॉले ३३५
मोर्ले २२४
मोरोपंत १३९
मोतिलाल नेहरू १८

र

रस्किन् १००, २०६, २६७
राजवाडे, वि. का. २०, १६३, १८१
रामदास ९५, ९७, १०३
रामकृष्ण परमहंस १०४, १०९, २१६
रामतीर्थ १०९
रामन्, सी. व्ही. २४७, २५३
रूसो ३०७, ३२१
रेनॉल्ड्स, जोशुआ ३०९, ३३१, ३३६

ल

लबॉक २०५, २२३, २६६
लॅंब १९१
लाँगफेलो १००, २७१, ३०१
लॉक ३२९
लिंड्, रॉबर्ट २२२
लुईस, जॉर्ज हेन्री २११, २६५, २८६, २९८
लेसिंग २२३

व

वर्ड्स्वर्थ २०७, २११, २१२
वामन पंडित ५२, ५३
विवेकानंद ८१, १०४, १०९, २२१
विश्वनाथ २२२
वेल्स्, एच्. जी. २८५
वैद्य, चि. वि. २४,२५, २२७, २३७, २४३

श

शॉपेनहार २६३
शिलर १९७,३१०, ३३३
श्रीकंठय्या ४७,५४
शेफील्ड ३१२,३२३,३३५
शेली २१२,२७२,३०१
शेक्सपीयर २३८,२८६,२८७, ३०१, ३०२, ३४६, ३४७, ३४८

स

सरदेसाई, गो. स. १५२, १५[illegible] १६४,१७७,१८१
सरकार, यदुनाथ २२
सर्व्हांटिस ३०६, ३१०
सॉक्रेटीस २६३
स्कॉट् ३०२
सिसिरो २३८, ३२८
सीझर १६९,२०४, २३८, ३२[illegible]
सीतारामय्या ६७
स्टीव्हनूसन्, आर्. एल्. १९०
सीमोर विपट्रिस् १८४
स्पिनोझा २८५

स

स्मिटन्, ३०७,३०८,३०९

ह

व्हर्जिल ३२८

हिल बर्कबेक् ३३८
व्हॉल्टेर ३१७, ३२९
होमर ३२९, ३४८
होल्ट हॅलॅम २५५

# प्रमुख संदर्भग्रंथ

## संस्कृत


१ श्रीमद्भगवद्गीता
२ कालिदास मेघदूतम् (निर्णयसागर छापखाना, मुंबई)
३ बाणभट्ट कादंबरी कथा ( ,, ,, ,, )


## कानडी


१ अय्यंगार, मास्ती वेंकटेश साहित्य (बेंगळूर प्रेस, बेंगळूर)
२ ,, ,, कर्णाटक जनतेय संस्कृति (,, ,, ,, )
३ गुंडप्पा, डी. वी. साहित्य मत्तु विज्ञान (,, ,, ,, )
४ राघवेंद्राचार्य, एच्. एन्. भारतीय तत्त्वशास्त्रसंग्रह (प्रकाशकः—मैसूर विश्वविद्यानिलय, मूल्य ६ रु.)


## मराठी


१ आपटे, वासुदेव गोविंद (१) माणिकबाग (कादंबरी) (मनोरंजक ग्रंथ-प्रसारक मंडळी; मूल्य २ रु.) मनोरंजन कार्यालय, मुंबई ४
(२) लेखनकला व लेखनव्यवसाय (आनंदकार्यालय, पुणें; मूल्य १॥ रु.)
२ आपटे, हरि नारायण पण लक्षांत कोण घेतो ! (कादंबरी) (आर्यभूषण छापखाना, पुणें)
३ केळकर, नरसिंह चिंतामण (१) मौजेचे चार प्रहर (कथासंग्रह) (मूल्य १ रु.)
(२) तोतयाचें बंड (नाटक) (मूल्य १ रु.)
४ गर्दे, खंडो कृष्ण (ऊर्फ 'बाबा') ब्रह्मसिद्धांतमाला (श्रीरामतत्त्व-प्रकाश छापखाना, बेळगांव; मूल्य २ रु.)
५ गडकरी, राम गणेश एकच प्याला (नाटक)
६ सरदेसाई, गोविंद सखाराम श्यामकांताचीं पत्रें

# इंग्लिश

(कोश)

The Encyclopaedia Britannica (Eleventh edition)

(ग्रंथ)

(1) *Boswell, James* :— Life of Dr. Samuel Johnson (John Lane, The Bodley Head, Ltd, London)

(2) *Burton, Robert* :— Anatomy of Melancholy (Chatto & Windus, Piccadilly, London)

(3) *Doyle, Arthur Conan* (1) Adventures of Sherlock Holmes, (2) Memoirs of Sherlock Holmes (John Murray, London)

(4) *Durant, Will* :— (1) The Story of Philosophy (Garden City Publishing Co., New York, (2) On the Meaning of Life (William & Norgate, Ltd., London)

(5) *Dutt, Romesh Chunder* :— History of Civilization in Ancient India (4 volumes) (Thacker, Spink & Co., Calcutta)

(6) *Forster John* :— Life of Oliver Goldsmith

(7) *Froude, James Anthony* :— Thomas Carlyle, History of his life in London (2 volumes) (Longmans Green & Co, London)

(8) *Galt John* :— The Life of Lord Byron.

(9) *Galsworthy, John*:—Life and Letters of

(10) *Gibbon, Edward* :— (1) Autobiography with an introduction by Prof. J. B. Bury (Oxford University Press, London) (2) Same with an introduction by Prof. Smeaton

(11) *Goldsmith, Oliver* .– (1) The Vicar of Wakefield (2) The Traveller (3) The Deserted Village

(12) *Guiccioli, Countess* : My Recollections of Lord Byron (2 volumes) (Richard Bentley, London, 1869)

(13) *Lewes, George Henry* :— Life of Goethe (Smith, Elder & Co., London)

(14) *Lubbock, John* :— Pleasures of Life

(15) *Masson* :— Memoir of Oliver Goldsmith

(16) *Moore, Thomas* :— The Letters and Journals of Lord Byron with notices of his life (2 volumes) (John Murray, London, 1873)

(17) *Mukerji, Radhakumud* :— A History of Indian Shipping and Maritime Activity (Longmans Green & Co., Calcutta)

(18) *Napoleon* :— Memoirs and Letters of

(19) *Tagore, Rabindranath* :— The Golden Book of Tagore (Edited by Ramananda Chatterjee & published by the Golden Book Committee, Calcutta, 1931)

(20) *Todd, John* :— Students' Manual

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | |
|---|---|---|---|
| ३६ | २ | कादंबरा | कादंबरी |
| ४० | ४ | त्यांतून | त्यांतून |
| ४८ | २७ | कवीची | कवींची |
| ५३ | ३ | पडिता | पंडिता |
| ५६ | २१ | पूर्वापार | पूर्वापार |
| ५८ | १० | जैनानी | जैनांनीं |
| ६२ | १ | ङ्मवाय व जीवति | वाङ्मय, लेखन व जीवित |
| ६२ | २ | कुचंवणा | कुचंबणा |
| ७३ | ४ | आम च्या | आमच्या |
| ७३ | १० | माथा | माथीं |
| ८१ | १६ | ताव्रतेनें | तीव्रतेनें |
| ८१ | २६ | सागाव ! | सागावें ! |
| ८७ | ६ | उघल्यास | उघडल्यास |
| ९२ | १८ | यण | येणें |
| ९२ | २१ | याजमधाल | याजमधील |
| ९४ | १७ | ध्ययच | ध्येयच |
| ९४ | १९ | देवीची | देवाची |
| ९६ | ५ | झाल्याावांचून | झाल्यावांचून |
| १०३ | १ | सोसावा | सोसावी |
| १७१ | २६ | ताडात | तोंडांत |
| १९३ | २५ | त्याबराबरचे | त्याबरोबरच |
| २४७ | ५ | मह-महत्त्वाचे | महत्त्वाचे |
| २५९ | १ | ।वषय | विषय |
| २८५ | १५ | माननेवरच | भावनेवरच |
| २९७ | १४ | बोद्धिक | बौद्धिक |
| ३०२ | ७ | शका | शंका |